मोह पाडून, तुला, आणि, तुझ्या प्रिय विषयांनाही, एकदमच क्षणभरांत क्षयाला नेईल

———•———

पंढरपूरच्या श्रीविठ्ठलाची अशीच मोहिनी प्रवाशांवर पडते! प्रवाशांनो! सभाळा!

मा यात पांथाः पथि भीमरथ्याः ।
दिगंबरः कोऽपि तमालनीलः ॥
विन्यस्तहस्तोऽपि नितम्बबिम्बे ।
धूर्तः समाकर्षति चित्तवित्तम् ॥ २० ॥

उपजाति

भीमेकडे जाऊं नकोस पांथ।
तो नग्न तेथें कुणि शामकांत ॥
कटीसही ठेवुन हस्त, धूर्त।
चोरी क्षणीं रे तव चित्तवित्त ॥ २० ॥

गद्य अर्थ—

प्रवाशांनो! भीमेकडे जाणाऱ्या मार्गाला जाऊं नका! तेथें एक नग्न श्यामलवर्ण उभा आहे! तो आपले हात, आपल्या कटीवर ठेवून (तुमच्याकडे ते न आणतांही) धूर्त, तुमचें चित्त रूपी वित्त, पाहतां पाहतां, क्षणभरांत, लांबवील

———•———

चूडोत्तंसितचारुचंद्रकलिकाचञ्चच्छिखाभासुरो
लीलादग्धविलोलकामशलभः श्रेयोदशाग्रे स्फुरन् ॥
अंतःस्फूर्जदपारमोहतिमिरप्राग्भारमुच्चाटयन्
चेतःसद्मनि योगिनां विजयते ज्ञानप्रदीपो हरः ॥२१॥

शार्दूलविक्रीडित

ज्याच्या मस्तकिं चंद्रकोर हलती शुभ्र प्रभासुंदर
मारी खेळत कामरूप शलभा जो 'श्रेय' ज्योतीवर ॥
मोहाचा घन अंधकारगिरि जो, चित्तांतुनी उद्धरी
राहो तेवत ज्ञानदीप शिव तो योगीमनो-
मंदिरीं ॥ २१ ॥

गद्य अर्थ—

ज्याच्या मस्तकीं, चंद्राची सुंदर हलती तेजस्वी कोर आहे, 'श्रेयस्' रूपी ज्योतीवर जो कामरूपी टोळ लीलेनें जाळून टाकतो, मानव हृदयांतून, मोहरूपी अंधारपर्वताचा भार, जो, उचलून फेकून देतो, असा तो, ज्ञानदीप शिव, योगीमनोमंदिरीं तेवत राहो!

———•———

भीतिर्नैव भुजङ्गपुङ्गवविषात्; प्रीतिर्न चंद्रामृता—
च्छौचं नृकपालकण्ठलुलनाच्छौचं न गंगाजलात् ॥
नोद्वेगश्चितिभस्मतो न च सुखं गौरीस्तनालिङ्गना—
दात्मारामतया हिताहितसमः स्वस्थो हरः पातु
वः ॥ २२ ॥

शार्दूलविक्रीडित

ज्यातें सर्पविषें न भीति, अथवा चंद्रामृतें प्रीति न
रुंडांचा न विटाळ, वा न शुचिता गंगाजळें न्हाउन ॥
भस्माचें न च दुःख, सौख्य नच वा आलिंगुनी
पार्वती
रक्षो तो शिव! आत्मतृप्त, सम ज्या दुःखें सुखें
सर्व तीं ॥ २२ ॥

गद्य अर्थ—

ज्याला गळ्यांतील महासर्पाच्या विषाचें भय वाटत नाहीं, वा मस्तकावरील चंद्राच्या अमृताचें प्रेम वाटत नाहीं, गळ्यांतील रुंडमालेचा विटाळ नाहीं, वा डोक्यावरील गंगाजळाच पावित्र्य वाटत नाहीं, अंगाला चिताभस्म लावण्याचें दुःख नाहीं वा पार्वतीला आलिंगिण्याचें सुख वाटत नाहीं, असा आत्मतृप्त, सुखीं दुःखीं समवृत्ति ठेवणारा शंकर तुमचें रक्षण करो

———•———

अहिभूषणोऽप्यभयदः सुकलितहालाहलोऽपि यो नित्यः।
दिग्वसनोऽप्यखिलेशस्तं शशधरशेखरं वन्दे ॥ २३ ॥

वसंततिलका

देई जगा अभय, नाग गळां असून
हालाहला पिउनि, नित्यचि जो अजून ॥
होई दिगंबर, तरी अखिलेश राहे
त्या नित्य वंदन असो शशिशेखरा हें ॥ २३ ॥

गद्य अर्थ—

ज्याच्या गळ्यांत सर्पाचा अलंकार असतां, जो जगाला अभय देतो, हालाहल पिऊनही जो नित्य अमर राहतो, दिगंबर असून जो अखिल सृष्टीचा ईश आहे, त्या चंद्रशेखराला वंदन करतों

———•———

करचरणकृतं वाक्कायजं कर्मजं वा
श्रवणनयनजं वा मानसं वापराधम् ।

येनाञ्जितानि नयनानि मृगांगनानां
को वा करोति रुचिराङ्गरुहान्मयूरान् ॥
को वोत्पलेषु दलसंनिचयं करोति
को वा करोति विनयं कुलजेषु पुंसु ? ॥ २९ ॥

वसंततिलका

केलें मृगीनयनिं अंजन सांग कोणीं ?
मोरां दिलीं विविधरंग पिसेंहि कोणीं ? ॥
पद्मांस नीलदलभारहि देइ कोण ?
या देतसे विनय सत्कुलजांस कोण ? ॥ २९ ॥

गद्य अर्थ—

हरणींचे डोळे घाळून घातल्यासारखे काळे कोर कोणी केले ? मयूरांना सुंदर रंगीबेरंगी पिसें कोणीं दिलीं ? नीलकमलांना त्याच्या सुंदर पाकळ्या कोण देतो ? सुकुलीन माणसांना ( अलंकारासारखा मनोहर ) विनय कोण देतो ?

———

आकाशात्पतितं तोयं यथा गच्छति सागरम् ।
सर्व-देव-नमस्कारः केशवं प्रति गच्छति ॥ ३० ॥

भुजंगप्रयात

पडे खालतीं जे नभांतून पाणी ।
जसें सागरातेंच जातें मिळोनी ॥
नमस्कार कोणाहि देवास केला ।
तरी अंतिं तो पोंचतो केशवाला ॥ ३० ॥

गद्य अर्थ—

आकाशांतून पडलेलें पाणी ( मग तें कोठेही पडलेलें असो ) जसें शेवटीं समुद्रासच जाऊन मिळतें; तद्वतच, कोणाही देवाला केलेला नमस्कार अखेर केशवालाच पोंचतो

———

प्रार्थना

असतो मा सद्गमय ।
तमसो मा ज्योतिर्गमय ।
मृत्योर्माऽमृतं गमय ॥ ३१ ॥

अनुष्टुभ्

जे नाहींच ( वाईट ) तयांतून सत्तत्त्वा ( चांगल्या ) प्रत ने मला ॥
मृत्युपासुन मोक्षाला-अंधारांतुनि ज्योतिला ॥ ३१ ॥

गद्य अर्थ—

हे परमेश्वरा ! असत्यापासून मला अस्तित्वाप्रत ने, ( किंवा वाईटापासून मला चांगल्याकडे ने ) मरणापासून मला अमरताप्रत ने अंधारापासून मला प्रकाशाकडे ने

———

भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवाः
भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ॥
स्थिरैरङ्गैस्तुष्टुवांसस्तनूभिः
व्यशेमहि देवहितं यदायुः ॥ ३२ ॥

शार्दूलविक्रीडित

हे यज्ञप्रिय देव ! नित्य असुच्या कानीं पडो मंगल
नेत्रांनाहि दिसो सदैव अनघें जे जे असे निर्मल ॥
हें आम्ही स्तवितों स्थिरेंद्रिय अशी एकाग्रता साधुनी
जावो जीवित आमुचें प्रभु ! तुझ्या, संपूर्ण, आराधनीं ॥ ३२ ॥

गद्य अर्थ—

हे यज्ञप्रिय देवा ! आमच्या कानीं नेहमीं मंगलच पडो, डोळ्यांना नेहमीं मंगलच दिसो, आम्ही सर्वावयवीं एकाग्रता साधून, तुझें स्तवन करून, एवढेंच मागतों कीं, तुझ्या सेवेंतच आमचें जीवन व्यतीत होवो

———

प्रजापते ! न त्वदेतान्यन्यो
विश्वा जातानि परि ता बभूव ।
यत्कामास्ते जुहुमस्तन्नो अस्तु
वयं स्याम पतयो रयीणाम् ॥ ३३ ॥

शार्दूलविक्रीडित

हे देवा परमेश्वरा ! सकलचीं हें विश्व जे जन्मलें
नाहीं अन्य कुणी, तुझ्याविण, तया व्यापोनिया राहिलें ॥
ज्या इच्छा धरुनीच यज्ञ करितों, त्या पूर्ण व्हाव्या झणीं
वित्तांचे, जगिंच्या, अनेकविध त्या, आम्ही असावे धनी ॥ ३३ ॥

गद्य अर्थ—

प्रजापते, या उत्पन्न झालेल्या सर्व विश्वाला तुजवांचून अन्य कोणी व्यापून राहिलेलें नाहीं ज्या इच्छा धरून आम्ही यज्ञ करतों त्या पूर्ण होवोत विविध ऐहिक संपत्तीचे आम्ही धनी व्हावें

———

समानी व आकूतिः समाना हृदयानि वः ।
समानमस्तु वो मनो यथा वः सुसहासति ॥३४॥

अनुष्टुभ्

विचारैक्य मिळो चित्तीं हृदयीं एकता अशी-
कीं कार्यें तुमचीं व्हावीं सुसंघटित नीटशीं ॥ ३४ ॥

तुमचे (आमचे) विचार (आशाआकांक्षा) समान असोत. हृदयें व मनें यांची अशी एकता होवो की, त्यामुळें सर्व कार्यांमध्यें सुसंघटितपणा येवो.

---

काले वर्षतु पर्जन्यः पृथिवी सस्यशालिनी ।
देशोऽयं क्षोभरहितः सज्जनाः सन्तु निर्भयाः ॥ ३५ ॥

अनुष्टुभ्

वेळींच वृष्टि होवो; ही । पिकांनींच फुलो मही ॥
या देशीं क्षोभ होवो न । व्हावे निर्भय सज्जन ॥ ३५ ॥

गद्य अर्थ—

योग्यवेळीं पाऊस पडो व पृथ्वी धनधान्यादींनीं समृद्ध होवो. या देशांत क्षोभ नसो (शांति राहो.) सज्जनांना कुणापासूनही भय नसो.

---

सर्वेऽत्र सुखिनः सन्तु सर्वे सन्तु निरामयाः ।
सर्वे भद्राणि पश्यन्तु न कश्चित् दुःखमाप्नुयात् ॥३६॥

अनुष्टुभ्

सुख सर्वां मिळो; येथें । निरोगीच असोत ते ।
दिसो कल्याण सर्वांना । दुःखही न घडो कुणा ॥ ३६ ॥

गद्य अर्थ—

या जगीं सर्वांना सुख मिळो; सर्व रोगमुक्त असोत, सर्वांना कल्याण दिसो; दुःख कोणालाही न होवो.

---

न त्वहं कामये राज्यं न स्वर्गं न पुनर्भवम् ।
कामये दुःखतप्तानां प्राणिनामार्तिनाशनम् ॥ ३७ ॥

अनुष्टुभ्

न स्वर्ग न पुनर्जन्म, नको साम्राज्यही मला ।
दुःखितांचें दुःख जावो हाचि हो ध्यास लागला ॥३७॥

गद्य अर्थ—

मला राज्य नको, स्वर्ग नको, (अधिक चांगला) पुनर्जन्म नको, दुःखपीडितांचें दुःख नष्ट होवो एवढेंच मी इच्छितों !

---

ॐ मधुवाता ऋतायते । मधु क्षरन्तु सिंधवः माध्वीर्नः सन्त्वोषधीः ॥ मधु नक्तमुतोषसि । मधुमत् पार्थिवं रजः । मधु द्यौरस्तु नः पिता ॥ मधुमान्नो वनस्पतिः । मधुमाँ अस्तु सूर्यः । माध्वीर्गावो भवन्तु नः ॥ ३८ ॥

वसंततिलका

वाहोत हे झुळुं झुळूं मधु मंद वात
राहो वहात जल गोडचि या नद्यांत ॥
देवोत औषधि अम्हां रस गोड भारी
रात्री प्रभातहि असो मधु सौख्यकारी ॥
वर्तोत गोड जन पार्थिव ते अम्हांस
वृष्टीमुळें नभ करो जगरक्षणास ॥
झाडांतुनी मधुरची रस पाझरोत
आरोग्यदायक असो रवि तो नभस्थ ॥
देवोत दुग्ध मधु गोडचि नित्य गायी
होवो अशी अखिल सृष्टिच सौख्यदायी ॥३८॥

गद्य अर्थ—

वारे मधुर वाहोत, नद्यांत गोड पाणी राहो. औषधि मधुर असोत. रात्र, उषा मधुर असोत. लोक आमच्याशीं मधुर वर्तोत नभातून मधुर वृष्टी होऊन जगद्रक्षण होवो; झाडें मधुर रस स्रवोत. सूर्य मधुर (आरोग्य) देवो. गाई मधुर दूध देवोत.

---

श्रीशंकराचार्यविरचित परापूजा

पूर्णस्यावाहनं कुत्र ? सर्वाधारस्य चासनम् ?
स्वच्छस्य पाद्यमर्घ्यं च शुद्धस्याचमनं कुतः ?
निर्मलस्य कुतः स्नानं वस्त्रं विश्वोदरस्य च ?
निरालम्बस्योपवीतं पुष्पं निर्वासनस्य च ?
निर्लेपस्य कुतो गंधो रम्यस्याभरणं कुतः ?
नित्यतृप्तस्य नैवेद्यं ताम्बूलं च कुतो विभोः ?
प्रदक्षिणा ह्यनंतस्य ह्यद्वयस्य कुतो नतिः ?
वेदवाक्यैरवेद्यस्य कुतः स्तोत्रं विधीयते ?
स्वयं प्रकाशमानस्य कुतो नीराजनं विभोः ?
अंतर्बहिश्च पूर्णस्य कथमुद्वसनं भवेत् ? ॥ ३९ ॥

( चाल-चराचरीं तू )

विश्वव्यापी ईशा, करणें आवाहन कैचें ?
सर्वाधारा आसन द्यावें, मनुजानें कुठचें ? ॥
स्वच्छ, स्वच्छतर होई कैसा पाद्यअर्घ्यदानें ?
शुद्धालागीं, व्यर्थचि न च कां आचमनें करणें ? ॥
निर्मलची जो, त्यास कशाला स्नानहि घालावें ?
विश्वें उदरीं, त्यास पुरेसें वस्त्र कुठुनि द्यावें ? ॥
अर्यांतरीं जो, त्यास घालणें कसें जानवें तें ?
निरिच्छ जो, त्या मोद कोठला हुंगुनि पुष्पातें ? ॥
निर्लेपाच्या पुढें प्रतिष्ठा काय सुगंधांची ?
जातीच्या सुंदरास शोभा कुठुनि भूषणांची ? ॥
नित्यतृप्त, त्या नैवेद्याचें खाद्य फोल होतें
भोजन नसतां, तांबूलाचें व्यर्थचि सेवन तें ॥
प्रदक्षिणा कधि करूं शके कां, अनंतास कोणी ?
दोन न तू मी; नमन करूं कां मी माझ्या चरणीं ? ॥
ज्ञान न ज्याचें देऊं शकली वेदांची वाणी
स्तुति मी पामर, कशी करूं तव, कुठल्या स्तोत्रांनीं ? ॥
स्वयंप्रकाशा ! व्यर्थ तुजपुढें नीरांजन वाटे
सर्वत्रचि जो भरला त्याचें विसर्जनहि कोठें ? ॥ ३९ ॥
( पार्थिव पूजा-विधि हा व्यर्थचि निराकार ! तुजला
म्हणुनी केवळ मानसपूजा हाच मार्ग उरला ॥ )

गद्य अर्थ—

जर परमेश्वर निराकार निर्विकार इत्यादि आहे, तर, त्याची षोडशोपचारें पूजा करणें कसें अशक्य आहे, तें, आचार्यांनीं, या स्तोत्रांत, ओळींनें सांगितलें आहे.

(१) विश्वव्यापी तू; तुला **आवाहन** कसें करणार? (२) सर्वांचा आधार तू; तुला **आसन** कसें देणार? (३) मूळांनच तू स्वच्छ; तुला **पाद्यअर्घ्य** वा (४) **आचमनें** देऊन अधिक स्वच्छ, कसें करणार? (५) स्वयंनिर्मलाला, **स्नान** कसलें? (६) ज्याच्या उदरीं विश्व, त्याला **वस्त्र** कुठून देणार? (७) अर्यांतरीं तू; तुला **उपवीत** कसें घालणार? (८) निरिच्छ तू; तुला **फुलांनीं** काय आनंद? (९) निर्लेप तू; तुला **सुगंध** कसले? (१०) जन्मजात सुंदराला **अलंकार** कसले? (११) नित्य तृप्ताला **नैवेद्य** कशाला? (१२) भोजन नसतां, **तांबूल** कसलें? (१३) अनंत तू; तुला **प्रदक्षिणा** कशी घालणार? (१४) अद्वैतामुळें, तू व मी जर एक, तर मीच मला **नमन** करूं? (१५) वेदांना अवेद्य तू व वर स्वयंप्रकाशी, तुला कुठल्या स्तोत्रांनीं व कुठल्या **नीरांजनानें** ओवाळावें? (१६) सर्वांत अंतर्बाह्य तू; तुझें विसर्जन तरी कोठें करणार?



---

राष्ट्रीय स्वयंसेवक संघ प्रार्थना

नमस्ते सदा वत्सले मातृभूमे !
त्वया हिंदुभूमे ! सुखं वर्धितोऽहम् ॥
महामङ्गले पुण्यभूमे ! त्वदर्थे
पतत्वेष कायो नमस्ते नमस्ते ॥ १ ॥

प्रभो ! शक्तिमन् ! हिन्दुराष्ट्राङ्गभूता
इमे सादरं त्वां नमामो वयम् ॥
त्वदीयाय कार्याय बद्धा कटीयम्
शुभामाशिषं देहि तत्पूर्तये ॥ २ ॥

समुत्कर्षनिःश्रेयसस्यैकमुग्रं
परं साधनं नाम वीरव्रतम् ॥
तदन्तः स्फुरत्वक्षया ध्येयनिष्ठा
हृदन्तः प्रजागर्तु तीव्रानिशम् ॥ ३ ॥

अजय्यां च विश्वस्य देहीश ! शक्तिं
सुशीलं जगद्येन नम्रं भवेत् ॥
श्रुतं चैव यत्कण्टकाकीर्णमार्गं
स्वयं स्वीकृतं नः सुगं कारयेत् ॥ ४ ॥

विजेत्री च नः संहता कार्यशक्ति-
र्विधायास्य धर्मस्य संरक्षणम् ॥
परं वैभवं नेतुमेतत्स्वराष्ट्रं
समर्था भवत्वाशिषा ते भृशम् ॥ ५ ॥
॥ ४० ॥

शार्दूलविक्रीडित

नित्याचें तुज मातृभूमि ! करितों हे वत्सले ! वंदन
देवोनी सुख, हिंदुभूमि ! मम तूं केलेंस संवर्धन ॥
मोठी मंगल, पुण्यभूमि असशी, माते ! तुझ्या कारणीं
माझा देह पडो ! सदा विनत मी राहो तुझ्या चंदनीं ॥ १ ॥

आम्ही आदरयुक्त नागरिक हे या हिंदुराष्ट्रांतले
मोठी शक्ति तुझी म्हणून नमितों देवा! तुझीं पाउलें॥
कार्याला तुझियाच बांधुनि कटी आहों सदा सिद्ध रे
आशीर्वादहि देइ कीं "सकलही तें कार्य होवो पुरें"॥२॥
देण्या ऐहिक वैभवासह नरा निःश्रेयसप्राप्ति ती
"वीराचें व्रत उग्र साधन" असें जे सुज्ञ ते सांगती॥
त्याच्यांतूनचि नित्य अक्षय अशी ध्येयैकनिष्ठा स्फुरो॥
राहो जागृत ती सदैव हृदयीं; व्यापून त्या ती
उरो॥३॥
जिंकू विश्व शके न जीस, असली दे शक्ति आम्हांप्रत
जेणें विश्व सुशील नम्र बनुनी राहील हें नांदत॥
आहे कंटकपूर्ण मार्ग अमुचा हें ऐकियेलें, परी—
केला स्वीकृत जो स्वयें, सुगम त्या, हे ईश्वरा! तू
करीं॥४॥
एकत्रीकृत कार्यशक्ति अमुची साऱ्या जगा जिंकुन
धर्माचें अमुच्या हियाचकडुनी होऊन संरक्षण॥
नेण्याला परवैभवास अमुच्या या हिंदुराष्ट्रा क्षणीं
होवो पूर्ण समर्थ ती, प्रभु! तुझ्या आशीर्वचा
लाभुनी॥५॥ ॥४०॥

———

महिमानं यदुत्कीर्त्य तव संह्रियते वचः।
श्रमेण तदशक्त्या वा न गुणानामियत्तया॥४१॥

आर्या

वर्णुनि तव महिमा, जें भाग पडे रोचणें
परत वाणी।
थकुनी, अशक्तिनें तें, न गुणांचा अंत
तव दिसे म्हणुनी॥४१॥

गद्य अर्थ—

परमेशा! तुझा महिमा वर्णन करतां वाणी कुंठित होते त्याचें कारण, तुझे गुण संपले, हें नसून, ती थकल्यामुळें, होय.

———

असितगिरिसमं स्यात् कज्जलं सिंधुपात्रे
सुरतरुवरशाखा लेखनी, पत्रमुर्वी॥
लिखति यदि गृहीत्वा शारदा सर्वकालं
तदपि तव गुणानामीश पारं न याति॥४२॥

मालिनी

गिरिसम जरि ओलें काजळी सागरांतीं।
सुरतरुवरशाखा लेखनी, पत्र भू ती॥
धरुनि जरि लिही ती शारदा सर्वकाल।
तरि न तव गुणांच्या पार जाऊं शकेल॥४२॥

गद्य अर्थ—

डोंगराएवढी काजळी, समुद्ररूपी दौतींत (घालून शाई केली), देवदाराची शाखा ही लेखणी, भूपृष्ठ हाच कागद करून, प्रत्यक्ष शारदादेवी, काळाच्या अंतापर्यंत, लिहीत बसली, तरी, हे देवा! ती तुझ्या गुणाच्या शेवटास पोंचू शकणार नाहीं.

———

अभिप्रेतार्थसिद्ध्यर्थं पूजितो यः सुरासुरैः।
सर्वविघ्नच्छिदे तस्मै गणाधिपतये नमः॥४३॥

अनुष्टुभ्

इच्छिलें तें मिळे देवां-दानवां, ज्यास पूजुन।
सर्वविघ्नहरा ऐश्या त्या गणेशास वंदन॥४३॥

गद्य अर्थ—

देव असोत, दानव असोत, इष्टसिद्धीसाठीं ज्याची पूजा करितात, अशा त्या सर्व विघ्ननाशक गणेशास वंदन.

———

मंगलाचरणाचा शेवट ज्ञानेशांच्याच शब्दांत

आतां विश्वात्मकें देवें। येणें वाग्यज्ञें तोषावें॥
तोषोनि मज द्यावें। पसायदान हें॥—
"जे खळांची व्यंकटी सांडो। तयां सत्कर्मीं
रति वाढो।
भूतां परस्परें पडो। मैत्र जीवाचें॥
दुरिताचें तिमिर जावो। विश्व स्वधर्मसूर्यें पाहो।
जो जें वांछील तो तें लाहो। प्राणिजात॥४४॥"

उपजाति

म्हणोनि विश्वात्मक देवदेवें।
वाग्यज्ञ हा पाहुनि तुष्ट व्हावें॥
संपूर्ण संतुष्ट असें बनून।
द्यावें मला हेंच पसायदान॥—
"दुष्टांतला दुष्टपणाच सांडो।
सत्कर्मिं त्यांतें रति नित्य वाढो॥
परस्परांच्या प्रति भूतमात्र।
जीवश्च कंठश्च असोत मित्र॥
पापस्वरूपी तम दूर जावो।
स्वधर्मसूर्यें नित विश्व पाहो॥
इच्छील जें जें मनिं जीवजात।
होवोच तें तें क्षणिं त्यास प्राप्त॥४४॥"

———

# प्रकरण दुसरें

विषय—वाग्देवता, सरस्वती, वाल्मीकि यांना वंदना; सुभाषित, सूक्ति, वाणी, शब्द, अर्थ, उपमा, प्रसाद, पद, पदलालित्य, वृत्त, श्लोक, रस, श्लेष, रचना, अलंकार, वक्रोक्ति, काव्य, कविता, सूचकता, कवि, महाकवि, कविब्रुव, अल्पकवि, रसज्ञ, अरसिक, भाषांतर, कविविशेष — कालिदास, भवभूति, चोर, मयूर, हर्ष, बाण, भास, मुरारि, जगन्नाथ.

अपूर्वः कोऽपि कोपोऽयं विद्यते तव भारति ।
व्ययतो वृद्धिमायाति क्षयमायाति सञ्चयात् ॥ १ ॥

अनुष्टुभ्

हे वाग्देवि ! तुझा कोप विचित्रचि किती असे !
देतां वाढे, सांचवोनी, त्याचा क्षयचि होतसे ॥ १ ॥

गद्यार्थ—

हे शब्ददेवते ! ( ज्ञानदेवते ) तुझें भांडार मोठें विचित्र आहे. दिल्यानें तें वाढतें–सांठविल्यानें क्षय पावतें !

सदूषणाऽपि निर्दोषा सखराऽपि सुकोमला ।
नमस्तस्मै कृता येन रम्या रामायणी कथा ॥ २ ॥

उपजाति

सदूषणा जी तरि दोषहीन ।
सुकोमला जी सखरा असून ॥
नमूं कवी तो, रचिली जयानें ।
रामायणी रम्य कथा प्रयत्नें ॥ २ ॥

गद्यार्थ—

( दूषण व खर हे रामायणांतील दोन राक्षस. त्यांच्यावरून सदूषणा व सखरा या शब्दांत श्लेषाची कोटि. ) ज्यानें सदूषणा ( दोषपूर्ण, पक्षीं, दूषण ज्यांत आहे अशी ) असून जी कथा निर्दोष केली, तसेंच सखरा ( खर म्हणजे रूक्ष. पक्षीं– राक्षस जींत आहे अशी ) असून ज्यानें रामायणकथा कोमल व रम्य केली त्या ( वाल्मीकि ) कवीला नमस्कार असो.

द्राक्षा म्लानमुखी जाता शर्करा चाश्मतां गता ।
सुभाषितरसस्याग्रे सुधा भीता दिवं गता ॥ ३ ॥

वसंततिलका

कोणी सुभाषितरसापुढतीं टिके न;
द्राक्षे तयास वनलीं बघुनीच म्लान ॥
झाली शिलाच थिजुनी जणुं शर्करा ती
स्वर्गीं पळे अमृत, थोर धरून भीति ॥ ३ ॥

गद्यार्थ—

सुभाषितरसापुढें द्राक्षें म्लानमुखी ( जांभळीं काळीं निळीं ) झालीं. साखर थिजून खडीसाखर ( दगड ) झाली आणि अमृत भिऊन जें पळालें तें थेट स्वर्गांत.

पृथिव्यां त्रीणि रत्नानि जलमन्नं सुभाषितम् ।
मूढैः पाषाणखण्डेषु रत्नसंज्ञा विधीयते ॥ ४ ॥

अनुष्टुभ्

रत्नें तीनच भूलोकीं–जल, अन्न, सुभाषितें ।
परि देती शिलाखंडा–रत्न हें नांव मूर्ख ते ॥ ४ ॥

गद्यार्थ—

खरोखर ज्यांना रत्न म्हणावें अशा तीनच वस्तु या जगीं आहेत त्या म्हणजे पाणी, अन्न व सुभाषितें. मूर्ख मात्र कांहीं शिलाखंडांना, रत्न हें नांव देत असतात.

नायं प्रयाति विकृतिं, विरसो न यः स्यात्
न क्षीयते बहुजनैर्नितरां निपीतः ॥
जाड्यं निहन्ति, रुचिमेति, करोति तृप्तिं
नूनं सुभाषितरसोऽन्यरसातिशायी ॥ ५ ॥

वसंततिलका

नासे न जो, विरस वा कधिं जो बनेना
साऱ्या जनें पिउनिहीं मुळिं जो घटेना ॥
नाशून जाड्य, रुचि देउनि तोषवील
साऱ्या रसांतहि सुभाषित हाच थोर ॥ ५ ॥

गद्यार्थ —

जो नासत नाहीं, नीरस होत नाहीं, कोणी कितीही प्याले तरी कमी होत नाहीं, जडत्व नष्ट करून रुचि व तृप्ति देतो, असा सुभाषितरस अन्य सर्व रसांना मागें सारतो

———०———

बोद्धारो मत्सरग्रस्ताः प्रभवः स्मयदूषिताः ।
अबोधोपहताश्चान्ये जीर्णमङ्गे सुभाषितम् ॥ ६ ॥

अनुष्टुभ्

जाणते मत्सरग्रस्त, राजे-श्रीमंत गर्वित ।
दुजे कांहीं न जाणीत, जिरे अंगीं सुभाषित ॥६॥

गद्यार्थ—

(सुभाषित सांगावें तरी कोणापुढें?) जाणते आहेत त्याना हेवा वाटतो, राजे, धनिक हे आपल्याच गर्वात आहेत इतर कोणी आहेत त्याना समजण्याची अकल नाहीं–हाय ! हाय ! सुभाषित हृदयांतल्या हृदयातच जिरण्याची पाळी आली !

———०———

भाषासु मुख्या मधुरा दिव्या गीर्वाणभारती ।
तस्माद्धि काव्यं मधुरं तस्मादपि सुभाषितम् ॥ ७ ॥

आर्या

भाषांत मुख्य सुमधुर,
देवांची दिव्य संस्कृतचि वाणी ।
त्यांतुनि सुकाव्य सुमधुर,
मधुर सुभाषित परी तयांहूनी ॥ ७ ॥

गद्यार्थ—

सर्व भाषांत प्रमुख, देवांची दिव्य गोड संस्कृत, हीच भाषा होय. त्या भाषेंतलें काव्य तिच्याहून गोड. त्याहून, त्यांतलीं सुभाषितें तर सर्वांत गोड.

———०———

सुभाषित-मय-द्रव्य-संग्रहं न करोति यः ।
प्रस्तावयज्ञे संप्राप्ते कां प्रदास्यति दक्षिणाम् ? ॥ ८ ॥

आर्या

जो न सुभाषितरूपी, द्रव्य कधीं ठेवणार जन्मयोनी ।
भाषण-यज्ञीं मग तो, देई सौवर्णदक्षिणा कुठुनी?॥८॥

गद्यार्थ—

जो कोणी सुभाषितरूपी द्रव्य साचवणार नाहीं तो, (सभेंत) भाषणरूपी यज्ञ करण्याच्या वेळीं, सु-वर्ण दक्षिणा कुठली देणार ?

———०———

संसारकटुवृक्षस्य द्वे फले ह्यमृतोपमे ।
सुभाषितरसास्वादः; संगतिः सज्जनैः सह ॥ ९ ॥

आर्या

संसारवृक्ष कटुफल !
दोन फलें परि सुधेपरी याचीं ।
मिळणें रुचि सूक्तींची
घडणें संगत तशीच सुजनांची ॥ ९ ॥

गद्यार्थ—

ससाररूपी कडू झाडाला, दोन फळें मात्र, अमृतासारखीं येतात, एक सुभाषितरस चाखणें व दुसरें, सज्जनाची संगति लाभणें

———०———

सुभाषितरसास्वादजातरोमाञ्चकञ्चुकाः ।
विनाऽपि कामिनीसङ्गं कवयः सुखमेधते ॥ १० ॥

आर्या

चाखुनि सरस सुभाषित
यत्तनु रोमाञ्चकञ्चुका धरिते ।
स्त्रीसंग न घडतांही
त्याहुनि सुख मधुर भोगिती कवि ते ॥१०॥

गद्यार्थ—

सुभाषितरस चाखल्यानें, जणूं काय चोळी अंगावर चढावी, इतके दाट रोमाच ज्यांच्या अंगावर फुलतात, त्या कवींना, कामिनीचा सग न घडताही, त्याहून मधुर सुख प्राप्त होतें !

———०———

सुभाषितेन गीतेन युवतीनां च लीलया ।
यस्य न द्रवते चित्तं स योगी ह्यथवा पशुः ॥ ११ ॥

आर्या

ऐकुनि गीत सुभाषित
युवतींच्या ललितमधुर लीलांनीं ॥
तो योगी अथवा पशु-
ज्याचें जाई न हृदय विरघळुनी ॥ ११ ॥

गद्यार्थ—

सुभाषितें किंवा गायन ऐकून, किंवा तरुणींच्या लीला पाहून ज्याचें हृदय विरघळत नाहीं, तो, एकतर योगी तरी असेल, किंवा, पशु तरी असेल ( मनुष्य निश्चित नाहीं )

———०———

आस्वादितदयिताधरसुधारसस्यैव सूक्तयो मधुराः ।
अकलितरसालमुकुलो न कोकिलः कलमुदञ्चति ॥१२॥

आर्या

चाखिति अधरसुधारस,
ठरती त्यांच्याच सूक्ति मधुरतर ।
न पितां आम्रमुकुलरस
कोकिल कूजन कधीं न करणार ॥ १२ ॥

गद्यार्थ—
जे, प्रियेचा अधरसुधारस चाखतात, त्यांच्याच सूक्तींना आगळीच माधुरी येते. आम्याच्या मोहरांतला रस न चाखतां, कोकिल, आपला पंचमांतला सूर थोडाच लावतो ?

———०———

खिन्नं चापि सुभाषितेन रमते स्वीयं मनः सर्वदा
श्रुत्वान्यस्य सुभाषितं खलु मनः श्रोतुं पुनर्वाञ्छति ॥
अज्ञान् ज्ञानवतोऽप्यनेन हि वशीकर्तुं समर्थो भवेत्
कर्तव्यो हि सुभाषितस्य मनुजैरावश्यकः संग्रहः ॥१३॥

शार्दूलविक्रीडित

होई तुष्ट सुभाषितें मन सदा,
आधीं जरी खिन्न तें
अन्यांची परिसोनि सूक्ति, मन ती
ऐकूं पुन्हां इच्छितें ॥
अज्ञांच्यासह जाणत्यां, वश करूं
यांनीं शके कोणिही
ठेवीं सूक्ति अवश्य यास्तव नरा,
तूं आपुल्या संग्रहीं ॥ १३ ॥

गद्यार्थ—
मन, आधीं खिन्न झालेलें असलें, तरी, सुभाषित ऐकून, तें पुन्हां प्रसन्न होतें. दुसऱ्याच्या तोंडून चांगली सूक्ति एकदां ऐकून, (तृप्ति न होतां), ती पुन्हां ऐकण्याची मनाला इच्छा होते. अज्ञालाच काय सुज्ञाला सुद्धा, सुभाषितांच्या शक्तीनें मनुष्य वश करूं शकतो. म्हणून, मनुष्यानें, सुभाषितें अवश्य आपल्या संग्रहीं ठेवलीं पाहिजेत.

———०———

यस्य वक्त्रकुहरे सुभाषितं,
नास्ति नाप्यवसरे प्रजल्पति ।
आगतः सदसि धीमतामसौ,
लेप्यनिर्मित इवावभासते ॥ १४ ॥

रथोद्धता

ज्याचिया मुखिं नसे सुभाषित,
वा न तें सुसमयींच योजित ॥
जेधवां बुधसमेंत येइ तो,
मृण्मयीच जणुं मूर्ति भासतो ॥ १४ ॥

गद्यार्थ—
ज्याच्या तोंडीं सुभाषितें नसतात, किंवा (असूनही) जो त्यांचा योग्यवेळीं उपयोग करीत नाहीं, तो, बुद्धिमंतांच्या बैठकींत गेला, म्हणजे, मातीच्या पुतळ्याप्रमाणेंच ठरावयाचा.

———०———

केयूरा न विभूषयन्ति पुरुषं, हारा न चन्द्रोज्ज्वला
न स्नानं, न विलेपनं, न कुसुमं, नालङ्कृता मूर्धजाः ॥
वाण्येका समलङ्करोति पुरुषं या संस्कृता धार्यते
क्षीयन्ते खलु भूषणानि सततं वाग्भूषणं भूषणम् ॥१५॥

शार्दूलविक्रीडित

शोभा देति न हार शुभ्रहि तसे
केयूरही मानवा
न स्नानें, न विलेपनें, न कुसुमें;
शृंगारिले केंस वा ॥
वाणी संस्कृतियुक्त एकच नरा
शोभा खरी देतसे
वाणी हीच अपूर्व भूषण सदा
नाशा दुजें जातसे ॥ १५ ॥

गद्यार्थ—
केयूरादि अलंकार, शुभ्र हार, स्नान, उटी, फुलें किंवा केश-भूषा यांपैकीं एकानेंही माणसाला शोभा येत नाहीं. संस्कारयुक्त वाणी ही एकच माणसाचा खरा अलंकार ! इतर सर्व भूषणें नष्ट होतील; पण, भूषणांतलें भूषण वाणी ( मात्र टिकून राहील. )

———०———

वाङ्माधुर्यान्नान्यदस्ति प्रियत्वं
वाक्पारुष्याच्चोपकारोऽपि नष्टः ।
किं तद्द्रव्यं कोकिलेनोपनीतं ?
को वा लोके गर्दभस्यापराधः ? ॥ १६ ॥

शार्दूलविक्रीडित

गोड्या वाणिहुनी न अन्य करितें,
लोकीं, नराला प्रिय.
वाणी तीच कठोर नष्ट करते
केलें भलें सक्रिय ॥

देई कोकिल काय वित्त मनुजा
आणोनिया कोठुनी ?
होई गर्दभ कां तिरस्कृत, सदा
भारे हि ते वाहुनी ? ॥ १६ ॥

गद्यार्थ—
माणसाला लोकप्रिय करणारें, गोड वाणीहून अधिक कार्यक्षम साधन दुसरें नाहीं उलटपक्षीं, कठोर कर्कश वाणीमुळें लोकांवर उपकार केले असतील, त्याचा सुपरिणाम सुद्धा नष्ट होतो. कोकिल काय कुणाला द्रव्य आणून देतो? (म्हणून प्रिय वाटावा?) आणि, बिचाऱ्या गाढवानें, जगात, काय अपराध केला? (म्हणून तो तिरस्कृत व्हावा?)

———•———

सम्यगनिष्पन्नः सन् योऽर्थस्त्वरया बहिः स्फुटीक्रियते ।
स व्यंग एव भवति प्रथमो विनतातनूज इव ॥१७॥

आर्या
अर्थ सुपोषित नसतां,
त्वरितचि बाहेर जो पडे फुटुन ।
तो व्यंगयुक्त राहे,
विनतेचा प्रथम पुत्र जणुं अरुण ॥ १७ ॥

गद्यार्थ—
(मनांत आशय पूर्ण घोळवून) अर्थाचा नीट परिपोष होण्याआधींच, घाईनें, जे शब्द बाहेर निघतात, ते व्यंगयुक्त राहतात- जसें विनतेचा प्रथमपुत्र अरुण (पूर्ण दिवस भरण्यापूर्वींच विनतेनें अंडें फोडल्यानें अरुण लंगडा पांगळा जन्मला)

———•———

अर्थो गिरामपिहितः पिहितश्च कश्चित्
सौभाग्यमेति मरहट्टवधूकुचाभः ।
नान्ध्रीपयोधर इवातितरां प्रकाशो
नो गुर्जरीस्तन इवातितरां निगूढः ॥ १८ ॥

वसंततिलका
शब्दार्थ गुप्त नि खुले समतोल साचे
होतात रम्य, कुच जेविं मराठणीचे ॥
आंध्रीकुचांसम नसोत खुले समस्त
या गुर्जरीस्तनपरी अगदींच गुप्त ॥ १८ ॥

गद्यार्थ—
शब्द योजतांना, अगदींच फार गूढार्थ, किंवा, अगदी उघड्यानागड्या अर्थाचे ते नसावेत त्यांत एक प्रकारचा रमणीयपणा असावा, ते तसे असले, म्हणजे, महाराष्ट्रीय स्त्रीच्या स्तनांसारखे सौंदर्यपोषक होतात आंध्रस्त्री प्रमाणें अगदीं उघडे नसावेत, गुर्जरस्त्री सारखे फार झांकलेले नसावेत

———•———

उपमैका शैलूषी संप्राप्ता चित्रभूमिकाभेदान् ॥
रंजयति काव्यरंगे, नृत्यन्ती, तद्विदां चेतः ॥ १९ ॥

आर्या
उपमा जणुं एक नटी,
नटुनी थटुनी विचित्र वेषांत ।
जी काव्यरंगभूमी-
वर नाचोनी हरी रसिकचित्त ॥ १९ ॥

गद्यार्थ—
उपमा ही एखाद्या नटीसारखी आहे जेव्हां, नटून थटून विचित्र वेषात, ती काव्यरंगभूमीवर नाचते, तेव्हां, रसिकांचें चित्तरंजन करते

———•———

उपमा कालिदासस्य भारवेरर्थगौरवम् ।
दण्डिनः पदलालित्यं माघे सन्ति त्रयो गुणाः ॥२०॥

अनुष्टुभ्
उपमा कालिदासाची
भारवीची सखोलता ।
दण्डीचे पदलालित्य,
माघीं त्रैगुण्यचारुता ॥ २० ॥

गद्यार्थ—
चार प्रख्यात संस्कृत कवींचीं वैशिष्ट्यें—
उपमा वधावी तर कालिदासाची, खोल अर्थ भारवीचा! पदलालित्य दण्डीचें! माघ कवींत तिन्ही गुण एकवटलेले

———•———

श्रुतिमात्रेण शब्दात्तु येनार्थप्रत्ययो भवेत् ।
साधारणसमग्राणां स प्रसादो गुणो मतः ॥ २१ ॥

अनुष्टुभ्
सामान्यबुद्धि सर्वांना अर्थाचा बोध होतसे ।
ऐकतां शब्दची ज्याचे, प्रसाद गुण तो असे ॥२१॥

गद्यार्थ—
ज्या काव्यांतले शब्द, वाचतां ऐकतां क्षणींच, सामान्य बुद्धीच्या सर्व माणसांना, ज्याचा अर्थ समजतो, त्याला प्रसाद गुणाचें काव्य म्हणावें

———•———

श्लोकाः सुवृत्तरचना रमणीकुचाभा
अर्थस्तथा सुमधुरस्त्वधरेण तुल्यः ।
श्लेषादयः किमपि मंजुलनूपुरास्ते
तैस्संयुता युवतिवत्कविता विभाति ॥ २२ ॥

वसंततिलका

स्त्रीच्या कुचांसम जिची रचना सुवृत्त
शब्दांमधूनि अधरासम गोड अर्थ ॥
श्लेषादि मंजु मृदु नूपुरनाद जीतें
ऐशी नटूनि कवितावधु मोहवीते ॥ २२ ॥

गद्यार्थ—

( कविः—कै. डॉ. श्रीखंडे, कोल्हापूर )

श्लोकांची रचना, चांगल्या वृत्तांत बांधलेली डौलदार असावी, रमणीच्या कुचांसारखी. अर्थ मधुर असावा, स्त्रीच्या अधरासारखा. श्लेष वगैरे कानाला गोड लागावे—स्त्रीच्या मंजुल नूपुरांसारखे. असें सर्व जमलें, म्हणजे, कविता ही तरुणीसारखी मोहक होते.

———

कविता वनिता चैव स्वयमेवागता वरा ।
बलादाकृष्यमाणा सा सरसा विरसा भवेत् ॥ २३ ॥

अनुष्टुभ्

कविता कामिनी दोघी वश्या येती स्वयें जरी ।
बळें ओढून त्या होती सरसा विरसा परी ॥ २३ ॥

गद्यार्थ—

कविता काय, किंवा, स्त्री काय, प्रसन्न चित्तें, आपण होऊन येतील, तरच ठीक. बळानें ओढून ताणून आणल्या तर, मूळच्या सरस असूनही, त्या विरस करतील.

———

त एव पदविन्यासास्त एवार्थविभूतयः ।
तथापि नव्यं भवति काव्यं ग्रथनकौशलात् ॥ २४ ॥

अनुष्टुभ्

पदांची मांडणी तीच, तेच अर्थ सखोलसे ।
तरी ग्रथन-कौशल्यें काव्य नूतन होतसे ॥ २४ ॥

गद्यार्थ—

तशींच पदें, तसेच खोल अर्थ असून, तुसती, रचनेच्या कौशल्यांतल्या भिन्नपणानें, काव्यें नवीं दिसतात.

———

सरसा सालंकारा सुपदन्यासा सुवर्णमयमूर्तिः ।
आर्या तथैव भार्या न लभ्यते पुण्यहीनेन ॥ २५ ॥

आर्या

सरसा सालंकारा
सुपदन्यासा सुवर्णमयमूर्ति ।
आर्या तशीच भार्या
न पुण्यहीनासि या कधीं मिळती ॥ २५ ॥

गद्यार्थ—

सरस (रसयुक्त; पक्षीं–रसिक), सालंकार (शब्दांचे अलंकार घातलेली, पक्षीं सोन्याचे ) सुपदन्यास (पदलालित्ययुक्त) सुवर्णमयमूर्ति ( गोडवर्ण असलेली, पक्षी सुवर्णकांति असलेली ) अशी आर्या, तशीच भार्या, पुण्यहीनास मिळत नाहीं.

———

निन्द्यन्ते यदि नाम मन्दमतिभिर्वक्राः कवीनां गिरः
स्तूयन्ते न च नीरसैर्मृगदृशां वक्राः कटाक्षच्छटाः ॥
तद्वैदग्ध्यविदां सतामपि मनः किं नेहते वक्रतां ?
धत्ते किं न हरः किरीटशिखरे वक्रां कलामैन्दवीम् ? २६

शार्दूलविक्रीडित

वक्रोक्ती कविची जरी कुणि जगीं
निन्दोत निर्बुद्ध ते
स्त्रीचे वक्र कटाक्ष नीरसहृदीं
आणोत अप्रीतितें ॥
विद्वान् सज्जन वक्रतेंतिल मनीं
गोडी न कां वांछिती ?
चंद्राची धरतो न काय मुकुटीं
वक्रा कला धूर्जटी ? ॥ २६ ॥

गद्यार्थ—

( वक्रोक्तींची गोडी कवि वर्णन करतो )

जगांतले निर्बुद्ध लोक, वक्रोक्तींची (गोडी न कळल्यानें) खुशाल निन्दा करोत; रुक्ष अरसिकांना, रमणीच्या वक्र कटाक्षांची स्तुति करावीशी न वाटो. पण वक्रोक्तीला जें कौशल्य लागतें, त्याची पारख असणाऱ्या सज्जनांना, तिची ओढ लागल्याशिवाय कशी राहील? प्रत्यक्ष शंकर, आपल्या मुकुटाच्यावर, चंद्राची वक्र कला, धारण करतोच कीं नाहीं ?

———

विष्वण्वती पुरस्तैक्ष्ण्य पृष्ठतः कुर्वती गुणम् ।
कर्णान् विध्यति लोकस्य सूचीवत् सूचकस्य वाक् ॥ २७

आर्या

दावुनि तीक्ष्णत्व पुढें
मागुनि गुण दीर्घ घेउनी येते ।
टोंची कान जनांचे,
सूचक वाणी सुई परी असते ॥ २७ ॥

गद्यार्थ—

सूचक शब्द हे सुईसारखे असतात प्रथम पुढें तीक्ष्णत्व दाखवून, माणसाचे कान टोंचतात पण, मागोमाग दीर्घ गुण (सुई पक्षीं-दोरा) घेऊन येतात

———०———

मन्दं निक्षिपते पदानि परितः शब्दं समुद्वीक्षते
नानार्थाहरणं च कांक्षति, मुदालङ्कारमाकर्षति ॥
आदत्ते सकलं सुवर्णनिचयं, धत्ते रसान्तर्गतं
दोषान्वेषणतत्परो विजयते चोरोपमः सत्कविः ॥२८॥

शार्दूलविक्रीडित

ठेवी मंद पदांस, घे चहुंकडे
चाहूल शब्दांचिही
इच्छी पुष्कळ अर्थ, चोरित असे
मोदें अलंकार ही ॥
घेई सर्व सुवर्ण आणि पुरतो
ठेवा रसान्तर्गत
दोषा शोधित, या कवीस उपमा
तैशाच चोराप्रत ॥ २८ ॥

गद्यार्थ—

(पद, शब्द, अर्थ, अलंकार, सुवर्ण, रसान्तर्गत दोषान्वेषण इतके शब्द द्व्यर्थी आहेत)

चोर हळू पद टाकतो–कवि नाजूक पदें घालतो चोर शब्दांची चाहूल घेत चहूंकडे पाहतो –योग्य शब्दांसाठीं कवि चोहींकडे पाहतो, दोघांनाही नाना अर्थ हवे असतात अलंकार दोघांनाहि लागतात, दोघांनाही आनंद होतो सुवर्ण दोघेही घेऊन रसातर्गत (चोर, रसा म्हणजे जमिनीत) (कवि रसांत बुडवून) ठेवतात दोघेही दोषान्वेषण करतात (दोषा रात्र,) कवि आपल्या लेखनातले दोष शोधीत असतो अशा प्रकारें चोरासारख्या सत्कवीचा विजय असो

———०———

कवयः परितुष्यन्ति नेतरे कविसूक्तिभिः ।
न ह्यकूपारवत् कूपा वर्धन्ते विधुकान्तिभिः ॥ २९ ॥

अनुष्टुभ्

उचंबळति काव्यानें कवी, न इतरेजन ।
भरती ये समुद्राला, न कूपा, चंद्र पाहुन ॥ २९ ॥

गद्यार्थ—

कवींच्या काव्यानें उचंबळून येण्यास, कविहृदयच हवें ! इतरांना, त्याचें कांहींच वाटत नाहीं चंद्रदर्शनानें भरती येते, ती समुद्राला, विहिरीला नव्हे !

———०———

कविः करोति काव्यानि, रसं जानाति पंडितः ।
तरुः सृजति पुष्पाणि, मरुद्वहति सौरभम् ॥ ३० ॥

अनुष्टुभ्

कवि काव्यें करी, त्यांचा जाणतो रस पंडित ।
तरु पुष्पां जन्म देई नेई तो गंध मारुत ॥ ३० ॥

गद्यार्थ—

कवि काव्ये रचितो त्यांचा रस रसिक घेतात. तरु फुलें प्रसवतो, पण, त्याचा सुगंध (जगभर देण्यासाठीं) वाहून नेण्याचे काम, वारा करतो

———०———

कर्कश-तर्क-विचारव्यग्रः किं वेत्ति काव्यहृदयानि ?
ग्राम्य इव कूपीनिमग्नश्चलनयनावचोरहस्यानि ॥३१॥

आर्या

तर्कें रूक्ष जनाला
काव्याचें का रहस्य समजेल ? ॥
धर्धि काय नागऱ्याला
रमणीवचमर्म गोड उमजेल ? ॥ ३१ ॥

गद्यार्थ—

तर्क विचारांनीं रूक्ष झालेल्याला, काव्याचें रहस्य, कसें कळेल ? शेतीकामांत व्यग्र नांगऱ्याला, रमणीच्या भाषणाचें गोड मर्म काय कळणार ?

———०———

मरमाऽपि कवेर्वाणी हरिनामाङ्किता यदि ।
सादरं गृह्यते तज्ज्ञैः शुक्तिर्मुक्तान्विता यथा ॥ ३२ ॥

आर्या

जरि सुमधुर कविवाणी
तींतचि हरिनाम गुंफिलें तर ती।
ग्राह्यचि सादर तज्ज्ञां
होई मौक्तिकयुता जशी शुक्ति ॥ ३२ ॥

गद्यार्थ—

आधींच कवीची वाणी गोड असली, व, तींतच हरिनाम गुंफलें गेलें, तर, (दुधांत साखर!) आंत मोती असलेल्या शिंपल्याप्रमाणें, तज्ज्ञ, तिचा अधिकच आदरानें स्वीकार करतात.

———०———

कान्पृच्छामः? सुराः स्वर्गे, निवसामो वयं भुवि ॥
किं वा काव्यरसः स्वादुः किं वा स्वादीयसी सुधा? ॥

आर्या

वसती देव स्वर्गी; आम्ही भूवर;
पुसूं कुणास तर—।
"कां मधुर काव्यरस हा
कां त्याहुनि ही सुधाच मधुरतर? ॥ ३३ ॥

गद्यार्थ—

देव राहिले स्वर्गांत; आम्ही इथें पृथ्वीवर! तर मग विचारावें तरी कोणाला, कीं, "काय हो! काव्यरस अधिक गोड, कीं, अमृत अधिक गोड?" (आम्हाला तर शंकाच आहे अमृत अधिक गोड असेल काय याची.)

———०———

जयन्ति ते सुकृतिनो रससिद्धाः कवीश्वराः।
नास्ति येषां यशःकाये जरामरणजं भयम् ॥३४॥

अनुष्टुम्

रस ज्यां वश ते धन्य पुण्य सत्कवि लोकिं या।
जरेची मृत्युची भीति कीर्तिदेहा न ज्यांचिया ॥३४॥

गद्य अर्थ—

रसपूर्ण रचनेची सिद्धि ज्याना मिळाली, असे जे श्रेष्ठ कवि, त्याचा विजय असो. त्यांच्या कीर्तिरूप देहाला, वार्धक्य आणि मृत्यु, याची भीति नसते!

———०———

ते धन्यास्ते महात्मानस्तेषां लोके स्थिरं यशः।
यैर्निबद्धानि काव्यानि ये वा काव्ये प्रतिष्ठिताः ॥ ३५ ॥

अनुष्टुम्

ते पूज्य, ते महात्मे; या लोकीं तत्कीर्ति सुस्थित।
जे काव्य रचिती ते, वा जे काव्यांतून वर्णित ॥३५॥

गद्य अर्थ—

ज्यांनी स्वतः काव्यें रचिलीं, किंवा, जे काव्याचे विषय झाले, ते पूज्य; ते महात्मे; त्यांची कीर्ति जगांत अटळ राहते.

———०———

कवयति पण्डितराये, कवयन्त्यन्येऽपि विद्वांसः।
नृत्यति पिनाकपाणौ, नृत्यन्त्यन्येऽपि भूतवेतालाः ३६

आर्या

पंडित कवि काव्य करी
काव्यचि विद्वान अन्यही करिती।
नाचे शंकर म्हणुनी
भूत नि वेताल नाचतीच किती ॥ ३६ ॥

गद्य अर्थ—

(पात्रता नसतांना काव्य करणारांना टोमणा).

जगन्नाथ पंडित काव्य करतो, म्हणून, इतर अनेक विद्वान् काव्य करूं लागले! शंकर नाचतो, म्हणून, भूत वेताळ नाचूं लागले! (कुठें तो—आणि कुठें हे!)

———०———

"कवयः कालिदासाद्याः कवयो वयमप्यमी।"
"पर्वते परमाणौ च पदार्थत्वं प्रतिष्ठितम्!" ॥३७॥

अनुष्टुम्

"कालिदासादि ते जैसे आम्हीहि कवि हे तसे"।
"गिरींत परमाणूंत पदार्थत्व जसें वसे" ॥ ३७ ॥

गद्य अर्थ—

कविब्रुव म्हणतात—(आम्ही काय कवी आहोंत कीं काय?) "जसे कालिदासादि हे कवि, तसे आम्हीहि कवीच." याला रसिक उत्तर देतो—
"होय! पर्वत व परमाणु यांच्यांत 'पदार्थत्व' (हा धर्मभाजक) आहे—(तितकेंच तुमचें म्हणणें खरें आहे!")

———०———

गणयन्ति नापशब्दं न वृत्तभंगं क्षयं न चार्थस्य।
रसिकत्वेनाकुलिता वेश्यापतयश्च कुकवयश्च ॥ ३८ ॥

आर्या

रसिकपणासचि भाळुनि,
जसे कविविुव तसेच जार पति ।
अपशब्द वृत्तभंगहि
अर्थाची हानि ही न कधिं गणिती ॥ ३८ ॥

गद्य अर्थ—

**कविवुव** हे, वेश्याच्या यजमानांप्रमाणे, केवळ **रसिकपणास** भाळून, **अपशब्द** (कवीकडे–ग्राम्य शब्द जारपतीकडे शिव्या), **वृत्तभंग** (कवीकडे–वृत्तरचनेंत चूक) (जारपतीकडे–नोकरी धंदा सुटणें), किंवा, **अर्थहानि** (कवीकडे–शब्दार्थ भलता होणें) (जारपतीकडे द्रव्यहानि) याचीही पर्वा करीत नाहींत

———•———

हठादाकृष्टानां कतिपयपदानां रचयिता
जनः स्पर्धालुश्चेदहह कविना वश्यवचसा ॥
भवेदद्य श्वो वा किमिह बहुना पापिनि कलौ
घटानां निर्मातुस्त्रिभुवनविधातुश्च कलहः ॥३९॥

शिखरिणी

वळें ओढाताणी करनि पद जो चार जुळवी
करी तो वागीशांसह जर चढाओढ कुकवि॥
पुढें मागें पापी कलित मग होणार अहह !
कुण्या कुंभाराचा त्रिभुवनविधात्यासि कलह ३९

गद्य अर्थ—

बळें ओढाताण करून, पुढें चारदोन पदें जो जुळवूं शकला असा कुकवि, जर, 'शब्दसृष्टीचे ईश्वर' अशा थोर कवींशी स्पर्धा करूं म्हणेल, तर, आज उद्यां, या पापी कलियुगात, हरहर ! मडकीं घडविणारा कुंभारडा त्रिभुवनविधात्याशीं का चढाओढ करणार नाहीं ?

———•———

लीलालुण्ठितशारदापुरमहासंपद्भराणां पुरो
विद्यासद्मविनिर्गलत्कणमुषो वल्गन्ति चेत् पामराः ।
अद्य श्वः फणिनां शकुन्तशिशवो दन्तावलानां शशाः
सिंहानां च सुखेन मूर्धसु पदं धास्यन्ति शालामृगाः ४०

शार्दूलविक्रीडित

लीलेनें धन शारदीय लुटिती
त्यांच्यापुढेंही जर
विद्येचे कण चोरितो कधिं
असा जल्पे कुणी पामर ॥
आतां आज उद्यां शकुंत अहिच्या,
हत्तींचियाही ससे
सिंहांच्या पद मस्तकीं
हरिणही देतील निःशंकसे ॥ ४० ॥

गद्य अर्थ—

जे **महाकवि शारदेच्या** राजधानीची मुक्तहस्तें लूट करतात, अशापुढें, विद्यामंदिरातून गळलेले चारदोन कण चोरणारे **पामर**, जर दिमाख दाखवूं लागले, तर आतां सर्पांच्या शिरीं शकुंत, हत्तींच्या शिरीं ससे, आणि सिंहांच्या मस्तकीं हरिणहि, निःशंकपणें, पाय देतील असेंच म्हटलें पाहिजे !

———•———

सन्ति सन्ति गृहे गृहेऽपि कवयो येषां वचश्चातुरी
स्वे हर्म्ये कुलकन्यकेव लभते स्वल्पैर्गुणैर्गौरवम् ॥
दुष्प्रापः स तु कोऽपि कोविदमतिर्यद्वाग्रसग्राहिणी
पण्यस्त्रीव कलाकलापकुशला चेतांसि हर्तुं क्षमा ॥४१॥

शार्दूलविक्रीडित

होती अल्प कवी घरोघर, घरीं त्यांची वचश्चातुरी
होई गौरवपात्र, अल्प हि गुणें, साध्या कुलस्त्रीपरी॥
लोकीं दुर्लभ ते रसज्ञ कवि, कीं ज्यांची सुधावैखरी
पण्यस्त्रीपरि विभ्रमें सुललितें चित्ता जगाच्या हरी ४१

गद्य अर्थ—

घरोघर, असे कित्येक **अल्पकवि** आहेत, की, ज्यांच्या काव्यांत अल्प गुण असला, तरी, त्याच घरांतल्या घरांत, कुलस्त्रीच्या अल्पकृतींचेंहि होतें, तसें, कौतुक होतच असतें परंतु, वेश्येप्रमाणें, आपल्या नखऱ्यांनीं साऱ्या जगाचें चित्त हरणारी, वाणी, ज्यांना लाभली, असे **रसज्ञ कवि** विरळाच !

———•———

धन्यास्ते कवयो यदीयरसनाहस्ताध्वसचारिणी
धावन्तीव सरस्वती द्रुतपदन्यासेन निष्क्रामति ॥
अस्माकं रसपिच्छिले पथि गिरां देवी नवीनोदयत्
पीनोत्तुंगपयोधरेव युवतिर्मान्थर्यमालम्बते ॥ ४२ ॥

शार्दूलविक्रीडित

जिव्हा-शुष्कपथीं सरस्वति पदें टाकोनिया सत्वर
ज्यांच्या धांवतसे, कविब्रुव असे ते धन्य सारे नर ॥
देवी ती, अमुच्या पथीं चिखल हो झाला रसानें जिथें
जाणों डोलत मंद मंद युवती पुष्टस्तनी चालते ॥४२॥

गद्य अर्थ—

ज्या भिकार कवींच्या, जिव्हारूप शुष्क रुक्ष मार्गावरून, घाईत, पावलें टाकीत, सरस्वती देवी, धावत निघून जाते, ते धन्य! आम्हां महाकवींच्या रसनापथीं मात्र, रसानें चिखल झाल्यानें, एखाद्या नवोदितपुष्टस्तनी तरुणीप्रमाणें, सरस्वती देवी, मंदगजगतीनें, ( सुंदर विभ्रम दावीत, डोलत ) सावकाश जाते.

———

काव्यार्थास्वादकाले तु शब्दोत्पत्तिविचारकाः ॥
नीवीविमोक्षवेलायां वस्त्रमूल्यविचिन्तकाः ॥ ४३ ॥

अनुष्टुभ्

काव्यार्थास्वाद घेतां जो शब्दोत्पत्तीच चर्चितो ॥
निऱ्यांसि सोडतांना तो वस्त्रमूल्य विचारतो ॥४३॥

गद्य अर्थ—

एखाद्या रुक्ष अरसिकानें, काव्याचा रसास्वाद घेण्याच्या वेळीं, शब्दांची व्युत्पत्ति चर्चिणें, हें, रति-रंगांत, निऱ्या सोडण्याच्या वेळीं, वस्त्राच्या मूल्याचा विचार करण्यासारखें आहे.

———

साहित्यसंगीतकलाविहीनः
साक्षात्पशुः पुच्छविषाणहीनः ॥
तृणं न खादन्नपि जीवमान-
स्तद्भागधेयं परमं पशूनाम् ॥ ४४ ॥

उपजाति

साहित्य, संगीत कला जया न
पशूच तो पुच्छ नि शृंगहीन ॥
जगे तृणावांचुनि हेंच सार्चे
जगीं महाभाग्य असे पशूंचें ॥ ४४ ॥

गद्य अर्थ—

ज्या माणसापाशीं, साहित्य, संगीत, कला, यांपैकीं कांहींच नाहीं, तो पुच्छ व शृंग नसलेला पशूच! मात्र, गवत न खातां तो जगतो, हें, पशूंचें भाग्यच म्हटलें पाहिजे.

———

इतरतापशतानि निजेच्छया
वितर तानि सहे चतुरानन ॥
अरसिकेषु कवित्वनिवेदनं
शिरसि मा लिख मा लिख मा लिख ॥४५॥

द्रुतविलंबित

इतरदुःखशतांसहि साहिन
जरिहि इच्छिसि दे चतुरानन ॥
अरसिकांस कवित्व निवेदणें—
परि कपाळिं लिहूनि न ठेवणें ॥ ४५ ॥

गद्य अर्थ—

ब्रह्मदेवा! इतर शेंकडों दुःखे स्वेच्छेनें मला दे. मी तीं (आनंदानें) सहन करीन, परंतु अरसिकांपुढें काव्ययाचन करणें, हें, माझ्या कपाळीं लिहून ठेवूं नको.

———

विपुलहृदयाभियोग्ये
खिद्यति काव्ये जडो; न मौर्ख्ये स्वे ॥
निन्दति कञ्चुकिकारं
प्रायः शुष्कस्तनी नारी ॥ ४६ ॥

पृथ्वी

विशाल हृदयास योग्य असल्याहि काव्यांतरीं
रमे न जड, हा, विटे न अपुल्याच मौर्ख्या परी ॥
विशालकुचयोग्य कंचुक जधीं वधे घालुनी
सदोष तधिं शिंपियासचि म्हणेल शुष्कस्तनी ॥४६॥

गद्य अर्थ—

ज्याचा आस्वाद घेण्यास, विशाल हृदय अवश्य, असें काव्य वाचून, एखादा मूर्ख अरसिक नाकें मुरडतो; पण स्वतःच्या मूर्खपणाची कांहीं लाज त्याला वाटत नाहीं; भरदार वक्षाच्या स्त्रीच्या मापाची चोळी, एखादी शुष्कस्तनी घालून बघते, व 'शिंप्याला बेततांच येत नाहीं' म्हणून त्यालाच दोष देत बसते.

———

दुर्जनहुताशदग्धं काव्यसुवर्णं विशुद्धिमुपयाति ॥
दर्शयितव्यं तस्मान्मत्सरिमनसः प्रयत्नेन ॥ ४७ ॥

आर्या

दुर्जन अग्नित जळुनी काव्यसुवर्णहि विशुद्धतर होतें ॥
यास्तव मत्सरयुक्तां मुद्दामचि काव्य दाखवावें तें ४७

गद्य अर्थ—

(गाध्या सान्याप्रमाणेंच) काव्यसुवर्णहि दुर्जनरूपी अग्नीत जळल्यान अधिक शुद्ध होतें यासाठीं, कवीनें, आपलं काव्य मत्सरी माणसास, मुद्दामच दाखवावें

———•———

कतिचिदुद्धतमत्सरनिर्भराः
कतिचिदात्मवचःस्तुतिशालिनः ।
अहह ! केऽपि निरक्षरकुक्षय-
स्तदिह सप्रति कं प्रति मे श्रमः ? ॥४८॥

द्रुतविलंबित

जनहि मत्सरपूर्ण जगीं किती
कुणि दुजे निज काव्यचि वानिती ॥
अहह ! अक्षरशत्रु दुजे किती
तर मम श्रम आज कुणांप्रति ? ॥ ४८ ॥

गद्य अर्थ—

प्रत्येक लोक उद्धट व मत्सरानें भरलेले, कित्येक आपल्याच काव्याच्या स्तुतींत मग्न, अरेरे, (राहिलेले) अक्षरशत्रु ! मग मी हे (काव्यरचनेचे) कष्ट कोणासाठीं करीत आहे ?

———•———

दिगन्ते खेलन्ती रसिकहृदयानन्दजननी
मया नीता भोजक्षितिपनगरीमम्ब कविते !
अकस्मादुन्मीलत्खलवदनवल्मीकरमना–
भुजङ्गीदष्टाङ्गी शिव शिव समाप्तिं गतवती ॥४९॥

आर्या

आनंद देत रसिकां,
विहरत जी राहिली दिगन्तांत ।
माते कविते ! मी तुज
नेलें जधि भोजराजनगरींत ॥
खलवदन वारुळांतुनि
निघुनि अचानकचि जीभ नागीण ।
डसता तुजला शिव ! शिव !
क्षणांत झालीस गे गतप्राण ॥ ४९ ॥

गद्य अर्थ—

(पूर्वी राजाश्रय मिळण्यासाठीं कवि राजाकडे जात पण, तेथील आधींचे आश्रित कवि, (मत्सरी,) हे नव्या कवींची कशी वाट लावीत, तें दर्शवीत कवि म्हणतो)—हे माते कविते ! जी, तू, स्वच्छंद दिगन्तीं विलास करीत, रसिकांना रंजवीत होतीस, त्या तुला (मला कोठून दुर्बुद्धि झाली व) मी राजा भोज याच्या नगरीं घेऊन गेलों आणि, खल वदनरूपी वारुळांतून एकाएकी, जीभरूपी नागीण निघून, तुला डसली, आणि क्षणाभरांत, तू गतप्राण झालीस ! हाय ! हाय !

———•———

संग्रामे सुभटेन्द्राणां कवीनां कविमण्डले ।
दीप्तिर्वा दीप्तिहानिर्वा मुहूर्तादेव जायते ॥ ५० ॥

आर्या

कविमंडळीं कवींचें-
वीराचेंही लढून युद्धांत ॥
उज्ज्वल वा कज्जल मुख
होणें, दोन्ही क्षणांत होतात ॥ ५० ॥

गद्य अर्थ—

वीराचें युद्धांत व कवींचें कविमंडळांत, मुख उज्ज्वल व्हावयाचें कीं, काळें व्हावयाचें हें क्षणभरांत ठरतें (पैकीं एका कवीचा प्रसंग ४९ व्या कवितेंत आलाच आहे)

———•———

मद्राणि ! मा कुरु विषादमनादरेण
मात्सर्यमग्नमनसां सहसा खलानाम् ।
काव्यारविन्दमकरन्दमधुव्रताना-
मास्येषु धास्यसितमां कति नो विलासान् ५१

वसंततिलका

जे काव्यरूप कमलांतिल भृंग, त्यांस
तू जोवरी असति मोदकरीच खास ॥
मात्सर्यमग्न खल तुच्छ तुला करी तो
मद्वाणि ! यास्तव तुला न विषाद वाटो ॥ ५१ ॥

गद्य अर्थ—

(हा कवि अगा आपल्याविषयीं अनादर करणाऱ्यांना उद्देशून म्हणतो)—हे मद्वाणि ! तू, जोवर काव्यकमलांतील रस पिणाऱ्या भ्रमरांप्रमाणें जे रसिकजन, त्यांना आनंद देऊ

शकतेस, तोंपर्यंत, मत्सरी दुर्जनीं केलेल्या तुझ्या अपमानाबद्दल, वाईट वाटून घेऊं नकोस.

—•—

मदुक्तिश्चेदन्तर्मदयति सुधीभूय सुधियः
किमस्या नाम स्यादरसपुरुषानादरभरैः।
यथा यूनस्तद्वत्परमरमणीयाऽपि रमणी
कुमाराणामन्तःकरणहरणं नैव कुरुते ॥ ५२ ॥

शिखरिणी

मदुक्ती होवोनी अमृत, जर मोही बुधमती
नसे पर्वा, नाके अरसिक जरी ते मुरडती ॥
हरी सौंदर्यानें, तरुणहृदया मान रमणी
कुमारांचें अंतःकरण कधिं नेई न हरुनी ५२

गद्य अर्थ—

(जगन्नाथ पंडित अरसिकानाच उलट टोला मारतो, की "अरे तुम्ही अजून पोरें आहात माझी कविता, सुंदर, तरुणी आहे तेव्हा तिची माधुरी तुम्हांला कळणारच कशी ?)"

माझी कविता अमृत होऊन, बुधाच्या अंतःकरणाला जोंवर मोहिनी घालीत आहे, तोंवर अरसिकांनीं तिचा कितीही अनादर केला, तरी, तिचें काय वांकडें होणार आहे ? रमणी अत्यंत सुंदर असली, तरी, ती केवळ तरुणांचें हृदय हरूं शकते,-पोरासोरांचें नव्हे

—•—

पुराणमित्येव न साधु सर्वं
न चापि काव्यं नवमित्यवद्यम् ।
सन्तः परीक्ष्यान्यतरद्भजन्ते
मूढः परप्रत्ययनेयबुद्धिः ॥ ५३ ॥

उपजाति

जुनें म्हणोनीच न सर्व छान
नवें म्हणोनीच न काव्य हीन ॥
परीक्षुनी सज्जन एक घेती
परांजलींनी जल मूर्ख पीती ॥ ५३ ॥

गद्य अर्थ—

(केवळ, हा नवा कवि म्हणूनच, त्याचें काव्य वाईट, असें म्हणणाऱ्या पुराणमतवाद्याचा, प्रत्यक्ष कालिदासालाही, उपद्रव झाला कालिदासानें त्यांना सरळ मूर्खांत काढलें )

केवळ जुनें म्हणूनच सर्व चांगलें ठरत नाहीं— केवळ नवीन म्हणून ( माझें ) काव्य वाईट ठरत नाहीं सज्जन हे या दोहोंची नीट परीक्षा करून तें ठरवितात मूर्ख मात्र (स्वतःची स्वतंत्रबुद्धि न वापरतां) दुसऱ्यांच्या ओंजळीनें पाणी पितात

—•—

ये नाम केचिदिह नः प्रथयन्त्यवज्ञां
जानन्तु ते किमपि तान्प्रति नैष यत्नः ।
उत्पत्स्यते मम कदापि समानधर्मा
कालो ह्ययं निरवधिर्विपुला च पृथ्वी ॥ ५४ ॥

वसंततिलका

कोणीहि जे मदपमान जगीं करीती
हा यत्न त्यांप्रति नसे, उमजोत चित्तीं ॥
जन्मेलची मम कदापि समानधर्मी
कालास अंत न, असे विपुलाचि भूमी ॥५४॥

गद्य अर्थ—

(आपल्या काव्याचा रसज्ञ, समानधर्मी कोणीच न दिसल्यानें, व, अरसिक, निंदा करीत राहिल्यानें, भवभूती-सारख्या महान् कवीलाही, विषण्ण होण्याची पाळी आली पण, त्याचा आशावाद, सर्व काळीं दुर्दम्य, म्हणून, तो म्हणतो –)

जे कोणी, माझी अवमानना, जगभर पसरवीत आहेत, त्यांना मी सांगतों, कीं, माझें काव्य, तुमच्यासाठीं नाहीं (या देशांत, किंवा, या काळांत, माझें काव्य कोणास कळलें नाहीं, तरी मला पूर्ण आशा आहे कीं, ) माझा समानधर्मा केव्हांतरी (व कोठेंतरी) जन्माला येईल-न येईल कारण काळास अंत नाहीं व पृथ्वी अफाट आहे

—•—

भवभूतेः संबंधाद्भूधरभूरेव भारती भाति ।
एतत्कृतकारुण्यात् किमन्यथा रोदिति ग्रावा ॥५५॥

आर्या

भवभूतिच्यामुळें जणु पर्वतकन्याच भारती झाली ।
तें नसतें तर तत्कृत करुणरसानें शिला कशी रडली ?

गद्य अर्थ—

भवभूतीचा प्रभाव एवढा, कीं, पर्वतकन्या पार्वतीच, त्याची वाणी झाली असावी नाहींतर भवभूतीच्या करुणरसानें (जिवंत माणसेंच, काय, पण, निर्जीव) शिलाही कशा रडल्या ?

—•—

अयं मे वाग्गुम्फो विशदपदवैदग्ध्यमधुरः
स्फुरद्बन्धो वन्ध्यः पशुहृदि, कृतार्थः कविहृदि ॥
कटाक्षो वामाक्ष्या लवदलित–नेत्रांतकलितः
कुमारे निःसारः स तु किमपि यूनः सुखयति ॥५६॥

आर्या

चतुरप्रसन्नपद मी
सुमधुर काव्यप्रबंध रचियेला।
वांझ जरी पशुहृदया,
कविहृदयाप्रति कृतार्थ तो झाला ॥
आमीलित नेत्रांतुनि कटाक्ष
जो फेकिते मधुर रमणी।
व्यर्थ कुमारां, तरुणां रोमांचित
तो करीच सुखवोनी ॥ ५६ ॥

गद्य अर्थ—

(५२ व्या श्लोकाप्रमाणेंच जगन्नाथाची दर्पोक्ति) मी हा जो **चतुर प्रसन्न शब्द** योजून, **काव्यप्रबंध** सिद्ध केला आहे, तो, (सामान्य मनुष्यरूपी) पशुहृदयापुढें वांझच ठरेल, पण, **कविहृदयाचे** ठायीं मात्र, कृतार्थ ठरेल अधोन्मीलित नेत्रांनीं, कामिनी, जे कटाक्ष फेकते, ते, पोरापुढें व्यर्थ, परंतु तरुणांना मात्र, अपूर्व सुख देतात.

---

निमग्नेन क्लेशैर्मननजलधेरन्तरुदरं
मयोन्नीतो लोके ललितरसगंगाधरमणिः ॥
हरन्नन्तर्ध्वान्तं हृदयमधिरूढो गुणवता–
मलङ्कारान्सर्वानपि गलितगर्वान् रचयतु ॥ ५७ ॥

शिखरिणी

महाकष्टांनीं मी सुमननसमुद्रांत बुडुनी
घरी काढीयेला ललित रसगंगाधर मणि ॥
धरो वक्षीं यातें गुणिजन मन कश्मलहर
अलंकारां सर्वां मम मणि ठरो हा मदहर ॥५७॥

गद्य अर्थ—

(जगन्नाथाच्या सर्व काव्यांतून दर्पोक्ति आणि सार्थ आत्मविश्वास यांचा मिश्र सूर ऐकू येतो हा श्लोक **रसगंगाधराच्या** प्रस्तावनेचा आहे.)

मननचिंतनरूपी समुद्राच्या पोटांत बुडी मारून, मोठ्या कष्टानें, मीं हें सुंदर **रसगंगाधररूपी** रत्न, वर काढलें आहे (इतर रत्नें स्वप्रकाशानें फक्त बाह्य अंधार नष्ट करतात, पण) माझें हें रत्न अंतरंगांतला अंधार दूर करणारें आहे गुणी जनांनीं हें रत्न, आपल्या हृदयावर धारण केल्यास, इतर सर्व अलंकारांचें गर्वहरण या रत्नानें केल्याचें दिसून येईल.

---

परिष्कुर्वन्त्वर्थान् सहृदयधुरीणाः कतिपये
तथापि क्लेशो मे कथमपि गतार्थो न भविता ॥
तिमींद्राः संक्षोभं विदधतु पयोधेः पुनरिमे
किमेतेनायासो भवति विफलो मन्दरगिरेः ॥५८॥

शार्दूलविक्रीडित

अर्था भूषविती महारसिक हो कित्येक लोकीं नर,
पाणी काय तयें पडेल मम या साऱ्या प्रयत्नावर ?॥
मत्स्यांनीं किलिही जरी उठविल्या लाटा समुद्रावर
तेणें का विफलप्रयास जगतीं तो जाहला मंदर ? ॥५८॥

गद्य अर्थ—

(रसगंगाधराच्या प्रस्तावनेंतील श्लोक–जगन्नाथाची हीच दर्पोक्ति पुढें चालू–)

**अर्थ सौंदर्य व्यक्तविणारे मोठे सहृदय** पुष्कळच आहेत, पण, त्यांच्या लिखाणामुळें, माझा हा प्रयत्न, निष्फळ थोडाच होणार आहे ? क्षुद्र मत्स्यांनीं समुद्राच्या (पृष्ठभागीं फारतर) लाटा उठवाव्या पण त्यानें, मंदर पर्वतानें, तळापासून समुद्र मथिला, त्याची बरोबरी थोडीच होणार ?

---

निर्माय नूतनमुदाहरणानुरूपं
काव्यं मयात्र रचितं, न परस्य किंचित्।
किं सेव्यते सुमनसां मनसापि गन्धः
कस्तूरिकाजननशक्तिभृता मृगेण ? ॥ ५९ ॥

वसंततिलका

निर्मून नूतन, उदाहरणां धरून,
मी काव्य हें रचियलें, उसनें मुळीं न ॥
हुंगील कां सुमनगंध मनामधेंही
कस्तूरि–जन्म द असा मृग तो कधींही ? ५९

गद्य अर्थ—

(रसगंगाधर प्रस्तावना, जगन्नाथ, तोच सूर पुढें चालू-) या ग्रंथांत, मीं जीं उदाहरणें दिलीं आहेत, त्यांना अनुसरून जें काव्य आहे, तें, माझें मी रचलें आहे लोकांची उसनवारी यत्किंचितही नाहीं ज्याला कस्तूरीसारखा, सर्वश्रेष्ठ सुगंध निर्माण करण्याचें सामर्थ्य आहे, असा मृग, फुलांचा वास घेण्याचें (चुकून तरी) मनांत आणील काय?

—·—

मधुद्राक्षाः साक्षादमृतमथ वामाधरसुधा
कदाचित्केषांचिन्न खलु विदधीरन्नपि मुदम्।
ध्रुवं ते जीवन्तोऽप्यहह मृतका मन्दमतयो
न येषामानन्दं जनयति जगन्नाथभणितिः ॥६०॥

शिखरिणी

मधु द्राक्षें, साक्षात् अमृत, तरुणीचुंबन तसें
कदाचित् कोणाला, चुकुनि न गमे मोदकरसें ॥
खरेंची मेलेले, जगत असुनी मंदमति ते
जगन्नाथाचें ना करुन मन ज्यांचें रिझवितें ॥ ६० ॥

गद्य अर्थ—

(जगन्नाथ आत्मश्लाघा) मधुर द्राक्षें, प्रत्यक्ष अमृत, तरुणीचें चुंबन, यांनीं सुद्धां ज्याला आनंद होत नाहीं, असा माणूसही, क्वचित्, कोणी, असूं शकेल पण जगन्नाथाच्या काव्यानं ज्याच्या मनाला आनंद होत नाहीं, असा मंदमति, कोठें असेल, तर, तो जिवंत असून, खरोखर मेलेला, असेंच, म्हटलें पाहिजे

—·—

गिरां देवी वीणागुणरणनहीनादरकरा
यदीयानां वाचाममृतमयमाचामति रसम् ॥
वचस्तस्याकर्ण्य श्रवणसुभगं पंडितपते-
रधुन्वन्मूर्धानं नृपशुरथवाऽयं पशुपतिः ॥ ६१ ॥

शिखरिणी

जियें वाग्देवी ही त्यजुनि रुचि वीणारणनिंची
स्वयें गोडी चाखी, अमृतमय ज्याच्या कवनिंची ॥
तयाची वाणी जे परिसुनि न शीर्षा डुलवितो
गमे ते सारेही जगिं नरपशू वा पशुपति ॥ ६१ ॥

गद्य अर्थ—

(जगन्नाथ आत्मश्लाघेचें शिखर) ज्याच्या काव्यांच्या अमृतरसपानापुढें, स्वतः श्रीशारदेला स्वत:च्या वीणेचा झंकार ऐकण्याची गोडी वाटेनाशी होते, अशा त्या जगन्नाथाचें सर्व मधुर काव्य ऐकून, ज्याचें मस्तक (समाधानानंदानें) डुलत नाहीं, तो, एकतर नरपशु तरी असेल, किंवा पशुपति तरी असेल

—·—

वाणी ममैव सरसा यदि रंजयित्री
न प्रार्थये रसविदामवधानदानम् ॥
मार्यंतनीषु मकरंदवतीषु भृंगाः
किं मल्लिकासु विनिमंत्रणमालभन्ते ? ॥६२॥

वसंततिलका

वाणीच गोड जर रंजक मामकीन
'द्या ध्यान' ही न विनती रसिकां करीन।
संध्येंतल्या उमलल्या नव मल्लिकेस
भोगार्थ भृंग न कधिं घेइ निमंत्रणास ? ॥६२॥

गद्य अर्थ—

(जगन्नाथ आत्मविश्वास) माझी वाणीच जर अत्यंत मधुर, व, रसविणारी आहे, तर "माझ्या काव्याकडे ध्यान द्या' असी, रसिकांना विनति मी करणार नाहीं संध्यासमयीं फुललेल्या नवमल्लिकेकडे येण्याला, भुंग्याला आमंत्रण थोडेंच करावें लागतें?

—·—

वसु यच्छतु वा न वा नरेशो
मम कर्णेऽपि च भारतीं करोतु ॥
रतिमिच्छतु वा न वा नवोढा
यदि केलीगृहदेहलीमुपैतु ॥ ६३ ॥

वसंततिलका

देवो न वा नृपति तो धन अल्प मातें
ऐकोच एक मम काव्य, मला पुरे तें ॥
इच्छो, न, वा, नववधू रति अनरांत
ठेवोच एक पद ती रतिमंदिरांत ॥ ६३ ॥

गद्य अर्थ—

(जगन्नाथाचा आत्मविश्वास दांडगा इमात्र अगदीं रंगेल)
मला पुरस्कार देण्याची, राजाची इच्छा असो, वा, नसो एकवार त्यानें माझें काव्य ऐकलें म्हणजे पुरें. (वेवल्यान तो

पूर्ण संतुष्ट होऊन मला पुरस्कार देईल, यात संशयच नाहीं. ) नववधूला (प्रथम समागमीं) रतिसुखाची इच्छा, झाली असो, वा, नसो; एकवार तिला रंगमहालाच्या उंबरठ्यात पाऊल तर टाकूं दे. (मग पुढचें सकलिन साध्य होण्याची, मला संपूर्ण खातरी आहे.)

———०———

अयं हि रसनोत्कर्षी पीनस्तनविमर्दनः ।
नाभ्यूरुजघनस्पर्शी नीवीविस्रंसनः करः ॥ ६४ ॥

वसंततिलका

हा तोच हात ! लिहिलें मृदु काव्य ज्यानें
उत्तुंगपीन कुच कुस्करिले जयानें ॥
अंगावरी युवतिच्या फिरला सुखांत
सोडी निऱ्या सुरतपूर्वेहि हाच हात ॥ ६४ ॥

गद्य अर्थ—

(कवि आपल्या हाताचें कौतुक करतो) ज्यानें रसपूर्ण काव्य लिहिलें-कुचमर्दन केलें, कामिनींचा अंगस्पर्श केला-नीवीबंध सोडले तोच धन्य हा हात।

———०———

येषां कोमलकाव्यकौशलकलालीलावती भारती
तेषां कर्कशतर्कवक्रवचनोद्गारेऽपि किं हीयते ॥
यैः कान्ताकुचमंडले कररुहाः सानन्दमारोपिता-
स्तैः किं मत्तकरीन्द्रकुम्भशिखरे नारोपणीयाः शराः ? ॥

शार्दूलविक्रीडित

वाणी काव्यमयी सुकौशलकलायुक्ता जयां लाभली
त्यांना साध्य न काय कर्कश अशी ती वक्र तर्कावली ?॥
कांतेच्या कुचमंडलीं फिरविती जे वीर मोदें कर
त्यांना शक्य न सोडणें शरहि कां उन्मत्त हत्तींवर ?॥

गद्य अर्थ—

("तुम्ही कवि लुसलुशीत काव्य लिहितां, तर्कशास्त्राची कठोर भाषा तुम्हांला काय साधणार ?" असें डिवचतां, कवि उत्तर देतो—)

ज्यांना ललित कौशल्ययुक्त काव्यवाणी असते, त्यांना, तर्काची वक्र कठोर भाषा वापरणें, अशक्य थोडेंच आहे ? (लढाईवर नसले, म्हणजे) जे वीर, आपल्या कांतेच्या कुच-कुंभावर, आनंदानें, हात फिरवितात, तेच वीर, त्याच हातांनीं, मत्तगजकुंभावर नाहीं का बाण सोडीन ?

———०———

पदविह्वलता कापि स्पृहणीया भवति रसकवीन्द्राणाम् ।
घनजघनस्तनमंडलभारालसकामिनीनां च ॥ ६६ ॥

आर्या

पद चुकणें कोठें तरि, शोभे मोठ्या कवींसही साचें ।
पुष्टस्तनजघनभरें अलसगमन शोभतें जसें स्त्रीचें ॥

गद्य अर्थ—

कवितेत कोठेंतरी एखादें पद घालण्यात चूक होणें हें महाकवींना एकप्रकारें शोभाच देतें. जसें भरदार स्तनजघन भारामुळें अलसगमन स्त्रीला हें (पद चुकणें) शोभतें तसें.

———०———

ते पृथ्वीपतयो जयन्ति, नतयो येषां द्विषद्भूभृतां
ते वंद्या यतयो, विशन्ति मतयो येषां परे ब्रह्मणि ।
ते श्लाघ्याः कवयो, वयोमदभरव्याजृम्भमाणाङ्गना-
दृक्पाता इव तोषयन्ति हृदयं, येषां गिरां संचयः ६७

शार्दूलविक्रीडित

राजे तेच खरे, जयांस नमिती ते शत्रुराजे सदा
ब्रह्मीं होइ विलीन यन्मति, यती ते वंद्य हो सर्वदा ॥
तोची स्तुत्य कवी, हरी जनमना, जो वाङ्मयाभूषणें
जैशी यौवनभारमत्त रमणी आकर्षिते दृष्टिनें ॥ ६७ ॥

गद्य अर्थ—

ज्यांना शत्रुराजे लोटांगण घालतात, ते खरे राजे. ब्रह्मांत ज्यांची मति विलीन झाली, ते खरे यति आणि, एकाद्या मत्त-यौवन कामिनीच्या कटाक्षाप्रमाणें, जे, आपल्या वाणीनें, जन-हृदयाला संतुष्ट करतात, ते खरे कवि !

———०———

हे राजानस्त्यजत सुकविप्रेमबन्धे विरोधं
शुद्धा कीर्तिः स्फुरति भवतां नूनमेतत्प्रसादात् ॥
तुष्टैर्बद्धं तदलघु रघुस्वामिनः सच्चरित्रं
क्रुद्धैर्नीतस्त्रिभुवनजयी हास्यमार्गं दशास्यः ॥६८॥

मंदाक्रान्ता

राजा ! मैत्री कविसि करण्या तूं विरोधास टाकी
शुद्धा कीर्ती तव पसरते तत्प्रसादेंच लोकीं ॥
श्रीरामाचें चरित रचिलें थोर ज्यांनीं खुषींत
नेलें कोपें त्रिजगविजयी रावणा हास्यतेंत ॥ ६८ ॥

गद्य अर्थ—

हे राजा, कवींशीं स्नेह करण्यावावतींतला तुझा विरोध टाकून दे तुझी विशुद्ध कीर्ति, त्यांच्याच कृपेनें, जगांत पसरते ते घडीत आले म्हणून, त्यांनीं रामाचें एवढें मोठें चरित्र रचिलें, ते रागावले, म्हणून त्रिजगविजयी रावणाला हास्यास्पद त्यांनींच करुन सोडलें.

———०———

लङ्कापतेः सङ्कुचितं यशो यद्
यत्कीर्तिपात्रं रघुराजपुत्रः ।
स सर्व एवादिकवेः प्रभावो
न कोपनीयाः कवयः क्षितीन्द्रैः ॥६९॥

वसंततिलका

केलें कमी कितितरी यश रावणाचें
सत्कीर्तिपात्र ठरलें यश राघवाचें ॥
तो तो प्रभाव बघ वाल्मिकिचाच त्यास
राजा! कधीं कविजनां डिवचूं नकोस ॥६९॥

गद्य अर्थ—

रावणाचें यश, पुष्कळ कमी करुन, रामाचें चरित्र कीर्तिपात्र ठरविलें, हा सर्व, आदिकवि वाल्मीकीचा (कर्तुमकर्तुम्) असा प्रभाव आहे, म्हणून, हे राजा! कवींचा कोप स्वत वर ओढवून घेऊं नकोस

———०———

रे रे खलाः शृणुत मद्वचनं समस्ताः
स्वर्गे सुधाऽस्ति, सुलभा न तु सा भवद्भिः ॥
कुर्मस्तदत्र भवतामुपकारकारि
काव्यामृतं पिबत तत्परमादरेण ॥७०॥

शार्दूलविक्रीडित

दुष्टांनो! तुमच्या हितार्थ वदतों तें सर्व घ्या ऐकुन
स्वर्गी त्या असली सुधा तरि तुम्हां
केव्हांहि ती लभ्य न ॥
आम्ही हे उपकारकारक, तुम्हां, आहोंत जें निर्मित
घ्या हो सादर तें पिऊन अमृता
हें तुल्य काव्यामृत ॥ ७० ॥

गद्य अर्थ—

हे सर्व दुष्टांनो! माझें बोलणें नीट ऐका! स्वर्गी अमृत आहे, पण तुम्हांस (स्वर्ग मिळणार नसल्यानें) तें कधींच मिळणारें नव्हे. तेव्हां तुमच्यावर उपकार करण्यासाठीं, आम्ही कवि (येथेंच) हें जें काव्यामृत उत्पन्न करीत आहों, तेंच आदरानें प्या!

———०———

नैव व्याकरणज्ञमेव पितरं, न भ्रातरं तार्किकं
मीमांसानिपुणं नपुंसकमिति, ज्ञात्वा निरस्तादरा ॥
दूरात्संकुचितेव गच्छति पुनश्चाण्डालवच्छान्दसं
काव्यालंकरणज्ञमेव कविता—कांता वृणीते स्वयम् ७१

आर्या

वैयाकरणास पिता,
भ्राता तार्किक जनास मानून।
मीमांसका नपुंसक
म्हणत, तया तुच्छ तुच्छ समजून ॥
दूर पळे संकोचें,
अस्पृश्यचि वैदिकास मानून।
काव्यालंकारज्ञा
काव्यवधु वरी स्वयेंच जाऊन ॥ ७१ ॥

गद्य अर्थ—

काव्यवधु ही वैयाकरणाला बाप, तार्किकाला भाऊ, मानते मीमांसकाला नपुंसक म्हणून तुच्छ मानते, वैदिकाला चाण्डाल समजून संकोचून दूर पळते काव्यालंकार जाणणाऱ्या पुरुषास मात्र, स्वतें जाऊन माळ घालते

———०———

गृह्णन्तु सर्वे यदि वा यथेष्टं
नास्ति क्षतिः क्वापि कवीश्वराणाम् ॥
रत्नेषु लुप्तेषु बहुष्वमर्त्यै-
रद्यापि रत्नाकर एव सिन्धुः ॥ ७२ ॥

उपजाति

घेवोत सारे कितिही लुटून
महाकवींचे लवही उणें न ॥
रत्नें किती चोरनिहीं सुरांनीं
समुद्र रत्नाकर तो अजूनी ॥ ७२ ॥

पूर्ण संतुष्ट होऊन मला पुरस्कार देईल, यात संशयच नाहीं ) नववधूला ( प्रथम संगमीं ) रतिसुखाची इच्छा, झाली असो, वा, नसो, एकवार तिला रंगमहालाच्या उंबरठ्यांत पाऊल तर टाकूं दे ( मग पुढचें संकल्पित साध्य होण्याची, मला संपूर्ण खातरी आहे )

---

अयं हि रसनोत्कर्षी पीनस्तनविमर्दनः ।
नाभ्यूरुजघनस्पर्शी नीवीविस्रंसनः करः ॥ ६४ ॥

वसंततिलका

हा तोच हात! लिहिलें मृदु काव्य ज्यानें
उत्तुंगपीन कुच कुस्करिले जयानें ॥
अंगावरी युवतिच्या फिरला सुखांत
सोडी निऱ्या सुरतपूर्वहि हाच हात ॥ ६४ ॥

गद्य अर्थ—

( कवि आपल्या हाताचें कौतुक करतो ) ज्यानें रसपूर्ण काव्य लिहिलें–कुचमर्दन केलें, कामिनींचा अंगस्पर्श केला–नीवीबंध सोडले तोच धन्य हा हात !

---

येषां कोमलकाव्यकौशलकलालीलावती भारती
तेषां कर्कशतर्कवक्रवचनोद्गारेऽपि किं हीयते ॥
यैः कान्ताकुचमंडले कररुहाः सानन्दमारोपिता–
स्तैः किं मत्तकरीन्द्रकुम्भशिखरे नारोपणीयाः शराः ? ॥

शार्दूलविक्रीडित

वाणी काव्यमयी सुकौशलकलायुक्ता जयां लाभली
त्यांना साध्य न काय कर्कश अशी ती वक्र तर्कावली ?॥
कांतेच्या कुचमंडलीं फिरविती जे वीर मोदें कर
त्यांना शक्य न सोडणे शरहि कां उन्मत्त हत्तींवर ?॥

गद्य अर्थ—

( "तुम्ही कवि लुसलुशीत काव्य लिहितां तर्कशास्त्राची कठोर भाषा तुम्हांला काय साधणार ?" असें डिवचतां, कवि उत्तर देतो– )

ज्यांना ललित कौशल्ययुक्त काव्यवाणी असते, त्यांना, तर्कांची वक्र कठोर भाषा वापरणें, अशक्य थोडेंच आहे ? ( लढाईवर नसले, म्हणजे ) जे वीर, आपल्या कांतेच्या कुच-कुंभांवर, आनंदानें, हात फिरवितात, तेच वीर, त्याच हातांनीं, मत्तगजकुंभांवर नाहीं कां बाण सोडीत ?

पदविह्वलता कापि स्पृहणीया भवति रसकवीन्द्राणाम्।
घनजघनस्तनमंडलभारालसकामिनीनां च ॥ ६६ ॥

आर्या

पद चुकणें कोठें तरि, शोभे मोठ्या कवींसही साचें।
पुष्टस्तनजघनभरें अलसगमन शोभतें जसें स्त्रीचें॥

गद्य अर्थ—

कवितेंत कोठेतरी एखादे पद घालण्यांत चूक होणें हें महाकवींना एकप्रकारें शोभाच देतें जसें भरदार स्तनजघन भारामुळें अलसगमन स्त्रीला हें ( पद चुकणें ) शोभतें तसें

---

ते पृथ्वीपतयो जयन्ति, नतयो येषां द्विषद्भूभृतां
ते वंद्या यतयो, विशन्ति मतयो येषां परे ब्रह्मणि ।
ते श्लाघ्याः कवयो, वयोमदभरव्याजृम्भमाणाङ्गना-
दृक्पाता इव तोषयन्ति हृदयं, येषां गिरां संचयः ६७

शार्दूलविक्रीडित

राजे तेच खरे, जयांस नमिती ते शत्रुराजे सदा
ब्रह्मीं होइ विलीन यन्मति, यती ते वंद्य हो सर्वदा ॥
तोची स्तुत्य कवी, हरी जनमना, जो वाङ्मयाभूषणें
जैशी यौवनभारमत्त रमणी आकर्षिते दृष्टिनें ॥ ६७ ॥

गद्य अर्थ—

ज्यांना शत्रुराजे लोटांगण घालतात, ते खरे राजे. ब्रह्मांत ज्यांची मति विलीन झाली, ते खरे यति आणि, एकाद्या मत्त-यौवन कामिनीच्या कटाक्षाप्रमाणें, जे, आपल्या वाणीनें, जन-हृदयाला संतुष्ट करतात, ते खरे कवि !

---

हे राजानस्त्यजत सुकविप्रेमबन्धे विरोधं
शुद्धा कीर्तिः स्फुरति भवतां नूनमेतत्प्रसादात् ॥
तुष्टैर्बद्धं तदलघु रघुस्वामिनः सच्चरित्रं
क्रुद्धैर्नीतस्त्रिभुवनजयी हास्यमार्गं दशास्यः ॥६८॥

मंदाक्रान्ता

राजा! मैत्री कविसि करण्या तूं विरोधास टाकीं
शुद्धा कीर्ती तव पसरते तत्प्रसादेच लोकीं ॥
श्रीरामाचें चरित रचिलें थोर ज्यांनीं सुप्रीत
नेले कोपें त्रिजगविजयी रावणा हास्यतेंत ॥ ६८ ॥

गद्य अर्थ—

हे राजा, कवींशीं स्नेह करण्याबावतींतला तुझा विरोध टाकून दे तुझी विशुद्ध कीर्ति, त्यांच्याच कृपेनें, जगांत पसरते ते युगींत आले म्हणून, त्यांनीं रामाचें एवढें मोठें चरित्र रचिलें ते रागावले, म्हणून त्रिजगविजयी रावणाला हास्यास्पद त्यांनींच करून सोडलें

———o———

लङ्कापतेः सङ्कुचितं यशो यद्
यत्कीर्तिपात्रं रघुराजपुत्रः ।
स सर्व एवादिकवेः प्रभावो
न कोपनीयाः कवयः क्षितीन्द्रैः ॥६९॥

वसंततिलका

केलें कमी कितितरी यश रावणाचें
सत्कीर्तिपात्र ठरलें यश राघवाचें ॥
तो तो प्रभाव वध वाल्मिकिचाच खास
राजा! कधीं कविजनां डिवचूं नकोस ॥६९॥

गद्य अर्थ—

रावणाचें यश, पुष्कळ कमी करून, रामाचें चरित्र कीर्तिपात्र ठरविलें, हा सर्व, आदिकवि वाल्मीकीचा (कर्तुमकर्तुम्) असा प्रभाव आहे, म्हणून, हे राजा! कवींचा कोप स्वत वर ओढवून घेऊं नकोस

———o———

रे रे खलाः शृणुत मद्वचनं समस्ताः
स्वर्गे सुधाऽस्ति, सुलभा न तु सा भवद्भिः ॥
कुर्मस्तदत्र भवतामुपकारकारि
काव्यामृतं पिबत तत्परमादरेण ॥७०॥

शार्दूलविक्रीडित

दुष्टांनो! तुमच्या हितार्थ वदतों तें सर्व घ्या ऐकुन
स्वर्गी त्या असली सुधा तरि तुम्हां
केव्हांहि ती लभ्य न ॥
आम्ही हे उपकारकारक, तुम्हां, आहोंत जें निर्मित
घ्या हो सादर तें पिऊन अमृता
हें तुल्य काव्यामृत ॥ ७० ॥

गद्य अर्थ—

हे सर्व दुष्टांनो! माझें बोलणें नीट ऐका! स्वर्गी अमृत आहे, पण तुम्हास (स्वर्ग मिळणार नसल्यानें) तें कधींच मिळणारें नव्हे तेव्हां तुमच्यावर उपकार करण्यासाठीं, आम्ही कवि (येथेंच) हें जें काव्यामृत उत्पन्न करीत आहों, तेंच आदरानें प्या!

———o———

नैव व्याकरणज्ञमेव पितरं, न भ्रातरं तार्किकं
मीमांसानिपुणं नपुंसकमिति, ज्ञात्वा निरस्तादरा ॥
दूरात्संकुचितैव गच्छति पुनश्चाण्डालवच्छान्दसं
काव्यालंकरणज्ञमेव कविता—कांता वृणीते स्वयम् ७१

आर्या

वैयाकरणास पिता,
भ्राता तार्किक जनास मानून ।
मीमांसका नपुंसक
म्हणत, तया तुच्छ तुच्छ समजून ॥
दूर पळे संकोचें,
अस्पृश्यचि वैदिकास मानून ।
काव्यालंकारज्ञा
काव्यवधु वरी स्वयेंच जाऊन ॥ ७१ ॥

गद्य अर्थ—

काव्यवधु ही वैयाकरणाला बाप, तार्किकाला भाऊ, मानते मीमांसकाला नपुंसक म्हणून तुच्छ मानते, वैदिकाला चाण्डाल समजून संकोचून दूर पळते काव्यालंकार जाणणाऱ्या पुरुषास मात्र, स्वयें जाऊन माळ घालते

———o———

गृह्णन्तु सर्वे यदि वा यथेष्टं
नास्ति क्षतिः क्वापि कवीश्वराणाम् ॥
रत्नेषु लुप्तेषु बहुष्वमर्त्यै-
रद्यापि रत्नाकर एव सिन्धुः ॥ ७२ ॥

उपजाति

घेवोत सारे कितिही लुटून
महाकवींचें लवही उणें न ॥
रत्नें किती चोरनिही सुरांनीं
समुद्र रत्नाकर तो अजूनी ॥ ७२ ॥

निर्=नाहीं, रजनिकर=चंद्र; नीरज=कमल; निकर=समुदाय, वरसभा=पंडितांची सभा. नव-रस-भावज्ञ=नऊ रसाचे भाव जाणणारे.

चंद्राशिवाय रात्र-कमलसमुदायाविना सरोवर; आणि नव-रस भाव जाणणाऱ्याशिवाय पंडितसभा-राजसभा या शोभत नाहींत.

---

यदि प्रभुरुदारधीः सुरसकाव्यकौतूहल—
स्तथैव च सभासदः सदसि तद्गुणग्राहिणः ॥
सुवर्णसदलंकृतिर्भवति तत्र नृत्योद्यता
मदीयरसनानटी रसघटीयमानन्दभूः ॥ ७७ ॥

आर्या

प्रभु तो उदारहृदयी,
काव्यरसा जाणता असेल जर।
आणि सभेंत सभासद
परगुण घेण्यास सिद्ध असति तर ॥
मम रसना हीच नटी
रसमय आनंदभूमि, नृत्यार्थ
आहे सज्ज सुवर्णा-
लंकारांचें स्वविभव दावीत ॥ ७७ ॥

गद्य अर्थ—

राजा, मनानें उदार, व, काव्यज्ञ, आणि, राजसभेंतील सदस्य गुणग्राहक असतील, तर, माझी वाणीरूपी नटी, रसमय, व आनंददायी अशी, स्वतःचें सु-वर्ण व अलंकार ( दोन्ही शब्द द्व्यर्थी ) यांचें वैभव दाखवीत, नर्तन करण्यास तयारच आहे.

---

पुरो वा पश्चाद्वा वयमुपविशामः क्षितिभुजां
ततः किन्नश्छिन्नं वचनरचनाक्रीतजगताम् ॥
अगारे, कान्तारे, कुचकलशभारे मृगदृशां
मणेस्तुल्यं मूल्यं सहजसुभगस्य द्युतिमतः ॥ ७८ ॥

आर्या

सुवचनरचनामूल्यें अखिल जगा विकत घेतलें ज्यांनीं
मागें, पुढें, नृपाच्या, कुठेंहि बसलों तरी कुठें हानि? ॥
स्त्रीच्या कुचकुंभांवर-घरांत किंवा वनांत जरि असलें
द्युतिमय रत्नाचें त्या सहज असें मूल्य काय तरि बदले? ॥

गद्य अर्थ—

( कोणा कवीला, त्याच्या योग्य, मानाची जागा, राजसभेंत न मिळाल्यामुळें, कवि म्हणतो- )

ज्या आम्ही आमच्या सुंदर काव्यरचनेनें उभ्या जगाला विकत घेतलें आहे—त्या आम्हांला, राजाच्या पुढें बसविण्यांत आलें, किंवा मागें, तरी त्यामुळें आमची काय हानि होणार आहे? घरांत असो, वनांत असो, किंवा स्त्रीच्या वक्षोजांवर असो, मूल्याच्या तेजस्वी रत्नाचें मूल्य थोडेंच कमी अधिक होतें?

---

व्यासादीन्कविपुङ्गवाननुचितैर्वाक्यैः सलीलं हस-
न्नुच्चैर्जल्प, निमील्य लोचनयुगं श्लोकान्सगर्वं पठ ॥
काव्यं धिक्कुरु यत्परैर्विरचितं स्पर्धस्व सार्धं बुधै-
र्वचभ्यर्थयसे श्रुतेन रहितः पाण्डित्यमाप्तुं बलात् ॥ ७९ ॥

स्रग्धरा

व्यासादी सत्कवींना, अनुचित वदुनी
लीलया तू हंसून,
मोठ्यानें जल्प, दोन्ही स्वनयन मिटुनी
श्लोक गर्वें म्हणून ॥
धिक्कारी काव्य अन्यें रचित सरसही,
स्पर्धा विद्वज्जनांतें
यावें पांडित्य वाटे जर नच शिकतां,
ओढुंताणून तूतें ॥ ७९ ॥

गद्य अर्थ—

( स्वत ला कांहीं ज्ञान नसतां, पांडित्याचा आव आणीत, जे कविब्रुव इतर सर्वांना नावें ठेवीत बसतात, त्यांना उद्देशून— )

जर तुला, कांहीं न शिकतां, ओढून ताणून आणलेलें पांडित्य विकटवून घेण्याची इच्छा असेल तर व्यासादि महाकवींना, कांहींतरी, अचकट-विचकट, बोलून लीलेनें हंसत जा. डोळे मिटून, कोठले तरी श्लोक, मोठ्या गर्वांत म्हणत, मोठ्यानें बडबडत जा. दुसऱ्यांच्या चांगल्या काव्यांचाही धिक्कार करीत जा. मोठमोठ्या विद्वानांशीं स्पर्धा कर.

---

देवीं वाचमुपासते हि बहवः, सारं तु सारस्वतं
जानीते नितरामसौ कुविकुलश्रेष्ठो मुरारिः कविः ॥
अब्धिर्लङ्घित एव वानरभटैः किन्त्वस्य गंभीरता-
मापातालनिमग्न-पीवर-तनुर्जानाति मंथाचलः ॥८०॥

गद्य अर्थ—

सर्वांनीं त्यांना यथेच्छ लुटलें, तरी महाकवींचें (भाण्डार) कमी होत नाहीं देवांनीं त्यातलीं कितीही रत्नें चोरून नेलीं, तरी समुद्र अद्यापि रत्नाकरच आहे

---

प्रतीयमानं पुनरन्यदेव
वस्त्वस्ति वाणीषु महाकवीनाम् ॥
यत्तत्प्रसिद्धावयवातिरिक्तं
विभाति लावण्यमिवाङ्गनासु ॥ ७३ ॥

शार्दूलविक्रीडित

वाटे वाचुनि अर्थ त्याहुनि दुजा राहे परी अंतरीं
होई थोर कवींचिया सुवचनीं ऐसेंच कांहींतरी ॥
स्त्रीची सुंदरताहि भौतिक तिच्या अंगांत वाटे जरी
न्यारें त्याहुनिही मनोमय वसे सौंदर्य तेथें परी ॥७३॥

गद्य अर्थ—

वरून वाचून, जो अर्थ भासतो, त्याहून दुसराच आशय, त्याचे पोटांत असावा; असें कांहींतरी महाकवींच्या उक्तींत असतें. स्त्रीच्या भौतिक देहांत जें सौंदर्य वरवर पाहणाराला वाटतें, त्याहून कांहींतरी निराळेंच सौंदर्य, तिच्या अंतरंगांत असतें, तद्वत्.

---

अग्रे गीतं, सरसकवयः पार्श्वतो दाक्षिणात्याः
पृष्ठे, लीलावलयरणितं चामरग्राहिणीनाम् ॥
यद्यस्त्येवं कुरु भवरसास्वादने लम्पटत्वं
नो चेच्चेतः प्रविश सहसा निर्विकल्पे समाधौ ॥७४॥

मंदाक्रांता

चाले गाणें पुढति, भवतीं सत्कवी दक्षिणी ते
मागें ढाळी चवरि, ललना कंकणांचे ध्वनी ते ॥
लाभे ऐसें तरचि धर तूं संसृतीची उपाधि
चित्ता ! नाहींतर भज क्षणीं निर्विकल्पा समाधि ॥७४॥

गद्य अर्थ—

(भर्तृहरि म्हणतो)–पुढें, गायन चाललें आहे. आजूबाजूस थोर दक्षिणी कवि विराजमान आहेत. मागें, तरुणी, चवऱ्या ढाळतांना, त्यांच्या कंकणांचा रुणत्कार, कानीं पडत आहे असें कांहीं वैभव मिळत असेल, तरच, संसाराचा लोभ धरावा. [illegible] त्याच्या मागें लाग.

क्षान्तिश्चेत्कवचेन किं ? किमरिभिः
क्रोधोऽस्ति चेद्देहिनां ?
ज्ञातिश्चेदनलेन किं ? यदि सुहृ-
द्दिव्यौषधैः किं फलम् ? ॥
किं सर्पैर्यदि दुर्जनाः ? किमु धनै-
र्विद्यानवद्या यदि ?
व्रीडा चेत्किमु भूषणैः ? सुकविता
यद्यस्ति राज्येन किम् ? ॥ ७५ ॥

आर्या

असतां क्षमा, कवच तें
कशास ?–रिपुही, असेल कोप जर ?
असतां वारस, अग्निहि
फोलचि, औषध, असेल मित्र जर ॥
असतां कुजन कशाला
साप ? सुविद्येपुढें धनहि काय ?
विनयापरतें भूषण—
काव्यकलेपुढति राज्य तें काय ? ॥ ७५ ॥

गद्य अर्थ—

माणसाच्या अंगीं, क्षमा असेल, तर, चिलखताची काय आवश्यकता आहे ? कोध असेल, तर, निराळा शत्रु कशाला हवा ? वारसा हक्क सांगणारे असतील, तर, निराळा अग्नि कशाला ? सुमित्र असतील, तर, निराळें औषध कशाला ? दुर्जन असतां, आणखी सर्प कशाला ? सुविद्या असल्यास, धनाची काय पर्वा ? विनय असल्यास, भूषण कशाला ? काव्यकला असेल तर, तीपुढें, राज्य तें काय ?

---

रात्रिर्नीरजनिकरा नीरजनिकरापरिष्कृता सरसी ।
अपि भजते न वरसभा नवरसभावज्ञवर्जिता शोभाम् ॥

आर्या

नीरजनिकरा रात्री नीरजनिकराविना सरोवर ही
न वरसभाही शोभे नवरसभावज्ञजनविना कधिंही ७६

गद्य अर्थ—

यात नीरजनिकरा, न वरसभा या शब्दांत कोटि आहे (म्हणून ते मराठी भाषांतरात तसेच ठेवावे लागले)

निर्=नाहीं, रजनिकर=चंद्र; नीरज=कमल; निकर=समुदाय, वरसभा=पंडितांची सभा. नव-रस-भावज्ञ=नऊ रसांचे भाव जाणणारे.

चंद्राशिवाय रात्र-कमलसमुदायाविना सरोवर; आणि नव-रस भाव जाणणाऱ्यांशिवाय पंडितसभा-राजसभा या शोभत नाहींत.

---

यदि प्रभुरुदारधीः सुरसकाव्यकौतूहल—
स्तथैव च सभासदः सदसि तद्गुणग्राहिणः ॥
सुवर्णसदलंकृतिर्भवति तत्र नृत्योद्यता
मदीयरसनानटी रसघटीयमानन्दभूः ॥ ७७ ॥

आर्या

प्रभु तो उदारहृदयी,
काव्यरसा जाणता असेल जर।
आणि सभेंत सभासद
परगुण घेण्यास सिद्ध असति तर ॥
मम रसना हीच नटी
रसमय आनंदभूमि, नृत्यार्थ
आहे सज्ज सुवर्णा-
लंकारांचें स्वविभव दावीत ॥ ७७ ॥

गद्य अर्थ—

राजा, मनानें उदार, व, काव्यज्ञ, आणि, राजसभें-तील सदस्य गुणग्राहक असतील, तर, माझी वाणीरूपी नटी, रसमय, व आनंददायी अशी, स्वतःचें सु-वर्ण व अलंकार ( दोन्ही शब्द द्व्यर्थी ) यांचें वैभव दाखवीत, नर्तन करण्यास तयारच आहे.

---

पुरो वा पश्चाद्वा वयमुपविशामः क्षितिभुजां
ततः किन्नश्छिन्नं वचनरचनाक्रीतजगताम् ॥
अगारे, कान्तारे, कुचकलशभारे मृगदृशां
मणेस्तुल्यं मूल्यं सहजसुभगस्य द्युतिमतः ॥ ७८ ॥

आर्या

सुवचनरचनामूल्यें अखिल जगा विकत घेतलें ज्यांनीं
मागें, पुढें, नृपाच्या, कुठेंहि बसलों तरी कुठें हानि? ॥
स्त्रीच्या कुचकुंभांवर-घरांत किंवा वनांत जरि असलें
द्युतिमय रत्नाचें त्या सहज असें मूल्य काय तरि बदले?

गद्य अर्थ—

( कोणा कवीला, त्याच्या योग्य, मानाची जागा, राजसभेंत न मिळाल्यामुळें, कवि म्हणतो- )

ज्या आम्ही आमच्या सुंदर काव्यरचनेनें उभ्या जगास विकत घेतलें आहे-त्या आम्हांला, राजाच्या पुढें बसविण्यांत आलें, किंवा मागें, तरी त्यामुळें आमची काय हानि होणार आहे? घरांत असो, वनांत असो, किंवा स्त्रीच्या वक्षोजांवर असो, मूळच्या तेजस्वी रत्नाचें मूल्य थोडेंच कमी अधिक होतें?

---

व्यासादीन्कविपुङ्गवाननुचितैर्वाक्यैः सलीलं हस-
न्नुच्चैर्जल्प, निमील्य लोचनयुगं श्लोकान्सगर्वं पठ ॥
काव्यं धिक्कुरु यत्परैर्विरचितं स्पर्धस्व सार्धं बुधै-
र्यद्यभ्यर्थयसे श्रुतेन रहितः पाण्डित्यमाप्तुं बलात् ॥७९॥

स्रग्धरा.

व्यासादी सत्कवींना, अनुचित वदुनी
लीलया तू हंसून,
मोठ्यानें जल्प, दोन्ही स्वनयन मिटुनी
श्लोक गर्वे म्हणून ॥
धिक्कारी काव्य अन्यें रचित सरसही,
स्पर्ध विद्वज्जनांतें
यावें पांडित्य वाटे जर नच शिकतां,
ओढुंताणून तूतें ॥ ७९ ॥

गद्य अर्थ—

( स्वतःला कांहीं ज्ञान नसतां, पांडित्याचा आव आणीत, जे कविब्रुव इतर सर्वांना नावें ठेवीत बसतात, त्यांना उद्देशून-)

जर तुला, कांहीं न शिकतां, ओढून ताणून आणलेलें पांडित्य मिरवून घेण्याची इच्छा असेल तर व्यासादि महाकवींना, काहींतरी, अचरट-विचरट, बोलून लीलेनें हंसत जा. डोळे मिटून, कोठले तरी श्लोक, मोठ्या गर्वांत म्हणत, मोठ्यानें बडबडत जा. दुसऱ्यांच्या चांगल्या काव्यां-चाही धिक्कार करीत जा. मोठमोठ्या विद्वानांशीं स्पर्धा कर.

---

देवीं वाचमुपासते हि बहवः, सारं तु सारस्वतं
जानीते नितरामसौ कुविकुलश्रेष्ठो मुरारिः कविः ॥
अब्धिर्लङ्घित एव वानरभटैः किन्त्वस्य गंभीरता-
मापातालविमग्न-पीवर-तनुर्जानाति मंथाचलः ॥८०॥

शार्दूलविक्रीडित

वाग्देवीस उपासिती किति तरी, काव्यस्थ मर्मं परी
जाणे पूर्ण मुरारि तो, कविकुळीं जो भूषणाचे परी ॥
अब्धी लंघिति वीर वानर, परी खोली तयाची किती-
पातालावधि पुष्ट देह बुडवी, त्या मंदरा ज्ञात ती ॥८०॥

गद्य अर्थ—

(मुरारिकवीची प्रशंसा-) सरस्वतीची उपासना करणारे पुष्कळ आहेत, परंतु काव्यांतलें खरें सार कविश्रेष्ठ मुरारि हा एकटाच जाणतो. लंकेच्या समरांत अनेक वानरवीर समुद्रावरून उड्डाण करून गेले, परंतु, समुद्राची खोली किती, तें (मंथनाचे वेळीं) आपला विशाल देह, अगदीं पाताळापर्यंत ज्यानें बुडविला, त्या एका मंदर पर्वतालाच माहीत !

———०———

यस्याश्चोरश्चिकुरनिकरः कर्णपूरो मयूरो
भासो हासः कविकुलगुरुः कालिदासो विलासः ।
हर्षो हर्षो, हृदयवसतिः पञ्चबाणस्तु बाणः
केषां नैषा कथय कविताकामिनी कौतुकाय ॥८१॥

शार्दूलविक्रीडित

कानांतील मयूर भूषण; जिच्या, केशांपरी चोर तो
कालीदास विलास, भासहि जिच्या
हासापरी भासतो ॥
हर्षाचे परि हर्ष, बाण हृदयीं तो पंचबाणापरी
होई पात्र न कौतुकास कविता-देवी कुण्या अंतरीं?

गद्य अर्थ—

ज्या कवितादेवीच्या, मयूर कवि हा कर्णभूषणाप्रमाणें आहे, चोर कवि हा केशकलापाप्रमाणें, भास हा हास्याप्रमाणें कविकुलश्रेष्ठ कालिदास हा विलासाप्रमाणें, हर्ष हा हर्षाप्रमाणें, व बाण जणू तिच्या हृदयातील पंचबाणा (मदना) प्रमाणें आहे,—ती कवितादेवी, सांग बरें, कोणाच्या कौतुकाला पात्र होणार नाहीं ?

———०———

पुरा कवीनां गणनाप्रसंगे
कनिष्ठिकाधिष्ठितकालिदासा ।
अद्यापि तत्तुल्यकवेरभावा-
दनामिका सार्थवती बभूव ॥ ८२ ॥

शार्दूलविक्रीडित

पूर्वीं एक कुणी, जुन्या कविजनां मोजावया बैसतां-
हुकानेंच कनिष्ठिकेवर वसे तो कालिदास स्वतां ॥
त्याच्या तुल्य दुजा कवी न दिसतां ती मोजणी थांबली
यासाठींच अनामिका अजुनिही नांवापरी राहिली ॥

गद्य अर्थ—

(करांगुलीच्या जवळच्या बोटाला अनामिका नांव कां पडलें याचें अभिनव स्पष्टीकरण –)

पूर्वी, कोणी, कवींची गणना करावयास बसले, तेव्हा साहजिक कालिदासाच्या नांवानें करांगुळी मिटली पण पुढें विचार करतां, कालिदासाच्या तोलाचा कवि अद्यापपर्यंत कोणी झालेला नसल्यानें, दुसरें बोट मिटण्याची पाळीच आली नाहीं, त्यामुळें त्या बोटाचें अनामिका हें नाव सार्थ झालें.

———०———

गीर्वाणवाणीषु विशिष्टबुद्धि-
स्तथापि भाषांतरलोलुपोऽहम् ॥
यथा सुधायां मरुतां च सत्यां
स्वर्गाङ्गनानामधरासवे रुचिः ॥ ८३ ॥

वसंततिलका

त्या संस्कृताप्रति मला जरि ओढ राहे
भाषांतरांत तरि लोलुप मीच आहे ॥
स्वर्गामधें अमृतही मिळुनी सुरांतें
कां अप्सराधरसुधा अति गोड वाटे ? ॥ ८३॥

गद्य अर्थ—

संस्कृत भाषेविषयीं मला विशेष प्रेम असलें, तरी, भाषांतर करण्याविषयीं माझें मन विशेष लोलुप आहे. देवांना अमृत मिळत असून सुद्धां, अप्सरांचें अधरासव पिण्यास, त्यांना गोडी वाटतेच ना ?

———०———

श्लोकस्तु श्लोकतां याति यत्र तिष्ठन्ति साधवः ।
'ल' कारो लुप्यते तत्र यत्र तिष्ठन्त्यसाधवः ॥ ८४ ॥

अनुष्टुभ्

असती साधु हे तेथें श्लोक श्लोकत्व पावतो ॥
असाधु असती तेथें 'ल' हा त्यांतुनि लोपतो ॥ ८४ ॥

गद्य अर्थ—

काव्याचा, श्लोकाचा, आस्वाद घेणारे जर सुजन असतील, तर श्लोकाचें श्लोकत्व टिकून राहतें. पण जर, काव्यवाचक दुर्जन असतील तर, त्या श्लोक शब्दांतील 'ल' कार नष्ट होतो, म्हणून शोक शिल्लक राहतो. ( कुठून या दुर्जनांना काव्य दाखविलें असें म्हणून शोक करण्याची पाळी कवीवर येते. )

———

कवीश्वराणां वचसां निनादै-
नंदन्ति विद्यानिधयो न चान्ये ॥
चंद्रोपला एव करैर्हिमांशो-
र्मध्ये शिलानां सरसा भवन्ति ॥ ८५ ॥

उपजाति

महाकवींच्या वचनें निनाद
उठे सुविद्यांतच, ना दुज्यांत ॥
करें शशीच्या, अवघ्या शिलांत
रसें द्रवे एकच चंद्रकांत ॥ ८५ ॥

गद्य अर्थ—

महान् कवींच्या वाणीचे पडसाद, सुविद्य अंतःकरणांतच उठतात; इतरांत नाहीं. दगडांच्या राशींत, एकटा चंद्रकांतच काय तो, चंद्राचे किरण पडतांच, रसानें न्हाहून निघतो.

———

शब्दशास्त्रमनधीत्य यः पुमान्
वक्तुमिच्छति वचः सभान्तरे ॥
बद्धुमिच्छति वने मदोत्कटं
हस्तिनं स बिसतन्तुभिर्नरः ॥ ८६ ॥

रथोद्धता

शब्दशास्त्र न शिकूनि जे जन
बोलुं इच्छिति क्षणीं सभांतुन ॥
इच्छिती कमलतन्तु घेउनी
बांधण्यास गज मत्त ते वनीं ॥ ८६ ॥

गद्य अर्थ—

शब्दशास्त्र, वक्तृत्व, वगैरे न शिकता, जो मनुष्य एकदम आपला, सभांतून बोलूं पाहतो, तो, रानातल्या उन्मत्त हत्तीला, कमलतंतूंनीं बांधूं पाहतो असेंच म्हटलें पाहिजे.

———

सरस्वती—मातुरभूच्चिरं न यः
कवित्वपांडित्यघनस्तनंधयः ॥
कथं स सर्वाङ्गमनाप्तसौष्ठवो
दिनादिनं प्रौढिविशेषमश्नुते ? ॥८७॥

आर्या

आई सरस्वतीचे कवित्व पांडित्य पुष्ट कुच दोन ।
त्यांचे बहुकाळ कधीं बाल्यीं ज्याला न लाभलें पान ॥
ऐसा कृशतनु कवि तो अंगीं सौष्ठव जया मिळालें न ।
प्रौढत्व उत्तरोत्तर, विशेषसें, दाखवील कोठून ? ८७

गद्य अर्थ—

कवित्व आणि विद्वत्ता, हे जे सरस्वतीमातेचे जणूं दोन पुष्ट स्तनच, त्यांचें पान, ज्याना फारसें मिळालें नाहीं, ज्यांना त्यामुळें, देहसौष्ठव आलें नाहीं, असे जरत्कारु कवि, उत्तरोत्तर, ( आपल्या काव्यदेहांत ) विशेषसें प्रौढत्व, कोठून दाखवूं शकणार ?

———

सत्काव्यमास्वाद्य यदा रसज्ञो
नैव क्षमो धारयितुं स्वमोदम् ॥
प्रणेतुरग्रे प्रकटीकरोति
भुङ्क्तस्तदाऽऽनन्दमवर्णनीयम् ॥ ८८॥

उपजाति

चाखोनि सत्काव्य रसज्ञ जेव्हां
मोदा समावूं न शकेच; तेव्हां ॥
कवीस तो बोलुनि दाखवीतो
दोघां तदा मोद अवर्ण्य होतो ॥ ८८ ॥

गद्य अर्थ—

( कवि-श्री. छत्रे, कल्याण. ) रसज्ञ, जेव्हा एखादें सत्काव्य चाखतो, व त्यामुळें त्याचा आनंद पोटांत न मावल्यानें, तो जेव्हा, तें कवीस सांगतो, तेव्हां त्या दोघानाही जो आनंद होतो तो अवर्णनीय असतो.

———

ताम्बूलं दयिताधरे प्रकुरुते रंगप्रकर्षं यदा
हृत्वा तत् परिचुम्ब्य हर्षित-मना ओष्ठे निजे वल्लभः ॥
चर्वन् स्वाननसंपुटे वितनुते तुल्यां रुचिं, सोऽश्नुते
यं मोदं, लभते तमेव रसिको भाषान्तरास्वादकः ८९

वसंततिलका

रंगे विडा बहु जधीं दयिताधरांत,
　चुंबून, त्या हरनि घेत (खात) निजाननांत॥
तत्तुल्य ओष्ठ निज, रंगविण्यांत जैशी
　भाषांतरांत रुचि ये रसिकास तैशी ॥ ८९॥

गद्य अर्थ—

आपल्या प्रियेनें तांबूलभक्षण सुरू केलेलें आहे व त्यामुळें तिचे ओष्ठ विशेष रंगलेले आहेत असें बघून (आपल्या आवडत्या कवीची विशेष रंगलेली कविता पाहून) प्रियकरानें तिचें चुंबन घेऊन, तिच्या मुखातला तो विडा आपल्या मुखात घ्यावा (आपल्या भाषेत तो अर्थ आणावा) व पुनश्चर्वण करीत, स्वताचे ओष्ठांना प्रियेच्या ओष्ठांइतका रंग आणावा (मूळांतली बहुतेक गोडी, रस, रंग, भाषांतरांत आणावा) याप्रकारामध्यें प्रियकराला जी गोडी लागते— तशीच गोडी भाषान्तराचा स्वाद घेणाऱ्या रसिकाला मिळत असते. (स्वतंत्र कविता हा एकट्यानें विडा खाण्या-सारखें व भाषांतरित कविता वरील प्रमाणें खेळ विडा, खाण्यासारखें, म्हणून भाषांतराचें श्रेष्ठत्व वर्णिलें आहे.)

---

# प्रकरण तिसरें

## गुण, गुणी, गुणज्ञ, निर्गुण, दोष, दोषीः—

गुणा गुणज्ञेषु गुणीभवन्ति
ते निर्गुणं प्राप्य भवन्ति दोषाः॥
आस्वाद्यतोयाः प्रभवंति नद्यः
समुद्रमासाद्य भवन्त्यपेयाः॥ १॥

उपजाति

गुणज्ञची सद्गुण जाणताती
　ते निर्गुणाच्या करिं दोष होती॥
गोडेंचि पाणी उगमीं नद्यांचें
　अब्धींत तें योग्य नसे पिण्याचे॥ १॥

गद्यार्थ—

गुण जाणणाऱ्यापाशीं, गुण हे गुणच ठरतात; पण, तेच निर्गुणाला दोषासारखे दिसतात. नद्या या उगमाशी गोडच असतात पण त्याच समुद्रांत गेल्या, कीं, त्यांचें पाणी पिण्याचे योग्य राहात नाहीं.

---

विद्वाभिरामगुणगौरवगुम्फितानां
रोषोऽपि निर्मलधियां रमणीय एव॥
लोकप्रियैः परिमलैः परिपूरितस्य
काश्मीरजस्य कटुतापि नितान्तरम्या॥ २॥

वसंततिलका

विश्वास मोहक अशा गुणसुंदरांचा
　हो गोड रोषहि सुनिर्मल अंतरींचा॥
लोकप्रियें परिमलें असतें भरून
　त्या केशरांतिल किती कटुताहि छान!॥ २॥

गद्यार्थ—

विशाल आवडणाऱ्या गुणांनीं युक्त व निर्मल अंतःकरणाच्या सुजनांचा, रोष हाही, रमणीय असतो. सर्वांना आवडणारा सुगंध ज्यांत पूर्ण भरला आहे, अशा केशरातील, कडूपणासुद्धां रम्यच वाटतो.

---

गुणाः कुर्वन्ति दूतत्वं; दूरेऽपि वसतां सताम्॥
केतकीगन्धमाघ्राय स्वयमायांति षट्पदाः॥ ३॥

अनुष्टुभ्

राहत्या दूर साधूंचे दूत होतात सद्गुण॥
हुंगुनी केतकी गंध, स्वयें येतात षट्पद॥ ३॥

गद्यार्थ—

साधु (गुणशील) दूर राहत असले, तरी, त्यांचे सद्गुण हे, त्यांचे दूत होतात. केवड्याचा वास (हाच त्याचा सद्गुण दूत) घेतांच, भुंगे आपसच होऊन धांवत येतात.

कस्यापि कोऽप्यतिशयोऽस्ति स तेन लोके
ख्यातिं प्रयाति, न हि सर्वविदस्तु सर्वे ॥
किं केतकी फलति ? किं पनसः सपुष्पः ?
किं नागवल्ह्यपि च पुष्पफलैरुपेता ? ॥ ४ ॥

वसंततिलका

कांहीं कुणांत गुण थोर वसे तयानें
तो ख्यात होत जगिं, सर्व न सर्व जाणे ॥
कां केवडयास फळ? कां फणसास फूल?
किंवा धरील फळपुष्पहि नागवेल ? ॥ ४ ॥

गद्यार्थ—

कोणांत कांहींतरी विशेष गुण असतो, तेवढ्यानें तो जगांत प्रख्यात होतो. सारेच कांहीं सर्वज्ञ नसतात. केवड्याला कुठें फळ येतें ? फणसाला कुठें फूल येतें ?, किंवा नागवेलीला फळें फुलें दोन्ही कुठें येतात ? (पण एकेक गुण आहे तो पुरेसा आहे.)

———•———

प्रथमदिवसचंद्रः सर्वलोकैकवन्द्यः
स च सकलकलाभिः पूर्णचन्द्रो न वन्द्यः ॥
अतिपरिचयदोषात्कस्य नो मानहानि-
र्नवनवगुणरागी प्रायशो जीवलोकः ॥ ५ ॥

मालिनी

प्रथमदिवसचंद्रा सर्वही पूजितात
परि नच पुनवेचा चंद्र तो धंद्य होत ॥
अतिपरिचयदोषें मान राहे कुणास ?
नव नच गुण वाटे गोड सार्‍या जगास ॥ ५ ॥

गद्यार्थ—

लोक प्रतिपदेच्या चन्द्राची पूजा करतात; पण, सर्व कलांनीं युक्त पौर्णिमेच्या चन्द्राची करीत नाहींत. ( सतत १५ दिवस पाहिल्यानें त्याचा कंटाळा येत असावा ) अतिपरिचय झाल्यानें कोणाची मानहानि होत नाहीं ? सर्वांनाच नवा नवा गुण आवडला, म्हणजे तो गोड वाटतो.

———•———

शिशुर्वा शिष्या वा यदसि मम तत्तिष्ठतु तथा
विशुद्धेरुत्कर्षस्त्वयि तु मम भक्तिं द्रढयति ॥
शिशुत्वं स्त्रैणं वा भवतु ननु वंद्यासि जगतो
गुणाः पूजास्थानं गुणिषु, न च लिङ्गं न च वयः ॥ ६ ॥

शार्दूलविक्रीडित

शिष्या वा शिशु तूं जरी मजसि दे
नातें तसें ठेवुनी
मोठी शुद्धि तुझी, करी दृढ, तुझ्या
ठायींच भक्ती मनीं ॥
सीते ! तूं जगतास वंद्य असती;
स्त्री बालही होउनी
ना लिंगा, न वयास, केवळ गुणां,
पूजार्ह मानी गुणी ॥ ६ ॥

गद्यार्थ—

( वसिष्ठ मुनि सीतेला म्हणतात— ) हे सीते, तूं मला मुलीसारखी किंवा शिष्येसारखी आहेस तें नातें क्षणभर बाजूस ठेव ! पण तुझी परमशुद्धता, माझी तुझ्या ठायीं भक्ति वाढवीत आहे. तूं लहान असलीस किंवा स्त्री असलीस (म्हणून काय झालें ?) तरी जगाला वन्दनीयच आहेस. गुणी लोक हे केवळ गुणांसच पूजार्ह मानतात. पूजास्थानाचें लिंग किंवा वय पाहात नाहींत.

———•———

बाह्यांगमात्रमवलोक्य न जातु कैश्चित्
कस्यापि शक्यमवधारयितुं गुणौघाः ॥
छन्नोऽपि कण्टकचयैः पनसो बहिस्ता-
दन्तः सुधासमधिकं हि रसं बिभर्ति ॥ ७ ॥

वसंततिलका

बाह्यांग मात्र बघुनी, गुण ते कुणाचे
कोणासही समजणें न च शक्य साचें ॥
बाहेरुनी फणस कंटकपूर्ण वाटे
आहे सुधामधुरची रस आंत त्यातें ॥ ७ ॥

गद्यार्थ—

केवळ बाह्यरूप पाहून, कोणासही, कोणाचे गुण जाणणें शक्य नाहीं. फणस बाहेरून कांट्यांनीं भरलेला असतो पण, त्याचे आंत, अमृततुल्य असा मधुर रस असतो.

———•———

रे कूप जीवनागार, यदि दातृत्वमिच्छसि ॥
तदा त्वं गुणवत्पात्रमेकं वा सन्निधौ कुरु ॥ ८ ॥

अनुष्टुभ्

जीवनागार हे कृपा देण्या, तूं इच्छीसी जर।
गुणवान् पात्र तूं ठेवी आपुल्या जवळी तर ॥ ८ ॥

गद्यार्थ—

(यांत तीन शब्द द्व्यर्थी आहेत. जीवन=जीवन किंवा पाणी, गुण=सद्गुण किंवा दोरी, पात्र=दान देण्यास सत्पात्र; किंवा भांडें. हे कृपा–दुस्वावदात जीवनाचा जो सोठा आहे तो जर कोणाला तूं देऊं इच्छीत असशील तर एक सत्पात्र गुणिजन जवळ ठेव. (किंवा दोरी लावलेलें भांडें जवळ ठेव.)

———•———

न वेत्ति यो यस्य गुणप्रकर्षं
स तं सदा निन्दति नात्र चित्रम् ॥
यथा किराती करिकुम्भजातां
मुक्तां परित्यज्य बिभर्ति गुंजाम् ॥ ९ ॥

उपजाति

जाणे न ज्याच्या महती गुणांची
तो त्यास निंदी न विचित्र हेंची ॥
जशी त्यजोनी करिकुंभ मोतीं
गुंजा शरीरीं धरिते किराती ॥ ९ ॥

गद्यार्थ—

ज्याला ज्याच्या गुणांची थोरवी कळत नाहीं तो, त्याची निंदा करतो, यांत आश्चर्य काय! भिल्लीण, हत्तीच्या गंडस्थळांतील मोतीं, टाकून गुंजाच नाहीं का धारण करीत!

———•———

नैर्गुण्यमेव साधीयो धिगस्तु गुणगौरवम् ॥
शाखिनोऽन्ये विराजंते, खण्ड्यंते चन्दनद्रुमाः ॥ १० ॥

अनुष्टुभ्

बरी निर्गुणता वाटे, धिक्कारा थोर सद्गुण ॥
डोलती दुसरे वृक्ष-कापले जाति चंदन ॥ १० ॥

गद्यार्थ—

गुणच नसणें हें बरें वाटतें. मोठ्या गुणांचा धिक्कार असो. इतर झाडें ऐटींत डुलत असतात, आणि चन्दन तेवढें कापलें जातें!

———•———

गुणानामज्ञाता प्रचुरधनदातापि न मुदे
मुदे विद्याज्ञाता भवति मितदातापि गुणिनाम् ॥
दृशौ भ्राम्या दत्ते, न पुनरवधत्ते सुचतुरो
दृशः प्रांतं दत्वा, वशयति नितांतं पुरवधूः ॥ ११ ॥

शार्दूलविक्रीडित

दाता थोर परी गुणज्ञ न; गुणी
लोकां न तो मोद दे
देई अल्प तरी गुणज्ञचि खरा-
तो त्यां सदा आवडे ॥
पाहे नेत्र भरूनि, सुज्ञ तरि कां
भाळेल ग्राम्येवरी?
देतां मात्र कटाक्ष, पूर्ण वश ती,
त्यातें करी नागरी ॥ ११ ॥

गद्यार्थ—

गुण न जाणणारा दाता, जरी, पुष्कळ धन देणारा असेल तरी, गुणीजनना तो आनंद देत नाहीं. तेंच गुण जाणणारा दाता जरी थोडें देत असला, तरी त्याना अधिक प्रिय असतो. खेडवळ (अरसिक) तरुणी एखाद्याकडे डोळे भरून पाहील, (स दृष्टी देईल) तरी,–रसिक विदग्धाकडे लक्षही देत नाहीं. तेंच रसज्ञ नागर स्त्री नुसते कटाक्ष (डोळ्याचा नुसता कोपरा) देईल त्यानें रसिक संपूर्ण वश होईल.

———•———

न हि ज्येष्ठस्य ज्येष्ठत्वं गुणैर्ज्येष्ठत्वमुच्यते ॥
केतकीवरपत्रेषु लघुपत्रस्य गौरवम् ॥ १२ ॥

उपजाति

वयामुळें ज्येष्ठपणा न येतो
मिळे कुणालाहि गुणांमुळें तो ॥
तें केवड्या आंतिल पत्र सान
श्रेष्ठत्व पावे सगळ्यांमधून ॥ १२ ॥

गद्यार्थ—

केवळ वयामुळें ज्येष्ठता येत नाहीं. ती गुणांमुळें येत असते. केवड्याच्या आंतलें (वयानें सर्वांत लहान) पान सर्वांत श्रेष्ठ असतें.

———•———

गुणवानपि नोपयाति पूजां
पुरुषः सत्पुरुषैरकथ्यमानः ।
न हि सौरमणिः स्वभावकांतिं
रविपादैरनधिष्ठितः करोति ॥ १३ ॥

माल्यभारा

असुनीहि गुणी, न पूज्य होतो
नर, ज्या सज्जन वानितील ना तो ॥
शिरती रविचे न पाद ज्यांत
पसरी ना द्युति मूळ सूर्यकांत ॥ १३ ॥

गद्यार्थ—

सज्जनांनी ज्याची स्तुति केलेली नसेल, तो स्वतः गुणी असूनही, वंद्य होत नाहीं. ज्याला सूर्याच्या किरणांनीं स्पर्श केला नाहीं, असा सूर्यकांत मणि आपलें मूळचें तेज प्रकट करीत नाहीं.

———०———

दोषमपि गुणवति जने दृष्ट्वा गुणरागिणो
न खिद्यन्ते ।
प्रीत्यैव शशिनि पतितं, पश्यति लोकः कलंक-
मपि ॥ १४ ॥

आर्या

दोषहि गुणीजनांतिल,
बघुनि गुणज्ञास खेद होई न ।
डागहि चन्द्रावरचा,
प्रेमानें लोक घेति पाहून ॥ १४ ॥

गद्यार्थ—

गुणी माणसात एखादा दोष दिसला तरी, गुणी माणूस त्यानें खेद पावत नाहीं, चन्द्रावरचा डाग सुद्धा लोक प्रेमानें पहातात.

———०———

दोषो गुणाय गुणिनां, महदपि दोषाय दोषिणां
सुकृतम् ।
तृणमिव दुग्धाय गवां, दुग्धमिव विषाय सर्पा-
णाम् ॥ १५ ॥

आर्या

गुणिजनदोष गुण बने
दुष्टांचें सुकृत थोरही दोष ।
गो पय करी तृणाचें,
सर्प दुधाचें करीत जेवि विष ॥ १५ ॥

गद्यार्थ—

गुणिजनांना दोषी वस्तु दिली तरी ते त्याचा गुण करून दाखवितात. उलट दोषी माणसाला चांगली वस्तु देऊनही तो त्याची वाईट करून टाकतो. गाय गवताचें दूध करते, व सर्प दुधाचें विष करतो.

———०———

आरोप्यते शिला शैले यत्नेन महता यथा ।
पात्यते तु क्षणेनाधस्तथात्मा गुणदोषयोः ॥ १६ ॥

वसंततिलका

नेतां शिला गिरिवरी, बहु कष्ट होती
येते, क्षणींच गिरिखालति पाडतां ती ॥
तैसेचि सद्गुणहि कष्टुनि येति सारे
येतात दोष परि ते सहजींच या रे ॥ १६ ॥

गद्यार्थ—

डोंगरावर दगड चढवावयास मोठे कष्ट पडतात, पण, त्याला खालीं क्षणांत विनायास पाडता येतें तसेंच सद्गुण हे, मिळवायला कष्ट पडतात. दुर्गुण अंगीं आणण्यास कांहींच कष्ट नकोत.

———०———

मांसं मृगाणां दशनो गजानां
मृगद्विषां चर्म, फलं द्रुमाणाम् ॥
स्त्रीणां स्वरूपं च नृणां हिरण्य-
मेते गुणा वैरकरा भवन्ति ॥ १७ ॥

उपजाति

हत्तींप्रती दांत; मृगांस मांस
वाघांप्रती चर्म, फळें तरूंस ॥
सोनें नरां, सुंदरता स्त्रियांना
वैरीच हे सद्गुण होति नाना ॥ १७ ॥

गद्यार्थ—

हरिणांना मांस, हत्तींना दांत, वाघांना चर्म, झाडांना फळें, स्त्रीला सौंदर्य, माणसाला संपत्ति, हे सर्व गुण असून, वैरी ठरतात

———०———

आजन्मानुगतेऽप्यसिन्नाले विमुखमम्बुजम् ॥
प्रायेण गुणपूर्णेषु रीतिर्लक्ष्मीवतामियम् ॥ १८ ॥

उपजाति

आजन्म मागें जडलें असून
तें पद्म नालास कधीं वघे न ॥
गुणीजनांशीं बहुधा जगांत
'श्री' मंत हे विन्मुख वागताल ॥ १८ ॥

गद्यार्थ—

(यात विमुख, गुणपूर्ण, लक्ष्मीवान् यांत दोन दोन अर्थ आहेत कमळाचा नाल (देठ) त्याला जन्मापासून चिकटलेला असून त्याचें तोंड नाळाकडे नसतें यावरून कल्पना)—नाळ हा गुणपूर्ण (आत तंतु असलेला) कमल हें लक्ष्मीवत्; कारण लक्ष्मी त्यांत उभी असते जसें कमळ हें नाळाला जन्मापासून चिकटलें असून विमुख (कारण तें लक्ष्मीवंत, व नाळ गुणवंत) तसे श्रीमंत हे गुणवंतांशीं नेहमींच विमुख असतात.

———०———

निर्गुण इति मृत इति च द्वावेकार्थाभिधायिनौ विद्धि ।
पश्य धनुर्गुणशून्यं निर्जीवं यदिह किं न शंसन्ति ॥ १९ ॥

आर्या

निर्गुण, मृत हे दोन्ही
एका अर्थाच शब्द समजावे ।
गुणहीन धनुष्यातें
निर्जीवचि पूर्ण कां न मानावें ? ॥ १९ ॥

गद्यार्थ—

गुण शब्दावर कोटि (गुण=गुण किंवा दोरी) निर्गुण आनि मृत हे दोन्ही शब्द एका अर्थाचे समजावे (कारण निर्गुण माणूस मृतच नव्हे तर काय ?) पहा बरें, धनुष्य हें निर्गुण (दोरी न लावलेलें) असल्यास त्याला निर्जीवच मानूं नये काय ?

———०———

गुणेष्वनादरं भ्रातः पूर्णश्रीरपि मा कृथाः ।
संपूर्णोऽपि घटः कूपे गुणच्छेदात्पतत्यधः ॥ २०॥

आर्या

भरुनिहि संपत्तीनें
गुणीं अनादर धरूं नको स्वमनीं ।
पूर्णहि घट, गुण तुटतां
विहिरीमध्यें पडेल कोसळुनी ॥ २० ॥

गद्यार्थ—

बाबारे, संपत्तीनें तुझें पोट भरलें असलें, तरी गुणांच्या बाबतींत अनादर करूं नको. भरलेला घटही गुण (दोर) तुटला असतां, विहिरींत कोसळून पडतो.

———०———

सिध्यन्ति कर्मसु महत्स्वपि यन्नियोज्याः
संभावनागुणमवेहि तमीश्वराणाम् ॥
किं वाभविष्यदरुणस्तमसां विभेत्ता
तं चेत्सहस्रकिरणो धुरि नाकरिष्यत् ? २१ ॥

वसंततिलका

कार्यांत थोरहि, मिळे सफलत्व भृत्यां
तें श्रेय "चीज करत्या" धनिच्या गुणा त्या ॥
होता कसा अरुणही तमनाशिता तो
त्यातें जरी न सविता धुरि योजिता तो ? ॥ २१ ॥

गद्यार्थ—

नोकरांना मोठमोठ्या कार्यांतही जें यश मिळतें त्याचें श्रेय, त्यांच्या धन्यामध्यें, नोकराच्या कष्टाचें चीज करण्याचा जो गुण असतो, त्याला आहे. सूर्यानें जर त्याला आपला सारथि केलें नसतें, तर अरुणाकडून अंधार-नाशाचें कार्य कसें घडलें असतें?

———०———

अनंतरत्नप्रभवस्य यस्य हिमं न सौभाग्यविलोपि जातम् ॥
एको हि दोषो गुणसन्निपाते निमज्जतीन्दोः किरणेष्विवाङ्कः ॥ २२ ॥

उपजाति

अनंत रत्नें निघती जियून-
शोभा तयाची न हिमें हि हीन ।
दोषैक लोपे बहु सद्गुणांत
ज्योत्स्नेमधें जेवि कलंक तुल ॥ २२ ॥

गद्यार्थ—

(कालिदास, कुमारसंभवांतील हिमालयवर्णनांतला हा एक श्लोक आहे. ) ज्या हिमालयांतून अनंत रत्नें निघतात त्याची शोभा हिमानें कांहीं कमी होत नाहीं. (कारण) अनेक गुणांमध्यें एक दोष बुडून जातो—जसें चन्द्राच्या किरणांमध्यें त्याचा कलंक

———०———

स्वदेशजातस्य नरस्य नूनं गुणाधिकस्यापि भवेदवज्ञा ।
निजाङ्गना यद्यपि रूपराशिस्तथापि लोकः परदारसक्तः ॥ २३ ॥

उपजाति

जन्मे स्वदेशीं म्हणुनी नरास
गुणी असोनीहि मिळे न मान।
भुले परस्त्रीसचि लोक सारा
पत्नी घरीं सुन्दरही असून ॥ २३ ॥

गद्यार्थ—

(परदेशीय तज्ज्ञांना मोठा मान) पण एतद्देशीय माणसाला (मग तो त्या परदेशीयापेक्षांही) गुणांनीं श्रेष्ठ असला तरी, केवळ, तो या देशांत जन्मला, म्हणून योग्य तो मान त्याला मिळत नाहीं स्वतःची पत्नी अत्यंत सुंदर असली तरी परस्त्रीवर भाळणारे लोक जगभर आहेतच.

———०———

कुस्थानस्य प्रवेशेन गुणवानपि पीड्यते ।
वैश्वानरोऽपि लोहस्थः कारुकैरभिहन्यते ॥ २४ ॥

अनुष्टुभ्

स्थानीं गुणवान् जातां, त्याचाहि छळ होतसे।
हस्थ विस्तवालाही, लोहार पिटिती जसें ॥ २४ ॥

र्थ—

वाईट स्थानीं, मोठा गुणवान जरी गेला, तरी त्याचाही छळ त्याशिवाय राहात नाहीं. लोखंडाच्या सान्निध्यानें, प्रत्यक्ष मेदेवतेलाही लोहारासारख्याकडून मार खावा लागतो.

———०———

अपि जीवितमात्रेण गुणिनं परिपालयेत् ।
गुणवत्संगमौषध्या मृत्युरप्येति मित्रताम् ॥ २५ ॥

अनुष्टुभ्

गुणी जनासि रक्षावें, निजप्राणहि देउनी।
गुणी-मैत्री-सुमात्रेनें, मृत्यु ये मित्र होउनी ॥ २५ ॥

गद्यार्थ—

स्वतःचा जीव देऊन सुद्धां गुणी माणसाला रक्षावें गुणी जनांची मैत्री, ही अशी रामबाण मात्रा आहे कीं, तिनें यमही मित्र होतो.

———०———

गुणयुक्तोऽपि पूर्णोऽपि कुम्भः कूपे निमज्जति ।
तस्य भारसहो नास्ति गुणानां ग्राहको यदि॥२६॥

आर्या

न मिळेल गुणग्राहक
जो तद्भारहि करूं शके सहन।
तर गुणयुक्तहि, पूर्णहि
घट तो विहिरींत जातसे बुडुन ॥ २६ ॥

गद्यार्थ—

(गुणग्राहक सुद्धां, त्या गुणांचा भार सहन करण्याइतका समर्थ असावा लागतो. ) गुणग्राहक (दोरी धरणारा) व तो भार उचलूं शकणारा नसेल तर गुणयुक्त (दोरी असलेला) व पूर्ण भरलेला घटही विहिरींत बुडतो.

———०———

जाड्यं ह्रीमति, गण्यते, व्रतरुचौ दम्भः, शुचौ कैतवं
शूरे निर्घृणता मुनौ विमतिता, दैन्यं प्रियालापिनि ॥
तेजस्विन्यवलिप्तता, मुखरता वक्तर्यशक्तिः स्थिरे
तत्को नाम गुणो भवेत्स गुणिनां यो दुर्जनैर्नाङ्कितः॥२७

शार्दूलविक्रीडित

लज्जा मांद्य, व्रतस्थ दांभिक, ठरे, पावित्र्य कापट्यसें
शूर क्रूर, मुनी विमूढ, मधुरा वाणी ठरे दैन्यसें ॥
वक्ता जल्पक, धीर दुर्बल, ठरे तेजस्वि गर्वी ठरे
दुष्टानिंदित कोणता गुण गुणी लोकांतला सांग रे॥२७॥

गद्यार्थ—

(दुष्ट सर्वच गुणांची निंदा करतात.) गुणी लोकांत असा कोणता गुण आहे कीं, त्याची दुष्टांनीं (आजवर) निंदा केलेली नाहीं ? लज्जेला ते जडत्व म्हणणार, व्रताला ढोंग, पावित्र्याला कपट, शौर्याला क्रौर्य, मुनित्वाला वेडगळपणा, प्रियभाषणाला

लाचारी, स्वाभिमानाला गर्व, बोलक्याला बडबड्या, धिमेपणाला दुर्बलता, म्हणणार !

---

गुणेषु यत्नः पुरुषेण कार्यो न किञ्चिदप्राप्यतमं गुणानाम् ॥
गुणप्रकर्षादुडुपेन शम्भोरलंघ्यमुल्लङ्घितमुत्तमाङ्गम् ॥ २८ ॥

वसततिलका

लाभावया गुण, नरें करणे प्रयत्न
नाहींच वस्तु जगिं जी मिळणें गुणे न ॥
उल्लंघिलेंच शशिनें स्वगुणेंच खास
श्रीशाचिया अति अलघ्यहि मस्तकास ॥ २८ ॥

गद्यार्थ—

*गुण मिळविण्याचा माणसानें प्रयत्न केला पाहिजे*, गुणांच्या बळानें मिळणार नाहीं अशी कोणतीच वस्तु नाहीं जेथें पोंचणें अशक्य, असें शंकराचें मस्तक, पण चन्द्रानें आपल्या गुणांच्या जोरावर तेथेंहि स्थान मिळविलें कीं नाहीं ?

---

नागुणी गुणिनं वेत्ति गुणी गुणिषु मत्सरी ॥
गुणी च गुणरागी च विरलः सरलो जनः ॥ २९ ॥

अनुष्टुभ्

अगुणी न गुणी जाणे-गुणी गुणिसि मत्सरी ।
गुणप्रेमी गुणी दोन्ही-ऋजु दुर्मिळ भूवरी ॥ २९ ॥

गद्यार्थ—

अगुणी माणसाला **गुणी** माणसाची पारखच होत नाहीं आणि **गुणी** माणसें एक दुसऱ्याचा मत्सर करतात म्हणून **गुणी** असून **गुणप्रेमी** असलेलीं, सरळ माणसें, विरळा !

---

स्खलन्ती स्वर्लोकादवनितलशोकापहृतये
जटाजूटग्रथौ यदसि विनिबद्धा पुरभिदा ॥
अये निर्लोभानामपि मनसि लोभं जनयतां
गुणानामेवायं तव जननि दोषः परिणतः ॥३०॥

शिखरिणी

जधीं येशी स्वर्गातुनि अवनिच्या शोकहरणीं
जटांमध्यें बांधी तधिं शिव तुला जें जखडुनी ॥
अहो ! निर्लोभांच्या उपजविति जे लोभचि मनीं
गुणाचाची त्या हा तव उपजला दोष जननी ॥ ३० ॥

गद्यार्थ—

हे गंगामाई ! या जगाचे शोक हरण करण्यासाठीं तू जेव्हां स्वर्गांतून खालीं उतरलीस तेव्हा शंकरानें तुला आपल्या जटासंभारामध्यें बांधून ठेविलें अहाहा ! शंकरासारख्या निःसंग, निर्लोभ, हृदयांत सुद्धां, तुझ्या **गुणांनीं लोभ** उत्पन्न करावा, व अशा रीतीनें **गुणांपासूनच दोष** उत्पन्न व्हावा हें केवढें आश्चर्य !

---

# प्रकरण चौथें

मनीषी, थोर, उत्तम, सज्जन, साधु, लोकोत्तर, सत्त्वशाली, महानुभाव, उदारचरित, संत पुण्यकृत्, परोपकारी, महात्मे, कुलज, वंद्य, कुलदीप, उच्चस्थ, महाशय, ऊर्जस्वल :—

कुसुमस्तबकस्येव द्वे गती स्तो मनीषिणाम् ।
मूर्ध्नि वा सर्वलोकस्य विशीर्येत वनेऽथवा ॥ १ ॥

अनुष्टुभ् ।

गति दोनचि थोरांच्या असतात फुलांपरी ।
शोभावें शिरिं सर्वांच्या, सुकावें या वनान्तरीं ॥१॥

गद्यार्थ—

थोर माणसाच्या गति, फुलांप्रमाणें, दोनच असूं शकतात. सर्वांच्या शिरावर तरी शोभावें, नाहींतर, रानांत (अज्ञात असें) सुकून तरी जावें.

———

घृष्टं घृष्टं पुनरपि पुनश्चन्दनं चारुगन्धम्
छिन्नं छिन्नं पुनरपि पुनः स्वादु चैवेक्षुकाण्डम् ॥
दग्धं दग्धं पुनरपि पुनः काञ्चनं कान्तवर्णं
प्राणान्तेऽपि प्रकृतिविकृतिर्जायते नोत्तमानाम् ॥ २ ॥

मन्दाक्रांता

घांसूं घासूं कितिहि तरि त्या चंदना गोड वास
तोडूं तोडूं पुनरपि तरी गोड लागेच ऊंस ॥
जाळूं जाळूं तरि टिकनसे कांचनाचा सुवर्ण
प्राणांतींही प्रकृति बदले सज्जनांची कधीं न ॥२॥

गद्यार्थ—

पुन्हां पुन्हां झिजविली उगाळलें, तरी, चंदनाचा वास गोड तो गोड; पुन्हां पुन्हां तोडावा, तरी ऊंस गोड तो गोड, पुन्हां पुन्हां तापविलें, तरी, सोन्याचा सुंदर रंग कायमच. सज्जनही असेच;— प्राण गेले तरी मूळ स्वभाव बदलीत नाहींत.

———

किं शेषस्य भरव्यथा न वपुषि क्ष्मां न क्षिपत्येष यत्?
किं वा नास्ति परिश्रमो दिनपतेरास्ते न यन्निश्चलः ? ॥
किन्त्वङ्गीकृतमुत्सृजन्कृपणवच्छ्लाघ्यो जनो लज्जते
निर्व्यूढः प्रतिपन्नवस्तुषु सतामेतद्धि गोत्रव्रतम् ॥ ३ ॥

शार्दूलविक्रीडित

टाकी भूमि न खालतीं, म्हणुनि कां तो भार शेषा नसे ?
नोहे निश्चल सूर्यही म्हणुनि कां तो श्रान्त ना होतसे ?
जें कां स्वीकृत, टाकण्या (कृपणवत्) जे थोर ते लज्जित
त्यावें स्वीकृत तेंच सिद्धिस असें थोरांघरींचें व्रत ३

गद्यार्थ—

शेष पृथ्वीला खालीं फेकीत नाहीं, म्हणून काय त्याला तिचें ओझेंच होत नसेल ? किंवा, सूर्य थांबत नाहीं, म्हणून काय त्याला श्रमच होत नसतील ? (पण तें तसें नाहीं) तर, जें एकदां हातीं घेतलें, तें कृपणासारखें, त्यांना सोडण्याची लाजच वाटते. जें स्वीकृत, ते कार्य तडीस नेणें, हा थोरांचा कुलधर्म आहे.

———

प्रथमवयसि पीतं तोयमल्पं स्मरन्तः
शिरसि निहितभारा नारिकेला नराणाम् ॥
ददति जलमनल्पास्वादमाजीवितान्तं
नहि कृतमुपकारं साधवो विस्मरन्ति ॥ ४ ॥

मालिनी

शिशुपणिं जल अल्प प्राशिलें तें स्मरोनी
फलभर निजशीर्षी नारळी त्या धरोनी ।
मधुरतर जलातें देति आजीव लोकां
कधिं कृत उपकारा साधु तो विसरे कां ? ॥४॥

गद्यार्थ—

कधींकाळीं, लहानपणीं, प्यालेलें पाणी स्मरून, स्वतःच्या डोक्यावर, फळांचा भार वाहात, नारळी, या, माणसाला जन्मभर अतिशय गोड असें पाणी देत असतात. केलेला उपकार, सज्जन कधीं विसरत नाहींत.

———

उदयति यदि भानुः पश्चिमे दिग्विभागे
प्रचलति यदि मेरुः शीततां याति वह्निः ॥
विकसति यदि पद्मं पर्वताग्रे शिलायां
न भवति पुनरुक्तं भाषितं **सज्जनानाम्** ॥ ५ ॥

मालिनी

उदय जरि रवीचा जाहला पश्चिमेला
चिचलित जरि मेरू, अग्निही थंड झाला ॥
गिरिवरिहि शिलान्तीं पद्म झालें प्रफुल्ल
तरि न कधिंहि वाणी सज्जनांची फिरेल ॥५॥

गद्यार्थ—

सूर्य एकवेळ पश्चिमेस उगवला, मेरू हलू लागला, विस्तव थंड झाला, डोंगरावर दगडादगडांत कमल फुललें, तरी, सज्जन एकदां दिलेला शब्द ( पुन्हां बोलून नाहींत ) फिरवील नाहींत

———•———

वज्रादपि कठोराणि मृदूनि कुसुमादपि ।
**लोकोत्तराणां** चेतांसि को हि विज्ञातुमर्हति ॥ ६ ॥

अनुष्टुभ्

फुलांहुनि मऊ, तेंवीं वज्राहून कठोर तीं ।
लोकोत्तरांच्या चित्तांतें कोण हो पूर्ण जाणती ! ॥६॥

गद्यार्थ—

वज्राहून कठीण, पण ( त्याचवेळीं ) फुलांपेक्षां मऊ, अशा **लोकोत्तरांच्या** हृदयाचें, यथार्थ ज्ञान, कोणाला होऊं शकेल ?

———•———

विजेतव्या लङ्का, चरणतरणीयो जलनिधि-
र्विपक्षः पौलस्त्यो रणभुवि सहायाश्च कपयः ॥
तथाप्येको रामः सकलमवधीद्राक्षसकुलं
क्रियासिद्धिः सत्त्वे वसति महतां नोपकरणे ॥७॥

शिखरिणी

पुरी लंका घेणें, तरुनि चरणांनी जलधितें
दहातोंडी शत्रु प्रबल रणि साहाय्य कपि ते ॥
तरि एकटा रामें सकल वधिले राक्षसहि ते
न थोरांची सिद्धी करणि परि सत्त्वांत वसते ७

गद्यार्थ—

लंकेसारखी ( बळकट, आणि बेटांतील ) नगरी जिंकाव याची, समुद्र ओलांडावयाचा तो पायांनीं, शत्रु रावणासारखा बलिष्ठ, युद्धांत साहाय्याला कोण तर म्हणे वानर ! तरीही एकट्या रामानें सर्व राक्षसकुल वधिलें **थोर माणसांच्या** कार्याचें यश हें त्याच्या हिंमतीवर अवलंबून असतें, साधनावर नव्हे

———•———

क्वचित्पृथ्वीशय्यः क्वचिदपि च पर्यङ्कशयनः
क्वचिच्छाकाहारः क्वचिदपि च शाल्योदनरुचिः ॥
क्वचित्कन्थाधारी क्वचिदपि च दिव्यांबरधरो
**मनस्वी** कार्यार्थी न गणयति दुःखं न च सुखम् ॥८॥

शिखरिणी

कधीं शय्या भूमीवरि, कधिं पलंगीं मिळतसे
कधीं पाला खाणें कधिं रुचिर पक्वान्नहि तसें !
कधीं चिंध्या ल्याव्या कधिं वसन उंचीच तनुतें
सुखें दुःखें कार्यास्तव न गणिती थोर कधिं ते ८

वेळ पडली तर, जमिनीवर पडावें, मिळालाच, तर, पलंगही भला ! कधीं, शाकभाजीनें पोट भागवावें, तर कधीं पक्वान्नांची रुचि चाखावी, कधीं अंगावर चिंध्या तर चिंध्या, कधीं जमलें तर उंची वस्त्रें, असें जीवन, केवळ कार्याकडे दृष्टी ठेवून, सुख-दुःखांची पर्वा न करतां, **थोर** माणसें जगत असतात

———•———

अपां निधिं वारिभिरर्चयन्ति,
दीपेन सूर्यं प्रतिबोधयन्ति ॥
ताभ्यां तयोः किं परिपूर्णता स्याद्
भक्त्या हि तुष्यन्ति महानुभावाः ॥ ९ ॥

उपजाति

आधीं नदी पूजिति जें जलानें
सूर्यास ओंवाळिति जें दिव्यानें ॥
पूर्णत्व कां त्यांत मिळे तयांना ?
ती तोषवी भक्तिच सज्जनांना ॥ ९ ॥

गद्यार्थ —

पाण्यान समुद्राची पूजा करतात, दिव्यान सूर्याला ओवाळतात, या दोन्ही गोष्टींनीं, त्या दोघाची, अमुक उणीव आहे, ती भरून निघते, असें थोडेंच आहे? पण पूजकाच्या भक्तीन, थोर सज्जन, तुष्ट होत असतात

---

न हि भवति वियोगः स्नेहविच्छेदहेतु-
र्जगति गुणनिधीनां सज्जनानां कदाचित् ॥
घनतिमिरनिरुद्धो दूरसंस्थोऽपि चन्द्रः
किमु कुमुदवनानां प्रेमभङ्गं करोति ? ॥ १० ॥

मालिनी

घडत नच वियोगें स्नेहविच्छेद साचा
जगिं बहुगुण पेशा सज्जनांसज्जनांचा ॥
जरि वसत दुरी तो चंद्र अधारमग्न
प्रणय कुमुदिनीचा तो करी काय भग्न ? ॥१०॥

गद्यार्थ—

बहुगुणी अशा सज्जनांसज्जनांच्या स्नेहाचा, केवळ वियोगानें, ( दूर राहण्यानें ) भंग होत नाहीं चंद्र हा दूर व घोर अंधारांत बुडलेला असला, तरी, ( चंद्रविकासी ) कमलाचें प्रेम तोडतो थोडेंच ?

---

क्षारो वारिनिधिः, कलङ्ककलुषश्चन्द्रो, रविस्तापकृत्
पर्जन्यश्चपलाश्रयोऽभ्रपटलादृश्यः सुवर्णाचलः ॥
शून्यं व्योम, रसा द्विजिह्वविधृता, स्वर्धाम धेनुः पशुः
काष्ठं कल्पतरुर्दृषत्सुरमणिस्तत्केन साम्यं सताम् ? ११

शार्दूलविक्रीडित

खारा अब्धि, असे, कलंकित शशी, भारी रवी तापतो
पर्जन्यांत वसेच वीज, न दिसे मेघांमुळें मेरु तो ॥
व्योमीं शून्य, धरी फणी जग, पशु स्वर्धाम धेनूहि तें
काष्ठें कल्पतरू, शिला सुरमणी; थोरां कुठें साम्य तें ?

गद्यार्थ—

( उपमानभूत, ज्या मोठमोठ्या वस्तु आहेत, त्याच्यात, कोहींना कांहीं खोड आहेच ) तेव्हां, थोरांचें साम्य, कोठल्या वस्तूशीं दाखवावें ? समुद्र बघावा, तर, खारट, चंद्र डागाळलेला, सूर्य तापट, पावसांत विजेसारख्या चपलेचा वास, मोठा सुवर्णमेरु पण, मेघाच्छादित म्हणून अदृश्य ! आकाश पोकळ, जग सर्पावर आधारलेलें ( म्हणून परावलंबी ), धेनुरूप जें स्वर्धाम म्हणतात तें तर निव्वळ पशु, कल्पतरु म्हणजे लांकूड, व कौस्तुभरत्न म्हटलें तरी एक दगडच !

---

अयं निजः परो वेति गणना लघुचेतसाम् ॥
उदारचरितानां तु वसुधैव कुटुंबकम् ॥ १२ ॥

अनुष्टुभ्

"हा माझा, हा पराचा" हें मानिती क्षुद्र ते मनीं ॥
पृथ्वी हीच कुटुंबीय उदारहृदयी गणी ॥ १२ ॥

गद्यार्थ—

"हा माझा, हा दुसऱ्याचा," ही क्षुद्राची विचारसरणी होय उदार, हे सारें जगच स्वकुटुंब समजतात

---

वहति भुवनश्रेणीं शेषः फणाफलकस्थितां
कमठ–पतिना मध्येपृष्ठं सदा स विधार्यते ॥
तमपि कुरुते क्रोडाधीनं पयोनिधिरादरा-
दहह महतां निःसीमानश्चरित्रविभूतयः ॥ १३ ॥

मालिनी

कितिक भुवनें वाही सौख्यें फणांवरि शेष तो
कमठपति त्या पृष्ठीं मध्यें सदैवचि ठेवितो ॥
उदधि वसवी त्या तुच्छत्वें स्ववक्षिं कुठेंतरी
सुजनचरितें सीमांच्याही अतीतचि तीं खरीं १३

गद्यार्थ —

( पृथ्वी काय लहान आहे ? ) पण अशीं कितेक भुवनें, शेष, सहज आपल्या फणांवर धरतो ! त्या शेषाला, कूर्म, आपल्या पाठीवर लीलेन धारण करतो, आणि त्या कूर्माला समुद्र हा आपल्या छातीवर सहज कुठेंतरी, तो विशेष कोणीच नव्हे अशा तुच्छभावानें ठेवतो ! एकापेक्षां एक हे क्रमाने थोर ( पण ) अहाहा ! सज्जनांचे चरित्राची थोरवी सीमांच्याही पलीकडची आहे

---

करे श्लाघ्यस्त्यागः, शिरसि गुरुपादप्रणयिता
मुखे सत्या वाणी, विजयिभुजयोर्वीर्यमतुलम् ॥
हृदि स्वस्था वृत्तिः श्रुतमधिगतैकव्रतफलं
विनाप्यैश्वर्येण प्रकृतिमहतां मण्डनमिदम् ॥ १४॥

शिखरिणी

करां शोभा त्यागें, गुरुनति शिरोभूषण वरें
मुखीं शोभे सत्य, प्रबलहि भुजां शौर्यचि खरें ॥
हृदीं शोभे शांति, श्रवणयुगिं विद्यार्जन तसें
अशी सारी शोभा, धन नसुनि थोरांतचि वसे १४

गद्यार्थ —

हाताला त्यागाची शोभा, मस्तकास गुरुनमनाची, मुखाला सत्याची, विजयी बाहूना शौर्याची, हृदयाला शांतीची, आणि कानांना विद्येची शोभा,– इतर कमलें ऐश्वर्य नसलें, तरी, **थोरांचे** हे मोठे मौल्यवान अलंकारच होत.

——०——

यः प्रीणयेत्सुचरितैः पितरं स पुत्रो
यद्भर्तुरेव हितमिच्छति तत्कलत्रम् ॥
तन्मित्रमापदि सुखे च समक्रियं य-
देतत्त्रयं जगति पुण्यकृतो लभन्ते ॥ १५ ॥

वसततिलका

बापास तुष्टिकर सत्कृतिनें सुपुत्र
इच्छी हितास पतिच्याचि असें कलत्र ॥
दुःखासुखांत समवृत्ति असा सुमित्र
लोकीं तिन्ही मिळति पुण्यकृतींस मात्र ॥ १५॥

गद्यार्थ —

स्वत च्या सद्वर्तनानें, पित्यास तुष्ट करितो, असा मुलगा, केवळ पतिहितच चिंतणारी पत्नी, सुखदु खांत, समानवृत्ति ठवणारा मित्र, ही त्रयी जगांत केवळ **पुण्यवंतांनाच** मिळते !

——०——

नम्रत्वेनोन्नमन्तः परगुणकथनैः स्वान्गुणान्ख्यापयन्तः
स्वार्थान्सम्पादयन्तो विततबहुतरारम्भयत्नाः परार्थे ॥
क्षान्त्यैवाक्षेपरूक्षाक्षरमुखरमुखान् दुर्मुखान् दूषयन्तः
सन्तः साश्चर्यचर्या जगति बहुमताः कस्य नाभ्यर्चनीयाः?

स्रग्धरा

नम्रत्वें थोर होई, स्वगुण प्रकटवी वर्णुनी ते दुज्यांचे
साधी जो स्वार्थ, मोठे करुनि बहुविधा यत्न अन्यार्थ साचे ॥
आक्षेपी निंदकांचें खलमुख अपुल्या क्षांतिनें लाजवीतो
कृत्यें आश्चर्यदायी जगीं सुजन करी, पूज्य कोणा न हो तो ? ॥ १६ ॥

गद्यार्थ —

नम्र होऊन उन्नतपदीं जाणें, लोकाचे गुण वर्णून ( सूचक तेन ) *स्वगुण प्रसिद्ध करणें, परार्थ अनेकविध प्रयत्न करीत* त्यातच स्वहित साधणें, निंदकाचीं दुर्मुखें केवळ आपल्या क्षमेनें लज्जित करणें, अशीं आश्चर्यकारक कृत्यें करणारे **सज्जन** लोकमान्य, कोणाला पूज्य नाहींत ?

——०——

छिन्नोऽपि रोहति तरुश्चन्द्रः क्षीणोऽपि वर्धते लोके ॥
इति विमृशन्तः सन्तः सन्तप्यन्ते न लोकेऽस्मिन् ॥१७

आर्या

तोडूनहि तरु वाढे कोरहि वाढून पूर्ण चंद्र बने ॥
याच विवेकें सुजनहि चिडुनि न कधिंही निराश होइ मनें ॥ १७ ॥

गद्यार्थ —

*तोडलेलें झाड पुन्हा वाढतें, व, चंद्रकोरही वाढून पुन्हा* पूर्णचंद्र होतो, हा विवेक करून, **सुजन** चिडून निराश होत नाहींत

——०——

संपत्सु महतां चित्तं भवत्युत्पलकोमलम् ॥
आपत्सु च महाशैलशिलासंघातकर्कशम् ॥ १८॥

अनुष्टुभ्

वैभवीं चित्त थोरांचें नाजूक कमलापरी ॥
कठोर, संकटीं होई मोठ्या शैलशिलांपरी ॥ १८ ॥

गद्य अर्थ—

वैभवकाळीं, थोरांचें हृदय, कमलासारखें कोमल, परंतु, संकटकाळीं, मोठ्या खड्गासारखें कठीण होतें

———•———

तृष्णां छिन्धि, भज क्षमां, जहि मदं, पापे रतिं मा कृथाः
सत्यं ब्रूह्यनुयाहि साधुपदवीं, सेवस्व विद्वज्जनान् ॥
मान्यान्मानय, विद्विषोऽप्यनुनय, प्रच्छादय स्वान्गुणान्
कीर्तिं पालय, दुःखिते कुरु दयामेतत्सतां लक्षणम् ॥ १९ ॥

शार्दूलविक्रीडित

तृष्णा तोड, धरीं क्षमा, मद नसो, या प्रीति पापावरी
बोलें सत्यचि, सत्पथा अनुसरीं, सेवा बुधांची करीं ॥
मान्यां मान, रिपूहि तुष्ट कर तूं, झांकीं स्वतःचे गुण
रक्षीं कीर्तिस, दुःखितां सदय हो—हें <u>थोरची</u> लक्षण ॥ १९ ॥

गद्य अर्थ—

तृष्णा नष्ट कर, क्षमावृत्ति धर, गर्व सोड, पापानें प्रेम नसो, खरें बोल, सत्पथान जा, विद्वानांची सेवा कर, मान्यास मान दे, शत्रूला सुद्धां नाखूष न करता त्याचें समाधान कर, स्वतःचे गुण झांकून ठेव ( आत्मश्लाघा नको ) कीर्तिरक्षण कर, दुःखपीडितांवर दया कर हें थोर पुरुषाचें लक्षण आहे

———•———

प्रिया न्याय्या वृत्तिर्मलिनमसुभङ्गेऽप्यसुकरं
त्वसन्तो नाभ्यर्थ्याः सुहृदपि न याच्यः कृशधनः ॥
विपद्युच्चैः स्थेयं पदमनुविधेयं च महतां
सतां केनोद्दिष्टं विषममसिधाराव्रतमिदम् ? ॥ २० ॥

शार्दूलविक्रीडित

न्यायी गोडचि वागणें, न करणें प्राणांतिंही पाप तें
दुष्टांसी न च याचणें, अधनशा थोरांसही द्रव्य तें ॥
होणे उच्चचि संकटीं, सुजन जे जाणें तयांमागुनी
खड्गाचेसम तीक्ष्ण हें व्रत कुणी <u>थोरां</u> दिलें नेमुनी ॥२०

गद्य अर्थ—

न्याय्य पण प्रिय वृत्ति ठेवणें, प्राणांतींही घाणेरडें कृत्य न करणें, दुष्टांपाशीं तर नव्हेच पण निर्धन अशा थोरापाशींही द्रव्य न मागणें, संकटांत उच्चवृत्ति ठेवणें, सज्जनांना अनुसरणें— असलें हें तरवारीच्या धारेसारखें तीक्ष्ण व्रत थोरांना कुणी नेमून दिलें ?

———•———

भवन्ति नम्रास्तरवः फलागमै—
र्नवाम्बुभिर्दूरविलम्बिनो घनाः ।
अनुद्धताः सत्पुरुषाः समृद्धिभिः
स्वभाव एवैष परोपकारिणाम् ॥ २१ ॥

वशस्थ

फळेंचि येतां तरु फार वांकती
नव्या जळें फारचि मेघ लोंबती ॥
न वैभवें गर्वित <u>थोर</u> होतसे
परोपकारी जन नित्य हे असे ॥ २१ ॥

हेंच पुन्हां शार्दूलविक्रीडितात—

होती थोरहि वृक्ष, नम्र, जधिं ये त्यांतें फळांचा भर
येतां नीर नवें, सुदूर घनही ओळंबती भूवर ॥
होती गर्वित ना कधीं <u>सुजन</u> हे, संपत्ति येतो निती,
त्यांचा हाच असे स्वभाव, जन जे अन्यार्थची कष्टती ॥ २१ ॥

गद्य अर्थ—

फळांचा बहर आला, कीं, झाडें नम्र होतात नव पाणी भरलें, म्हणजे ढग पुष्कळच खालीं लोंबतात त्याचप्रमाणें सज्जनांना वैभव येतां, ते गर्वित होत नाहींत परोपकारी माणसांचा हा स्वभावच आहे

———•———

पातितोऽपि कराघातैरुत्पतत्येव कन्दुकः ।
प्रायेण साधुवृत्तानामस्थायिन्यो विपत्तयः ॥ २२ ॥

अनुष्टुभ्

चेंडू आपटितां हातें येतो उसळुनी वरी ।
संकटें <u>सज्जनांचीही</u> प्रायें अस्थिर त्यापरी ॥ २२ ॥

गद्य अर्थ—

हातानें मारून चेंडू आपटला तरी तो उडी घेऊन वर उठतोच उठतो सज्जनांचीं संकटें बहुधा अधींच फार वेळ न टिकणारीं असतात

———•———

तृणानि नोन्मूलयति प्रभञ्जनो
मृदूनि नीचैः प्रणतानि सर्वतः ।
समुच्छ्रितानेव तरून्प्रबाधते
महान्महत्स्वेव करोति विक्रमम् ॥ २३ ॥

वंशस्थ

सर्वत्र वाके अतिरिक्त कोमल
अशा तृणाला उपटी न वादळ ॥
उभ्या तरूंचाच करील घात तें
दावील <u>थोरांसचि थोर,</u> शौर्य तें ॥२३॥

गद्य अर्थ—

मृदु, सर्वत्र वाकलेलें गवत–पण, त्याला कांहीं वादळ उपटीत नाहीं; तर (मोठ्या दिमाखानें मस्तक उंच करून,) उभ्या राहिलेल्या वृक्षांचाच तें निपात करतें आपलें शौर्य दाखवावयाचें तें (क्षुद्रांवर न दाखवता) **थोर लोक थोरांवरच** दाखवतात

—•—

आपद्गतः खलु महाशयचक्रवर्ती
विस्तारयत्यकृतपूर्वमुदारभावम् ॥
कालागुरुर्दहनमध्यगतः समन्तात्—
लोकोत्तरं परिमलं प्रकटीकरोति ॥ २४ ॥

वसंततिलका

येतां विपत्ति <u>अति थोर</u> अशा जनास
तो दाखवी नित अपूर्वचि थोरवीस ॥
कालागुरू जळतही, अवघ्या दिशांस
मोठा <u>अलौकिक</u> असा पसरी सुवास ॥२४॥

गद्य अर्थ—

**थोरांत थोर** अशा मनुष्यास संकट आलें तरी तो अत्यंत अपूर्व असा उच्चभाव प्रकट करतो. कालागुरु विस्तवांत टाकला तरी सर्वत्र तो अलौकिक असा सुगंध पसरतो

—•—

विप्रियमप्याकर्ण्य ब्रूते प्रियमेव सर्वदा सुजनः ।
क्षारं पिबति पयोधेर्वर्षत्यम्भोधरो मधुरमम्भः ॥ २५ ॥

आर्या

अप्रिय ऐकुनि घेई, सुजन तरी प्रियचि नित्य बोलेल।
खारें सागरजलही पिउनी वर्षीच मेघ मधुर
जल ॥ २५ ॥

गद्य अर्थ—

**सज्जन** अप्रिय ऐकून घेतो पण सदा प्रियच बोलतो मेघ हा समुद्राचें खारें पाणी पितो आणि वृष्टि करतो मधुर जलाची

—•—

किटिस्तु धरणीधरः, कति न सन्ति भूदारकाः ?
गिरिस्तु कनकाचलः, कति न सन्ति भूभारकाः ? ॥
मरुत्तु मलयानिलः, कति न सन्ति झञ्झानिलाः ?
प्रभुस्तु विबुधाश्रयः; कति न सन्ति कुक्षिंभराः ॥२६॥

आर्या

भूधर वराह एकचि, भू उकरिति अन्य काय ते थोडे?
एकच सुवर्ण मेरु; गिरि जगता भार अन्य कां थोडे?
मलयाद्रिवात एकचि; झञ्झावातहि जगांत कां थोडे?
आश्रय देइ बुधां तो, प्रभु, उदरंभर जगीं कुठें
थोडे ? ॥ २६ ॥

गद्य अर्थ—

(थोर हे अनन्यसामान्य असतात) डुकर एकच खरा–पृथ्वी ज्यानें वराहावतारीं उचल्ली–तो, पृथ्वी उकरीत बसणारे दुसरे काय थोडे आहेत? पर्वत म्हणावा तर एक सुवर्ण मेरु जगाला भारभूत इतर पर्वत काय थोडे आहेत? मलयावरून येणारा शीतल वात तो खरा। इतर झंझावात काय थोडे आहेत! विद्वानांना आश्रय देणारा तो एकच खरा प्रभु। पोटभरू प्रभूंना काय तोटा?

—•—

अद्यापि नोज्झति हरः किल कालकूटं
कूर्मो बिभर्ति धरणीं किल पृष्ठभागे ॥
अम्भोनिधिर्वहति दुस्तरवाडवाग्नि–
मङ्गीकृतं सुकृतिनः परिपालयन्ति ॥ २७ ॥

वसंततिलका

सोडी न शंकर अजूनहि कालकूट
पाठीवरी अजुनि कूर्म जगा धरीत ॥
ठेवीचि अब्धि वडवानल अंतरांत
अंगीकृतास नित <u>सज्जन</u> पाळतात ॥ २७ ॥

गद्य अर्थ—

हालाहलाला शंकर अजूनहि सोडीत नाहीं. कूर्म हा पृथ्वीस अजून पाठीवर वाहातच आहे, भयंकर वडवानलाला समु

अजूनही पोटांत धारण करतो   एकदां ज्याला आपला म्हणून म्हटलें त्याचें परिपालन **सज्जन** हे नित्य करीत असतात

---

ये दीनेषु दयालवः स्पृशति यानल्पोऽपि न श्रीमदो
व्यग्रा ये च परोपकारकरणे, हृष्यन्ति ये याचिताः ॥
स्वस्थाः सन्ति च यौवनोन्मदमहाव्याधिप्रकोपेऽपि ये
तैः स्तम्भैरिव सुस्थिरैः किल भराक्रान्ता धरा धार्यते २८

शार्दूलविक्रीडित

जे दीनांसि दयालु, वित्तमद ज्यां स्पर्शी न थोडा अति
जे कां नित्य परोपकार करिती, जे याचनें हर्षती ॥
होती संतत शांत यौवनमद व्याधींतही पोळुन
स्थाणू स्तंभपरी असे जड जगा आधार हे सज्जन ॥

गद्य अर्थ—

दीनांस दया करणारे, धनमद थोडाही ज्यांना स्पर्शूं शकत नाहीं, परोपकारांत गर्क, याचिल्यानें जे हर्षित, यौवनमदाच्या भयंकर व्याधींत पोळले जात असतांनाही जे शांत राहू शकतात, ते धैर्याचे महामेरु **सज्जन** बळकट खांबाप्रमाणें, (दुर्जनांच्या) भारानें श्रान्त अशा जगाला आधारभूत असतात

---

छिन्नोऽपि चन्दनतरुर्न जहाति गन्धं
वृद्धोऽपि वारणपतिर्न जहाति लीलाम् ।
यन्त्रार्पितो मधुरतां न जहाति चेक्षुः
क्षीणोऽपि न त्यजति शीलगुणान्कुलीनः ॥२९॥

वसंततिलका

टाकी न गंध, जरि चंदन तोडियेला
होऊनि वृद्ध, गज ना त्यजितो स्वलीला॥
माधुर्य, ऊस चरकांतहि सोडितो न
सोडी न संकटिंहि शीलगुणा कुलीन ॥२९॥

गद्य अर्थ—

चंदन तोडला तरी सुगंध टाकीत नाहीं   म्हातारा झाला तरी हत्ती आपला डौल सोडीत नाहीं   चरकांत पिळला जात असलेला ऊस आपली माधुरी सोडीत नाहीं   त्याप्रमाणेंच **कुलीन** हा संकटांतही शीलगुण सोडीत नाहीं

---

सज्जनस्य हृदयं नवनीतं यद्वदन्ति कवयस्तदलीकम् ।
अन्यदेहविलसत्परितापात्सज्जनो द्रवति,
नो नवनीतम् ॥ ३० ॥

रथोद्धता

" चित्त हें घृत जणू, सुजनाचें "
जे कवी वदति तें नच साचें ॥
ताप अन्यहि तनूत असून
हो द्रवे सुजन हा, घृत हें न ॥ ३० ॥

किंवा हेंच शार्दूलविक्रीडित —

लोण्याची हृदयास देति उपमा, थोरांचिया,
जें कवी—
खोटें तें—जरि तुल्यता दिसुनि ये दोघांमधें मार्दवीं ॥
अन्यांच्याहि तनूंत ताप असतां त्यांच्या धगीच्यामुळें
थोरांचीं हृदयें पहा वितळतीं–लोणी
कुठे पाघळे ? ॥ ३० ॥

गद्य अर्थ—

**सज्जनांच्या** हृदयाला कविजन हे लोण्याची उपमा देतात तें कांहीं खरें नव्हे (मृदुत्वापुरती ही उपमा बरोबर असेल) दुसऱ्यांच्या देहांत ताप जळजळत असला (दुसऱ्यांच्या दुःखानें) तर त्यानें **सज्जनहृदय** द्रवतें लोणी कधीं वितळलेलें पाहिलें ?

---

सत्पुरुषः खलु हिताचरणैरमन्द-
मानन्दयत्यखिललोकमनुक्त एव ॥
आराधितः कथय केन करैरुदारै-
रिन्दुर्विकासयति कैरविणीकुलानि ? ॥ ३१ ॥

वसंततिलका

जे साधु ते, करुनि कार्य सुसौख्यदायी
आनंद देति जगताम्, न सांगतांही ॥
पद्मां शशी उमलवी स्वकरें उदारें
तें त्या कुणी विनविलें म्हणुनीच का रे ?॥३१॥

गद्य अर्थ —

सत्पुरुष हे, परहिताचीं कार्यें, अविरत करीत, जगाला आनंद देण्याचें कार्य, कुणी न सांगतांही, करीत असतात. आपल्या उदार करांनीं (किरणांनीं), (चंद्रविकासी) कमलांना

चंद्र उमलविनो तें काय त्याला कुणी विनविलें म्हणून? सांगा पाहू

---

गिरयो गुरवस्तेभ्योऽप्युर्वी गुर्वी ततोऽपि जगदण्डम् ॥
तस्मादप्यतिगुरवः प्रलयेऽप्यचला महात्मानः ॥३२॥

आर्या

गिरि हे मोठे, त्यांहुनि पृथ्वी, ब्रह्माण्ड थोर तीहून ॥
परि अतिथोर महात्मे प्रलयांतहि कधिं न जे करिति चलन ॥ ३२ ॥

गद्य अर्थ—

पर्वत मोठेच असतात, पण पृथ्वी त्याहून मोठी, व, ब्रह्मांड तर, तिच्याहून मोठें, पण, या सर्वांहून अत्यंत मोठे महात्मेच- जे प्रलयातसुद्धा चलित होत नाहींत

---

उदये सविता रक्तो रक्तश्चास्तमने तथा ॥
संपत्तौ व विपत्तौ च महतामेकरूपता ॥ ३३ ॥

अनुष्टुभ्

उदयीं अस्तमानीं या सूर्य लालचि तो असे ।
एकची रूप थोरांचें वैभवीं संकटीं तसें ॥३३॥

गद्य अर्थ—

उगवतांना काय, मावळतांना काय, सूर्य एकसारखा लालच असतो थोरही, वैभव येवो, संकट येवो, एकसारखी वृत्ति ठेवतात

---

किं मधुना, किं विधुना,
किं सुधया, किंच वसुधयाखिलया ? ॥
यदि हृदयहारिचरितः
पुरुषः पुनरेति नयनयोरयनम् ॥ ३४ ॥

आर्या

मधु, विधु, सुधा नि वसुधा
हे व्यारहि तुच्छ वाटतील, जर ॥
निजचरितें जननंदन,
सुजन पुन्हां दृष्टिला पडेल तर ॥ ३४ ॥

गद्य अर्थ—

निजचरितानें जनमनाला आनंदविणारा सुजन पुन्हां दृष्टीला जर पडणार असेल, तर मधाची, चंद्राची, अमृताची किंवा साऱ्या जगाची तरी पर्वा मनुष्य कशाला करील?

---

शुद्धः स एव, कुलजश्च स एव धीरः
श्लाघ्यो विपत्स्वपि न मुञ्चति यः स्वभावम् ॥
तप्तं यथा दिनकरस्य मरीचिजालै-
र्देहं त्यजेदपि हिमं, न तु शीतलत्वम् ॥ ३५ ॥

वसंततिलका

तो शुद्ध, धीर, जगिं एकच तो कुलीन
स्तुत्य, स्वभाव त्यजितो कधिं संकटीं न ॥
सूर्यातपांत अतितीव्रहि, कोळपून
देहा त्यजील हिम हें; परि शीतता न ॥३५॥

गद्य अर्थ—

संकटातसुद्धा जो स्वभाव सोडीत नाहीं तो खरा शुद्ध, तो कुलीन, तो धीर, तो स्तुत्य! सूर्याच्या किरणांनीं तापूनही हिम हें आपला देह सोडील (वितळेल) पण शीतलता सोडणार नाहीं

---

विद्या विवादाय, धनं मदाय शक्तिः परेषां परिपीडनाय॥
खलस्य, साधोर्विपरीतमेतद् ज्ञानाय दानाय च रक्षणाय ॥३६॥

वसंततिलका

विद्या विवाद करण्यास, मदार्थ वित्त
शक्ती दुज्यांस छळण्या असण्या समर्थ ॥
दुष्टास! साधुस परी उलटेंच त्यास
ज्ञानास, दान करण्यास, नि रक्षणास ॥ ३६ ॥

गद्य अर्थ—

विद्या मिळवावयाची, ती वाद घालण्यासाठीं, संपत्ति, उन्मत्त होण्यासाठीं, शक्ति, दुसऱ्यांना छळण्यासाठीं, हें झालें दुष्टाचें! पण सज्जनाचें बरोबर त्याच्या उलटें असतें अनु-क्रमें—विद्या, ही ज्ञानार्जनासाठीं, संपत्ति, दान देण्यासाठीं, शक्ति, दुर्बलांचें रक्षण करण्यासाठीं

---

अञ्जलिस्थानि पुष्पाणि वासयन्ति करद्वयम् ॥
अहो सुमनसां प्रीतिर्वामदक्षिणयोः समा ॥ ३७ ॥

अनुष्टुभ्

ओंजळींत फुलें देतीं वास दोन्ही करांप्रति ॥
सुमनांची सम प्रीती डाव्यां नि उजव्यां प्रति ॥३७॥

गद्य अर्थ—

ओंजळींत घेतलेलीं फुलें दोन्हीं हातांना सुगंध देतात. सुमनांची (फुलांची; चांगल्या मनाचे जे त्यांची) प्रीति डाव्या काय उजव्या काय दोन्हींवर सारखीच.
( डावें उजवें म्हणजे कमी व अधिक हा अर्थही आहेच. )

---

अहो बत विचित्राणि चरित्राणि महात्मनाम् ।
लक्ष्मीं तृणाय मन्यन्ते तद्भारेण नमन्ति च ॥ ३८ ॥

अनुष्टुभ्

अहो ! विचित्र हीं कैशीं थोरांचीं वर्तनें किती ? ।
मानिती तृण लक्ष्मीला तद्भारें परि वांकती ! ॥ ३८॥

गद्य अर्थ—

थोरांचें हें वर्तन केवढें विचित्र म्हणावें ? एकीकडे संपत्तीला ते तृणवत् (क्षुद्र, हलकी) समजतात पण दुसरीकडे पहावें तर त्याच (हलक्या) संपत्तीच्या भाराखालीं हे वांकतात ? (नम्र होतात.)

---

वदनं प्रसाद-सदनं सदयं हृदयं सुधामुचो वाचः ।
करणं परोपकरणं येषां, केषां न ते वंद्याः ? ॥३९॥

आर्या

वदन प्रसन्न,हृदयहि सदय नि वाणी स्रवेच अमृतास।
कृति ही उपकाराची ज्यांची ते वंद्य कां न कोणास ?३९

गद्य अर्थ—

ज्यांचें वदन प्रसन्न, हृदय सदय, बोलणें अमृतासारखें व कृति परोपकाराची ते कोणाला वंदनीय नाहींत ?

---

यथा चित्तं तथा वाचो यथा वाचस्तथा क्रियाः ।
चित्ते वाचि क्रियायां च साधूनामेकरूपता ॥ ४० ॥

अनुष्टुभ्

जसें चित्त तशी वाणी, जशी वाणी तशी कृति ।
चित्त, वाणी, क्रिया सारीं साधूंचीं एकरूप तीं ॥४०॥

गद्य अर्थ—

मनांत असेल तसेंच बोलणें, बोलावें तशीच कृति करणें—अशाप्रकारें चित्त, वाणी, क्रिया, यांमध्यें सज्जनांच्या बाबतींत एकरूपता असते.

---

धनुः पुष्पं, मौर्वी मधुकरमयी, चंचलदृशां
दृशां कोणो बाणः, सुहृदपि जडात्मा हिमकरः ।
स्वयं चैकोऽनङ्गः सकलभुवनं व्याकुलयति
क्रियासिद्धिः सत्त्वे भवति महतां नोपकरणे ॥ ४१ ॥

आर्या

पुष्पांचेंच धनुष्य, नि दोरी मधुकरमयी, तसा बाण
स्त्रीचे कटाक्ष चंचल, जड हिमकर चंद्र मित्रही छान ॥
असुनी स्वयें अनंगहि, अखिल जगा एकटाच जिंकितसे
कृतियश थोरांचें निज सत्त्वामध्यें, न साधनांत वसे ॥ ४१ ॥

गद्य अर्थ—

पुष्पांचें नाजूक धनुष्य, भुंगांची दोरी, स्त्रीचे चंचल कटाक्ष हे बाण, जड गारठविणारा गोळा चंद्र हा म्हणे मित्र ! स्वयें अनङ्ग म्हणजे देहच नसलेला; असा मदन, एकटाच सर्व जग जिंकतो ! ( साधनें कमतीं व सिद्धि केवढी प्रचंड ! ) थोरांचें कार्यांतलें यश हें त्यांच्या सत्त्वावर अवलंबून असतें, साधनांवर नव्हे.

---

हृदयानि सतामेव कठिनानीति मे मतिः ।
खलवाग्विशिखैस्तीक्ष्णैर्भिद्यन्ते न मनाग्यतः ॥ ४२ ॥

अनुष्टुभ्

सज्जनांचींच हृदयें कठीण मज वाटतीं ।
तीक्ष्ण वाग्बाण दुष्टांचे ज्यां न अल्पहि छेदिती ॥४२॥

गद्य अर्थ—

ज्याअर्थी दुष्टांचे, तीक्ष्ण बाण, त्यांना अल्पही छेदूं शकत नाहींत, त्याअर्थी (इतरांचीं नव्हेत) सज्जनांचींच हृदयें कठीण, असें मला वाटतें; ( मृदु म्हणतात तें खोटें ! )

---

रथस्यैकं चक्रं भुजगयमिताः सप्ततुरगा
निरालम्बो मार्गश्चरणविकलः सारथिरपि ।।
रविर्यात्येवान्तं प्रतिदिनमपारस्य नभसः
क्रियासिद्धिः सत्त्वे भवति महतां नोपकरणे ।। ४३ ।।

आर्या

रथचक्र एक, घोडे सातहि धरण्या लगाम सर्पांचा ।
मार्ग अधांतरिं, सारथि थोटा चरणाविना अरुण साचा ॥
तरि तो सूर्य प्रतिदिनिं उल्लंघुनि नभ अपार जात असे.
कृतियश थोरांचें निजसत्त्वामध्यें, न साधनांत वसे ॥ ४३ ॥

गद्य अर्थ—

रथाला एकच चाक, घोडे सात आणि त्यांना आवरण्यास सर्प हा लगाम ! मार्ग अधांतरीं, सारथी अरुण लंगडा, (असल्या साधनांच्या बळावर ) सूर्य प्रतिदिन अपार आकाश ओलांडतो थोरांच्या कार्यांतली सिद्धि त्याच्या सत्त्वावर (हिंमतीवर) अवलंबून असते, साधनांवर नसते (व त्यासाठीं ते रडतही बसत नाहींत )

---

मनस्वी म्रियते कामं कार्पण्यं न तु गच्छति ।
अपि निर्वाणमायाति नानलो याति शीतताम् ।। ४४ ।।

अनुष्टुभ्

मरे थोर तरीही ना नीचत्व कधिं दावितो ।
जाई विझूनही अग्नि तरी होई न थंड तो ॥४४॥

गद्य अर्थ—

थोर माणसें मेलीं तरी नीचपणा दाखवीत नाहींत. अग्नि विझून जाईल पण थंड होणार नाहीं.

---

यदमी दशन्ति दशना रसना तत्स्वादुसौख्यमनुभवति ।।
प्रकृतिरियं विमलानां क्लिश्यन्ति यदन्यकार्येषु ।।४५।।

आर्या

चावितित दांतचि जरि तें, अनुभवितें जीभ मात्र गोडी ती ।
प्रकृतिच ही निर्मलांची, कीं, अन्यांस्तवचि कष्ट हे करिती ॥ ४५ ॥

गद्य अर्थ—

दात ( अन्न ) चावतात पण त्याची गोडी मात्र जीभ चाखते विमलांचा (शुद्ध मनाच्या लोकांचा, इकडे दांत विमल पांढरे असतात) हा स्वभावच कीं, त्यांनीं दुसऱ्यासाठीं कष्ट करीत राहावें

---

शिला बाला जाता चरणरजसा यत्कुलशिशोः
स एवायं सूर्यः सपदि निजपादैर्गिरिशिलाम् ।।
स्पृशन्भूयो भूयो न खलु कुरुते कामपि वधूं
कुले कश्चिद्धन्यः प्रभवति नरः श्लाघ्यमहिमा ।। ४६

आर्या

यत्कुलशिशुनें केली चरणधुळीनें शिळेंतुनी बाला
तो हा सूर्यहि संतत निजपादांनीं गिरीवरील शिळा ॥
स्पर्शी पुनःपुन्हां तरि करी शिळेंतुनि न एकही स्त्री तो
कुलांत एखादाची कोणी अत्यंत थोर नर होतो ॥४६॥

गद्य अर्थ—

( राम हा सूर्यवंशांत जन्मला ) ज्याच्या कुलांतील एका मुलानें, आपल्या पदधुळीनें, दगडातून जिवत स्त्री उत्पन्न केली, तो स्वत सूर्य, पर्वतावरील शिलांना, सतत, अनेकदां, आपला पादस्पर्श (पाद=किरण) करीत असून, एकाही शिळेंतून, स्त्री त्याला उत्पन्न करतां आली नाहीं. कुलांत एखादाच धन्य महात्मा निपजतो ( सारे थोडेच मोठे होतात ? )

---

दीपाः स्थितं वस्तु विभावयन्ति कुलप्रदीपास्तु भवन्ति केचित् ।
चिरव्यतीतानपि पूर्वजान्ये प्रकाशयन्ति स्वगुण–प्रकर्षात् ।। ४७ ।।

वसंततिलका

जे कां असे, उजळवील तयास दीप
होई परंतु विरळाच कुलप्रदीप ॥
गेले कधींच, असल्या निजपूर्वजांस
ज्याचा सदा उजळवी स्वगुणप्रकर्ष ॥ ४७ ॥

गद्य अर्थ—

दिवे हे ( फार तर ) या घटकेला समोर, प्रत्यक्ष अस्तित्वांत असलेल्या वस्तूलाच, प्रकाशित करतात. पण कुलप्रदीप म्हणून कांहीं असतात, ते, आपल्या गुणप्रर्पाने ( गुण= देण्याची वात ) स्थीच, पूर्वी होऊन गेलेल्या आपल्या पूर्वजांना सुद्धा, प्रकाशित करतात.

---

विगृहीतः पदाक्रान्तो भूयो भूयश्च खंडितः ।
माधुर्यमेवावहति सुश्लोक इव सज्जनः ॥ ४८ ॥

वंशस्थ

करूनही विग्रह, पाडुनी पदें
पुन्हां पुन्हां खंड करूं तरीहि ते ॥
सुश्लोक हे गोडचि, हेंहि होउन
तसेच सारे असतात सज्जन ॥ ४८ ॥

गद्य अर्थ—

( यांत विगृहीत, पदाक्रांत, खंडित हे तीन शब्द अर्थी श्लोकाकडे विगृहीत=विग्रह करून=समास सोडवून, पदाक्रान्त= पदें पाडून, खडित=तुकडे पाडून सज्जनाकडे विगृहीत=विग्रह ( भांडण ) करून, पदाक्रान्त=लाथाडून ( अपमान करून ) खंडित= अपमान करून किंवा मारझोड करून. ) सज्जन हे सुश्लोका- सारखे असतात—दोघेही विगृहीत, पदाक्रांत, पुन्हां पुन्हां खंडित केले तरी गोड ते गोड !

---

तरुमूलादिषु निहितं जलमाविर्भवति पल्लवाग्रेषु ।
निर्भृतं यदुपक्रियते तदपि महान्तो वहन्त्युच्चैः ॥४९

आर्या

जल शिंपिलें मुळाशीं तें तरु दावील पल्लवाग्रांत ।
गुप्तहि उपकारातें सिरनिति उंचावरी धरनि संत ४९

गद्य अर्थ—

मुळाशीं घानलेलें ( न दिसून पडणारें ) पाणी, झाडें हीं वर आपल्या पानांच्या टोकांशीं प्रदर्शित करतात सज्जनांवर गुप्त रीतीनें उपकार केले तरी ते उंचावर धरून मिरवितात ( म्हणजे उपकाराच्या मानानें जास्त आभारी होतात व उघड तें ऋण मानतात )

---

अत्यंतमन्थनकदर्थनमुत्सहन्ते
मर्यादया नियमिताः किमु साधवोऽपि ?
लक्ष्मीसुधाकरसुधाद्युपनीय शेषे
रत्नाकरोऽपि गरलं किमु नोज्जगार ? ॥५०॥

वसंततिलका

मर्यादशील हृदयीं कितिही असून
अत्यंत घोर छळ साधुहि सोशिती न ॥
लक्ष्मी, शशी, अमृत, देउनही समुद्रें
त्रासून अंतिं न दिलें विष घोर कां रे ? ॥५०॥

गद्य अर्थ—

मर्यादया नियमित, (समुद्र, किनाऱ्यानें बांधलेला, सज्जन- मर्यादशील हृदयाचे ) असून सुद्धा, सज्जन जरी झाले, तरी, आत्यंतिक छळ करा सोसतील ? ( समुद्र मंथनांत ) लक्ष्मी, चन्द्र, अमृत हें देऊन सुद्धा शेवटीं घुसळून घेण्याला त्रासून रत्नाकरानें सुद्धा विष ओकलें नाहीं काय ?

---

न तपांसि न तीर्थानि न शास्त्राणि जयन्ति च ।
संसारसागरोत्तारे सज्जनासेवनं विना ॥ ५१ ॥

अनुष्टुभ्

तपें तीर्थें तरीं शास्त्रें संसाराब्धींतुनी जना ।
तारूं ना शकती; अल्प जों सेवी तो न सज्जना ॥५१॥

गद्य अर्थ—

तपश्चर्या काय, तीर्थयात्रा काय, किंवा शास्त्राभ्यास काय संसारसागरातून तारून नेण्यास समर्थ होत नाहींत, जोंवर माणसाच्या हातून थोडीतरी सज्जनांची सेवा घडली नाहीं तोंवर

---

शम्भुः श्वेतार्कपुष्पेण चन्द्रमा वस्त्रतंतुना ।
अच्युतः स्मृतिमात्रेण साधवः करसंपुटैः ॥ ५२ ॥

वसंततिलका

होई प्रसन्न शिव शुभ्र रुईफुलानें
संतुष्ट चंद्र बनतो अवघ्या दशेनें ॥
श्रीविष्णु तुष्ट अवघ्या स्मरणेंच होई
जोडून हात नित तोषति साधु हेही ॥ ५२ ॥

गद्य अर्थ—

शंकर पाढऱ्या रुईच्या फुलानें, चंद्र वस्त्राच्या धाग्यानें, विष्णु नामस्मरणानें व **सज्जन** ( त्यांना ) केवळ हात जोडण्यानें प्रसन्न होतात.

---

अथापदं प्राप्य सुसंपदं वा
महामतिः स्वप्रकृतं स्वभावम् ॥
जहाति नो मन्दरवेल्लितोऽपि
शौक्ल्यं यथा क्षीरमयाम्बुराशिः ॥ ५३ ॥

उपजाति

येवोत संपत्ति, विपत्ति घोर
मूळ स्वभावा त्यजितो न थोर ॥
त्या मन्दरें मंथियलें, तरी तो
क्षीराब्धि कां शुभ्रपणा त्यजीतो ? ॥ ५३ ॥

गद्य अर्थ—

वैभव येवो आपत्ति येवो, **थोर** माणूस मूळ स्वभाव सोडीत नाहीं. मन्दरानें घुसळल्यानें क्षीराब्धि आपला शुभ्रपणा थोडाच सोडतो ?

---

न सज्जनाद्दूरतरः कचिद्भवेद्भजेत साधून् विनयक्रमान्वितः
स्पृशन्त्ययत्नेन हि तत्समीपगं विसारिणस्तद्गुणपुष्परेणवः ॥ ५४ ॥

इंद्रवंशा

*न हो कधीं दूरचि सज्जनांहुन*
तू नम्रभावें भज नित्य सज्जन ॥
तत्संनिधीं तद्गुणपुष्परेणु ते
होती विनायास नरास स्पर्शिते ॥ ५४ ॥

गद्य अर्थ—

**सज्जनां**पासून कधीं दूर राहू नकोस. त्यांची नम्रभावें सेवा कर, त्यांच्या गुणपुष्पातून निघणारे रेणु त्यांच्या जवळ असणारांना विनायास स्पर्श करीत असतात.

---

दानाय लक्ष्मीः सुकृताय विद्या, चिन्ता परब्रह्मविनिश्चयाय ॥
परोपकाराय वचांसि यस्य वन्द्यस्त्रिलोकीतिलकः स एव ॥ ५५ ॥

उपजाति

विद्या सुकार्या, धन द्यावयातें
चिंता परब्रह्मचि जाणण्यातें ॥
परार्थ वाणी शिणते जयाची
त्रिलोकिचें भूषण वंद्य तोची ॥ ५५ ॥

गद्य अर्थ—

*ज्याची संपत्ति दानासाठीं, विद्या सत्कार्यासाठीं; चिंता* ब्रह्माचें आकलन करण्यासाठीं; आणि, वाणी परोपकारासाठीं; असा जो त्रैलोक्याला भूषणभूत पुरुष तो **वंदनीयच** आहे.

---

वाञ्छा सज्जनसङ्गमे परगुणे प्रीतिर्गुरौ नम्रता
विद्यायां व्यसनं स्वयोषिति रतिर्लोकापवादाद्भयम् ॥
भक्तिः शूलिनि शक्तिरात्मदमने संसर्गमुक्तिः खले-
ष्वेते येषु वसन्ति निर्मलगुणास्तेभ्यो नरेभ्यो नमः ॥

शार्दूलविक्रीडित

इच्छा सज्जनसंगमीं, परगुणीं प्रीती, गुरू वंदणें ।
विद्याभ्यास, रति स्वपत्नितचि अन् लोकापवादा भिणें ॥
भक्ती शंकरिं, शक्तिआत्मदमनीं, दुःसंगिं आस्थाच न
*होती सद्गुण ज्यांत निर्मल असे त्या सज्जनां* वंदन ॥ ५६ ॥

गद्य अर्थ—

सत्संगाची इच्छा धरणें, दुसऱ्यांच्या गुणावर प्रेम करणें, गुरुजनाशीं नम्र असणें, विद्येचें व्यसन असणें, आपल्या पत्नीवरच प्रेम असणें, लोकनिंदेला भिणें, शंकरावर भक्ति असणें, मन संयमाची शक्ति असणें, खलांपासून दूर असणें हे निर्मल गुण ज्यांत असतात त्या **सज्जनांना** वंदन असो.

---

विपदि धैर्यमथाभ्युदये क्षमा,
सदसि वाक्पटुता, युधि विक्रमः ।
यशसि चाभिरुचिर्व्यसनं श्रुतौ
प्रकृतिसिद्धमिदं हि महात्मनाम् ॥५७॥

वसंततिलका

सद्धैर्य संकटिं, क्षमा निजवैभवांत
वक्तृत्व संसदिं, पराक्रम संगरात ॥
विद्याव्र वेड जणु,आवडणें सुकीर्ति
जन्मेंच हे सुगुण थोर जनात होती ॥ ५७ ॥

गद्य अर्थ—

संकटांत धैर्य धरणें, वैभवकाळीं क्षमावृत्ति धरणं सभेंत वक्तृत्व दाखविणें, युद्धांत पराक्रम करणें, सुकीर्तीची आवड धरणें, विद्येचें वेड असणें हे थोरांचे जन्मजात गुणच आहेत

——o——

प्रदानं प्रच्छन्नं, गृहमुपगते संभ्रमविधिः
प्रियं कृत्वा मौनं सदसि कथनं नाप्युपकृतेः ।
अनुत्सेको लक्ष्म्या निरभिभवसाराः परकथाः
सतां केनोद्दिष्टं विषममसिधाराव्रतमिदम् ॥५८॥

शार्दूलविक्रीडित

दानें गुप्तपणे, गृहीं अतिथि ये त्यातें समाराधणे
केलें जें उपकार या, प्रिय, न तें चौघामधें बोलणे ॥
वित्तानें फुगणें न, अन्यविषयीं वाणी कुटाळीविण
खड्गाचेवरि तीक्ष्ण हें व्रत कुणी थोरां दिलें नेमुन ? ॥ ५८ ॥

गद्य अर्थ—

दान करणें ते गुप्तपणें, आलेल्या अतिथीचा सत्कार करणें, कोणाचें प्रिय किंवा उपकार केले तर त्याचा चारचौघांत उल्लेख न करणें, संपत्तीचा गर्व न करणें, दुसऱ्यांच्या विषयीं टवाळ उद्गार न काढणें इत्यादि हें असें तरवारीच्या धारेसारखें तीक्ष्ण व्रत थोरांना कोणी नेमून दिलें ?

——o——

अप्रियवचनदरिद्रैः प्रियवचनाढ्यैः स्वदारपरितुष्टैः ।
परपरिवादनिवृत्तैः क्वचित्क्वचिन्मण्डिता वसुधा ॥५९॥

साकी

दुज्यांस अप्रिय वदतां जे जन दरिद्रीच असतात ।
असे जयाचें वैभव मोठें सकलां प्रिय वदण्यांत ॥
स्वस्त्रीतचि रत, आणि पराङ्मुख परनिंदेपासून ।
कुठेंकुठें जे असती त्यांनी जग दिसतें शोभून ॥५९॥

गद्य अर्थ—

दुसऱ्यांना अप्रिय बोलतांना ज्यांच्या शब्दांना दारिद्र्य येतें, (शब्द निघतच नाहींत) प्रिय बोलतांना शब्दांना वैभव येतें, आपल्या पत्नीवरचेंच ज्यांना प्रेम, परनिंदेपासून जे पराङ्मुख असे कुठें कुठें (तुरून) जे सज्जन - भूतलावर आढळतात त्यांनीं पृथ्वीला अलंकृत केलें आहे

——o——

मनसि वचसि काये पुण्यपीयूषपूर्णा-
स्त्रिभुवनमुपकारश्रेणिभिः प्रीणयन्तः ॥
परगुणपरमाणून्पर्वतीकृत्य नित्यं
निजहृदि विकसन्तः सन्ति सन्तः कियन्तः ? ॥६०॥

मालिनी

मन, वच, तनु ज्याची पूर्ण पुण्यामृतांनीं
त्रिभुवन उपकारें तुष्ट केलें जयांनीं ॥
लवहि परगुणा जे गौरवोनी गिरीसे
स्वहृदयिं फुलणारे थोर होती कितीसे ? ॥६०॥

गद्य अर्थ—

ज्यांचें मन, वाणी, देह सारें कांहीं पुण्यामृतानें परिपूर्ण आहे, परोपकारानें ज्यांनीं त्रिभुवनाला तुष्ट केलें आहे, दुसऱ्याच्या अल्पही गुणाला पर्वतासारखें मोठें म्हणून जे गौरवितात आणि (त्या परगुणस्तुतीनें) आपल्याच हृदयांत फुलून जातात, असे, संत जगांत कितीसे आहेत ?

——o——

उपकर्तुं प्रियं वक्तुं कर्तुं स्नेहमकृत्रिमम् ।
सज्जनानां स्वभावोऽयं केनेन्दुः शिशिरीकृतः ? ॥६१॥

आर्या

करणें उपकृति, वदणें प्रिय, अन् करणें अहर्निश प्रीति ॥
सुजनात हा स्वभावचि, चंद्रा शिशिरत्व कोण कधिं देती ? ॥६१॥

गद्य अर्थ—

उपकार करणें, प्रिय बोलणे, अकपट असा स्नेह करणें हा **सज्जनांचा** स्वभाव आहे चंद्राला शीतलत्व कुणी कधीं दिले आहे ?

—∘—

तुङ्गात्मनां तुङ्गतराः समर्था मनोरथान् पूरयितुं न नीचाः ॥
धाराधरा एव धराधराणां निदाघदाहं शमितुं न नद्यः ॥ ६२ ॥

साकी

उच्चस्थांचें उच्चतरस्थचि काम पूर्ण करुं शकती ।
सूर्यतप्त-गिरि-दाहा न नद्या, नभस्थ घन शमवीती ॥ ६२ ॥

गद्य अर्थ—

**थोरांचे** मनोरथ, त्याच्याहून **थोर** असतील (उच्चस्थांचे उच्चतरस्थ) तेच पूर्ण करण्यास समर्थ असतात. नीच नव्हेत सूर्यानें उन्हाळ्यात तापलेल्या डोंगराचा दाह शमविण्यास मेघच समर्थ असतात नद्या नव्हेत (डोंगर उच्चस्थ, मेघ त्याहून उच्चतरस्थ. नद्या सखल प्रदेशातून वाहणाऱ्या म्हणून नीच)

—∘—

आमरणान्ताः प्रणयाः कोपास्तत्क्षणभङ्गुराः ।
परित्यागाश्च निःसंगा भवन्ति हि **महात्मनाम्** ॥ ६३ ॥

अनुष्टुभ्

टिके आमरण प्रीति कोप तत्क्षण लोपती ।
त्यागांतहि महात्म्यांची निस्स्वार्थचि असे मति ॥ ६३ ॥

गद्य अर्थ—

**महात्म्यांचें** प्रेम जन्मभर टिकणारें, राग क्षणभंगुर व त्याग नि स्वार्थपणें केलेला असतो

—∘—

वासरगम्यमनूरोरम्बरमवनी च वामनैकपदा ।
जलधिरपि पोतलङ्घ्यः सतां मनः केन तुल्यामः ॥ ६४ ॥

आर्या

वामन एकपदे भू ; लंघी एकचि दिनीं नभा अरुण ॥
नौका अब्धिस लंघी, तुलय कशाशीं ठरेल सुजन-मन ? ॥ ६४ ॥

गद्य अर्थ—

(विश्वामध्यें) **सज्जनांच्या** मनाची तुलना तरी कशाशी करावी ? (हा मोठा प्रश्नच पडतो.) (विशाल पृथ्वीशीं तुलना करावी तर) वामनाने (एका कुटक्यानें) एक पावलात तिला व्यापून टाकलें (अनंत आकाशाशीं तुलना करावी) तर (एक लगडा) अरुण (सूर्याचा सारथी) त्याला एका दिवसात ओलांडून जातो, (विस्तीर्ण सागराशीं तुलना करावी) तर एखादी क्षुद्र नौकाही त्याच्या पार जाऊं शकते.

—∘—

यदेतन्नेत्राम्भस्तदपि च समासाद्य तरुणीं
कपोले व्यासक्तं कुचकलशमस्याः कलयति ॥
ततः श्रोणीबिम्बं व्यवसितविलासं तदुचितं
**स्वभावस्वच्छानां** पतनमपि भाग्यं वितरति ॥ ६५

शिखरिणी

म्हणूं ज्या अश्रू तो जधिं युवतिनेत्रांतुनि गळे
कपोलां स्पर्शोनी हळुंच कुचकुम्भांवर रुळे ॥
पुढें श्रोणीसंगें समुचित विलासांसहि करी
स्वभावस्वच्छांचें पतनहि तयां भाग्य वितरी ॥ ६५

गद्य अर्थ—

ज्याला अश्रु म्हणतात, तें नेत्रजल, तरुणीच्या नेत्रांतून पडल्यावर, तिच्या गालाला स्पर्शून, खालीं उतरून, तिच्या कुचकुम्भांवर डोलतें, व तेथूनही खालीं उतरून तिच्या श्रोणीविलास करते हें योग्यच आहे ! **स्वभावानेंच** जे स्वच्छ त्यांचें पतन सुद्धां त्यांना भाग्यदायी होतें

—∘—

**सुजनो** न याति विकृतिं परहितनिरतो विनाशकालेऽपि
छेदेऽपि चन्दनतरुः सुरभयति मुखं कुठारस्य ॥ ६६

आर्या

परहितरत सज्जन हा नाशांतहि न स्वभाव बदलितसे
तुटतांही चंदन तरु, कुऱ्हाडीसही स्वर्गंध वितरितसे ॥ ६६

गद्य अर्थ—

परोपकारी **सज्जन**, त्याचा विनाशकाळ आला तरी आपला स्वभाव सोडीत नाहीं, तुटता तुटतांही, चंदन, त्या कुऱ्हाडीलाच सुगंधित करतो

—∘—

उत्कर्षवान् निजगुणो यथा यथा याति कर्णमन्यस्य ।
धनुरिव सुवंशजन्मा तथा तथा सज्जनो नमति ॥६७॥

आर्या

उत्कर्षवंत निजगुण जाति जसजसे दुज्यांचिया कानीं ।
सद्वंशजात धनुपरि, तसा तसा सुजन जाय वांकोनी ॥६७॥

गद्य अर्थ—

उत्कर्षवन्=(धनुष्याकडे) खेंचली जाणारी (दोरी,) सज्जनांकडे–उत्कर्षास पोंचलेले गुण=धनुष्याची दोरी, सज्जनांकडे सद्गुण (व त्याची कीर्ति) सद्वंशात–(धनुष्याकडे) उत्तम वेळूपासून बनविलेलें (सज्जनाकडे) चांगल्या वंशांत जन्मलेले सद्वंशात धनुष्याची उत्कर्षवंत (खेंचली जाणारी) दोरी जसजशी दुसऱ्याच्या (धनुर्धरांच्या) कानाशीं जाते तसतसें धनुष्य (साहजिकच) अधिकाधिक वाकत सद्वंशात सज्जनांचे गुण उत्कर्षवत पावल्यानें (प्रसिद्धी पावून) जसजसे दुसऱ्याच्या कानापर्यंत जातात, तसतसे (प्रसिद्धिविन्मुख असल्यान) सज्जन अधिकाधिक वांकतात (नम्र होतात)

———○———

इयमुन्नतसत्त्वशालिनां महतां काऽपि कठोरचित्तता ।
उपकृत्य भवन्ति दूरतः परतः प्रत्युपकारशङ्कया ॥६८॥

आर्या

ऊर्जस्वल थोरांचें कठोरचित्तत्व हें विचित्र किती !
प्रत्युपकारभयें ते उपकृति करुनी सुदूर झणि पळती ॥६८॥

गद्य अर्थ—

थोरांच्या मनाच्या कठोरपणाचा, हा एक विचित्र प्रकार आहे की, ते उपकार करतात आणि दुसरा त्याची परतफेड करील, या भीतीनें ते दूर पळतात

———○———

आदिमध्यनिधनेषु सौहृदं सज्जने भवति नेतरे जने ॥
छेदतापननिघर्षताडनैर्नान्यभावमुपयाति काञ्चनम् ६९

आर्या

आधीं, मध्यें, अंतीं, सुजन सुजनता धरी, न इतर जन ।
कापूं, माजूं, घांसूं, ठोकूं तरि कनक पालटे काधं न ॥६९॥

गद्य अर्थ—

आधीं, मध्यें, शेवटीं, सुजनच सौजन्य दाखवितो—इतर कोणी नव्हे तोडावें, तापवावें घासावें किंवा ठोकावें, तरी सोन्यांत कांहीं पालट होत नाहीं (दुसरी कोणतीही धातु तशी नव्हे.)

———○———

क्षारं जलं वारिमुचः पिबन्ति तदेव कृत्वा मधुरं वमन्ति ।
सन्तस्तथा दुर्जनदुर्वचांसि पीत्वाऽपि सूक्तानि समुद्गिरन्ति ॥ ७० ॥

उपजाति

खाऱ्या जला मेघ पिऊन तेंच
देतात गोड करुनी पुनश्च ॥
प्राशोनिया दुर्जनशब्द संत
करोनि त्यां सूक्तिच ओकतात ॥७०॥

गद्य अर्थ—

मेघ हे पितांना खारें पाणी पितात—परत देतांना तेंच मधुर करून देतात अशाच रीतीनें सज्जन हे, दुर्जनाचे कुशब्द गिळतात आणि त्यांना सूक्ति करून ओकतात

———○———

क्षुद्राः सन्ति सहस्रशः स्वभरणव्यापारमात्रोद्यताः
स्वार्थो यस्य परार्थ एव स पुमानेकः सतामग्रणीः ॥
दुष्पूरोदरपूरणाय पिबति स्रोतःपतिं वाडवो
जीमूतस्तु निदाघसंभृतजगत्सन्तापविच्छित्तये ॥ ७१ ॥

शार्दूलविक्रीडित

होती क्षुद्र किती सहस्र, रत जे स्वार्थैक्संपादनीं
ज्याचा स्वार्थ परार्थ हाच-सुजनीं तो एकला अग्रणी॥
प्राशी अब्धिस वाडवाग्नि, भरण्या दुष्पूर पोटास तो
देण्या शांति निदाघतप्तचि जगा, हा मेघ त्यातें पितो ॥ ७१ ॥

गद्य अर्थ—

केवळ स्वतःचा स्वार्थ साधण्यातच गुरफटून गेलेले क्षुद्र लोक सहस्रश आहेत पण परार्थ हाच ज्याचा स्वार्थ, तो मनुष्य एकटाच सज्जनांचा शिरोमणि होय ! कधीं न भरणारी स्वतःच्या पोटाची खाच भरण्यासाठीं, वडवाग्नि, समुद्राचें प्राशन करतो पण मेघही त्याच समुद्राचें प्राशन करतो, तें ग्रीष्माच्या तापानें होरपळलेल्या जगाचा संताप शांत करण्यासाठीं !

———○———

तुङ्गत्वमितरा नाद्रौ नेदं सिन्धावगाधता ।
अलङ्घनीयताहेतुरुभयं तन्मनस्विनि ॥ ७२ ॥

उपजाति

गिरींत उंचीच अलंघ्यचिन्ह
अब्धींत खोलीच अलंघ्यचिन्ह ॥
एकांत एकेक; परंतु दोन्ही
येतात एक्या सुजनीं दिसोनी ॥ ७२ ॥

गद्य अर्थ—

अलंघ्यतेचीं दोन चिन्हें, उंची व खोली त्यापैकीं पर्वतात एक उंची आहे तर खोली नाहीं समुद्रात खोली आहे पण उंचीच नाहीं पण सज्जनांत हीं दोन्ही आहेत

———०———

सन्तः स्वयं प्रकाशन्ते गुणा न परतो नृणाम् ।
आमोदो न हि कस्तूर्याः शपथेन विभाव्यते ॥ ७३ ॥

अनुष्टुभ्

स्वयें प्रकाशती संत, दुजा गुण नरा न दे ।
खात्री कस्तूरिगंधाची शपथेनेंच कां घडे ? ॥ ७३ ॥

गद्य अर्थ—

संत हे स्वयंप्रकाशीच असतात दुसऱ्याकडून कांहीं कुणाला गुण प्राप्त व्हावयाचे नसतात कस्तूरीच्या सुगंधाबद्दल कुणाची खात्री पटवावयाची ती शपथेवर सांगितल्यानें पटावयाची थोडीच असते ?

———०———

गंगा पापं, शशी तापं, दैन्यं कल्पतरुस्तथा ।
पापं ताप च दैन्यं च घ्नन्ति सन्तो महाशयाः ॥७४॥

अनुष्टुभ्

गंगा पापा, चंद्र तापा, दैन्या कल्पतरू हरी ।
महोदार असा संत या तिघांसहि संहरी ॥ ७४ ॥

गद्य अर्थ—

गंगा पाप, चन्द्र ताप, कल्पतरु दैन्य, अशीं ( हीं एकेक हरण करतात ) संत, हीं तिन्ही नष्ट करतात

———०———

भीमं वनं भवति तस्य पुरं प्रधानं
सर्वे जनाः सुजनतामुपयान्ति तस्य ॥
कृत्स्ना च भूर्भवति सन्निधिरत्नपूर्णा
यस्यास्ति पूर्वसुकृतं विपुलं नरस्य ॥ ७५ ॥

वसंततिलका

त्या घोर रान वनतें जणुं राजधानी
सौजन्य त्यास मिळतें सगळ्यांकडोनी ॥
सद्रत्नपूर्ण बनतें जग सर्व त्यास
ज्या पूर्वसंचित विशाल अशा नरास ॥७५॥

गद्य अर्थ—

ज्याची पूर्वपुण्याई मोठी त्या माणसाला–घोर रान हें मोठ्या नगरीसारखें होतें, सर्व जन त्याच्याशीं सौजन्यानं वागतात, सारें जग त्याला सद्रत्नाची खाणच होतें.

———०———

पात्रं न तापयति नैव मलं प्रसूते
स्नेहं न संहरति नैव गुणान्क्षिणोति ॥
द्रव्यावसानसमये चलतां न धत्ते
सत्पुत्र एव कुलसद्मनि कोऽपि दीपः ॥ ७६ ॥

वसंततिलका

पात्रास ताप नच दे, न मल स्रवे तो
न स्नेह ओढुनि गुणक्षय वा करीतो ॥
द्रव्यावसानसमयीं न चळे कधींही
सत्पुत्र हा कुलगृहीं जणुं दीप होई ॥ ७६ ॥

गद्य अर्थ—

यात सर्व वर्णन द्व्यर्थी आहे—सत्पुत्र हा कुलगृहात दीपासारखा असतो दोघेही पात्रास ( ज्यात तेल असते त्या भागास, सत्पात्र माणसास ) ताप देत नाहींत दोघेही मल स्रवत नाहींत ( दिव्याकडे–काजळी पुत्राकडे–वाईट कृत्य ) स्नेह परत घेत नाहींत ( दिवा वातीकडून स्नेह=तेल खेचून घेत नाहीं सत्पुत्र मैत्री परत घेत नाहीं ) गुण-क्षय करीत नाहींत ( दिवा, गुण=वात कमी पडूं देत नाहीं. सत्पुत्र आपले गुण टिकून धरतो ) द्रव्य संपलें तरी चळत नाहींत. ( दिव्याकडे द्रव्य=द्रव=तेल, पुत्राकडे–संपत्ति )

———०———

परिचरितव्याः सन्तो यद्यपि कथयन्ति नो सदुपदेशम् ।
यास्तेषां स्वैरकथास्ता एव भवन्ति शास्त्राणि ॥ ७७ ॥

आर्या

उपदेश न वदती तरि करणें तूं नित्य संतसेवेस ।
सहज बोलही त्यांचे राहति शास्त्रेंच होउनी खास ॥ ७७ ॥

गद्य अर्थ—

संत हे जरी (उठल्या सुटल्या) उपदेश करीत नसले, तरी, माणसानें त्यांची सेवा केली पाहिजे. कारण त्यांचे सहजीं बोललेले शब्द व कथा या शास्त्रें होऊन राहतात !

———o———

व्यथयतितरामुपेतः शुद्धप्रकृतीनवद्यलेशोऽपि ।
उद्विजते ननु चक्षुः सक्तेन रजःकणेनापि ॥ ७८ ॥

आर्या

स्वच्छ प्रकृति जयांची, अल्पहि दोषें तयां व्यथा वाटे ।
डोळ्यांमधें रजःकण अल्पहि शिरतां पहा किती खुपतें ॥ ७८ ॥

गद्य अर्थ—

हृदयानें, स्वभावानें, स्वच्छ अशा थोरांना खत्ला यत्किंचित् दोष जडला, तरी, त्याची व्यथा वाटते. डोळ्यात अगदीं सूक्ष्म धुळीचा कण गेला, तरी किती खुपतो हें सर्वमान्य आहे. ( नेत्र हे स्वच्छप्रकृति )

———o———

उदन्वच्छन्ना भूः स च निधिरपां योजनशतं
सदापान्थः पूषा गगनपरिमाणं कलयति ॥
इति प्रायो भावाः स्फुरदवधिमुद्रामुकुलिताः
सतां प्रज्ञोन्मेषः पुनरयमसीमो विजयते ॥ ७९ ॥

आर्या

व्यापी उदधि जगा, परि, केवळ शतयोजनेंच विस्तृत तो ।
पांथस्थ नित्य रवि हा उल्लंघुनि हें विशाल नभ जातो ॥
मर्यादेनीं मुद्रित बहुधा सारेंच वस्तुजात असें ।
सुजनांच्या प्रज्ञेचें स्फुरणचि निःसीम एकमात्र दिसे ॥ ७९ ॥

गद्य अर्थ—

समुद्र हा, जगाला व्यापितो, पण, तोही, फारतर शंभर योजनांइतकाच विस्तृत असेल ! आकाश अनंत म्हणावें, तर, हा नित्यप्रवासी सूर्य, दिनप्रतिदिन त्याला ओलांडून जातो ! अशा तऱ्हेनें, बहुधा प्रत्येक वस्तु, मर्यादेनें बद्ध आहे,—पण सज्जनांच्या प्रज्ञेचें स्फुरण, हेंच एकमेव, निःसीम आहे.

———o———

# प्रकरण ५ वें

विषय — खल, दुर्जन, दुष्ट, नीच, पिशुन, क्षुद्र, निंदक, कलंकित.

निष्णातोऽपि च वेदान्ते साधुत्वं नैति दुर्जनः ॥
चिरं जलनिधौ मग्नो मैनाक इव मार्दवम् ॥ १ ॥

अनुष्टुभ्

वेदान्तीं ये बुडोनीही साधुता न खला तशी ॥
सागरीं चिरमग्नाही मैनाका मृदुता जशी ॥ १ ॥

गद्यार्थ—

दुर्जनाला, वेदान्तांत कितीहि, बुडविलें ( निष्णात झाला, ) तरी त्याला सुजनत्व येत नाहीं,—जसें, चिरकाळ समुद्रांत बुडलेल्या मैनाकाला, मृदुत्व येत नाहीं, तसें ( युद्धांत बापाला एकाकी सोडून, स्वतःचा जीव बचावण्याइतका, हा, कठोरहृदयी हिमालय—पुत्र, याचेविषयीं अधिक माहिती श्लो ४१ पहा )

खलजनवदनं गता नितान्तं
मधुरतरापि कटुत्वमेति सूक्तिः ॥
परिणमति विषात्मनैव पीतं
भुजगकुलेन पयोऽपि शर्करात्यम् ॥ २ ॥

वैतालीय

खल जधि वदतात गोड सूक्ति
मधुरहि त्या कटु फार फार होती ॥
यद्य मुखिं शिरतां भुजगमाचें
विषचि बने झणि दूध-साखरेचें ॥ २ ॥

गद्यार्थ—

खलाच्या अत्यंत मधुर, अशाही सूक्ति, दुष्टाच्या तोंडून बाहेर पडल्या, तरी कटु होतात सर्पांच्या तोंडांत दूध साखर गेलें तरी त्याचें विषांतच रूपांतर होतें

अनुकुरुत. खलसुजनावग्रिमपाश्चात्ययोः सूच्याः ॥
पिदधाति रन्ध्रमेको गुणवानन्यश्च विदधाति ॥ ३ ॥

आर्या

खल टोंक, सुजन नेढें, जणूं सुईचेच भाग हे दोन ॥
पाडील भोंक पहिला, दुसरा टाकील तेंचि बुजवून ॥ ३ ॥

गद्यार्थ—

खल, आणि, सुजन, हे अनुक्रमें, सुईच्या टोंकासारखे, व नेढ्यासारखे, असतात पहिला, भोंक पाडीत असतो, तर दुसरा, तें बुजविण्याचें कार्य करतो.

नन्वाश्रयस्थितिरियं तव कालकूट !
केनोत्तरोत्तरविशिष्टपदोपदिष्टा ? ॥
प्रागर्णवस्य हृदये, वृषलक्ष्मणोऽथ
कण्ठेऽधुना वससि वाचि पुनः खलानाम् ॥ ४ ॥

वसंततिलका

कैसें कुणी शिकविलें तुज कालकूट !
कीं उत्तरोत्तर तुझी स्थिति उच्च होत ? ॥
आधीं समुद्रिं, पुढती शिवकंठिं जासी !
तूं शेवटीं खलमुखीं स्थिर आज होसी ॥ ४ ॥

गद्यार्थ—

हे कालकूट विषा ! उत्तरोत्तर, तुझी वसति, अधिकाधिक उच्चावर होत जावी, ही युक्ति, तुला कोणी शिकविली ? मूळ तू सागरतळीं होतास, नंतर शिवाच्या कंठीं, आणि आतां खलाच्या मुखीं येऊन बसलास !

न देवाय, न धर्माय, न बन्धुभ्यो, न याचिने ॥
दुर्जनेनार्जितं द्रव्यं भुज्यते राजतस्करैः ॥ ५ ॥

उपजाति

देवा न, धर्मा न, न याचकास
मिळे न संबंधितही जनास ॥
जें द्रव्य लोभी खल मेळवीती
तें राज्य या चोर लुटूनि नेती ॥ ५ ॥

गद्यार्थ—

दुष्टांना मिळविलेलें द्रव्य, न देवाकारणीं, न धर्माकारणीं, न बांधवांना, न याचकांच्या हातीं पडायचें! राजे किंवा चोर यांनीं तें लुटावयाचें हीच त्याची गति!

———०———

एकः खलोऽपि यदि नाम भवेत्सभायां
मोघीकरोति विदुषां निखिलप्रयत्नान् ॥
एकापि पूर्णमुदरं मधुरैः पदार्थै—
र्लोड्य रेचयति हन्त न मक्षिका किम्? ६

वसन्ततिलका

साऱ्या सभेंत खल एक जरी असेल
सारीच सुज्ञ कृति निष्फल तो करील ॥
मिष्टान्नचीं उदरीं ज्या भरलें तयासी
देई न काय ढवळूनचि रेच माशी? ॥ ६ ॥

गद्यार्थ—

विद्वानांच्या सभेंत, एक जरी दुर्जन असला, तरी, त्याच्या सर्व श्रमावर तो बोळा फिरवील मिष्टान्न भरलेल्या पोटांत, एक जरी माशी गेली, तरी ती त्याला रेच दिल्याशिवाय राहील काय?

———०———

पादाहतोऽथ दृढदण्डविघट्टितो वा
यं दंष्ट्रया दशति तं किल हन्ति सर्पः ॥
कोऽप्यन्य एव पिशुनोऽथ भुजङ्गधर्मा
कर्णे परं स्पृशति, हन्ति परं समूलम् ॥ ७ ॥

वसन्ततिलका

मारूनि दंड, तुडवूनिहि त्या पदानें
मारीच सर्प, क्षणिं, ज्या डसतो रदानें ॥
हा सर्पबंधु खळ, लागुनि कानिं एका
मारी समूळ परि अन्य कुणास देखा ॥ ७ ॥

गद्यार्थ—

पायांनी तुडविलेला, किंवा, काठीनें बडविलेला सर्प, फार तर, ज्याला दातांनीं डसेल, त्या एकालाच मारू शकेल, पण सर्पबंधु दुर्जन ( चुगलखोर ) हा एकाच्या कानाला स्पर्शोन, पण दुसऱ्यालाच ठार करील

———०———

सर्पदुर्जनयोर्मध्ये वरं सर्पो, न दुर्जनः ॥
सर्पो दशति कालेन, दुर्जनस्तु पदे पदे ॥ ८ ॥

अनुष्टुभ्

सर्प दुर्जन यांमध्यें बरा सर्प, न दुर्जन ॥
सर्प चावे कधीं काळीं—दुष्ट चावे क्षणोक्षण ॥ ८ ॥

गद्यार्थ —

सर्प आणि दुर्जन, यात ( त्यातल्या त्यांत बरा म्हणावयाचा तर ) दुर्जन नव्हे, सर्पच कारण सर्प केव्हांतरी चावणार, पण दुर्जन क्षणक्षणाला डसत राहणार

———०———

अहो खलभुजङ्गस्य विपरीतो वधक्रमः ॥
अन्यस्य दशति श्रोत्रमन्यः प्राणैर्वियुज्यते ॥ ९ ॥

अनुष्टुभ्

किती विचित्र रीतीनें वधितो सर्प दुर्जन ॥
एकाच्या चावुनी कानां ठारी अन्यास मारुन ॥ ९ ॥

गद्यार्थ—

दुर्जनरूपी सर्प ( साध्या सर्पाहून ) किती निराळ्या रीतीनं मनुष्याला ठार करतो! डसतो एकाच्या कानाला, आणि, ठार मारतो दुसऱ्याच कुणाला!

———०———

दृश्यन्ते भुवि भूरि निम्बतरवः कुत्रापि ते चन्दनाः
पाषाणैः परिपूरिता वसुमती वज्रो मणिर्दुर्लभः ॥
श्रूयन्ते करटारवाश्च सततं, चैत्रे कुहूकूजितं
तन्मन्ये खलसङ्कुलं जगदिदं, द्वित्राः क्षितौ सज्जना १०

शार्दूलविक्रीडित

पाहावें तिकडेच लिंब जगतीं—कोठेतरी चंदन
पाषाणीं भरल्या महींत विरळा येई हिरा लाभुन ॥
काकांचा रव नित्य; कूजन करी चैत्रीं कधीं कोकिळा
दुष्टांच्या जगतांत थोर पडती दोन्तीनची दृष्टिला ॥१०

गद्यार्थ—

जगभर बघाव, तिकडे, कडुलिंबाचीं झाडेंच फार, चंदन कुठेंतरी एखादाच पृथ्वी नुसती दगडांनीं भरली आहे हिरा क्वचितच कावळ्याची कटकट निरंतरचीच, कोकिळांचें कुहूकुहू वर्षाकाठीं चैत्रांत ऐकू यायचें, एकूण या जगीं बुजबुजाट दुर्जनांचाच सज्जन कुठें दोन-तीन असतील नसतील!

———०———

खलः सर्षपमात्राणि परच्छिद्राणि पश्यति ॥
आत्मनो बिल्वमात्राणि पश्यन्नपि न पश्यति ॥ ११ ॥

अनुष्टुभ्

**दुज्यानेत्रीं कुसळही पाहे नित्यचि दुष्ट तो ॥**
**स्वतांचें तो मुसळही दिसूनिहि न पाहतो ॥ ११ ॥**

गद्यार्थ—

दुष्टाला, दुसऱ्याच्या डोळ्यातलें कुसळ सुद्धा दिसेल; पण स्वत च्या डोळ्यांतलें मुसळ दिसणार नाहीं (शब्दश.-दुसऱ्याचीं मोहरीएवढीं छिद्रें दिसतील, स्वतःचीं बेलफळाएवढींहि दिसणार नाहींत.)

———o———

दुर्जनः परिहर्तव्यो विद्ययालङ्कृतोऽपि सन् ॥
मणिना भूषितः सर्पः किमसौ न भयंकरः ? ॥१२॥

अनुष्टुभ्

**विद्याभूषित ऐसाही टाळावा नित्य दुर्जन ॥**
**मस्तकीं रत्न ज्याच्या, तो सर्प भीतिद काय न ? ॥१२॥**

गद्यार्थ—

दुर्जन, विद्यामंडित असला, तरी, त्याची सगत टाळावी. ज्याच्या मस्तकीं रत्न, असाही सर्प, काय भयंकर नव्हे ?

———o———

न विषममृतं कर्तुं शक्यं प्रयत्नशतैरपि
त्यजति कटुतां न स्वां निम्बः स्थितोऽपि पयोह्रदे ॥
गुणपरिचितामार्यां वाणीं न जल्पति दुर्जनः
चिरमपि बलाध्माते लोहे कुतः कनकाकृतिः ? ॥ १३ ॥

हरिणी

**अमृत करणें सायासेंही न शक्य विषांतुनी**
**न च मधुरता ये लिंबाला पयःसरिं वाढुनी ॥**
**गुणिजन वदे तैशी वाणी वदे न च दुर्जन**
**चिर फुंकुन ये लोहांतूनी सुवर्णचि कोठुन ? ॥ १३ ॥**

गद्यार्थ—

शेंकडों प्रयत्न केले, तरी, विषाचे, अमृत करणें अशक्य. दुधाच्या तळ्यात लिंब वाढला, तरी, आपली कटुता सोडीत नाहीं. गुणीजनासारखी वाणी, दुर्जनाच्या तोंडून निघणार नाहीं. चिरकाल फुंकलें, तरी, लोखंडाचें सोनें कुठून होईल ?

———o———

दुर्जनदूषितमनसां पुंसां सुजनेऽपि नास्ति विश्वासः ॥
पाणौ पयसा दग्धे तक्रं फूत्कृत्य बालकः पिबति ॥१४॥

आर्या

**दुष्टें दूषित करतां मन सुजनांतहि धरी न विश्वास ॥**
**जळतां हात दुधानें फुंकुनि बालक पिईल ताकास १४**

गद्यार्थ—

दुर्जनसगतीनें, मन, एकदां कां दूषित झालें, कीं, मग सज्जनाचाही विश्वास वाटेनासा होतो दुधानें हात भाजल्यावर बालक, ताकसुद्धा फुकूनच पितें.

———o———

अन्यस्य लगति कर्णे जीवितमन्यस्य हरति बाण इव ॥
हृदयं दुनोति पिशुनः कण्टक इव पादलग्नोऽपि ॥१५॥

आर्या

**लागे कर्णि दुज्याच्या, प्राण दुज्याचे हरी, जसा बाण ॥**
**हृदया दुखवी दुर्जन कांटा पायांत जेविं बोंचून ॥१५॥**

गद्यार्थ—

दुर्जन हा एकपक्षीं, बाणासारखा, एकाच्या कानाला लागतो व दुसऱ्याच कोणाला ठार मारतो. दुसऱ्यापक्षीं, तो काट्यासारखा-पायाला बोंचला (नम्र झाला), तरी, त्याची कळ हृदयापर्यंत जाते.

———o———

अमरैरमृतं न पीतमब्धे-
र्न च हालाहलमुल्बणं हरेण ॥
विधिना निहितं खलस्य वाचि
द्वयमेतद् बहिरेकमन्यदन्तः ॥ १६ ॥

शार्दूलविक्रीडित

**मंथोनी, उदधींतलें अमृत तें प्याले म्हणे देव ते**
**वा हालाहल शंकरेंच गिळिलें खोटेंचि हें वाटतें ॥**
**दुष्टांच्या मुखिं त्या कधींच विधिनें दोघांसही ठेविलें**
**ओष्ठांना अमृतें, नि आंतुनि तया हालाहलें व्यापिलें १६**

गद्यार्थ—

समुद्रमंथनातलें अमृत, देव प्याले, हेंही खोटें ! व, तीव्र हालाहल, शंकर प्याले, हेंही खोटें ब्रह्मदेवानें, आधींच दुर्जनाच्या मुखीं, त्या दोघानाही,—अमृताला ओठाशीं व हालाहलाला आंत—असें ठेविलें आहे.

———o———

त्यजन्ति शूर्पवद्दोषान् गुणान् गृह्णन्ति माधवः ॥
दोषग्राही गुणत्यागी चालनीरिव दुर्जनः ॥ १७ ॥

अनुष्टुभ्

गुण राखी, दोष फेकी, साधु तो या सुपापरी ॥
दोष घेई गुणां सोडी खल तो चाळणीपरी ॥ १७ ॥

गद्यार्थ—

पाखडताना, धान्य ठेवून घेऊन, खडे फेकणाऱ्या, सुपासारखे सज्जन समजावे पीठ चाळतांना, पीठ सोडून, खडा धरून ठेवणाऱ्या, चाळणीसारखे, दुर्जन समजावे ! !

———०———

जन्मप्रभृतिवक्रस्य हलस्य च खलस्य च ॥
सोढुं तयोर्मुखाक्षेपं भवत्येकैव सा क्षमा ॥ १८ ॥

उपजाति

जन्मेंच झाले अतिवक्र साचे
त्या नांगरांचे परि त्या खलांचे ॥
सारे मुखाक्षेपहि सोसण्यातें
क्षमाच ती एक समर्थ होते ॥ १८ ॥

गद्यार्थ —

जन्मानेंच जे वांकडे, अशा नांगराच्या फाळांचे, व, दुर्जनांचे मुखाक्षेप ( तोंडानें ओरबाडणें, दुष्ट शब्द ) सहन करण्यास क्षमाच ( भूमि, क्षमावृत्ति ) काय ती समर्थ होते. '

———०———

पोतो दुस्तरवारिराशितरणे दीपोऽन्धकारागमे
निर्वाते व्यजनं मदान्धकरिणां दर्पोपशान्त्यै सृणिः ॥
इत्थंतद्भुवि नास्ति यस्य विधिना नोपायचिन्ता कृता
मन्ये दुर्जनचित्तवृत्तिहरणे धाताऽपि भग्नोद्यमः ॥१९॥

शार्दूलविक्रीडित

नौका दुस्तर सागरास तरण्या, अंधार येतां दिवा
पंखा कुंद हवेंत, अंकुश करीदर्पा हरायास या ॥
कांहींही न जगीं, उपाय विधिनें नाहींत ज्या चिंतिले
दुष्टां तोषवितां स्वतांचि विधिनें हो हातची टेकले ॥१९

गद्यार्थ—

दुस्तर सागर तरण्यास नौका; अंधारांत दिवा, वारा पडल्यास पंखा, उन्मत्त हत्तींना नमविण्यास अंकुश—एकूण, जगांत असें कांहीं नाहीं, की, ज्यावर, ब्रह्मदेवानें उपाय काढलेला नाहीं. पण—दुर्जनाला तुष्ट करण्याचे बाबतींत, स्वतः त्यानेच, हात टेकले !

———०———

खलानां कण्टकानां च द्विविधैव प्रतिक्रिया ॥
उपानन्मुखभङ्गो वा दूरतो वा विसर्जनम् ॥ २० ॥

अनुष्टुभ्

द्विमार्गी च प्रतीकार दुष्टांचा; कण्टकांपरी ॥
फोडावें तोंड जोड्यानें, सोडावें दूर वा तरी ॥२०॥

गद्यार्थ—

कांट्याप्रमाणें दुष्टांचा प्रतिकार, दोनच प्रकारें होतो—एक, *खेटरानें मुखभंग करावा,* ( *कांट्याचें टोंक मोडावें—खलाचें* थोबाड मडकावें ), किंवा, दूर सोडून द्यावें

———०———

अहमेव गुरुः सुदारुणाना-
मिति हालाहल ! मा स्म तात दृप्यः ॥
ननु सन्ति भवादृशानि भूयो
भुवनेऽस्मिन् वचनानि दुर्जनानाम् ॥ २१ ॥

वैतालीय

" अतितीव्र विषांत मीच मोठा, "
कर हालाहल ! गर्व हा न खोटा ॥
तुझियासम हीं कितीक साचीं
घग्र लोकीं वचनेंहि दुर्जनांचीं ॥ २१ ॥

गद्यार्थ.—

हे हालाहला ! ' भयंकर विषांत मीच तीव्र ", असा गर्व तुला होऊं देऊं नकोस. दुर्जनांच्या वचनांप्रमाणें, दुसऱ्यांशीं *भयंकरपणांत तुजसारख्या अशा कित्येक वस्तु जगांत आहेत, पहा !*

———०———

स्पृशन्नपि गजो हन्ति जिघ्रन्नपि भुजङ्गमः ॥
हसन्नपि नृपो हन्ति मानयन्नपि दुर्जनः ॥ २२ ॥

अनुष्टुभ्

स्पर्शी तरी वधी हत्ती, हुंगी तरिहि सर्प तो ।
राजा हंसे तरी; दुष्ट मान देतहि मारितो ॥ २२ ॥

गद्यार्थ—

( दंश धरलेला ) हत्ती, स्पर्श करील, ( गोंजारल्यासारखें करील ) तरीही, मारल्याशिवाय सोडणार नाहीं, सर्प, हुंगील,

(प्रेमानें अवघ्राण केल्यासारखें करील,) तरीही, मारल्याशिवाय सोडणार नाहीं, राजा हसेल (प्रसन्न झाल्यासारखें दाखवील) तरी ठार मारील, दुर्जन, एखाद्याचा सन्मान करण्याचा आव आणीत आणीतच त्याचा वध करील (या चौघांचाही कोणी भरंवसा धरू नये)

———

जिह्वैव सतामुभे फणवतां स्रष्टुश्चतस्रश्च ता-
स्तास्सप्तैव विभावसोर्नियमिताः षट् कार्तिकेयस्य च ॥
पौलस्त्यस्य दशाभवन्फणिपतेर्जिह्वासहस्रद्वयं
जिह्वालक्षशतैककोटिनियमो नो दुर्जनानां मुखे ॥२३॥

आर्या

सुजनांस एक, सर्पा
दोन, विधीलागिं चार त्या असती।
अग्नीला सात जिभा
कार्तिकस्वामीसि त्या सहा होती ॥
त्या रावणा दहा, परि
शेषाच्या मुखिं सहस्र हो दोन।
किति कोटि दुर्जनांच्या
मुखांत असतील थांग लागे न ॥ २३ ॥

गद्यार्थ—

सज्जनाना, जीभ एकच असते,—सर्पाला दोन, ब्रह्मदेवाला चार, कार्तिकस्वामीला सहा, अग्नीला सात, रावणाला दहा, शेषाला दोन सहस्र, पण दुर्जनाच्या मुखात, किती कोटी जिभा असतील याचा नियमच नाहीं।

———

वर्जनीयो मतिमता दुर्जनः सख्यवैरयोः ॥
श्वा भवत्यपकाराय लिहन्नपि दशन्नपि ॥ २४ ॥

अनुष्टुभ्

मित्र वा शत्रु टाळावा सुज्ञानें नित्य दुष्ट तो ॥
चाटे डसे तरी कुत्रा अपकार करीच तो ॥ २४ ॥

गद्यार्थ—

दुर्जन हा मित्र म्हणून येवो, शत्रु म्हणून येवो, दोन्ही प्रसगीं सुज्ञानें त्याची संगत टाळावी. कुत्र्यानें, प्रेमानें चाटलें, किंवा, रागावून तो डसला, तरी दोन्ही अपकारकच!

———

एको विश्वसतां हराम्यपघृणः प्राणानहं प्राणिना-
मित्येवं परिचिन्त्य मात्ममनसि व्याधानुतापं कृथाः ॥
भूपाना भवनेषु किं च विमलक्षेत्रेषु दुष्टाशयाः
साधूनामरयो वसन्ति कति न त्वत्तुल्यकक्षा नराः २५

शार्दूलविक्रीडित

'ज्यां शंका न अशा जिवांसि वधितों मी एकटा निर्घृण'
पश्चात्तप्त, अशाचि चिंतनिं, तुझें व्याधा न होवो मन ॥
राजांच्या भवनांत, आणि विमल क्षेत्रांतही राहती
साधूंचे रिपु, दुष्टचित्त, तुझिया ऐशा नरांच्या तती २५

गद्यार्थ—

हे व्याधा! ' विश्वासू नि शंक प्राण्यांना क्रूरपणे मारणारा एकमेवाद्वितीय असा मीच!" अशा विचारांनीं तुला पश्चात्ताप न होवो! अरे राजाच्या भवनांतच नव्हे तर पवित्र क्षेत्रांत सुद्धा, तुझ्या तोडीचे, दुष्ट हृदयाचे, सज्जनाचे शत्रु काहीं थोडे नाहींत! (पंडे, बडवे आदींवर हा प्रहार आहे)

———

महदाश्रयसंयोगाद्धत्ते शोभामसाध्वपि ॥
कान्ताविलोचने न्यस्तं मलीमसमिवाञ्जनम् ॥ २६ ॥

अनुष्टुभ्

थोरांच्या आश्रयें दुष्ट शोभा मोठी धरीतसे ॥
स्त्रियांच्या लोचनीं शोभा काळें काजळही जसें ॥२६॥

गद्यार्थ—

स्त्रीच्या लोचनीं असलें म्हणजे मलीन काजळही जसें शोभतें तसें थोरांच्या आश्रयानें दुष्टही शोभतात

———

मृग–मीन–सज्जनानां
तृण–जल–संतोषविहितवृत्तीनाम् ॥
लुब्धक–धीवर–पिशुना
निष्कारणवैरिणो जगति ॥ २७ ॥

आर्या

मृग, मत्स्य, आणि सज्जन,
तृण, जल संतोष यांवरी जगती ॥
तरि रिपु निष्कारण त्यां
किरात कोळी नि दुष्ट हे जगतीं ॥ २७ ॥

गद्यार्थ—

हरिण, मासे व सज्जन हे अनुक्रमें गवत, पाणी व समाधानी वृत्ति यांवर जगतात ( म्हणजे यांचा कोणाला तरी कांहीं उपद्रव आहे काय ? ) पण यांना सुद्धां शिकारी लोक कोळी व दुर्जन हे अनुक्रमें अकारणवैरी आहेतच !

———

व्यालं बालमृणालतन्तुभिरसौ रोद्धुं समुज्जृम्भते
छेत्तुं वज्रमणीन् शिरीषकुसुमप्रान्तेन संनह्यते ॥
माधुर्यं मधुबिन्दुना रचयितुं क्षाराम्बुधेरीहते
नेतुं वाञ्छति यः खलान्पथि सतां सूक्तैः सुधास्यन्दिभिः

शार्दूलविक्रीडित

बांधाया बिसतन्तुनें बघतसे उन्मत्त हत्तीसि तो
धारेनें शिरिषाचिया जणुं हिरा कापावया पाहतो ॥
खाऱ्या अब्धिस गोड तो करुं बघे पक्व्या मधू बिंदुनें
दुष्टा सज्जनमार्गिं नेउं बघतो जो गोडशा भाषणें॥२८॥

गद्यार्थ—

( दुर्जन कशाला बधणार नाहीं. ) जो कोणी त्याला गोड सूक्तींनीं, सुजनमार्गीं नेऊं बघतो, तो त्याचा प्रयत्न, कमलतन्तूनें मत्तगजाला बांधण्यासारखा; फुलांच्या पाकळीच्या धारेनें, हिऱ्याला पैलू पाडूं पाहण्यासारखा; किंवा मधाच्या थेंबानें, खाऱ्या सागराला गोड करूं बघण्यासारखा आहे.

———

स्तोकेनोन्नतिमायाति स्तोकेनायात्यधोगतिम् ॥
अहो नु सदृशी वृत्तिस्तुलाकोटेः खलस्य च ॥२९॥

अनुष्टुभ्

अल्पें वरी चढोनी ये, अल्पभारेंचि खालतीं ॥
तराजूची खलाचीही समानचि असे गति ॥२९॥

गद्यार्थ—

खल हे तराजूच्या दांडीसारखे आहेत—थोड्यानें ( थोड्या वजनानें-वैभवानें ) ते वर चढतात; थोड्यानेंच ते खालीं जातात.

———

अकरुणत्वमकारणविग्रहः
परधने परयोषिति च स्पृहा ॥
सुजनबन्धुजनेष्वसहिष्णुता
प्रकृतिसिद्धमिदं हि दुरात्मनाम् ॥ ३० ॥

उपजाति

क्रूरत्व अन् कारणहीन वैर
इच्छी धना अन् परकीय नार ॥
दुस्वासही आप्त नि सज्जनांचा
स्वभाव हा नित्यचि दुर्जनांचा ॥ ३० ॥

गद्यार्थ—

निर्दयपणा, अकारण भांडणें, परधन व परस्त्रीचा लोभ, सज्जन व आप्त यांचा दुस्वास हे दुर्जनाचे स्वभावधर्म होत.

———

मार्जारो लभते न पञ्जरशुकालापेन कौतूहलं
कस्तूरीहरिणस्य सौरभतया व्याघ्रो न संतुष्यति ॥
प्रीतिर्नास्ति मयूरताण्डवविधौ व्याधस्य, दुष्टात्मभि—
र्व्याप्तायां भुवि सन्ति केऽपि विरलाः सन्तो गुणग्राहकाः

शार्दूलविक्रीडित

बोले पोपट, त्यामुळें न घडतें
बोक्यास त्या कौतुक !
कस्तूरीमृगनाभिगंध न च दे
व्याघ्रास तुष्टीसुख ॥
नाचे मोर, न त्यांत व्याध रमतो;
ऐसेच दुष्टात्मक-
सारे या जगिं; संत मात्र विरळा
होती गुणग्राहक ॥ ३१ ॥

गद्यार्थ—

पिंजऱ्यातला पोपट, सुरसुद्ध बोलतो, या कौतुकानें, कांहीं, बोका त्याकडे पहात नाहीं. कस्तुरीमृगाच्या सुगंधानें कांहीं वाघ संतोष पावत नाहीं. पारधी कांहीं मोराच्या नाचण्यावर खूष नसतो, पण जगांत बघावें तर असे दुष्टच फार ! गुण-ग्राहक सज्जन फारच विरळा.

———

सद्भिस्तु लीलया प्रोक्तं शिलालिखितमक्षरम् ॥
असद्भिः शपथेनोक्तं जले लिखितमक्षरम् ॥ ३२ ॥

अनुष्टुभ्

थोरांचे सहजीं शब्द—शिलालेखचि ते खरे ॥
शपथेवरि दुष्टांचे—पाण्यावरिल अक्षरें ॥ ३२ ॥

गद्यार्थ—

सज्जन, सहज बोलले, तरी, त्याचे शब्द, शिलालेखाप्रमाणें (अभंग) असतात दुर्जन, शपथेवर सांगतील, ते शब्दसुद्धा, पाण्यावरील लेखाप्रमाणें, (क्षणैक विनाशी) असतात.

---

बोधितोऽपि बहुसूक्तिविस्तरैः
किं खलो जगति सज्जनो भवेत् ? ॥
स्नापितोऽपि बहुशो नदीजलैः
गर्दभः किमु हयो भवेत् कचित् ? ॥ ३३ ॥

रथोद्धता

बोधपाठ बहुकाळ पाजुन
दुष्ट काय बनतील सज्जन ? ॥
न्हाणितां बहु नदीजलामधीं
होइ गर्दभहि अश्व कां कधीं ? ॥ ३३ ॥

गद्यार्थः—

पुष्कळ बोधामृत पाजूनही, दुर्जनाचा, सुजन थोडाच होणार आहे ? नदींत पुष्कळ धुतल्यानें, गाढवाचा, घोडा कुठें झाला आहे ?

---

प्राक्पादयोः पतति, खादति पृष्ठमांसं
कर्णे कलं किमपि रौति शनैर्विचित्रम् ॥
छिद्रं निरूप्य सहसा प्रविशत्यशङ्कः
सर्वं खलस्य चरितं मशकः करोति ॥ ३४ ॥

वसंततिलका

पायीं पडे प्रथम, पृष्ठि करीत दंश
कानीं हळूं गुणगुणेल विचित्र खास ॥
निःशंक आंत शिरते बघतांचि छिद्र
माशी करी सकल दुर्जन-दुश्चरित्र ॥ ३४ ॥

गद्यार्थ—

दुर्जनाची सर्व करणी, माशी, हुबेहुब वठवून दाखविते—आधीं पाया पडावें—मग पाठीचा चावा घ्यावा, मग कानाशी लागून गुणगुणावें—पण, जरा कुठें छिद्र दिसलें, की, बेधडक आंत शिरावें. (माशीविषयी स्वभावोक्ति.)

---

अपूर्वरसनाव्याली खलाननबिलेशया ॥
कर्णमूले दशत्यन्यं हरत्यन्यस्य जीवितम् ॥ ३५ ॥

अनुष्टुभ्

विचित्र सर्पिणी जीभ निजे दुष्टमुखांतरीं ॥
डसे कानास एकाच्या, दुज्याचे प्राण जी हरी ॥ ३५ ॥

गद्यार्थ—

खलमुखरूपी बिळात निजणारी, जिव्हा नावाची, एक विचित्र सर्पिणी आहे,—एकाच्या कानास डसते, पण, प्राणहरण दुसऱ्याचें करते

---

संवर्धितोऽपि पयसा भुजगो न वश्य-
स्तत्पालकानपि निहन्ति बलेन सिंहः ॥
दुष्टः परैरुपकृतस्तदनर्थकारी
विश्वासलेश इह नैव बुधैर्विधेयः ॥ ३६ ॥

वसंततिलका

होई न सर्प वश, पाजुनियां दुधास
मारील सिंहहि बळें निजपालकांस ॥
केलें भलें तरि वधीलचि दुष्ट त्यांस
विश्वास अल्प धरणें न बुधें अशांस ॥ ३६ ॥

गद्यार्थ—

दूध पाजून वाढविला तरी सर्प वश होत नाहीं सिंह स्वपालकाना बळें ठार मारतो. दुर्जन आपल्या उपकारकर्त्यांवर उलटून त्याचा नाश करतो सुज्ञानीं अशाचा यत्किंचितही विश्वास धरूं नये

---

हालाहलं खलु पिपासति कौतुकेन
कालानलं परिचुचुम्बिषति प्रकामम् ॥
व्यालाधिपं च यतते परिरब्धुमद्धा
यो दुर्जनं वशयितुं तनुते मनीषाम् ॥ ३७ ॥

वसंततिलका

हालाहला पिउं बघे जणुं कौतुकानें
चुंबूं बघे प्रलय अग्निस आवडीनें ॥
धाया मिठी धडपडे दृढ, तक्षकातें
जो इच्छितोचि करण्या वश दुर्जनातें ॥ ३७

गद्यार्थ—

दुर्जनाला वश करू पाहणें, म्हणजे, कौतुकानं, हालाहल पिऊ पाहण्यासारखें, अग्नीचें चुंबन घेऊ पहाण्यासारखें, किंवा तक्षकाला, यष्टि मिठी मारू बघण्यासारखें आहे

—o—

शिरसि निहितोऽपि नित्यं यत्नादपि सेवितो बहुस्नेहैः ॥
तरुणीकच इव नीचः कौटिल्यं नैव विजहाति ॥३८॥

आर्या

डोक्यावर वसवोनी
स्नेहानें नित्य पाळिलें ज्यांना ॥
युवतीच्या केसांपरि,
नीच कधीं कुटिलतेस सोडीना ॥ ३८ ॥

गद्यार्थ—

नीच, तरुणीच्या कुरळ्या केसासारखे आहेत, त्यांना तुम्ही डोक्यावर चढवा, की, स्नेहानें (प्रेमानं—तेलानं) त्यांचें पोषण करा, ते आपली जन्मजात कुटिलता (वक्र स्वभाव-कुरळेपणा) कांहीं सोडणार नाहींत

—o—

लब्धोत्साहो नीचः प्रथमतरं स्वामिनं पराभवति ॥
भूमिरजो रथ्यायामुत्थापकमेव संवृणुते ॥ ३९ ॥

अनुष्टुभ्

वरतीं उठतां नीच प्रथमचि मारी स्वकीय स्वामीस॥
मार्गस्थ धूळ जैशी, उठवी त्यालाच घेरिते खास ॥३९॥

गद्यार्थ—

नीचाला, एकदां उठू दिलं, कीं, प्रथम तो आपल्या स्वामीचाच पराभव करतो मार्गावरची धूळ, जो तिला उठवतो त्यालाच प्रथम घेरून टाकते

—o—

रविरपि न दहति तादृग्यादृग्दहति वालुकानिकरः ॥
अन्यस्माल्लब्धपदो नीचः प्रायेण दुःसहो भवति ॥४०

आर्या

रवि पोळतो न तितुका
जितुका पोळेल ढीग वाळूचा ॥
अन्याधारें मोठा
झालेला नीच दुःसहचि साचा ॥ ४० ॥

गद्यार्थ—

सूर्य (स्वतःसिद्ध उष्ण असला तरी सुसह्य तो) जितका माणसाला पोळतो त्यापेक्षां वाळूचा ढीग जास्त पोळतो दुसऱ्याने आधारें वर चढलेले नीच हे असेच दुःसह होतात

—o—

वरं पक्षच्छेदः समदमघवन्मुक्तकुलिश-
प्रहारैरुद्गच्छद्बहुलदहनोद्गारगुरुभिः ॥
तुषाराद्रेः सूनोरहह पितरि क्लेशविवशे
न चासौ संपातः पयसि पयसां पत्युरुचितः ॥ ४१ ॥

शिखरिणी

महाज्वाला इंद्रें जधिं उठविल्या स्वप्नहरणे
वरें मैनाकाचें लढतच तदा पक्ष तुटणे ॥
पित्याला एकाकी त्यजुनि समरीं भेकडपणे
जळो त्या नीचाचें उडुनिहि समुद्रांत पडणें ॥४१॥

गद्यार्थ—

(मैनाक हा हिमालयाचा पुत्र पूर्वी पर्वतांना पक्ष होते) ते इंद्रानं वज्रानं जाळले त्यावेळीं, मैनाकानं, उड्डाण करून, समुद्रांत क्षेप घेतली पण, या बहादुरीपेक्षां, त्या युद्धांत, बापाचं रक्षण करीत, ठाम उभे राहून, हिमालयाप्रमाणेंच, स्वतःचे पक्ष, मैनाकानें जाळून घेणें, अधिक शौर्याचं ठरलें असतें (पण भेकडपणा हा नीचांचा स्वभावच आहे)

—o—

व्योमनि वासं कुरुते चित्रं निर्माति यत्नतः सलिले ॥
स्नपयति पवनं सलिलैर्यो नीचे चरति सत्कारम् ॥४२॥

आर्या

करितो वास नभीं तो,
काढी चित्रहि जळांत करून ॥
न्हाणी पवन जलानें—
जो नीचाप्रति धरील सुजनपण ॥ ४२ ॥

गद्यार्थ—

जो नीचाशीं (त्याला सुधारण्याच्या अपेक्षेनं) सौजन्यानं वागेल, तो, जणू, आकाशांत घर बांधून राहतो, किंवा, पाण्यांत चित्र काढण्याचे श्रम करतो, किंवा, पाण्यानं वाऱ्याला अंघोळ घालतो

—o—

आक्रोशितोऽपि सुजनो न वदत्यवाच्यं
निष्पीडितो मधुरमुद्वमतीक्षुदण्डः ॥
नीचो जनो गुणशतैरपि सेव्यमानो
हास्येन वदति यत्कलहेऽप्यवाच्यम् ॥ ४३ ॥

वसंततिलका

क्षोभांतही न अपशब्द वदेल थोर
देई पिळूनि रस गोडचि, ऊंस फार ॥
अगीं गुणान्वि वसतो असलाहि नीच
बोले हंसूनि—कलहीं वदणें न तेंच ॥ ४३ ॥

गद्यार्थ—

न बोलावे असे शब्द, मोठ्या क्षोभप्रसंगींहि सुजन बोलणार नाहीं खूप पिळला तरी ऊंस हा मधुर रसच देतो. पण नीच हा अनेक गुणांनीं मंडित असला तरी, भांडणांत सुद्धा बोलूं नये असे शब्द, सहज हंसतहंसत बोलेल

———

कृमिकुलचितं लालाक्लिन्नं विगन्धि जुगुप्सितं
निरुपमरसं प्रीत्या खादन्नरास्थि निरामिषम् ॥
सुरपतिमपि श्वा पार्श्वस्थं विलोक्य न शंकते
न हि गणयति क्षुद्रो जन्तुः परिग्रहफल्गुताम् ॥ ४४ ॥

आर्या

कृमिपूर्ण नि लाळेनें
भिजलेलें, घाण, अन् किळसवाणें ॥
मांसविहीन नरास्थिहि
मिटक्या मारीत फार प्रेमानें ॥
खातां, कुत्रा, जवळीं
इंद्र उभा! लाजतो न त्या बघुन ॥
क्षुद्र मिळकतींचीही
नीचांना क्षुद्रताचि कळते न ॥ ४४ ॥

गद्यार्थ—

किड्यांनीं बुजबुजलेलें, लाळेनें भिजलेलें, घाण मारणारें, किळसवाणें, मांसरहित असें माणसाचें हाड मिटक्या मारीत खाणारें कुत्रें,—जवळ इंद्र येऊन उभा राहून पहात असला, तरी यत्किंचितही लाजत नाहीं नीचाना क्षुद्र वस्तु लाभली तरी त्याची क्षुद्रतासुद्धां प्रतीत होत नाहीं ( ही सुंदर स्वभावोक्ति आहे )

———

उद्भासिताखिलखलस्य विशृंखलस्य
प्राग्जातविस्मृतनिजाधमकर्मवृत्तेः ॥
दैवादवाप्तविभवस्य गुणद्विषोऽस्य
नीचस्य गोचरगतैः सुखमाप्यते कैः ? ॥४५॥

वसंततिलका

दुष्टांसि तेज चढवी, नयबंधहीन
जो नीच पूर्वकृतपाप मुळीं स्मरे न ॥
दैवेंचि सुस्थित, गुणांप्रति ज्यास द्वेष
तो देइ काय सुख हो निजआश्रितांस? ॥४५॥

गद्यार्थ—

दुष्टाना सहाय्यक, नीतिबंधातीत, स्वकृत पापाची खंत न बाळगणाऱ्या, दैवानें वैभवास चढलेल्या, गुणांचा द्वेष करणाऱ्या, नीचाकडून, त्याच्या आश्रिताना काय सुख मिळणार ?

———

पिशुनत्वमेव विद्या परदूषणमेव भूषणं यस्य ॥
परदुःखमेव सौख्यं शिव शिव ते केन वेधसा सृष्टाः? ४६

आर्या

चुगलीच (पिशुनत्व) ज्यासि विद्या
परनिंदा हेंचि ज्यासि भूषणसें ॥
परदुःखें सुख ज्यातें
शिव शिव विधि कोण त्यासि निर्मितसे ? ॥४६॥

गद्यार्थ—

चुगली हीच ज्याची विद्या, परनिंदा हें भूषण, व ज्याला परदुःखानें सुख वाटतें, अशा नीचाला, कोण्या ब्रह्मदेवानें निर्मिलें ? शिव शिव ! !

———

वहति विषधरान्पटीरजन्मा
शिरसि मषीपटलं दधाति दीपः ॥
विधुरपि भजतेतरां कलङ्कं
पिशुनजनं खलु बिभ्रति क्षितींद्राः ॥ ४७ ॥

वैतालीय

विषधर किति चंदनासभोंतीं
धरिति दिवे, किति काजळीस माथीं ॥
किति मलिनपणा शशीमुखास
पिशुन किती असती नृपाश्रयास ॥ ४७ ॥

गद्यार्थ—

( दुष्टांचें सर्वत्र अस्तित्व आहे ) चंदन कितीतरी सर्पांना आश्रय देतो, दिवे आपल्या शिरावर काजळीचा भार वाहतात, चंद्र स्वखुशीं कलंक धारण करतो, राजांच्या आश्रयाला चुगलखोर असावयाचेच.

—०—

परवादे दशवदनः पररंध्रनिरीक्षणे सहस्राक्षः ॥
सद्वृत्तिवित्तहरणे बाहुसहस्रार्जुनः पिशुनः ॥ ४८ ॥

आर्या

निंदेला दशमुख, पर-
दोष पाहण्या सहस्रनेत्रचि तो ॥
सज्जनधन हरण्याला
सहस्रार्जुनापरी, पिशुन होतो ॥ ४८ ॥

गद्यार्थ—

नीच माणसाला, परनिंदा करताना दहा तोंडें, परदोष पाहण्यास सहस्र डोळे व सज्जनाचें धन हरताना सहस्रार्जुनाइतके हात असतात.

—०—

ददतु ददतु गालीर्गालिमन्तो भवन्तो
वयमपि तदभावाद्गालिदानेऽसमर्थाः ॥
जगति विदितमेतद्दीयते विद्यमानं
न हि शशकविषाणं कोऽपि कस्मै ददाति ॥ ४९ ॥

शार्दूलविक्रीडित

द्याहो द्याच शिव्या ; तुम्हाजवळ कीं
आहे तयांचा निधी !
मातें तो न, म्हणून मी परि शिव्या
देऊं शकेना कधीं ॥
कोणीही, जवळीं असेल अपुल्या,
देतो दुज्या त्यांतुनी
सांगा काय कधीं दुज्यांस दिधलीं
शिंगें सशाचीं कुणी ? ॥ ४९ ॥

गद्यार्थ—

हे निंदकांनो ! तुम्ही शिव्या देतच रहा ! कारण तुमच्याजवळ त्यांचा मोठा संग्रहच आहे ! माझ्याजवळ तो नाहीं म्हणून मी कांहीं शिव्या देऊं शकत नाहीं. कोणीहि झालें तरी आपल्याजवळ असेल त्यांतूनच देणार ! सशाचें शिंग कुणी कधीं दुसऱ्यास दिलेलें पाहिलें आहे काय ?

—०—

खलः सत्क्रियमाणोऽपि ददाति कलहं सताम् ॥
दुग्धपुष्टोऽपि किं याति वायसः कलहंसताम् ? ॥ ५० ॥

अनुष्टुभ्

भलें करूनिही दुष्ट सज्जनांशींहि भांडतो ॥
दुग्धेंहि पोषितां काक हंस होईल काय तो ? ॥ ५० ॥

गद्यार्थ—

भलें केलें तरी दुष्ट, सज्जनांची कुरापत काढतो कावळ्याला दूध पाजून वाढविलें तरी तो हंस थोडाच होणार ?

—०—

नौका दुर्जनजिव्हा च प्रतिकूलं विसर्पिणी ॥
परप्रतारणायैव दारुणा केन निर्मिता ? ॥ ५१ ॥

अनुष्टुभ्

नौका अन् जीभ दुष्टाची, प्रतिकूल विसर्पिणी ॥
परप्रतारणासाठीं दारुणा निर्मिली कुणी ? ॥ ५१ ॥

गद्यार्थ—

( यात प्रतिकूल, प्रतारण व दारुणा या शब्दांतील अर्थांना अशी आहे कीं, ती भाषांतरात आणणें अशक्य, यास्तव ते शब्द तसेच ठेवले आहेत ) (कूल=तीर ) प्रतिकूल विसर्पिणी= ( नौका ) या तीराहून त्या तीराला जाणारी. ( दुर्जन जिव्हा ) प्रतिकूल चालणारी. प्रतारण=(नौका) नीट तारून नेणें. ( दुर्जन जिव्हा ) फसवणूक. दारुणा ( नौका ) (तृतीया) लाकडापासून. (दुर्जन जिव्हा) दारुणा=भयंकर.—नाव व दुष्ट जिव्हा या दोन्ही प्रतिकूलविसर्पिणी, परप्रतारणासाठीं दारुणा कोणी निर्मिली ?

—०—

"दोषागमनमाशङ्क्य रविरेष तिरोहितः ॥"
"कथमिन्दुः समायाति ?" "कुतः शंका कलंकिनः ?" ५२

आर्या

"दोषागमना भिउनी क्षितिजाखालींच
सूर्य हा लपला"
"चंद्र कसा उगवे मग ?"
"भय हो कसलें कलंकयुक्ताला ?" ॥ ५२ ॥

# प्रकरण ६ वें

## धी, बुद्धि, प्रज्ञा, प्रज्ञाहत, अज्ञ, विद्या, ज्ञान, शिक्षण, गुरु, विद्यार्थी, शिष्य

उदीरितोऽर्थः पशुनाऽपि गृह्यते
हयाश्च नागाश्च वहन्ति नोदिताः ॥
अनुक्तमप्यूहति पण्डितो जनः
परेङ्गितज्ञानफला हि बुद्धयः ॥ १ ॥

इन्द्रवंशा

उच्चारला अर्थ पशूहि जाणती
कीं प्रेरितां भार गजाश्व वाहती ॥
जाणी, न जें उक्तहि सुज्ञ तें परी
हेरी दुजांचें मन बुद्धि ती खरी ॥ १ ॥

गद्यार्थ—

बोलून दाखविल्याचा अर्थ, पशूही ग्रहण करतात हाकलले म्हणजे, घोडे, हत्ती, भार वाहतात पण सुज्ञ हा, न बोललेलेंही ओळखतो दुसऱ्याच्या मनातलें हेरणें, हेंच तर खऱ्या बुद्धीचें फळ आहे

आत्मबुद्धिः सुखायैव गुरुबुद्धिर्विशेषतः ॥
परबुद्धिर्विनाशाय स्त्रीबुद्धिः प्रलयावहा ॥ २ ॥

अनुष्टुभ्

सुख लाभे स्वबुद्धीनें त्याहून गुरुबुद्धिनें ॥
परबुद्धि विनाशातें स्त्रीबुद्धि प्रलयास ने ॥ २ ॥

गद्यार्थ—

स्वतःच्या बुद्धीनें चालणें हें सुखावह, वडीलधाऱ्याच्या बुद्धीनें चालणें विशेषच सुखाचें, लोकांच्या ओंजळीनें पाणी पिणें हे नाशकारक, बायकांच्या बुद्धीनें चालणें म्हणजे प्रलयच।

शार्दूलविक्रीडित

मोठाही गज अंकुशें वश; तरी
तो कां गजाएवढा?
नाशी घोर तमास दीप, परि कां
तो त्या तमाएवढा? ॥
वज्रानें गिरि कोसळे तरि कुठें
त्याएवढें वज्र तें?
मोठी बुद्धि जयासि तोचि बलवान्;
स्थूलत्व काशास तें? ॥ ३ ॥

गद्यार्थ—

एवढा मोठा हत्ती, पण, तो एवढ्याशा अंकुशानें शरण आणतां येतो–तो अंकुश हत्तीएवढा थोडाच आहे? दिवा अंधाराचा नाश करतो–पण दिवा अंधाराएवढा विस्तीर्ण थोडाच आहे? वज्र हें, महापर्वताला लोळवितें, म्हणून काय तें वज्र, पर्वताएवढें थोडेंच आहे? ज्याची बुद्धी मोठी तोच बलवान, नुसत्या मोठ्या आकाराला काय चाटायचें आहे?

यो न संचरते देशान् यो न सेवेत पण्डितान् ॥
तस्य संकुचिता बुद्धिर्घृतबिन्दुरिवाम्भसि ॥ ४ ॥

अनुष्टुभ्

नानादेश फिरे जो न, न सेवी पंडितां तसें ॥
त्याची आक्रसते बुद्धि घृतबिंदु जळीं जसे ॥ ४ ॥

गद्यार्थ—

जो नाना देशांत फिरत नाहीं, पंडितांची सेवाही करीत नाहीं, त्याची बुद्धी, (थंड) पाण्यावर सोडलेल्या तुपाच्या

शार्दूलविक्रीडित

सर्पाच्या मुखिं हात, कोपित अशा
  द्यावा तरी तें बरें
प्राशोनी विष, झोंपणें यमगृहीं,
  तेंही सुखाचें ठरे ॥
शैलाग्राहुनि फेकुनी निजतनू
  विच्छिन्न होणें बरें
दुष्प्राप्त धनें, नको मिरविणें
  सौख्यांत लोकांत रे ॥ ५७ ॥

गद्यार्थ—

क्रोधानें खवळलेल्या सर्पाच्या तोंडांत हात देणें बरें; विष पिऊन खुशाल यमगृहीं झोपावें तेंहि बरें; डोंगराच्या कड्यावरून लोटून घेऊन स्वदेह छिन्नभिन्न होणेंही बरें; पण दुष्टांच्या कडून प्राप्त झालेल्या धनानें स्वतःला सुखी करणें हें बरें नव्हे.

---

दूरादुच्छ्रितपाणिरार्द्रनयनः प्रोत्सारितार्धासनो
गाढालिङ्गनतत्परः प्रियकथाप्रश्नेषु दत्तादरः ॥
अन्तर्भूतविषो बहिर्मधुमयश्चातीव मायापटुः
को नामायमपूर्वनाटकविधिर्यः शिक्षितो दुर्जनैः ? ॥

शार्दूलविक्रीडित

नेत्रीं अश्रु; दुरुन हात उभवी,
  सोडून अर्धासन
आलिंगी दृढ, आदर प्रियकथा-
  प्रश्नामधें दावुन ॥
बाहेरी मधु आंतुनी विष, अती
  मायापटू दुर्जन
घेई नाट्य असें अपूर्व न कळे
  कोठूनि अभ्यासुन ? ॥ ५८ ॥

गद्यार्थ—

(कोणी भेटावयास गेलें की) दुरूनच हात उभारून डोळ्यांत (आनंदाश्रू) पाणी आणून, बैठकीवरून अर्धे उठून दुर्जन हा त्याला (प्रथम) गाढ मिठी मारील, त्याच्या प्रियजनकथामध्यें आस्था दाखवील, आंतून विषपूर्ण असून बाहेरून मायावीपणें मधासारखें गोड बोलेल। हें असलें अपूर्व नाट्य दुर्जन कुठून शिकतात कोण जाणे!



गद्यार्थ—

दोषागमन यांत कोटी दोषा=रात्र." दोषागमनाला (रात्रीच्या आगमनाला किंवा दोष लागेल म्हणून) भिऊन सूर्य क्षितिजा खालीं लपला." "मग चंद्र कसाहो उगवतो?" (याला नाहीं वाटतें दोषागमनाचें भय?) "त्याला कसलें हो भय? तो मूळचाच कलंकयुक्त आहे." (नंगेसे खुदा डरता है!)

---

तक्षकस्य विषं दन्ते मक्षिकाया विषं शिरः ॥
वृश्चिकस्य विषं पुच्छं सर्वाङ्गं दुर्जनो विषम् ॥ ५३ ॥

अनुष्टुभ्

**तक्षका विष दांतांत माशीचें मस्तकीं विष ॥**
**विंचवा विष नांगींत सर्वांगीं खल हा विष ॥ ५३ ॥**

गद्यार्थ—

तक्षकसर्पाचें विष दातात, माशीचें तिच्या मस्तकात, विंचवाचें त्याच्या नांगीत (तो तो अवयव सोडला तर बाकी हे काहीं विषारी नाहींत) पण दुष्ट माणूस सर्वांगीं विषमय आहे

---

मनस्यन्यद्वचस्यन्यत् कार्ये चान्यद्दुरात्मनाम् ॥
मनस्येकं वचस्येकं कार्ये चैकं महात्मनाम् ॥ ५४ ॥

आर्या

**हृदयीं अन्यचि, वचनीं**
**अन्यचि, कार्यींहि अन्य दुष्टांचें ॥**
**हृदयीं एकचि, वचनीं**
**एकचि, कार्यींहि एक थोरांचें ॥ ५४ ॥**

गद्यार्थ—

मनांत निराळेंच, बोलण्यात त्याहून निराळें, व प्रत्यक्ष कृतींत तिसरेंच हा दुष्टांचा स्वभाव; जें मनांत, तेंच बोलण्यात, व तेंच कृतींत,—हा थोराचा स्वभाव!!

---

स्वभावकठिनस्यास्य कृत्रिमां बिभ्रतो नतिम् ॥
गुणोऽपि परहिंसायै चापस्य च खलस्य च ॥ ५५ ॥

आर्या

**कठिण स्वभाव असतां**
**नमती दोघे परंतु तें खोटें ॥**
**दुष्ट नि धनुष्य यांचा**
**गुणही केवल दुज्यांस वधण्यातें ॥ ५५ ॥**

गद्यार्थ—

दुष्ट व धनुष्य दोघे मूळचे कठीण. (दुष्टाचें मन कठोर, धनुष्याचा बाबू टणक) पण दोघेही कृत्रिमपणानें वांकतात (दुष्ट खोटा नम्र होतो, धनुष्याचा बाबू तात्पुरता बाण मारण्या-पुरता वांकतो,) पण खरें म्हणजे दोघाचाहि गुण (धनुष्याची दोरी) केवळ दुसऱ्याचे प्राण घेण्याच्याच कामीं लागतो!

---

कोऽर्थान्प्राप्य न गर्वितो, ? विषयिणः
कस्यापदोऽस्तं गताः ?
स्त्रीभिः कस्य न खण्डितं भुवि मनः ?
को नाम राज्ञां प्रियः ? ॥
कः कालस्य न गोचरान्तरगतः ?
कोऽर्थी गतो गौरवं ?
को वा दुर्जनवागुरासु पतितः
क्षेमेण यातः पुमान् ? ॥ ५६ ॥

शार्दूलविक्रीडित

**वित्तें गर्व कुणा न ? कोण विषयी,**
**आपत्ति ज्या सोडिती ?**
**स्त्रीनें भग्न हृदीं न कोण ? रुचतो**
**कां कोण राजांप्रती ? ॥**
**दैवाधीन न कोण ? गौरव कुणा**
**भिक्षेसही मागुनी ?**
**वाग्जालीं कुजनांचिया अडकतां,**
**सौख्यें सुटे कां कुणी ? ॥ ५६ ॥**

गद्यार्थ—

संपत्ति मिळून गर्वित कोण होत नाहीं? असा कोण विषयी आहे की ज्याच्या आपत्ति संपल्या आहेत? स्त्रीनें कोणाच्या हृदयाला भग्न केलें नाहीं? राजाला आवडणारा कोण आहे? कालाच्या तावडीत नाहीं असा कोण? भीक मागून गौरवास्पद ठरलेला कोण? दुर्जनांच्या वाग्जाळात गुरफटूनही सुखरूपपणें सुटला असा कोण आहे?

---

वरमहिमुखे क्रोधाध्माते करो विनिवेशितो
विषमपि वरं पीत्वा सुप्तं कृतान्तनिवेशने ॥
गिरिवरतटान्मुक्तश्चात्मा वरं शतधा कृतो
न तु खलजनावाप्तैरर्थैः कृतं हितमात्मनः ॥ ५७ ॥

शार्दूलविक्रीडित

सर्पाच्या मुखिं हात, कोपित अशा
 धावा तरी तें वरें
प्राशोनी विष, झोंपणें यमगृहीं,
 तेंही सुखाचें ठरे ॥
शैलाग्राहुनि फेकुनी निजतनू
 विच्छिन्न होणें वरें
दुष्टप्राप्त धनें, नको मिरविणें
 सौख्यांत लोकांत रे ॥ ५७ ॥

गद्यार्थ—

क्रोधानें खवळलेल्या सर्पाच्या तोंडांत हात देणें वरें; विष पिऊन खुशाल यमगृहीं झोपावें तेंहि वरें; डोंगराच्या कड्यावरून लोटून घेऊन स्वदेह छिन्नभिन्न होणेंही वरें; पण दुष्टांच्या कडून प्राप्त झालेल्या धनानें स्वतःला सुखी करणें हें वरें नव्हे.

———०———

दूरादुच्छ्रितपाणिरार्द्रनयनः प्रोत्सारितार्धासनो
गाढालिङ्गनतत्परः प्रियकथाप्रश्नेषु दत्तादरः ॥
अन्तर्भूतविषो बहिर्मधुमयश्चातीव मायापटुः
को नामायमपूर्वनाटकविधिर्यः शिक्षितो दुर्जनैः ? ॥

शार्दूलविक्रीडित

नेत्रीं अश्रु ; दुरून हात उभवी,
 सोडून अर्धासन
आलिंगी दृढ, आदर प्रियकथा-
 प्रश्नामधें दावुन ॥
बाहेरी मधु आंतुनी विष, अती
 मायापटू दुर्जन
घेई नाट्य असें अपूर्व न कळे
 कोठूनि अभ्यासुन ? ॥ ५८ ॥

गद्यार्थ—

( कोणी भेटावयास गेलें की ) दुरूनच हात उभवून डोळ्यांत ( आनंदाश्रू ) पाणी आणून, बैठकीवरून अर्धे उठून दुर्जन हा त्याला ( प्रथम ) गाढ मिठी मारील; त्याच्या प्रियजनकथांमध्यें आस्था दाखवील; आंतून विषपूर्ण असून बाहेरून मायावीपणें मधासारखें गोड बोलेल ! हें असलें अपूर्व नाट्य दुर्जन कुठून शिकतात कोण जाणे !



# प्रकरण ६ वें

धी, बुद्धि, प्रज्ञा, प्रज्ञाहत, अज्ञ, विद्या, ज्ञान, शिक्षण, गुरु, विद्यार्थी, शिष्य

उदीरितोऽर्थः पशुनाऽपि गृह्यते
हयाश्च नागाश्च वहन्ति नोदिताः ॥
अनुक्तमप्यूहति पण्डितो जनः
परेङ्गितज्ञानफला हि बुद्धयः ॥ १ ॥

इंद्रवंशा

उच्चारला अर्थ पशूहि जाणती
की प्रेरितां भार गजाश्व वाहती ॥
जाणी, न जें उक्तहि सुज्ञ तें परी
हेरी दुजांचे मन बुद्धि ती खरी ॥ १ ॥

गद्यार्थ—

बोलून दाखविल्याचा अर्थ, पशूही ग्रहण करतात हाकलले म्हणजे, घोडे, हत्ती, भार वाहतात पण सुज्ञ हा, न बोललेलेंही ओळखतो दुसऱ्याच्या मनातलें हेरणें, हेंच तर खऱ्या बुद्धीचें फळ आहे

—०—

आत्मबुद्धिः सुखायैव गुरुबुद्धिर्विशेषतः ॥
परबुद्धिर्विनाशाय स्त्रीबुद्धिः प्रलयावहा ॥ २ ॥

अनुष्टुभ्

सुख लाभे स्वबुद्धीने त्याहून गुरुबुद्धिनें ॥
परबुद्धि विनाशातें स्त्रीबुद्धि प्रलयास ने ॥ २ ॥

गद्यार्थ—

स्वतःच्या बुद्धीनें चालणें हें सुखावह, वडीलधाऱ्याच्या बुद्धीनें चालणें विशेषत सुखाचें लोकांच्या ओंजळीनें पाणी पिणें हें नाशकारक बायकांच्या बुद्धीनें चालणें म्हणजे प्रलयच !

—०—

हस्ती स्थूलतरः स चाङ्कुशवशः किं हस्तितुल्योऽङ्कुशः ?
दीपे प्रज्वलिते विनश्यति तमः किं दीपतुल्यं तमः ? ॥
वज्रेणाभिहताः पतन्ति गिरयः किं वज्रतुल्यो गिरिः ?
बुद्धिर्यस्य गरीयसी स बलवान् स्थूलेषु कः प्रत्ययः ? ॥ ३ ॥

शार्दूलविक्रीडित

मोठाही गज अंकुशे वश, तरी
तो का गजाएवढा ?
नाशी घोर तमास दीप, परि कां
तो त्या तमाएवढा ? ॥
वज्रानें गिरि कोसळे तरि कुठें
त्याएवढे वज्र ते ?
मोठी बुद्धि जयासि तोचि बलवान्,
स्थूलत्व काशास ते ? ॥ ३ ॥

गद्यार्थ—

एवढा मोठा हत्ती, पण, तो एवढ्याशा अंकुशाने शरण आणतां येतो–तो अंकुश हत्तीएवढा थोडाच आहे ? दिवा अंधाराचा नाश करतो–पण दिवा अंधाराएवढा विस्तीर्ण थोडाच आहे ? वज्र हें, महापर्वताला लोळविते, म्हणून काय तें वज्र, पर्वताएवढें थोडेंच आहे ? ज्याची बुद्धी मोठी तोच बलवान, नुसत्या मोठ्या आकाराला काय चाटायचें आहे ?

—०—

यो न सचरते देशान् यो न सेवेत पण्डितान् ॥
तस्य सकुचिता बुद्धिर्घृतबिन्दुरिवाम्भसि ॥ ४ ॥

अनुष्टुभ्

नानादेश फिरे जो न, न सेवी पंडितां तसें ॥
त्याची आक्रसते बुद्धि घृतबिंदु जळीं जसे ॥ ४ ॥

गद्यार्थ—

जो नाना देशात फिरत नाहीं, पंडिताची सेवाही करीत नाहीं, त्याची बुद्धी, (थंड) पाण्यावर सोडलेल्या तुपाच्या थेंबासारखी आक्रसून जाते

—०—

यस्य नास्ति स्वयं प्रज्ञा शास्त्रं तस्य करोति किम् ? ॥
लोचनाभ्यां विहीनस्य दर्पणः किं करिष्यति ? ॥ ५ ॥

अनुष्टुभ्

स्वतांचीच न ज्या बुद्धि शास्त्र काय तियें रडे ? ॥
दाविती आंधळ्यालागीं आरसे काय बापुडे ? ॥ ५ ॥

गद्यार्थ—

ज्याला स्वतःचीच बुद्धी नाहीं त्याला शास्त्र पढून काय होणार ! आरसे झाले म्हणून ते आंधळ्याला काय दाखविणार ?

———०———

शस्त्रैर्हतास्तु रिपवो न हता भवन्ति
प्रज्ञाहताश्च नितरां सुहता भवन्ति ॥
शस्त्रं निहन्ति पुरुषस्य शरीरमेकं
प्रज्ञा कुलं च विभवं च यशश्च हन्ति ॥ ६ ॥

वसंततिलका

शस्त्रांमुळें न मरतोच खरा रिपू तो
बुद्धी ( प्रज्ञा ) मरे, तरचि तो मृत पूर्ण होतो ॥
तें शस्त्र मानवशरीरचि एक मारी
प्रज्ञा कुलास, विभवास यशास हारी ॥ ६ ॥

गद्यार्थ—

शस्त्रांनीं मारून शत्रु खरा मेला असें होत नाहीं. त्याची बुद्धी मारली म्हणजेच तो संपूर्ण मरतो शस्त्र हें केवळ *माणसाच्या देहाचाच नाश करतें पण प्रज्ञा ( म्हणजे हतप्रज्ञता )* ही माणसाचें कुल, वैभव आणि कीर्ति या सर्वांचाच नाश करते.

———०———

यः पठति लिखति पश्यति
परिपृच्छति पण्डितानुपासयति ॥
तस्य दिवाकरकिरणै-
र्नलिनीदलमिव विकास्यते बुद्धिः ॥ ७ ॥

आर्या

पठती, लिहिती, बघती,
विचारिती, बुध उपासना करिती ॥
रविकिरणांनीं कमलें-
बुद्धि विकासे तशीच त्यांची ती ॥ ७ ॥

गद्यार्थ—

जे *पठण करतात, लेखन करतात, निरीक्षण करतात* व विद्वानांची सेवा करतात, त्यांची बुद्धी, सूर्य किरणांनीं कमलाच्या पाकळ्या उमलाव्या तशी उमलते.

———०———

इंद्रियाणां हि चरतां यन्मनोऽनुविधीयते ॥
तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवाम्भसि ॥ ८ ॥

अनुष्टुभ्

भ्रमत्या इंद्रियांमागें मन धांवेल जें दुरी ॥
तें बुद्धि भ्रमवी जैसा वायु नौकेस सागरीं ॥ ८ ॥

गद्यार्थ—

भरकटत जाणाऱ्या विषयांच्या मागें जें मन धावूं लागतें, तें, वारा जसा नौकेला समुद्रावर भरकटवतो, तसें, माणसाच्या बुद्धीला भ्रमवितें.

———०———

धीस्सम्यग्योजिता पारमसम्यग्योजिताऽऽपदम् ॥
नरं नयति संसारे भ्रमन्ती नौरिवार्णवे ॥ ९ ॥

अनुष्टुभ्

नौ समुद्रीं भ्रमे तैशी संसाराब्धींत मानवा ॥
पार नेई सुयुक्ता धी कुयुक्ता संकटांत वा ॥ ९ ॥

गद्यार्थ—

समुद्रावर चालणाऱ्या नावेप्रमाणें, बुद्धी ही जर नीट योजिली तर संसारसागराच्या पार नेईल—अयोग्य योजिली तर संकटांत ( भोवऱ्यात ) घेऊन जाईल.

———०———

भूतानि सन्ति सकलानि बहूनि दिक्षु
बोधान्वितानि विरलानि भवन्ति किन्तु ॥
वृक्षा भवन्ति फलपल्लवजालयुक्ताः
कल्पद्रुमास्तु विरलाः खलु सम्भवन्ति ॥ १० ॥

वसंततिलका

प्राणी अनेक असती सगळ्या दिशांत
त्यांच्यामधें क्वचितची कुणि बुद्धिमंत ॥
झाडें कितीक फलपल्लवपुष्पयुक्त
होती; परी विरल कल्पतरू तयांत ॥ १० ॥

गद्यार्थ—

दशदिशात अनेकानेक प्राणी असले तरी बुद्धिमान एखादाच ! फळाफुलांनीं डवरलेल्या वृक्षांना काय तोटा ? पण त्यांत कल्पवृक्ष विरळाच

———०———

पुस्तकस्था तु या विद्या परहस्तगतं धनम् ॥
कार्यकाले समुत्पन्ने न सा विद्या, न तद्धनम् ॥ ११ ॥

अनुष्टुभ्

पुस्तकातचि जी विद्या दुज्या हातींच जे धन ॥
योग्य वेळीं न ये कामा तशी विद्या तसें धन ॥११॥

गद्यार्थ—

जी विद्या, केवळ पुस्तकातच राहिली, किंवा धन जें दुसऱ्याच्या हातींच राहिलें, ती विद्या किंवा ते धन कामाच्या ऐन वेळीं उपयोगी पडणारीं नव्हेत

———o———

येषां न विद्या, न तपो न दानं,
ज्ञानं न शीलं, न गुणो न धर्मः ॥
ते मृत्युलोके भुवि भारभूता
मनुष्यरूपेण मृगाश्चरन्ति ॥ १२ ॥

उपजाति

ज्याते न विद्या, तप, शील, दान
न ज्ञान वा सद्गुण, धर्मही न ॥
तो मृत्युलोका अतिभार होतो
मनुष्यरूपांत फिरे पशू तो ॥ १२ ॥

गद्यार्थ—

ज्या माणसापाशीं विद्या, तप, दातृत्व, ज्ञान, शील, सद्गुण, किंवा धर्माचरण, यांपैकीं, एकही वस्तु नाहीं, तो मनुष्य कसला? केवळ पृथ्वीला भार! मनुष्याच्या रूपात तो पशुच फिरतो

———o———

हर्तुर्याति न गोचरं किमपि शं पुष्णाति यत्सर्वदा
ह्यर्थिभ्यः प्रतिपाद्यमानमनिशं प्राप्नोति वृद्धिं पराम् ॥
कल्पान्तेष्वपि न प्रयाति निधनं, विद्याख्यमन्तर्धनं
येषां, तान्प्रति मानमुज्झत नृपाः कस्तैः सह स्पर्धते? १३

शार्दूलविक्रीडित

चोराला न मिळे, अवर्ण्य असलें जे सौख्य देई सदा
मागे त्यास सदैव देत असुनी वाढेच जें सर्वदा ॥
कल्पान्तींहि मरे न; गुप्त धन हें विद्याख्य ज्यां लाभलें
राजा त्यांप्रति सोड गर्व! कुणि का त्यासीं कधीं स्पर्धलें

गद्यार्थ—

जें चोराच्या हातीं लागत नाहीं, जें माणसाला सदा अवर्णनीय सुख देतें,—याचकाला नित्य देत राहूनही, ज्याची नेहमीं वाढ होते, कल्पांतीं सुद्धां, जें मरणारें नव्हे, असें विद्या नावाचें गुप्त धन ज्यांना लाभलें, त्या बुधजनांशीं, हे राजांनो! गर्विष्ठ वृत्ति धरू नका! त्याच्याशीं कोणीच स्पर्धा करू शकत नाहींत (ते तुम्ही काय करणार?)

———o———

विद्या नाम नरस्य रूपमधिकं, प्रच्छन्नगुप्तं धनं
विद्या भोगकरी, यशःसुखकरी, विद्या गुरूणां गुरुः ॥
विद्या बन्धुजनो विदेशगमने, विद्या महादेवता
विद्या राजसु पूजिता, न तु धनं, विद्याविहीनः पशुः १४

शार्दूलविक्रीडित

विद्या हें सुविशेष रूपचि नरा,
वा गुप्त ऐसें धन
देई भोग, सुखें, सुकीर्ति,
गुरु ही साऱ्या गुरूच्याहुन ॥
विद्या दैवत थोर, बंधुसम ही
जातां विदेशीं जना
विद्या पूज्य नृपां, न हो धन, पशू
कोणीहि विद्येविना ॥ १४ ॥

गद्यार्थ—

विद्या ही माणसाला रूपाहून विशेष गुप्त धन, नाना भोग, कीर्ति व सुखें देणारी, गुरूची गुरु; परदेशीं जाणाऱ्याला भावासारखी, महादैवतासमान अशी असते (सुज्ञ) राजांना, विद्याच पूज्य वाटते, धन नव्हे, विद्याविहीन जो कोणी असेल तो पशूच

———o———

शुनः पुच्छमिव व्यर्थं जीवितं विद्यया विना ॥
न गुह्यगोपने शक्तं न च दंशनिवारणे ॥ १५ ॥

अनुष्टुभ्

श्वानपुच्छापरी व्यर्थ विद्येवाचुनि जीवित ॥
न गुह्य झांकण्या शक्त, न माशाहि निवारित ॥ १५॥

गद्यार्थ—

कुत्र्याची शेपटी, जसें त्याचें गुह्यही झांकू शकत नाहीं, किंवा, माशाही वारीत नाहीं, तसेंच, मनुष्याचें विद्याहीन

जीवन, त्याचें वैगुण्यही झांकूं शकत नाहीं, किंवा, येणारे आघात निवारूं शकत नाहीं.

---

सुखार्थी वा त्यजेद्विद्यां विद्यार्थी वा त्यजेत्सुखम् ॥
सुखार्थिनः कुतो विद्या कुतो विद्यार्थिनः सुखम् ?॥१६॥

अनुष्टुभ्

सुखार्थ सोडणें विद्या,
विद्यार्थ सुखही भलें ॥
सुखार्थ्या कोठली विद्या
विद्यार्थ्या सुख कोठलें ? ॥ १६ ॥

गद्यार्थ—

सुखाची इच्छा असेल त्यानें, विद्या तरी सोडली पाहिजे, किंवा, विद्या हवी असेल, त्यानें, सुख तरी सोडलें पाहिजे. सुखमार्गी लागणाराला विद्या कोठली ? आणि विद्यार्थ्याला सुख कोठलें ?

---

ये बालभावान्न पठन्ति विद्यां
ये यौवनस्था अधना अदाराः ॥
ते शोचनीया इह जीवलोके
मनुष्यरूपेण मृगाश्चरन्ति ॥ १७ ॥

उपजाति

बाल्यांत विद्या शिकुनी न घेत
न ज्यांस पत्नी, धन यौवनांत ॥
जगांत त्यांची स्थिति शोच्य होते
मनुष्यरूपें फिरती पशू ते ॥ १७ ॥

गद्यार्थ—

बाळपणीं, जे विद्या शिकत नाहींत, तारुण्यांत ज्यांना पत्नी व संपत्ति मिळत नाहीं; त्यांची स्थिति इहलोकीं अत्यंत शोचनीय असते. मनुष्यदेहांत ते पशूच फिरत असतात.

---

अक्षराणि परीक्ष्यन्तामम्बराडम्बरेण किम् ? ॥
शम्भुरम्बरहीनोऽपि सर्वज्ञः किं न जायते ? ॥ १८ ॥

अनुष्टुभ्

विद्या परीक्षिणें, मोठ्या वस्त्रांचें फल काय तें ? ॥
सर्वज्ञता, अवस्त्रत्वें शिवाची काय लोपते ? ॥ १८ ॥

गद्यार्थ—

माणसाची विद्या बघावी. भपकेदार वस्त्रांनीं काय होणार आहे ? शंकराला वस्त्रच नाहीं म्हणून काय त्याची सर्वज्ञता लोपली ?

---

अनेकसंशयोच्छेदि परोक्षार्थस्य दर्शकम् ॥
सर्वस्य लोचनं शास्त्रं यस्य नास्त्यन्ध एव सः ॥ १९ ॥

वसंततिलका

नाशी अनेकविध जें निजसंशयांतें
जें दृष्टिआड विषयांसहि दाखवीतें ॥
जें शास्त्र नेत्रचि जणूं सगळ्या जनांचे
तेंही न जे शिकति ते जगिं अंध साचे ॥ १९ ॥

गद्यार्थ—

मानवाच्या मनांतले नाना तऱ्हेचे संशय जें फेडतें; जें दृष्टिआड असलेली सृष्टि माणसाला दाखवतें, सर्व जनांचे जणुं डोळेच असें शास्त्र जे शिकत नाहींत ते खरोखर आंधळेच म्हटले पाहिजेत.

---

शास्त्रोपस्कृतशब्दसुंदरगिरः शिष्यप्रदेयागमा
विख्याताः कवयो वसन्ति विषये यस्य प्रभोर्निर्धनाः ॥
तज्जाड्यं वसुधाधिपस्य; कवयो ह्यर्थं विनापीश्वराः
कुत्स्याः स्युः कुपरीक्षका हि मणयो यैर्घतः पातिताः २०

शार्दूलविक्रीडित

वाणी शास्त्रसुसंस्कृता, वितरण्या-
जोगी सुविद्या जयां
त्याही ख्यात बुधां मिळे न धन ज्या
राज्यांत राजाचिया ॥
राजा तो जडबुद्धि; थोरचि घना-
वांचूनही पंडित
तोची गाजरपारखी उतरवी
जो रत्नमूल्याप्रत ॥ २० ॥

गद्यार्थ—

शास्त्राध्ययनानें सुसंस्कृत अशी सुंदर वाणी, व शिष्यांना देण्याजोगी सुविद्या ज्यांच्यापाशीं, अशा प्रख्यात पंडितांना ज्याच्या राज्यांत ( आश्रय न मिळाल्यानें ) दारिद्र्यांत दिवस काढावे लागतात तो राजा मंदमतीच म्हटला पाहिजे. पंडित

हे, धन न मिळालें, तरी, ( शब्दसृष्टीचे ) ईश्वर आहेत, तसेच राहणार, मान, जो रत्नांची किमत कमी करूं पाहतो, तो *गाजरपारखी ठरतो*

---

अर्थानामीशिषे त्वं
वयमपि च गिरामीश्महे यावदर्थं
शूरस्त्वं, वादिदर्प-
ज्वरशमनविधावक्षयं पाटवं नः ॥
सेवन्ते त्वां धनान्धा,
मतिमलहृतये मामपि श्रोतुकामा
मामप्यास्था न सा चेत्
त्वयि मम सुतरामेव राजन् गतोऽस्मि ॥२१॥

स्रग्धरा

अर्थांचा ईश तूं, मी
वचनिं वसति जे अर्थ त्यांचाच ईश
मोठा तू शूर ! वादीं
श्रुतिमद हरुनी जिंकितों मी बुधांस ॥
तूतें वित्तांध सेवी;
स्वमतिमल धुण्या सेविती शिष्य मातें
जातों मी; तूस आस्था
जर नच मजसी, ती मलाही न तूतें ॥२१॥

गद्यार्थ—

( राजानें अवमान केल्यानें निःस्पृह पंडित त्याची कानउघडाणी करतो )-राजा! तू अर्थांचा ( संपत्तीचा ) ईश असशील तर मी सुद्धा शब्दांच्या अर्थांचा ईशच आहें. तू मोठा शूर असशील-तर मीही वादामध्यें मोठ्यामोठ्या गर्विष्ठ पंडितांचा गर्व हरण करून त्यांना जिंकण्यांत पटु आहें. धनान्ध लोक तुला सेवतात-तर मनोमालिन्य धुण्यासाठीं माझा बोध ऐकणारे अनेक ( शिष्य ) मला सेवतात. तेव्हा ( कोणत्याही दृष्टीनें मी तुझ्या तोलाचाच असूनही ) जर तुला माझ्याबद्दल आस्था नसेल-तर मला ती तुझ्याविषयीं त्याहूनही नाहीं. हा मी चाललों !

---

माता शत्रुः पिता वैरी, येन बालो न पाठितः ॥
न शोभते सभामध्ये हंसमध्ये बको यथा ॥ २२ ॥

अनुष्टुभ्

आई शत्रु, पिता वैरी शिकवी न मुलास तो ॥
हंसांत बगळा, तैसा तो सभेंत न शोभतो ॥ २२ ॥

गद्यार्थ—

मुलास न शिकविणारी आई त्याची शत्रु व पिता त्याचा वैरीच समजावा. हंससमुदायात जसा बगळा तसा विद्वत्सभेंत तो मुलगा शोभत नाहीं.

---

गुरवः सन्ति बहवः शिष्यवित्तापहारकाः ॥
दुर्लभः स गुरुर्लोके शिष्यचित्तापहारकः ॥ २३ ॥

अनुष्टुभ्

बहु आहेत गुरु जे हरिती शिष्यवित्त ते ॥
गुरु दुर्मिळ तो लोकीं जो चोरी शिष्यचित्त तें ॥ २३॥

गद्यार्थ—

शिष्याचे वित्त अपहरण करणारे गुरु पुष्कळच; पण शिष्याचे चित्त हरण करणारा गुरु दुर्मिळ.

---

गीर्भिर्गुरूणां परुषाक्षराभि-
स्तिरस्कृता यान्ति नरा महत्वम् ॥
अलब्धशाणोत्कषणा नृपाणां
न जातु मौलौ मणयो वसन्ति ॥ २४ ॥

उपजाति

ताडी गुरू ज्यांस कठोर शब्दें
अशा मनुष्यांस महत्त्व येतें ॥
न घाशिलें शाणिं, अशा सुरत्नां
जागा नृपांच्या मुकुटीं मिळेना ॥ २४ ॥

गद्यार्थ—

(शिकविताना) गुरुनें ज्यांना कठोर शब्दानीं वाक्ताडन केलें अशीं माणसें पुढें महत्वाला चढतात. सहाणेवर घासलें नाहीं अशा रत्नांना राजाच्या शिरावर स्थान मिळत नाहीं.

---

अज्ञः सुखमाराध्यः सुखतरमाराध्यते विशेषज्ञः ॥
ज्ञानलवदुर्विदग्धं ब्रह्मापि च तं नरं न रञ्जयति ॥२५॥

आर्या

अज्ञाला तोषविणें
सोपें, त्याहूनि जाणत्याला तें ॥
फुगला ज्ञानलवें जो
विधिही शकतो न तोषवूं त्यातें ॥ २५ ॥

गद्यार्थ—

अज्ञानाची समजूत घालणें सोपें–जाणत्याची घालणें त्याहून सोपें. पण ( अर्धवट ) थोड्याशा ज्ञानानें जो गर्विष्ठ झाला त्याची समजूत ब्रह्मदेवही घालूं शकत नाहीं.

———o———

वितरति गुरुः प्राज्ञे विद्यां यथैव तथा जडे
न तु खलु तयोर्ज्ञाने शक्तिं करोत्यपहन्ति वा ॥
भवति च पुनर्भूयान् भेदः फलं प्रति तद्यथा
प्रभवति शुचिर्बिम्बोद्ग्राहे मणिर्न मृदां चयः ॥ २६ ॥

हरिणी

गुरु शिकवितो विद्या सुज्ञा, तशीच जडाप्रत
ग्रहणिं परि तो त्यांना शक्ती, न देत, न नाशित ॥
परि फल किती येई त्यांना विभिन्नचि रीतिचें
विमल मणि घे वस्तुच्छाया, न ढेकुळ मातिचें ॥२६॥

गद्यार्थ—

जशी हुषार विद्यार्थ्याला, तशी बत्थड मुलालाही, गुरु, आपली विद्या (सारखीच) शिकवतो; पण, तो, त्याच्या ज्ञानग्रहणाची शक्ति, कमी, किंवा, अधिक, करूं शकत नाहीं, यामुळें शेवटीं या विद्यादानाचें फळ, अगदीं भिन्न भिन्न दिसून येतें तें असें–शुद्ध निर्मळ रत्नांत मात्र प्रतिबिंब दिसतें–मातीच्या ढेकळांत मुळींच नाहीं.

———o———

यदा किंचिज्ज्ञोऽहं द्विप इव मदान्धः समभवं
तदा सर्वज्ञोऽस्मीत्यभवदवलिप्तं मम मनः ॥
यदा किंचित्किंचित् बुधजनसकाशादवगतं
तदा मूर्खोऽस्मीति ज्वर इव मदो मे व्यपगतः ॥२७॥

शिखरिणी

शिकें मी थोडें तें गजसम मदें अंध बनुनी
'असें मी सर्वज्ञ' द्रुत भरत हा गर्वहि मनीं ॥
जधीं थोडें थोडें मज बुधजनीं ज्ञान दिधलें—
स्वमूर्खत्याचें, तें ज्वरसमचि माझा मद पळे ॥ २७ ॥

गद्यार्थ—

मी थोडें शिकलों, तेव्हां, एकाद्या हत्तीप्रमाणें, मदान्ध होऊन, 'मी सर्वज्ञ आहें', असा गर्व मला झाला. पण, विद्वानांचे संगतीनें, मला, हळूंहळू, मी मूर्ख आहे, याचें जें हा ज्ञान झालें, तेव्हां, माझा मद, ताप उतरतो तसा उतरला.

———o———

स्वायत्तमेकान्तगुणं विधात्रा
विनिर्मितं छादनमज्ञतायाः ॥
विशेषतः सर्वविदां समाजे
विभूषणं मौनमपण्डितानाम् ॥ २८ ॥

उपजाति

देई नरा जें विधि निश्चितीचें
स्वाधीन आच्छादन अज्ञतेचें ॥
ज्ञानीसमूहांत विशेषतां तें
अजाणत्यां भूषण मौन होतें ॥ २८ ॥

गद्यार्थ—

अज्ञपणा झाकण्याचें, एक आपल्या स्वाधीनचें व निश्चितीचें साधन ब्रह्मदेवानें उत्पन्न केलें आहे त्याचें नाव मौन, आणि विशेषतः विद्वानांच्या सभेंत, अज्ञ माणसाला तें ( नुसतें अज्ञान झाकण्याचें साधनच नव्हे ) तर भूषणासारखेंही काम देतें.

———o———

क्षणशः कणशश्चैव विद्यामर्थं च साधयेत् ॥
क्षणे नष्टे कुतो विद्या कणे नष्टे कुतो धनम् ॥ २९ ।

अनुष्टुभ्

क्षणांनींच कणांनींच विद्या वित्तहि साधतें ॥
क्षणनाशें न ये विद्या कणनाशें न वित्त तें ॥ २९ ॥

गद्यार्थ—

विद्या ही क्षणाक्षणानीं व वित्त हें कणाकणानीं मिळवावयाचें असतें क्षणांचा नाश करीत बसणाराला कुठली विद्या? कणाकणाचा नाश करणाराला कुठलें धन?

———o———

वेश्यानामिव विद्यानां मुखं कैः कैर्न चुंबितम् ॥
हृदयग्राहिणस्तासां द्वित्राः सन्ति न सन्ति वा ? ॥३०॥

अनुष्टुभ्

वेश्यांचेसम विद्यांचें मुख कोण न चुंबितो ? ॥
दोन तीन, न वा, घेती, त्यांचिया हृदयांप्रती ॥ ३० ॥

गद्यार्थ—

वेश्यार्चे काय, किंवा, विद्येचे काय, सुखचुंबन करणारे पुष्कळ पण त्यांच्या हृदयापर्यंत पोंचणारे क्वचित, दोन तीन असतील किंवा नसतीलही

———०———

विद्ये ! हृयतरासि किं नु कृपणासभावनैर्लज्जसे ?
सन्त्यन्ये तव तोषणाहितधियो धन्या वदान्या भुवि ॥
कान्तानां कुचकुम्भकौशलरुचां नो हानिरेतावता
पण्ढानां हृदयेऽपि यत्प्रणयते नानङ्गरागोदयः ॥ ३१ ॥

आर्या

विद्ये ! सुंदरि ! लाजसि
कृपण असंभावना करी म्हणुन ? ॥
तोषवुं तुज इच्छिति जे,
असती ऐसे उदार धन्य जन ॥
पंढहृदीं मदनोद्भव
करूं न शकली कधींच ती म्हणुनी
पुष्टस्तनमंडित त्या
रमणीचीं यांत काय गुणहानि ? ॥ ३१ ॥

गद्यार्थ—

हे विद्ये सुंदरि ! कृपण लोक तुझी असभावना करतात, म्हणून, तू काय म्हणून कुढत बसतेस ? तुला तुष्ट करूं इच्छिणारे दुसरे धन्य उदार जन आहेत एखाद्या षंढाच्या हृदयात, तिच्या दर्शनानें मदनोद्भव झाला नाहीं, म्हणून, एखाद्या पुष्टस्तनवैभव-मंडित कामिनीची का गुणहानि होते ?

———०———

पौलस्त्यः कथमन्यदारहरणे दोषं न विज्ञातवान् ?
रामेणापि कथं न हेमहरिणस्यासंभवो लक्षितः ? ॥
अक्षैश्चापि युधिष्ठिरेण सहसा प्राप्तोऽह्यनर्थः कथं ?
प्रत्यासन्नविपत्तिमूढमनसां प्रायो मतिः क्षीयते ॥३२॥

शार्दूलविक्रीडित

अन्यस्त्रीहरणांत पाप न कसें त्या रावणाला दिसे ?
"सोन्याचा नसतो कधीं मृग' कळे रामास हें ना कसें ?
फांसे खेळुनिया युधिष्ठिर कसा जाई विनाशाप्रति ?
येतां नाश समीप, तोच बहुधा नाशी नराची मति॥३२

गद्यार्थ—

परस्त्रीहरण हें पाप आहे हे रावणाला कसें कळलें नाहीं ? सोन्याचा हरिण असणें असंभाव्य हें रामाच्या कसें ध्यानीं आलें नाहीं ? फांसे खेळून युधिष्ठिरानें एकदम अनर्थ कसा ओढवून घेतला ? जवळ आलेल्या आपत्तीने भ्रांत होतां, माणसाची बुद्धि बहुधा नष्ट होते

———०———

मीनः स्नानरतः फणी पवनभुङ् मेषस्तु पर्णाशनो
नीराशः खलु चातकः प्रतिदिनं शेते बिले मूषकः ॥
भस्मोद्धूलनतत्परः खलु खरो, ध्यानाधिरूढो वकः
सर्वे किं ननु यान्ति मोक्षपदवीं ? ज्ञानप्रधानं तपः ॥३३॥

आर्या

मासे नाहति, वायुच सर्प पिती, मेष पर्ण तृण खातो ॥
जगतो जलेंच चातक उंदीरहि नित बिळांमधें निजतो ॥
लोळे भस्मामध्यें गर्दभ, बक लावितो सदा ध्यान ॥
हे सर्व हि कां मोक्षा जाती ? तप मुख्यतां असे ज्ञान ३३

गद्यार्थ—

तपश्चर्येचीं बाह्यागें–स्नान, वायुभक्षण, तृणपर्णाहार, जलाहार, गुहेंत वास, भस्मचर्चा, ध्यान, इत्यादि अनुक्रमें मासे, सर्प, मेष, चातक, उंदीर, गर्दभ, बक हें सर्व करीत असून त्यांना थोडाच मोक्ष मिळतो ? तपाचें, ज्ञान हें प्रधान तत्त्व आहे

———०———

मात्रासमं नास्ति शरीरपोषणं
चिन्तासमं नास्ति शरीरशोषणम् ॥
भार्यासमं नास्ति शरीरतोषणं
विद्यासमं नास्ति शरीरभूषणम् ॥ ३४ ॥

उपजाति

मातेपरी नान्य शरीरपोषण
चिन्तेपरी नान्य शरीरशोषण ॥
पत्नीपरी नैव शरीरतोषण
विद्येपरी काय शरीरभूषण ? ॥ ३४ ॥

गद्यार्थ—

आई करील तसें मुलाचें शरीरपोषण दुसरें कोण करील ? चिंते-सारखें शरीराला झिजविणारें दुसरें काय ? पत्नीप्रमाणें शरीराला संतोष कोण देऊं शकेल ? विद्येसारखें सुंदर शरीर–भूषण अन्य कोणतें ?

———०———

## प्रकरण ७ वें

### बुध, पंडित, बुद्धिमान्, सुज्ञ, विद्वान्, शास्त्रज्ञ, प्राज्ञ, शहाणा.

अधिगतपरमार्थान्पण्डितान्मावमंस्था-
स्तृणमिव लघु लक्ष्मीर्नैव तान्संरुणद्धि ॥
अभिनवमदलेखाश्यामगण्डस्थलानां
न भवति बिसतन्तुर्वारणं वारणानाम् ॥ १ ॥

मालिनी

कधिंहि न अवमानीं सत्यदर्शी बुधांना
तृणसम लघु लक्ष्मी त्यांस बांधूं शकेना ॥
फुटुनि मद नव्यानें श्याम हो गंड ज्यांचे
धनति न बिसतंतू बंध ऐशा गजांचे ॥ १ ॥

गद्यार्थ—

परम अर्थ ज्यानीं प्राप्त करून घेतला, अशा पंडिताचा, कधीं अपमान करूं नका. तृणासमान क्षुद्र संपत्तीच्या मोहानें, त्यांना बंधन पडत नाहीं. नुकताच मद फुटून, ज्यांचे गंड श्याम झाले आहेत, अशा हत्तींना, कमलांतले कोमल तंतू काय बांधूं शकणार?

---

चिन्तनीया हि विपदामादावेव प्रतिक्रिया ।
न कूपखननं युक्तं प्रदीप्ते वह्निना गृहे ॥ २ ॥

अनुष्टुभ्

उपाय, संकटापूर्वीं सुज्ञें आधींच चिंतिणें ।
घराला लागतां आग योग्य कां कूप खोदणें? ॥ २ ॥

गद्यार्थः—

संकटें येण्यापूर्वींच, तीं निवारण्याचा उपाय, शहाण्यानें चिंतिण्याचा असतो. घराला आग लागल्यावर, विहीर खणणें युक्त नव्हे.

चलत्येकेन पादेन तिष्ठत्यन्येन बुद्धिमान् ।
नासमीक्ष्य परं स्थानं पूर्वमायतनं त्यजेत् ॥ ३ ॥

अनुष्टुभ्

चालतो एक पायानें, दुज्यानें स्थिर पंडित ।
न पाहतां नवी जागा, पहिली न च सोडित ॥ ३ ॥

गद्यार्थ—

सुज्ञ हा एका पायानें चालतो व दुसऱ्यानें (भूमीवर) स्थिर असतो. नवीन जागा मिळाल्यावाचून पहिली सोडूं नये.

---

विदुषां वदनाद्वाचः सहसा यान्ति नो बहिः ।
याताश्चेन्न पराञ्चन्ति द्विरदानां रदा इव ॥ ४ ॥

अनुष्टुभ्

विद्वानांच्या मुखांतून सहसा शब्द येति न ।
येतां परत ना जाती हस्तिदंतापरि स्थिति ॥ ४ ॥

गद्यार्थ—

विद्वानाच्या तोंडातून (आधीं) सहसा शब्द बाहेर येत नाहींत; पण एकदां आले, म्हणजे मात्र परत जात नाहींत. (वचनभंग करीत नाहींत.) हत्तीचे दांत फुटावयास वेळ लागतो खरा, पण, एकदां बाहेर आले, म्हणजे परत कसे जातील?

---

गुणवदगुणवद्वा कुर्वता कार्यमादौ
परिणतिरवधार्या यत्नतः पण्डितेन ॥
अतिरभसकृतानां कर्मणामाविपत्ते-
र्भवति हृदयदाही शल्यतुल्यो विपाकः ॥ ५ ॥

मालिनी

कृति कशिहि करो, त्यापूर्विंही पंडितानें
परिणति समजोनी नीट घ्याची प्रयत्नें ॥
त्वरित कृति करोनी मागुनी शल्य त्याचें
हृदयिं खुपत राहे मृत्युपर्यंत साचें ॥ ५ ॥

गद्यार्थ—

बरें, वाईट, कसलेंही काम करण्यापूर्वीं, सुज्ञानें त्याचा परिणाम काय होणार, याचा, नीट विचार करावा. एकादें काम घाईत केलें, तर, त्याच्या परिणामाबद्दलचें शल्य, मरेपर्यंत, माणसाला सलत राहून, हृदयाचा दाह करितें.

---

गुणदोषौ बुधो गृह्णन्निन्दुक्ष्वेडाविवेश्वरः ।
शिरसा श्लाघते पूर्वं, परं कण्ठे नियच्छति ॥ ६ ॥

उपजाति

गुणा नि दोषां जधिं सुज्ञ घेतो
चंद्रा, विषा शंकर ज्यापरी तो ॥
शिरावरी त्या पहिल्यास घेत
ठेवी दुज्या दाबुनियां गळयांत ॥ ६ ॥

गद्यार्थ—

सुज्ञ हा, जेव्हां गुण, किंवा, दोष घेतो, तेव्हां, तो शंकराचें तारतम्य वापरतो शंकर चंद्राला डोक्यावर बसवतो, व, विषाला गळ्यांत दाबून ठेवतो तसें

———०———

इह तुरगशतैः प्रयान्तु मूर्खा
धनरहितास्तु बुधाः प्रयान्तु पद्भ्याम् ॥
गिरिशिखरगतापि काकपंक्तिः
पुलिनगतैर्न समत्वमेति हंसैः ॥ ७ ॥

मालिनी

उडवित शत घोडे मूर्ख पेटींत जावो
अधन बुध जगीं या पादचारीच होवो ॥
गिरिशिखरिं जरीही बैसली काकपंक्ति
पुलिनचर न हंसां तुल्य होई कधीं ती ॥ ७ ॥

गद्यार्थ—

या जगीं, मूर्ख हे, शभर घोडे उडवीत जावोत, व धन नसल्याने, बुध हा बिचारा पायानीं चालो कावळ्यांचें टोळकें मोठ्या डोंगरावर जाऊन बसलें, तरी पुळणींत विहार करणाऱ्या हंसाची सर त्याला थोडीच येणार ?

———०———

जडास्तपोभिः शमयन्ति देहं
बुधा मनः सर्वविकारहेतु ॥
श्वा मुक्तमस्त्रं दशतीह कोपात्—
मोक्तारमुद्दिश्य हिनस्ति सिंहः ॥ ८ ॥

उपजाति

तपें करी शांत, तनूस, अज्ञ
विकारमूळास मनास सुज्ञ ॥
श्वा मुक्त बाणा चिडुनी डसेल
धनुर्धरा सिंह परी वधील ॥ ८ ॥

गद्यार्थ—

मूर्ख असतात, ते, तप करुन, केवळ देहाला शांत करूं बघतात, पण, सुज्ञ, सर्व विकारांचें मूळ जें मन, तेंच शांत करतात कुणी बाण मारला, तर, कुत्रें, त्या बाणालाच चिडून डसत बसतें, तर सिंह हा, मूळ बाण सोडणारावरच हल्ला करुन, त्याला ठार मारतो

———०———

परस्परं संवदतां जडानां
मौनं विधेयं सततं सुधीभिः ॥
कोलाहले काककुलस्य जाते
विराजते कोकिलकूजितं किम् ? ॥ ९ ॥

उपजाति

परस्परांशीं जड बोलतांना
बरें सदा मौनचि शाहण्यांना ॥
आक्रोशती काक जधीं वनांत
शोभा कुठें कोकिलकूजनांत ? ॥ ९ ॥

गद्यार्थ—

मूर्ख लोक आपसात बोलत असतांना सुज्ञ माणसानीं तेथें नेहमीं मौन धरावें हेंच चांगलें. कावळ्याची कावकाव चालू असता कोकिलाच्या कूजनाची काय शोभा ?

———०———

हरेः पादाहतिः श्लाघ्या, न श्लाघ्यं खररोहणम् ॥
स्पर्धापि विदुषा युक्ता न युक्ता मूर्खमित्रता ॥ १० ॥

वसततिलका

पादप्रहारहि बरे मृगराज, याचे
त्या गर्दभावर नको बसणेंहि साचें ॥
मूर्खासवे सुहृदता करण्याहुनीही
स्पर्धा करूं बुधजनां, बरवेचि तेंही ॥ १० ॥

गद्यार्थ—

सिंहाच्या पायाखालीं तुडविलें जाणेंही बरें पण गाढवाच्या पाठीवर बसणें नको विद्वानाशीं स्पर्धा करणेंही बरें— पण मूर्खाशीं मैत्रीही नको

———०———

कर्मायत्तं फलं पुंसां बुद्धिः कर्मानुसारिणी ।
तथापि सुधिया भाव्यं सुविचार्यैव कुर्वता ॥ ११ ॥

अनुष्टुभ्

कर्मा हातीं फलें बुद्धि कर्माच्या जाइ मागुनी।
तथापि करणें सुज्ञें कार्य नीट समीक्षुनी ॥ ११ ॥

गद्यार्थ—

कर्म (दैव) देईल तसेंच फळ माणसाला मिळतें व बुद्धिही कर्मानुसारी असते (हें खरें) तरीही सुज्ञानें, कर्म नीट विचार करूनच करावें.

---

यथा खरश्चन्दनभारवाही
भारस्य वेत्ता, न तु चन्दनस्य ।
तथा हि विप्रः श्रुतिशास्त्रपूर्णो
ज्ञानेन हीनः पशुभिः समानः ॥ १२ ॥

वसंततिलका

वाहोनि गर्दभहि चंदनभार खास
जाणील भार, न च चंदनिंचा सुवास ॥
शास्त्रें नि वेद शिकुनी जर सुज्ञता न
तो विप्रही ठरतसे पशुच्या समान ॥ १२ ॥

गद्यार्थ—

गाढव चंदनाचा भार वाहतो-तेव्हां त्याला त्या भाराची जाणीव होते-चंदनाच्या सुगंधाची कांहीं होत नाहीं. वेदशास्त्रें शिकूनही ज्याला ज्ञान (सुज्ञत्व) आलें नाहीं तो ब्राह्मण (असला तरी) पशुच !

---

न हृष्यत्यात्मसंमाने नावमानेन तप्यते ।
गाङ्गो ह्रद इवाक्षोभ्यो यः स पण्डित उच्यते ॥ १३ ॥

अनुष्टुभ्

हर्षे न जो स्वमानानें, अपमानें न तापतो ।
गंगाडोहापरी शांत, मेळवी पंडितत्व तो ॥ १३ ॥

गद्यार्थ—

मानसन्मान प्राप्त झाल्यानें जो हर्ष पावत नाहीं किंवा अपमानानें चिडत नाहीं (उलट) गंगेच्या डोहासाखा शांत राहतो त्याला पंडित म्हणतात.

---

यन्मनीषिपदाम्भोजरजःकणपवित्रितम् ।
तदेव भवनं नोचेद्भकारस्तत्र लुप्यते ॥ १४ ॥

आर्या

विद्वत्पदधूलीनें पवित्र जें तेंच शोभतें 'भवन' ॥
यापरि नसेल जेथें 'भ'कार तेथील जाय लोपून ॥१४॥

गद्यार्थ—

विद्वानांच्या पदधूलीनें जें पवित्र झालें तेंच भवन. त्याव्यतिरिक्त असेल तेथें त्यांतला 'भ' लोपून जातो (म्हणजे तें भवन न राहतां वन होतें)

---

अर्थाहरणकौशल्यं, किं स्तुमः शास्त्रवादिनाम् ? ।
अव्ययेभ्योऽपि ये चार्थान्निष्कासयन्ति ह्यनेकशः ॥१५॥

आर्या

किति वानूं शास्त्रज्ञां
अर्थाहरणांत कुशल ते म्हणुनी ? ॥
जे अव्ययांमधूनहि
अनेकविध अर्थ घेति काढोनी ॥ १५ ॥

गद्यार्थ—

शब्दांचे अनेक अर्थ शुक्तिविद्याच्या कौशल्याबद्दल शास्त्रज्ञांची स्तुति करावी तेवढी थोडीच आहे. कारण ते अव्ययांतूनही अनेक अर्थ काढतात. 'अव्यय' याचा दुसरा अर्थ खर्चाला कांहीं शिल्लक नसणें. त्यातूनही शास्त्रज्ञ अनेकविध अर्थ=संपत्ति काढतात. (उदाहरणार्थ—विज्ञानशास्त्री टाकाऊ वस्तूंतून संपत्ति निर्माण करतात.)

---

विद्वानेव विजानाति विद्वज्जनपरिश्रमम् ।
न हि वन्ध्या विजानाति गुर्वी प्रसववेदनाम् ॥१६॥

अनुष्टुभ्

विद्वान एकटा जाणे विद्वानांचे प्रयास ते ।
प्रसूतिवेदना मोठ्या वांझोटी काय जाणते ? ॥ १६ ॥

गद्यार्थ—

(ग्रंथलेखनाचे) किंवा (विद्यार्जनाचे कामीं) विद्वानांना काय परिश्रम पडले याची कल्पना विद्वान असतील त्यानाच येणें शक्य ! वांझोटी स्त्रीला बाळंतपणाच्या मोठ्या यातना काय ठाऊक?

---

विद्वत्त्वं च नृपत्वं च नैव तुल्यं कदाचन ।
स्वदेशे पूज्यते राजा विद्वान् सर्वत्र पूज्यते ॥ १७ ॥

गुणदोषौ बुधो गृह्णन्निन्दुक्ष्वेडाविवेश्वरः ।
शिरसा श्लाघते पूर्वं, परं कण्ठे नियच्छति ॥ ६ ॥

उपजाति

गुणा नि दोषां जधिं सुज्ञ घेतो
चंद्रा, विषा शंकर व्यापरी तो ॥
शिरावरी त्या पहिल्यास घेत
ठेवी दुज्या दावुनियां गळ्यांत ॥ ६ ॥

गद्यार्थ—

सुज्ञ हा, जेव्हा गुण, किंवा, दोष घेतो, तेव्हा, तो शंकराचें तारतम्य वापरतो शंकर चंद्राला डोक्यावर बसवतो, व, विषाला गळ्यात दाबून ठेवतो तसें

---

इह तुरगशतैः प्रयान्तु मूर्खा
धनरहितास्तु बुधाः प्रयान्तु पद्भ्याम् ॥
गिरिशिखरगतापि काकपंक्तिः
पुलिनगतैर्न समत्वमेति हंसैः ॥ ७ ॥

मालिनी

उडवित शत घोडे मूर्ख पेटींत जावो
अधन बुध जगीं या पादचारीच होवो ॥
गिरिशिखरिं जरीही बैसली काकपंक्ति
पुलिनचर न हंसां तुल्य होई कधीं ती ॥ ७ ॥

गद्यार्थ—

या जगीं, मूर्ख हे, शभर घोडे उडवीत जावोत, व धन नसल्यानें, बुध हा बिचारा पायानीं चालो. कावळयाचें टोळकें मोठ्या डोंगरावर जाऊन बसलें, तरी पुळणींत विहार करणाऱ्या हंसाची सर त्याला थोडीच येणार?

---

जडास्तपोभिः शमयन्ति देहं
बुधा मनः सर्वविकारहेतु ॥
श्वा मुक्तमस्त्रं दशतीह कोपात्—
मोक्तारमुद्दिश्य हिनस्ति सिंहः ॥ ८ ॥

उपजाति

तपें करी शांत, तनूस, अज्ञ
विकारमूळास मनास सुज्ञ ॥
श्वा मुक्त बाणा चिडुनी डसेल
धनुर्धरा सिंह परी वधील ॥ ८ ॥

गद्यार्थ—

मूर्ख असतात, ते, तप करून, केवळ देहाला शांत करूं बघतात, पण, सुज्ञ, सर्व विकारांचें मूळ जें मन, तेंच शांत करतात कुणी बाण मारला, तर, कुत्रें, त्या बाणालाच चिडून डसत बसतें, तर सिंह हा, मूळ बाण सोडणारावरच हल्ला करून, त्याला ठार मारतो

---

परस्परं संवदतां जडानां
मौनं विधेयं सततं सुधीभिः ॥
कोलाहले काककुलस्य जाते
विराजते कोकिलकूजितं किम्? ॥ ९ ॥

उपजाति

परस्परांशीं जड बोलतांना
बरें सदा मौनचि शाहण्यांना ॥
आक्रोशती काक जधीं वनांत
शोभा कुठें कोकिलकूजनांत? ॥ ९ ॥

गद्यार्थ—

मूर्ख लोक आपसात बोलत असतांना सुज्ञ माणसानीं तेथें नेहमीं मौन धरावें हेंच चागलें. कावळ्याची कावकाव चालू असता कोकिलाच्या कूजनाची काय शोभा?

---

हरेः पादाहतिः श्लाघ्या, न श्लाघ्यं खररोहणम् ॥
स्पर्धापि विदुषा युक्ता न युक्ता मूर्खमित्रता ॥ १० ॥

वसंततिलका

पादप्रहारहि बरे मृगराज, याचे
त्या गर्दभावर नको बसणेंहि साचें ॥
मूर्खांसवें सुहृदता करण्याहुनीही
स्पर्धा करूं बुधजनां, बरवेंचि तेंही ॥ १० ॥

गद्यार्थ—

सिंहाच्या पायाखालीं तुडविलें जाणेंही बरें पण गाढवाच्या पाठीवर बसणें नको विद्वानाशीं स्पर्धा करणेंही बरें— पण मूर्खाशीं मैत्रीही नको

---

कर्मायत्तं फलं पुंसां बुद्धिः कर्मानुसारिणी ।
तथापि सुधिया भाव्यं सुविचार्यैव कुर्वता ॥ ११ ॥

अनुष्टुभ्

कर्मा हातीं फळें बुद्धि कर्माच्या जाइ मागुनी ।
तथापि करणें सुज्ञें कार्य नीट समीक्षुनी ॥ ११ ॥

गद्यार्थ—

कर्म ( दैव ) देईल तसेंच फळ माणसाला मिळतें व बुद्धिही कर्मानुसारी असते ( हें खरें ) तरीही सुज्ञानें, कर्म नीट विचार करूनच करावें.

———०———

यथा खरश्चन्दनभारवाही
भारस्य वेत्ता, न तु चन्दनस्य ॥
तथा हि विप्रः श्रुतिशास्त्रपूर्णो
ज्ञानेन हीनः पशुभिः समानः ॥ १२ ॥

वसंततिलका

वाहोनि गर्दभहि चंदनभार खास
जाणील भार, न च चंदनिंचा सुवास ॥
शास्त्रें नि वेद शिकुनी जर सुज्ञता न
तो विप्रही ठरतसे पशुच्या समान ॥ १२ ॥

गद्यार्थ—

गाढव चंदनाचा भार वाहतो–तेव्हां त्याला त्या भाराची जाणीव होते–चंदनाच्या सुगंधाची कांहीं होत नाहीं. वेदशास्त्रें शिकूनही ज्याला ज्ञान ( सुज्ञत्व ) आलें नाहीं तो ब्राह्मण ( असला तरी ) पशूच !

———०———

न हृष्यत्यात्मसंमाने नावमानेन तप्यते ।
गाङ्गो ह्रद इवाक्षोभ्यो यः स पण्डित उच्यते ॥ १३ ॥

अनुष्टुभ्

हर्षे न जो स्वमानानें, अपमानें न तापतो ।
गंगाडोहापरी शांत, मेळवी पंडितत्व तो ॥ १३ ॥

गद्यार्थ—

मानसन्मान प्राप्त झाल्यानें जो हर्ष पावत नाहीं किंवा अपमानानें चिडत नाहीं ( उलट ) गंगेच्या डोहासारखा शांत राहतो त्याला पंडित म्हणतात.

———०———

यन्मनीषिपदाम्भोजरजःकणपवित्रितम् ।
तदेव भवनं नोचेद्भकारस्तत्र लुप्यते ॥ १४ ॥

आर्या

विद्वत्पदधूळीनें पवित्र जें तेंच शोभतें 'भवन' ॥
यापरि नसेल जेथें 'भ'कार तेथील जाय लोपून ॥१४॥

गद्यार्थ—

विद्वानांच्या पदधूळीनें जें पवित्र झालें तेंच भवन त्याव्यतिरिक्त असेल तेथें त्यांतला 'भ' लोपून जातो ( म्हणजे तें भवन न राहतां वन होतें )

———०———

अर्थाहरणकौशल्यं, किं स्तुमः शास्त्रवादिनाम् ? ।
अव्ययेभ्योऽपि ये चार्थान्निष्कासयन्ति ह्यनेकशः ॥१५॥

आर्या

किति वानूं शास्त्रज्ञां
अर्थाहरणांत कुशल ते म्हणुनी ? ॥
जे अव्ययांमधूनहि
अनेकविध अर्थ घेति काढोनी ॥ १५ ॥

गद्यार्थ—

शब्दांचे अनेक अर्थ खुलविण्याच्या कौशल्याबद्दल शास्त्रज्ञाची स्तुति करावी तेवढी थोडीच आहे. कारण ते अव्ययांतूनही अनेक अर्थ काढतात. 'अव्यय' याचा दुसरा अर्थ खर्चाला कांहीं शिल्लक नसणें. त्यांतूनही शास्त्रज्ञ अनेकविध अर्थ=संपत्ति काढतात. (उदाहरणार्थ—विज्ञानशास्त्री टाकाऊ वस्तूंतून संपत्ति निर्माण करतात. )

———०———

विद्वानेव विजानाति विद्वज्जनपरिश्रमम् ।
न हि वन्ध्या विजानाति गुर्वीं प्रसववेदनाम् ॥१६॥

अनुष्टुभ्

विद्वान एकटा जाणे विद्वानांचे प्रयास ते ।
प्रसूतिवेदना मोठ्या वांझोटी काय जाणते ? ॥ १६ ॥

गद्यार्थ—

( ग्रंथलेखनाचे ) किंवा ( विद्यार्जनाचे कामीं ) विद्वानांना काय परिश्रम पडले याची कल्पना विद्वान असतील त्यानाच येणें शक्य ! वांझोटी स्त्रीला बाळंतपणाच्या मोठ्या यातना काय ठाऊक?

———०———

विद्वत्त्वं च नृपत्वं च नैव तुल्यं कदाचन ।
स्वदेशे पूज्यते राजा विद्वान् सर्वत्र पूज्यते ॥ १७ ॥

## प्रकरण ८ वें

### मूर्ख, हेकट, अबुध, विवेकहीन

शक्यो वारयितुं जलेन हुतभुक्, छत्रेण सूर्यातपो
नागेन्द्रो निशिताङ्कुशेन समदो, दण्डेन गोगर्दभौ ॥
व्याधिर्भेषजसंग्रहैश्च विविधैर्मन्त्रैः प्रयोगैर्विषं
सर्वस्यौषधमस्ति शास्त्रविहितं, मूर्खस्य नास्त्यौषधम् ॥ १

शार्दूलविक्रीडित

अग्नीला जल, तेवि छत्रहि पहा सूर्यातपा वारितें
काठी बैल खरांस, अंकुश तसें उन्मत्त हत्तींस ते ॥
रोगां औषध, मंत्र तंत्रहि विषा नाशूनि, दावी गुण
सर्वांनाच सशास्त्र औषध असे मूर्खांस काहींच न ॥ १ ॥

गद्यार्थ—

अग्नीचें निवारण पाण्यानें; उन्हाचें, छत्रीनें; उन्मत्त हत्तीचें, तीक्ष्ण अंकुशानें; बैल गाढवांचें, काठीनें; रोगांचें औषधांनीं; विषाचें नाना मंत्रतंत्रांनीं निवारण करतां येतें. अशा रीतीनें सर्वांवर सशास्त्र औषध उपाय आहे, पण मूर्खाला काहींच नाहीं.

---

प्रसह्य मणिमुद्धरेन्मकरवक्त्रदंष्ट्रांकुरात्
समुद्रमपि संतरेत्प्रचलदूर्मिमालाकुलम् ॥
भुजङ्गमपि कोपितं शिरसि पुष्पवद्धारये-
न्न तु प्रतिनिविष्टमूर्खजनचित्तमाराधयेत् ॥ २ ॥

पृथ्वी

जमेल मणि काढणें सुसरिच्याहि दातांतुनी
अती उसळलाहि शक्य तरणें समुद्रांतुनी ॥
शिरीं कुपित सर्प पुष्पसम शक्य हो ठेवणें
न शक्य परि मूर्ख हेकट नरास आराधणें ॥ २ ॥

गद्यार्थ—

एकवेळ, बळानें मगरीच्या दातांतून रत्न काढणें शक्य होईल; भयंकर लाटांनीं खवळलेल्या समुद्रात पोहतां येईल; क्रुद्ध सर्पाला फुलासारखें डोक्यावर धारण करणेंही शक्य होईल, परंतु हेकट अशा मूर्खांची समजूत घालणें शक्य नाहीं.

---

वरं पर्वतदुर्गेषु भ्रान्तं वनचरैः सह ।
न मूर्खजनसंपर्कः सुरेन्द्रभवनेष्वपि ॥ ३ ॥

अनुष्टुभ्

बरें रानपशूसंगें फिरणें गिरिकन्दरीं ।
नको संगत मूर्खांची देवेन्द्राच्याहि मंदिरीं ॥ ३ ॥

गद्यार्थ—

वनचरांच्या संगतींत गिरिकंदरांतून भटकणेंही पत्करलें पण इंद्राच्या मंदिरांतही मूर्खांची संगत नको।

---

उपदेशो हि मूर्खाणां प्रकोपाय न शान्तये ।
पयःपानं भुजङ्गानां केवलं विषवर्धनम् ॥ ४ ॥

अनुष्टुभ्

उपदेशें न मूर्खातें शांति ये, परि कोपतो ।
पाजतां दूध सर्पाला वाढवी विष मात्र तो ॥ ४ ॥

गद्यार्थ—

मूर्खाला उपदेश केला असतां त्याला शांति येणें बाजूलाच राहिलें उलट तो संतापतो. सर्पाला दूध पाजलें असतां तो केवळ विष मात्र वाढवितो.

---

मिष्टान्नं प्राप्य दुर्बुद्धे मा प्राणेषु दयां कुरु ।
मिष्टान्नं दुर्लभं लोके प्राणा जन्मनि जन्मनि ॥ ५ ॥

वसंततिलका

मूर्खा ! जधीं मिळतसे तुज मिष्ट अन्न
प्राणांवरी तधिं दया करणें तुवां न ॥
मिष्टान्न हें जगतिं दुर्मिळ नित्य जाण
प्रत्येक जन्म तुज घेउनि येइ प्राण ॥ ५ ॥

गद्यार्थ—

मूर्खा ! तुला पक्वान्नें खावयास मिळतील, तेव्हां प्राणांवर दया करूं नको ( प्राण गेले तरी बेहेत्तर, इतकें खाऊन घे. ) या जगीं मिष्टान्न हें दुर्मिळ आहे—प्राण काय दरजन्मीं आहेतच.

---

अनुष्टुभ्

विद्वान् राजा असे दोन जगीं तुल्य कधींच न ॥
राजा पूज्य स्वदेशांत विद्वान् सर्वत्र पूजित ॥ १७ ॥

गद्यार्थ—

विद्वान् आणि राजा यांची कधीं तुलनाच होऊं शकत नाहीं राजा (फारतर) आपल्या देशांत पूजिला जात असेल. विद्वान् मात्र सर्वत्र पूजिला जातो.

———०———

प्राज्ञो हि जल्पतां पुंसां श्रुत्वा वाचः शुभाशुभाः ।
गुणवद्वाक्यमादत्ते हंसः क्षीरमिवाम्भसः ॥ १८ ॥

अनुष्टुभ्

जल्पती लोक तें सुज्ञ शुभाशुभ वचांतुनी ।
घेई वाक्य गुणी, जैसा हंस, दूध, जलांतुनी ॥ १८ ॥

गद्यार्थ—

लोक, कांहींतरी, बरें, वाईट, बडबडत असतांना, सुज्ञ हा त्यांतून, गुण असलेलें सार उचलतो. जसा, हंस, जलमिश्र दुधातून दूधच तेवढें घेतो.

———०———

शास्त्राण्यधीत्यापि भवन्ति मूर्खा
यस्तु क्रियावान्पुरुषः स विद्वान् ॥
सुचिन्तितं चौषधमातुराणां
न नाममात्रेण करोत्यरोगम् ॥ १९ ॥

वसंततिलका

शास्त्रें शिकूनहि कितीक रहाति मूर्ख
विद्वान्, परंतु करितो कृति तोच एक ॥
रोग्यास औषध मनीं बहु चिंतिलें तें
नामें च केवळ कधीं गुण काय देतें ? ॥ १९ ॥

गद्यार्थ—

शास्त्रें शिकून सुद्धां, कित्येक जण, मूर्ख ते मूर्खच राहतात. शास्त्रें कृतींत उतरवितात, ते खरे विद्वान्. मनांत खूप चिंतन करून, देण्यासाठीं औषध ठरविलें, तरी, त्या औषधाच्या केवळ नांवानें का तो रोगी बरा होणार आहे ? ( प्रत्यक्ष तें औषध तयार करून, योग्य तऱ्हेनें दिल्याशिवाय, कसें बरें होणार ? )

———०———

पण्डिते हि गुणाः सर्वे मूर्खे दोषाश्च केवलम् ।
तस्मान्मूर्खसहस्रेभ्यः प्राज्ञ एको विशिष्यते ॥ २० ॥

अनुष्टुभ्

सारेच दोष मूर्खात सुज्ञांत गुण सर्वही ।
मूर्खांहुनि सहस्रांही श्रेष्ठ सुज्ञचि एकही ॥ २० ॥

गद्यार्थ—

पंडितांत सारे गुणच, मूर्खांत सारे दोषच. म्हणून सहस्रों मूर्खांपेक्षा एक सुज्ञच श्रेष्ठ !

———०———

यस्य नास्ति विवेकस्तु केवलं यो बहुश्रुतः ।
न स जानाति शास्त्रार्थान्दर्वी पाकरसानिव ॥ २१ ॥

अनुष्टुभ्

जो बहुश्रुतची मात्र, विवेक नसतां मुळीं ।
तो न जाणेच शास्त्रार्थ जैशी अन्नरसा पळी ॥ २१ ॥

गद्यार्थ—

जो केवळ बहुश्रुत, म्हणजे, पुस्तकी पंडित, पण, ज्याला तारतम्य नाहीं, त्याला शास्त्राचें मर्म कळत नाहीं. अन्नामध्यें सतत वावरणाऱ्या पळीला अन्नरस कितपत कळतो !

———०———



# प्रकरण ८ वें

## मूर्ख, हेकट, अबुध, विवेकहीन

शक्यो वारयितुं जलेन हुतभुक्, छत्रेण सूर्यातपो
नागेन्द्रो निशितांकुशेन समदो, दण्डेन गोगर्दभौ ॥
व्याधिर्भेषजसंग्रहैश्च विविधैर्मंत्रैः प्रयोगैर्विषं
सर्वस्यौषधमस्ति शास्त्रविहितं, मूर्खस्य नास्त्यौषधम् ॥ १

शार्दूलविक्रीडित

अग्नीला जल, तेंवि छत्रहि पहा सूर्यातपा वारितें
काठी बैल खरांस, अंकुश तसे उन्मत्त हत्तींस ते ॥
रोगां औषध, मंत्र तेंवहि विषा नाशूनि, दावी गुण
सर्वांनाच सशास्त्र औषध असे मूर्खांस कांहींच ना ॥ १ ॥

गद्यार्थ—

अग्नीचें निवारण पाण्यानें; उन्हाचें, छत्रीनें; उन्मत्त हत्तीचें, तीक्ष्ण अंकुशानें; बैल गाढवांचें, काठीनें; रोगाचें औषधांनीं; विषाचें नाना मंत्रतंत्रांनीं निवारण करतां येतें. अशा रीतीनें *सर्वांवर सशास्त्र औषध उपाय आहे, पण मूर्खाला कांहींच नाहीं.*

---

प्रसह्य मणिमुद्धरेन्मकरवक्त्रदंष्ट्रांकुरात्
समुद्रमपि संचरेत्प्रचलदूर्मिमालाकुलम् ॥
भुजङ्गमपि कोपितं शिरसि पुष्पवद्धारये-
न्न तु प्रतिनिविष्टमूर्खजनचित्तमाराधयेत् ॥ २ ॥

पृथ्वी

जमेल मणि काढणें सुसरिच्याहि दातांतुनी
अती उसळल्याहि शक्य तरणें समुद्रांतुनी ॥
शिरीं कुपित सर्प पुष्पसम शक्य हो ठेवणें
न शक्य परि मूर्ख हेकट नरास आराधणें ॥ २ ॥

गद्यार्थ—

एकवेळ, बळानें मगरीच्या दातांतून रत्न काढणें शक्य होईल; भयंकर लाटांनीं खवळलेल्या समुद्रांत पोहतां येईल; क्रुद्ध सर्पाला फुलाखारखें डोक्यावर धारण करणेंही शक्य होईल, परंतु हेकट अशा मूर्खांची समजूत घालणें शक्य नाहीं.

---

वरं पर्वतदुर्गेषु भ्रान्तं वनचरैः सह ।
न मूर्खजनसंपर्कः सुरेन्द्रभवनेष्वपि ॥ ३ ॥

अनुष्टुभ्

वरें रानपशूसंगें फिरणें गिरिकन्दरीं ।
नको संगत मूर्खांची देवेन्द्राच्याहि मंदिरीं ॥ ३ ॥

गद्यार्थ—

वनचरांच्या संगतींत गिरिकंदरांतून भटकणेंही पत्करलें पण इंद्राच्या मंदिरांतही मूर्खांची संगत नको।

---

उपदेशो हि मूर्खाणां प्रकोपाय न शान्तये ।
पयःपानं भुजङ्गानां केवलं विषवर्धनम् ॥ ४ ॥

अनुष्टुभ्

उपदेशें न मूर्खांतें शांति ये, परि कोपतो ।
पाजतां दूध सर्पाला वाढवी विष मात्र तो ॥ ४ ॥

गद्यार्थ—

मूर्खाला उपदेश केला असतां त्याला शांति येणें बाजूलाच राहिलें उलट तो संतापतो. सर्पाला दूध पाजलें असतां तो केवळ विष मात्र वाढवितो.

---

मिष्टान्नं प्राप्य दुर्बुद्धे मा प्राणेषु दयां कुरु ।
मिष्टान्नं दुर्लभं लोके प्राणा जन्मनि जन्मनि ॥ ५ ॥

वसंततिलका

मूर्खा ! जधीं मिळतसे तुज मिष्ट अन्न
प्राणांवरी तधिं दया करणें तुवां न ॥
मिष्टान्न हें जगतिं दुर्मिळ नित्य जाण
प्रत्येक जन्म तुज घेउनि येइ प्राण ॥ ५ ॥

गद्यार्थ—

मूर्खा ! तुला पक्वान्नें खावयास मिळतील, तेव्हां प्राणांवर दया करूं नको ( प्राण गेले तरी बेहेत्तर, इतकें खाऊन घे. ) या जगीं मिष्टान्न हें दुर्मिळ आहे—प्राण काय दरजन्मीं आहेतच.

---

अरण्यरुदितं कृतं शवशरीरमुद्वर्तितं
स्थलेऽब्जमवरोपितं, सुचिरमूषरे वर्षितम् ॥
श्वपुच्छमवनामितं, बधिरकर्णजापः कृतो
धृतोऽन्धमुखदर्पणो यदबुधो जनः सेवितः ॥६॥

शार्दूलविक्रीडित

रानीं निर्जन मी फुकाच रडलों, प्रेतास शृंगारिलें
पद्में भूमिंत लाविलीं लवणभूतें दीर्घ मी शिंपिलें ॥
केलें कुक्कुरपुच्छ नीट, बहिऱ्या कानांत वा बोलिलें
अंधा दर्पण दाविलाच जणुं जें मूर्खास मीं सेविलें॥६॥

गद्यार्थ—

मूर्खाची मी सेवा केली, ती ( इतकी व्यर्थ, निष्फल, झाली कीं तिला उपमाच द्यावयाची, तर जणू काय ) मी निर्जन अरण्यांत रडलों, प्रेताला शृंगारलें, जमिनीवर कमळें लावलीं, खारटणावर दीर्घकाळ पाणी शिंपलें, कुत्र्याचें शेपूट सरळ केलें, बहिऱ्याच्या कानांत बोललों, आंधळ्याच्या तोंडासमोर आरसा धरला, ( अशासारखेंच म्हटलें पाहिजे )

---

अजातमृतमूर्खाणां वरमाद्यौ न चान्तिमः ।
सकृद्दुःखकरावाद्यावन्तिमस्तु पदे पदे ॥ ७ ॥

वसंततिलका

जो जन्मला न, मृत, मूर्ख, तिघांत या रे
दोन्ही बरे प्रथम शेवटचा नको रे ॥
देतात दुःख पहिले, कधिं एकवार
देईल अंतिम पदोपदिं दुःख फार ॥७॥

गद्यार्थ—

अजून जन्मला नाहीं तो, मेलेला, आणि मूर्ख या तिघांत (तर तम ठरवावयाचें तर ) पहिले दोघे बरे, तो शेवटचा ( मूर्ख ) नको ते पहिले दोघे केव्हांतरी एकदांच दुःख देतात शेवटचा पदोपदीं.

---

मूर्खस्य पंच चिह्नानि गर्वो, दुर्वचनी तथा ।
हठी चाप्रियवादी च परोक्तं नैव मन्यते ॥ ८ ॥

अनुष्टुभ्

मूर्खाचीं पांच चिन्हें हीं गर्वी, दुर्वचनीहि तो ।
हट्टी अप्रियची बोले दुज्याचें नच ऐकतो ॥ ८ ॥

गद्यार्थ—

गर्विष्ठपणा, वाईट बोलणें, हट्टीपणा, अप्रिय बोलणें व लोकांचें न ऐकणें हीं मूर्खाचीं पांच लक्षणें आहेत

---

वरं दरिद्रः श्रुतिशास्त्रपारगो
न चापि मूर्खो बहुरत्नसंयुतः ॥
सुलोचना जीर्णपटापि शोभते
न नेत्रहीना कनकैरलंकृता ॥ ९ ॥

आर्या

जरि तो असेल मूर्खचि, बहुरत्नांनी किती जरी सजला
त्याहुनि बरा दरिद्री परि जो श्रुति-शास्त्र पार गेलेला ॥
सुंदरनयना स्त्री ही चिंध्यानीही दिसेल शोभून
परि आंधळी तशी कां कनकालंकार तीस घालून ॥९॥

गद्यार्थ—

पुष्कळ रत्नानीं सजलेल्या मूर्खापेक्षा, श्रुतिशास्त्रपारंगत दरिद्रीहि बरा सुंदरनयना स्त्री फाटक्या वस्त्रानींहि शोभते—पण आंधळी, जरी सोन्यामोत्यानीं मढविली तरी काय सुंदर दिसणार ?

---

लभेत सिकतासु तैलमपि यत्नतः पीडयन्
पिबेच्च मृगतृष्णिकासु सलिलं पिपासार्दितः ॥
कदाचिदपि पर्यटन् शशविषाणमासादये-
न्न तु प्रतिनिविष्टमूर्खजनचित्तमाराधयेत् ॥ १० ॥

पृथ्वी

सयत्न पिळुनी निघेल कधिं वाळुचें तैलही
मिळे जल पिण्यास वा मृगजळीं तृषार्तासही ॥
चुकून, फिरतां, सुशक्य शशशृंगही लाभणें
न शक्य परि मूर्ख हेकट नरास आराधणें ॥ १० ॥

गद्यार्थ—

वाळूला पिळण्याचे यत्न केल्यास, एकवेळ, तिचें तेलही कदाचित् निघेल, तान्हेल्याला मृगजळांतही पाणी प्यावयास मिळेल, सशाचें शिंगही फिरतां फिरतां चुकून सांपडेल ( इतक्या अशक्य गोष्टी एकवेळ घडून येतील ) पण हेकट मूर्खाचें समाधान करणें शक्य होणार नाहीं

---

एको हि दोषो गुणसन्निपाते
निमज्जतीत्येतदयुक्तमुक्तम् ॥
रूपादिकान्सर्वगुणान्निहन्ति
किं मौर्ख्यमेकं न शरीरभाजाम् ? ॥ ११ ॥

उपजाति

"मोठ्या गुणीं दोषहि एक लुप्त"
म्हणे कुणी तें दिसतें न युक्त ॥
रूपादि सारे गुण, मौर्ख्य एक
नाशी नराचे नच काय ? देख ॥ ११ ॥

गद्यार्थ—

"एक दोष गुणसमुच्चयात लोपून जातो" हें जे म्हणतात, तें युक्त नव्हे. पहा वरें, रूप इत्यादि अनेक गुण माणसात असले तरी एक मूर्खपणा हा एकटा त्या सर्वांवर बोळा फिरवितो कीं नाहीं?

---

मुक्ताफलं किं मृगपक्षिणां च
मिष्टान्नपानं किमु गर्दभानाम् ? ॥
अन्धस्य दीपो, बधिरस्य गीतं
मूर्खस्य किं धर्मकथाप्रसंगः ? ॥ १२ ॥

उपजाति

मोतीं कशाला पशुपक्षियांना
कशास मिष्टान्नहि गाढवांना ? ॥
अंधा दिवा अन् बहिऱ्यास गाणें
कशास मूर्खास कथा-पुराणें ? ॥ १२ ॥

गद्यार्थ—

पशुपक्ष्यांना मोत्यांचा, गाढवांना मिष्टान्नाचा, आंधळ्याला दिव्याचा, बहिऱ्याला गाण्याचा व मूर्खाला कथापुराणाचा उपयोग काय?

---

मूर्खत्वं सुलभं भजस्व कुमते ! मूर्खस्य चाष्टौ गुणा
निश्चिंतो बहुभोजकोऽतिमुखरो रात्रिंदिवा स्वप्नभाक् ॥
कार्याकार्यविचारणान्धबधिरो मानापमाने समः
प्रायेणामयवर्जितो दृढवपुर्मूर्खः सुखं जीवति ॥ १३ ॥

शार्दूलविक्रीडित

दुर्बुद्धे ! भज मूर्खताच सुलभा; मूर्खांत आठी गुण
तो खादाड निचिंत अन् बडबड्या, स्वप्नांत रात्रंदिन ॥
कार्याकार्यविचारिं अंध, बहिरा, मानापमानीं सम
नीरोगी, तगडा, सदा सुख कुठें कोणास मूर्खासम? ॥

गद्यार्थ—

हे दुर्बुद्धे ! तूं आपली मूर्खताच घेऊन बैस त्याच्यापासून आठ प्रकारचे लाभ असतात. मूर्खाला कसली चिंता नको, खूप खावें प्यावें, बडबडावें, रात्रंदिवस कसली तरी मनोराज्यें करीत असावें, काय करावें, काय न करावें या बाबतींत डोळे व कान झाकून वागावें, त्याला मान व अपमान दोन्ही सारखेच, बहुधा त्याला कसले रोग होत नाहींत व शरीरानें चांगला धडधाकट असतो. मग असा मूर्ख सुखांत राहतो यांत नवल काय?

---

यस्यास्ति सर्वत्र गतिः स कस्मात्
स्वदेशरागेण हि याति नाशम् ? ॥
तातस्य कूपोऽयमिति ब्रुवाणाः
क्षारं जलं कापुरुषाः पिबन्ति ॥ १४ ॥

वसंततिलका

सर्वत्रही गति असे जगतीं जयाला
तो देशभक्ति धरुनी मरतो कशाला ? ॥
ज्यांना विहीर वडिलार्जित प्यार वाटे
त्यांच्या जला वसति पीतचि ते करंटे ॥ १४ ॥

गद्यार्थ—

ज्याला कुठेंही जाता येतें तो स्वदेशाचें प्रेम धरून (स्वदेशांत जगणें अशक्य झालें तरी तेथेंच राहून ) उगाच कशाला मरेल? केवळ वडिलार्जित विहीर आहे म्हणून ( दुसरी न खणतां ) तिचें खारें पाणीच पीत बसण्याचें काम हें करंट्याचें आहे

---

न व्याधिर्न विषं नापत्तथा नाधिश्च भूतले ।
खेदाय स्वशरीरस्थं मौर्ख्यमेकं यथा नृणाम् ॥ १५ ॥

अनुष्टुम्

छळींना जगतीं, रोग, विष, संकट, आधि, वा ॥
तेशी—जैशी स्वदेहींची मूर्खता एक मानवा ॥ १५ ॥

गद्यार्थ—

जगामध्यें एक मूर्खता ही माणसाचा जितका छळ करते, तेवढा, रोग, विष, संकटें किंवा मनाच्या चिंता याही करीत नाहींत.

---

वरं कर्दमभेकत्वं मलकीटकता वरम् ।
वरमन्धगुहाहित्वं न नरस्याविचारिता ॥ १६ ॥

वसंततिलका

होऊन बेडुक, वरें चिखलीं वसावें
शेणामधें, बनुनि कीटकही रहावें ॥
होणें वरें भुजग अन्धगुहांमधून
होणें नको नर परंतु विवेकहीन ॥ १६ ॥

गद्यार्थ—

बेडूक होऊन चिखलांत रहाणें एकवेळ वरें, किंवा किडे होऊन शेणात रहावें, किंवा, सर्प होऊन अधाऱ्या गुहेंत रहावे, परंतु, माणूस होऊन अविचारी मूर्ख होणें नको.

---

श्रेयश्च प्रेयश्च मनुष्यमेत-
स्तौ संपरीत्य विविनक्ति धीरः ।
श्रेयो हि धीरोऽभिप्रेयसो वृणीते
प्रेयो मन्दो योगक्षेमाद्वृणीते ॥ १७ ॥

आर्या

प्रियकर हितकर कर्मीं विवेक तरतम असाच सुज्ञ करी॥
सुज्ञ प्रियाहुनी हित; अज्ञ प्रिय तें हिताहुनीहि वरी ॥१७

गद्यार्थ—

माणसापुढें, प्रिय वाटणारें, व हितकारक अशीं दोन कर्में उभीं राहिल्यास विवेकी माणूस तरतम पाहून निवड करतो; सुज्ञ असेल तो प्रियापेक्षां हिताचें पसंत करतो. मूर्ख विवेकहीन हा तात्पुरत्या गरजेकडे पाहून हितापेक्षां प्रियच स्वीकारतो.

---



# प्रकरण ९ वें

## वित्त, कांचन, धन, श्री, लक्ष्मी, विभव, ऐश्वर्य.

यस्यास्ति वित्तं, स नरः कुलीनः
स पंडितः स श्रुतवान् गुणज्ञः ॥
स एव वक्ता स च दर्शनीयः
सर्वे गुणाः काञ्चनमाश्रयन्ते ॥ १ ॥

उपजाति

धने धनानें नर तो कुलीन
गुणज्ञ विद्वान् बहु ज्ञानवान ॥
वक्ताहि तो, सुंदर तोच होत
सारे रहाती गुण कांचनांत ॥ १ ॥

गद्यार्थ—

(एकदा संपत्ति मिळाली कीं मनुष्य सर्व कांहीं होतो) श्रीमंत मनुष्य कुलीन ठरेल, पंडित, विद्वान्, गुणज्ञ, वक्ता, सुंदर सर्व कांहीं ठरेल. सारे गुण सोन्याचा आश्रय घेतात.

---

बुभुक्षितैर्व्याकरणं न भुज्यते
पिपासितैः काव्यरसो न पीयते ॥
न छंदसा केनचिदुध्दृतं कुलं
हिरण्यमेवार्जय, निष्फला गुणाः ॥ २ ॥

वंशस्थ

क्षुधार्त ते व्याकरणा न भक्षिती
तृषार्त ही काव्यरसा न वा पिती ॥
छंदें कुळा उद्धरिलें कुणीहि न
तूं मेळवीं वित्तचि; फोल सद्गुण ॥ २ ॥

गद्यार्थ—

भूक लागली कीं कोणी व्याकरण खात नाहींत, किंवा तहान लागली कीं काव्यरस पीत नाहींत. छंदःशास्त्र, वृत्तशास्त्र शिकून कोणी कुळाचा उद्धार केलेला नाहीं. तेव्हां हे सर्व निष्फळ गुण मिळवीत बसण्यापेक्षां तूं आपला संपत्तीच मिळव.

---

जातिर्यातु रसातलं, गुणगणस्तस्याप्यधो मज्जतां
शीलं शैलतटात्पतत्वभिजनः संदह्यतां वह्निना ॥
शौर्ये वैरिणि वज्रमाशु निपतत्वर्थोऽस्तु नः केवलं
येनैकेन विना गुणास्तृणलवप्रायाः समस्ता इमे ॥ ३ ॥

शार्दूलविक्रीडित

जावो जात रसातळास; बुडुं दे त्याहूनि खालीं गुण
फेका शील कड्याहुनी, अभिजना अग्नींत या जाळुन ॥
वज्रें शौर्य मरो त्वरेंचि; धन तें आम्हां मिळो केवळ
सारे सद्गुण ज्या विना, तृणपरी होतात हे निष्फळ ॥ ३ ॥

गद्यार्थ—

(दारिद्र्यानें गांजलेला कवि चिडून म्हणतो—) जातीचा माझा अभिमान रसातळास जावो. मिळविलेले सारे गुण त्याच्याही खालीं बुडूं देत. शील डोंगराच्या कड्यावरून खालीं पडो; सत्कुलांत जन्म विस्तवांत जळो, शौर्यावर त्वरित वज्र पडो, —ज्या एका संपत्तीविना आमचे सारे गुण तृणासमान निष्फळ होऊन जातात—ती संपत्तीच केवळ आम्हांस प्राप्त होवो.

---

न वित्तं दर्शयेत्प्राज्ञः कस्यचित्स्वल्पमप्यहो ॥
मुनेरपि धनस्यस्य मनश्चलति दर्शनात् ॥ ४ ॥

अनुष्टुभ्

दाखवावें न सुज्ञानें कुणाला अल्पही धन ॥
वनस्थहि मुनीचें तें पाहुनी चळतें मन ॥ ४ ॥

गद्यार्थ—

सुज्ञानें कुणालाही थोडीही संपत्ति दाखवूं नये. अगदीं रानांत राहणाऱ्या मुनीचें सुद्धां धन पाहून मन चळतें.

---

बधिरयति कर्णकुहरं, वदनं मूकयति, नयनमन्धयति ॥
कुटिलयति गात्रयष्टिं संपद्रोगोऽयमद्भुतो लोके ॥ ५ ॥

आर्या

कानां करितो बहिरे, वदनास मुकें, नि अंध नेत्रांस ॥
वक्र करी देहातें, अद्भुत धनरोग हा जगीं खास ॥५॥

गद्यार्थ—

कान बहिरे करतो, तोंड मुकें करतो, डोळे आंधळे करतो, शरीर वाकडेंतिकडें करतो, असा हा धनरूपी रोग मोठा अद्भुत होय

———०———

दानं भोगो नाशस्तिस्रो गतयो भवन्ति वित्तस्य ॥
यो न ददाति न भुङ्क्ते तस्य तृतीया गतिर्भवति ॥६॥

आर्या

दानें, उपभोगानें, नाशानें, या धनास गति तीन ॥
देइ न, भोगि न, तद्धन तिसऱ्या गतिनेंचि जाइ नासून ६

गद्यार्थ—

देणें, उपभोगणें किंवा नष्ट होणें या, संपत्तीच्या तीन गति आहेत जो देत नाहीं, भोगत नाहीं, त्याच्या धनाची तिसरी गतीच ( नाश ) व्हावयाची

———०———

चत्वारो धनदायादा धर्माग्निनृपतस्कराः ॥
तत्र ज्येष्ठावमानेन त्रयः कुप्यन्ति बांधवाः ॥ ७ ॥

आर्या

वांटेकरी धनाचे धर्म, अग्नि, नृप, नि चोर हे चार ॥
वडिलाच्या अपमानें बाकीचे तीन कोपती फार ॥७॥

गद्यार्थ—

प्रत्येकाच्या धनाचे, धर्म, अग्नि, नृप व चोर हे चार वांटेकरी असतात त्यांतला वडील धर्म. त्याचा जर धनवतानें अपमान केला ( म्हणजे तो अधर्मानें वागू लागला ) तर बाकीचे तीन त्यावर रागवतात ( म्हणजे त्याची संपत्ति, अग्नि जाळील, किंवा राजा हरण करील, किंवा चोर लुटून नेईल )

———०———

प्रायेण धनिनामेव धनलोभो निरन्तरम् ॥
पश्य कोटिद्वयोपेतं लक्षाय प्रणतं धनुः ॥ ८ ॥

अनुष्टुभ

श्रीमंतांनाच हो नित्य धनाची हाव वाटते ॥
लक्ष्याकरितां धनू वांके दोन कोटि असून तें ॥ ८ ॥

गद्यार्थ—

श्रीमंतांनाच नेहमीं धनाची हाव असते पहा—की धनुष्याला दोन कोटी ( टोकें ) असून सुद्धा लक्ष्यासाठीं तें ( नेमावर बाण मारण्यासाठीं ) वाकून असते ( दोन कोटींची संपत्ति असलेला एक लक्षासाठीं वाकेलच. )

———०———

"पद्मे मूढजने ददासि विभवं, विद्वत्सु किं मत्सरः?"
"नाहं मत्सरिणी न चापि चपला, नैवास्ति मूर्खे रतिः ॥
मूर्खेभ्यो द्रविणं ददामि नितरां तत्कारणं श्रूयतां–
विद्वान् सर्वजनेषु पूजिततनुर्मूर्खस्य नान्या गतिः" ॥९॥

शार्दूलविक्रीडित

"लक्ष्मी ! मूर्ख नरास देसि धन, कां
विद्वज्जनीं मत्सर ? "
"नोहें मत्सरिणी न चंचलहि मी;
न प्रीति मूर्खांवर ॥
मूर्खां कां अतिमात्र देइं धन मी,
ऐकाच तें कारण—
विद्वानां जन सर्व पूजिति, परी
मूर्खां गती अन्य न" ॥ ९ ॥

गद्यार्थ—

" हे देवि लक्ष्मी ! तू मूर्खांना धन देतेस आणि विद्वानांचा का बरें मत्सर करतेस?" ( असें भक्तानें विचारल्यावरून लक्ष्मी उत्तर देते ) " मी मत्सरी नाहीं, चंचल नाहीं व मूर्खांवर प्रेम करते हेंही खरें नाहीं परतु मी मूर्खांना पुष्कळ धन देतें ( हें खरें आहे) त्याचें कारण ऐका—विद्वानांना सर्व जग मानसन्मान देते ( व त्यामुळें एक प्रकारें धनाची भरपाई करतें ) पण मूर्खांला ( जर धन न दिलें तर ) दुसरी काय गति आहे ?

———०———

लक्ष्मीवन्तो न जानन्ति प्रायेण परवेदनाम् ॥
शेषे धराभराक्रान्ते शेते नारायणः सुखम् ॥ १० ॥

अनुष्टुभ

प्रायें न परदुःखातें लक्ष्मीवान् कधिं जाणतो ॥
पृथ्वीभारें श्रांत शेषीं सुखानें विष्णु झोंपतो ॥ १० ॥

गद्यार्थ—

लक्ष्मीवन्त ( धनवन्त, पक्षी लक्ष्मीपति विष्णु ) अशा लोकांना बहुधा दुसऱ्यांच्या दुःखाची कांहीं कल्पनाच नसते पृथ्वी आपल्या

मणावर दचलून दमलेल्या शेषावर लक्ष्मीवत विष्णु सुखानं झोंपतो ( शेषाचें दुःख त्याला काय होय ? )

---

आलस्यं स्थिरतामुपैति, भजते चापल्यमुद्योगितां
मूकत्वं मितभाषितां वितनुते मौढ्यं भवेदार्जवम् ॥
पात्रापात्रविचारणाविरहिता यच्छत्युदारात्मतां
मातर्लक्ष्मि ! तव प्रसादवशतो दोषा अमी स्युर्गुणाः ११

शार्दूलविक्रीडित

आलस्या म्हणती थिमेपण, वने चापल्य उद्योगिता
मूकत्वें मितभाष होइ, ऋजुता त्याची ठरे मूर्खता ॥
पात्रापात्र कळे न त्यास, तरि तें औदार्य मानी जन
माते लक्ष्मि ! तुझा प्रसाद घडतां हे दोष होती गुण॥

गद्यार्थ—

माते लक्ष्मी ! तू एकदा माणसावर प्रसन्न झालीस म्हणजे त्याच्यातल्या दोषांनाही कसें गुणाचें रूप दिलें जातं पहा—(श्रीमंत) आळशी असला की म्हणावयाचें धिम्या स्वभावाचा आहे उपद्व्यापी असला की म्हणे तो उद्योगी ! मुका असला तर मितभाषी ! मूर्ख असला तर म्हणे अगदीं सरळस्वभावाचा ! आणि पात्रापात्र कळत नसल्यानें वाटेल तसें दान देत सुटला की म्हणे हा उदार वर्णाचा अवतार !

---

आपद्गतं हससि किं द्रविणान्ध मूढ !
लक्ष्मीः स्थिरा न भवतीति किमत्र चित्रम् ? ॥
एतान्प्रपश्यसि घटान् जलयन्त्रचक्रे
रिक्ता भवन्ति भरिता, भरिताश्च रिक्ताः ॥ १२ ॥

वसंततिलका

आपद्गता हंससि का द्रविणान्ध मूर्खा ?
"लक्ष्मी स्थिरा न" तुज विस्मय यांत रे का ? ॥
पाहें—रहाट फिरतां घट रिक्त कांहीं—
जाती भरूनि—परि रिक्तचि पूर्ण तेही ॥ १२ ॥

गद्यार्थ—

( चक्रनेमिक्रमेण सर्वांना संपत्ति आपत्ति येतच असतात अशा आपत्तींतल्या कोणाला पाहून एक धनाढ्य हसला त्याला कवि म्हणतो )

हे धनान्ध मूर्खा ! आपत्तींत सापडलेल्याला तू हसतोस काय ? लक्ष्मी कधीं स्थिर रहात नाहीं यांत तुला आश्चर्य का वाटावें ? हें पहा रहाटगाडगें चालू आहे यांतील घट कांहीं रिकामे आहेत ते भरले जात आहेत तर दुसरे कांहीं भरलेले आहेत ते रिकामे होत आहेत

---

नो सेवा विहिता मनागपि गुरोर्नो वा कृतं पूजनं
देवाना विधिवन्न वा शिवगिर स्निग्धादयः सेविताः ॥
किन्तु त्वच्चरणौ सरस्वति ! रमादा जन्मनः सेवितौ
तस्मान्मां विजहाति सा भगवती शङ्के सपत्नी तव ॥ १३ ॥

शार्दूलविक्रीडित

मी ना सेवियलें गुरूंस मुळिंही,
मित्रांस ना सेविलें
सारे योग्य विधी करून न च वा
देवांस मी पूजिलें ॥
प्रेमानें पद, हे सरस्वति ! तुझे
आजन्म मी सेवितां
त्यानेंची सवती त्यजी तव, मला
ही येइ शंका अतां ! ॥ १३ ॥

गद्यार्थ—

( आजन्म सरस्वतीची उपासना करूनही कवि निर्धनच कां राहिला याचें कारण त्याला उमगलें— )

मी गुरुजनाची थोडीही सेवा केली नाहीं—देवांना षोडशोपचारें पूजिल नाहीं अरे ! अरे ! मित्रादिकांचीही सेवा केली नाहीं परंतु जन्मभर, हे सरस्वति ! प्रेमानें तुझी चरणसेवा करीत आलों त्यामुळेच कीं काय, तुझी सवती ( लक्ष्मी ) माझा त्याग करती झाली अशी मग आतां शंका येत आहे

---

लक्ष्मि ! क्षमस्व वचनीयमिदं दुरुक्त-
मन्धीभवन्ति पुरुषास्त्वदुपासनेन ॥
नो चेत् कथं कमलपत्रविशालनेत्रो
नारायणः स्वपिति पन्नगभोगतल्पे ? ॥ १४ ॥

वसंततिलका

मी निंदितों परि क्षमा कर लक्ष्मि ! मातें
तूतें पुजूनि बनती जन अंध वाटे ॥
नाहीं तरी नयन पद्मविशाल ज्यातें
सर्पीहि तो शयन विष्णु करें करी तें ? ॥ १४ ॥

गद्यार्थ—

हे लक्ष्मी! मी तुझी निंदा करतों याबद्दल तू मला क्षमा कर. तुला पूजिल्यानें माणूस आंधळा होतो (हें निःसंशय.) तसें नसतें तर कमलदलाप्रमाणें मोठे डोळे असलेला विष्णु, सर्पांची गादी करून त्यावर निजतो हें कसें?

——०——

वाक्चक्षुःश्रोत्रलयं लक्ष्मीः कुरुते, नरस्य को दोषः ?॥
गरलसहोदरजाता न मारयति यच्च तच्चित्रम् ॥१५॥

आर्या

नरदोष काय ? लक्ष्मी वाक् चक्षु श्रोत्र यां करीच लय ॥
✓ विषभगिनी असुनी ती घेई न प्राण हेंचि आश्चर्य ॥१५

गद्यार्थ—

लक्ष्मी ही माणसाच्या वाणीचा, डोळ्यांचा व कानाचा सत्यानाश करते—माणसाचा बिचाऱ्याचा काय दोष? लक्ष्मी ही (समुद्रमंथनांत त्याच्या बरोबर जन्मल्यानें) विषाची बहीणच असून माणसाचें प्राणहरण करीत नाहीं हेंच आश्चर्य

——०——

पीतोऽगस्त्येन तातश्चरणतलहतो वल्लभोऽन्येन रोषा–
दाबाल्याद्विप्रवर्यैः स्ववदनविवरे धार्यते वैरिणी मे ॥
गेहं मे छेदयन्ति प्रतिदिवसमुमाकान्तपूजानिमित्तं
तस्मात् खिन्ना सदाहं द्विजकुलसदनं नाथ !
युक्तं त्यजामि ॥ १६ ॥

स्रग्धरा

प्याला पापा अगस्ती;
मम पतिस दुजा कोपुनी लाथ मारी
बाल्यापासुनि देवी
द्विज मुखिं मम ती वैरिणी दुष्ट मारी ॥
तोडीती मद्गृहातें
द्विज अनुदिन ते पूजिण्यातें शिवातें
तेणें संतत नाथा !
द्विजसदन सदा मोडितें, युक्तची तें ॥ १६ ॥

गद्यार्थ—

(तुझा ब्राह्मणांवर एवढा राग कां? म्हणून विष्णूनें विचारतां लक्ष्मी उत्तर देते—) एका (ब्राह्मणानें) अगस्तीनें माझ्या बापाला (समुद्राला) पिऊन टाकलें. दुसऱ्या एकानें (भृगु ऋषींनीं विष्णूला लाथ मारल्याची कथा आहे.) माझ्या दिव-कराला रागानें लाथ मारली; अखिल ब्राह्मण जात बाल्या-पासून, माझी वैरीण जी सरस्वती तिला आपल्या मुखांत धारण करते, (विद्याभ्यास करतात,) आणि उमेचा पति जो शंकर (म्हणजे माझ्या पतीचा प्रतिस्पर्धीच) त्याची पूजा करण्याच्या निमित्तानें हेच ब्राह्मण माझें घर (कमल) रोज उपटतात या सर्व अपराधांमुळें संतापून, हे नाथा! मी ब्राह्मणाचें घर सकारणच कायमचें सोडतें.

——०——

चांचल्यमुच्चैःश्रवसस्तुरङ्गात्
कौटिल्यमिन्दोर्विषतो विमोहः ॥
इति श्रियाशिक्षि सहोदरेभ्यो
न वेद्मि कस्मान्मतिमद्विरोधः ॥ १७ ॥

वसंततिलका

उच्चैःश्रवा तुरग चंचलतेस देई
देई शशी कुटिलता; विष मोह देई ॥
लक्ष्मी शिके, सकल हें निजबन्धुंतून
विद्वद्विरोध शिकली; न कळे कुठून ! ॥ १७ ॥

गद्यार्थ—

(समुद्रमंथनाचेवेळीं ज्याच्याबरोबर लक्ष्मी जन्माला आली ते सर्व तिचे भाऊ. त्यापैकीं) उच्चैःश्रवस्, या घोड्याकडून ती चांचल्य शिकली, चंद्रकोरेपासून वक्रता शिकली, बेशुद्ध करण्याची कला विषापासून शिकली. हें सर्व लक्ष्मी आपल्या भावांकडून शिकली. (तेव्हां त्यांचा उद्गम कोठून तें समजलें.) पण विद्वानांविषयीं द्वेष मात्र लक्ष्मी कोणाकडून शिकली तें कांहीं कळत नाहीं.

——०——

या स्वसद्मनि पद्मेऽपि संध्यावधि विजृम्भते ॥
इन्दिरा मन्दिरेऽन्येषां कथं स्थास्यति निश्चला ? ॥१८॥

आर्या

जी निजपद्मगृहांतहि
संध्या होई न तोंवरचि वसते ॥
अन्यगृहीं लक्ष्मी ती
स्थिर पद अपुलें करील कां कधिं तें ? ॥१८॥

गद्यार्थ—

जी लक्ष्मी स्वतःच्या घरांत (कमलांत) सुद्धां संध्याकाळ होईपर्यंतच (संध्याकाळीं कमलें मिटतात) राहते, ती दुसऱ्याच्या घरीं स्थिरपणें कशी राहील? (म्हणून ती चंचल.)

——०——

अशठमलोभमजिह्मं त्यागिनमनुरागिणं विशेषज्ञम् ॥
यदि नाश्रयति नरं श्रीः श्रीरेव हि वञ्चिता तत्र॥१९॥

आर्या

सरल, अलोभ नि ऋजु जो,
त्यागी, प्रेमी, विशेष ज्या ज्ञान ॥
जर त्या न वरी लक्ष्मी,
तर ती, वाटे, स्वयें वसे फसुन ॥ १९ ॥

गद्यार्थ—

अकपट, अलोभ, सरळ, त्यागी, प्रेमी, विद्वान, अशा माणसाला जर लक्ष्मी वरीत नसेल तर तिची स्वतःचीच फसवणूक होत आहे असें म्हटलें पाहिजे.

———०———

हालाहलं नैव विषं विषं रमा
जनः परं व्यत्ययमत्र मन्यते ॥
निपीय जागर्ति सुखेन तच्छिवः
स्पृशन्निमां मुह्यति निद्रया हरिः ॥ २० ॥

इंद्रवंशा

लक्ष्मीचि, हालाहल ना खरें विष
लोकांसि वाटे उलटेंचि खास ॥
पिऊनि तें जागृति ये शिवाला
स्पर्शें हिच्या विष्णुसि मोहनिद्रा ॥ २० ॥

गद्यार्थ—

हालाहल हें विषच नव्हे—खरें विष आहे लक्ष्मी ! परंतु (हें कोण जाणे ! ) लोक आपलें उलटेंच मानतात. (प्रत्यक्ष परिणामाच्या दृष्टीनें पाहिलें तर ) तें विष पिऊन शंकर सुखानें जागृतींत राहतो ! इकडे पाहिलें तर या लक्ष्मीच्या नुसत्या स्पर्शानें विष्णूला मोहनिद्रा येते. (बेशुद्ध पाडणें हा विषाचा धर्म आहे.) (शंकर सदा जागृत व विष्णू सदा निद्रिस्त हें सर्वश्रुत आहेच.)

———०———

न पुत्रायत्तमैश्वर्यं कुर्यादार्यः कथंचन ॥
पुत्रार्पितप्रभुत्वोऽभूद्धृतराष्ट्रस्तृणोपमः ॥ २१ ॥

अनुष्टुभ्

यावें सुधें न केव्हांही, निजैश्वर्य मुलां करीं ॥
देतां सत्ता मुलां, झाला धृतराष्ट्र तृणापरी ॥ २१ ॥

गद्यार्थ—

सुज्ञानें आपलें ऐश्वर्य कधीं मुलांच्या हातीं देऊं नये. तें तसें दिल्यानें धृतराष्ट्र अगदीं करपटाप्रमाणें झाला.

———०———

तानीन्द्रियाणि सकलानि तदेव कर्म
सा बुद्धिरप्रतिहता वचनं तदेव ॥
अर्थोष्मणा विरहितः पुरुषः स एव
त्वन्यः क्षणेन भवतीति विचित्रमेतत् ॥२२॥

वसंततिलका

तीं इंद्रियें सकल; कर्महि तें असोनी
बुद्धी अकुंठितहि तीच; तशीच वाणी ॥
होई दुजाच-जर ऊब निघे धनाची
पक्या क्षणें; किति विचित्रतऱ्हा जगाची ॥

गद्यार्थ—

माणसाचीं ( दारिद्र्य येण्यापूर्वी ) इंद्रियें, होतीं तींच असून; कर्म होतें, तेंच असून; बुद्धि पूर्वी होती तशीच अकुंठित असून; बोलणें पूर्वी होतें तसेंच असून;—केवळ धनाची ऊब होती ती निघाल्याबरोबर क्षणाभरात तो मनुष्य जगाला निराळाच वाटूं लागावा ही जगाची केवढी विचित्र तऱ्हा आहे !

———०———

लज्जे ! त्वं मज्ज सिन्धौ,
गिरिवरशिखरे त्वं च तिष्ठ प्रतिष्ठे !
शांते ! प्रान्ते दिशान्ते
कुरु वसतिमहो गर्व ! खर्वो भवाशु ॥
तेजः ! पातालमूलं
भज भुवि भगवन् मान ! मा नाम तेऽस्तु
प्रेम्णैकामाह्वयन्तीं
सततमहमिमां तूर्णमाशां श्रयिष्ये ॥ २३ ॥

सुमंदारमाला

बुडी मार अब्धींत लज्जे ! प्रतिष्ठे !
गिरीच्या शिरीं बैस तूं जाउन ।
दिगन्तीं रहा शांतते ! तूंहि; गर्वा !
रहा होउनी तूं क्षणीं वामन ॥
रहा तेज ! पातालमूलीं; स्वमाना !
न राहो तुझें नाम ही भूवरी ।
मला प्रीतिनें वाहते जी धनाशा
अनन्याश्रया मी तियेच्या वरी ॥ २३ ॥

गद्यार्थ—

(दारिद्र्याला त्रिडून, पण धनप्राप्तीतही, लज्जा, स्वाभिमान, सोडावे लागतात, त्याचाही संताप येऊन, वैतागानें कवि म्हणतो) हे लज्जे! तूं समुद्रांत बूड, प्रतिष्ठे! तूं डोंगरावर जाऊन बैस, हे शान्तते! जा! दूर दिगन्तीं जाऊन रहा! गर्वा! तूं वामन-रूप धारण कर तेजा! तूं पातालीं जा; स्वाभिमाना! तुझें नांव सुद्धां यापुढें न उरो! आतां मी (आजवर प्रिय मानलेलीं सर्व मूल्यें सोडून) मला प्रेमानें बोलावणाऱ्या धनाशेच्या—तिच्या एकटीच्याच—आश्रयाला त्वरित जात आहें, तो कायमचाच!

---

वयोवृद्धास्तपोवृद्धा ये च वृद्धा बहुश्रुताः ॥
ते सर्वे धनवृद्धस्य द्वारि तिष्ठन्ति किंकराः ॥ २४ ॥

अनुष्टुभ्

वयोवृद्ध तपोवृद्ध आणि वृद्ध बहुश्रुत ॥
ते सर्व धनवृद्धाच्या दारीं नोकर तिष्ठत ॥ २४ ॥

गद्यार्थ—

वयानें वृद्ध असोत, तपानें वृद्ध असोत, विद्याभ्यासानें वृद्ध असोत, ते सारे धनानें वृद्ध असेल त्याच्या दाराशीं विचारे नोकराप्रमाणें तिष्ठत असतात.

---

यथा ह्यामिषमाकाशे पक्षिभिः श्वापदैर्भुवि ॥
भक्ष्यते सलिले मत्स्यैस्तथा सर्वत्र वित्तवान् ॥ २५ ॥

अनुष्टुभ्

श्वापदें भूवरी; पक्षी नभीं खातात आमिषा ॥
मासे जळीं; भक्ष्य होई श्रीमान् सर्वत्रही तसा ॥२५॥

गद्यार्थ—

ज्याप्रमाणें आमिषार्थ लावलेलें मांस हें आकाशांत पक्ष्यांकडून जमीनीवर श्वापदांकडून, व पाण्यांत मत्स्यांकडून तोडतोडून खाल्लें जातें, तसा श्रीमंत सर्वत्र सर्वांचा भक्ष्य होत असतो.

---

गंगां च धारयति मूर्ध्नि सदा कपाली
सा तस्य चुम्बति मुखं न कदाचिदेव ॥
रत्नाकरं प्रति चुचुम्ब सहस्रवक्त्रै-
र्गङ्गादयो युवतयः सधनानुकूलाः ॥ २६ ॥

वसंततिलका

गंगेसि मस्तकिं धरी नित कृत्तिवास
त्याच्या कधीं न परि चुंबित ती मुखास ॥
रत्नाकरा शतमुखीं परि चुंबिते ती
गंगादि सर्व युवती धनलुब्ध चित्तीं ॥२६॥

गद्यार्थ—

गंगेला शंकरानें नेहमीं आपल्या डोक्यावर चढवून ठेवली असूनही ती कधींहि त्याचें मुख चुंबीत नाहीं—परंतु (दूर जाऊन) त्या रत्नाकराचें (समुद्र) सहस्र मुखांनीं चुंबन घेते (जाऊन मिळते) (शंकर हा दिगंबर दरिद्री) (समुद्र हा रत्नांचा आकर) तेव्हा गंगादि तरुणी एकंदरींत श्रीमंतानाच अनुकूल असतात!

---

तीक्ष्णादुद्विजते, मृदौ परिभवत्रासान्न संतिष्ठते
मूर्खान्द्वेष्टि, न गच्छति प्रणयितामत्यंतविद्वत्स्वपि ॥
शूरेभ्योऽप्यधिकं बिभेत्युपहसत्येकान्तभीरूनहो
श्रीर्लब्धप्रसरेव वेशवनिता दुःखोपचर्या भृशम् ॥ २७ ॥

आर्या

कडक नराला भिटते;
अपमानभयें न नेभळ्यास वरी।
मूर्खांचा द्वेष करी;
प्रेम न विद्वज्जनांवरीहि करी ॥
शूरां अधिक भिते ही
धरिते उपहासवृत्ति भित्र्यांस।
श्री वरचढ वेश्येपरि
समाराधण्या असे कठिण खास ॥ २७ ॥

गद्यार्थ—

लक्ष्मी ही कडक स्वभावाच्या माणसाला भिटते; आपला अपमान होईल (नेभळटाच्या बायकोचा कुणीही अपमान करावा) या भीतीनें नेभळटाच्या वाट्याला उभी राहात नाहीं; मूर्खांचा द्वेष करते; अतिशय विद्वान् हिला आवडत नाहींत; शूरांना विशेषच भिते (कारण ते तिचा वरचष्मा चालूं देणार नाहींत.) अत्यंत भित्र्या माणसाचा ती उपहास करते. एकूण लक्ष्मी ही सर्वतोपरी वरचढ अशा वेश्येप्रमाणें अगत्यानें तिची आराधना करणें महा कर्म कठीण

---

स्त्रीरूपं मोहकं पुंसो यून एव भवेत्क्षणम् ॥
कनकं स्त्री-बालवृद्धपंढानामपि सर्वदा ॥ २८ ॥

आर्या

तरुणचि पुरुषा केवळ पाडी स्त्रीरूप मोह पळभर तें ॥
स्त्री-वृद्ध-बाल-पंढां कनक परी सर्वकाळ मोहवितें ॥

गद्यार्थ—

स्त्रीसौंदर्य हें केवळ तरुण पुरुषाला, आणि तेंहि क्षणभरच मोह पाडतें. पण कनक हें, स्त्री, बाल, वृद्ध, पंढ या सर्वांनाच सर्वकाळ मोह पाडणारें असतें.

---

गोभिः क्रीडितवान् कृष्ण इति गोसमबुद्धिभिः ॥
क्रीडत्यद्यापि सा लक्ष्मीरहो! देवी पतिव्रता॥ २९

साकी

हरि गाई बैलांत खेळला म्हणुनी लक्ष्मी अजुनी ॥
गोसमबुद्धिजनांतचि रमते, पतिव्रता ! ती म्हणुनी ॥

गद्यार्थ—

कृष्ण गाई बैलांत खेळला म्हणून त्याची पतिव्रता पत्नी लक्ष्मी ( पतीसारखें करावयाच म्हणून ) अजून गाईबैलाइतपतच बुद्धि असलेल्या लोकांत रमते.

---

ईशे पद्मप्रणयभाजि मुहूर्तमात्रं
प्राणप्रियेऽपि कुरु मानिनि मा प्रसादम् ॥
जानातु मत्प्रभुरसौ पदयोर्नताना-
मस्मादृशां खलु मनोरथभङ्गदुःखम् ॥ ३० ॥

शार्दूलविक्रीडित

तो प्राणप्रिय विष्णु येइ तुझिया पायां पडाया जरी
हे लक्ष्मी! क्षण तूं प्रसन्नच मुळीं होऊं नको त्यावरी!
त्याचे पाय धरावयास रिघती जे आर्त माझ्यापरी
त्यांचें इप्सितभंग-दुःख कळुं दे त्यालाहि थोडें तरी ॥

गद्यार्थ—

( कवि लक्ष्मीस विनविनो) हे मानिनी लक्ष्मी, विष्णु ( तुझी समजूत घालण्याकरितां ) तुझ्या पाया पडायला येईल तेव्हां क्षणभर क्षमा धरून तुझ्या त्या प्राणप्रियावर तू प्रसन्न होऊं नकोस ! आमच्यासारखे जे, देवाच्या सतत पाया पडत असून, आमचे मनोरथ, देवानें पूर्ण न केल्याचें दुःख भोगत असतात, त्यांच्या दुःखाचा, थोडातरी नमुना त्याला चाखूं दे ! ( तो खुद्द लक्ष्मीलाही टोमणा आहेच. )

---

तिर्यक्तां भजतु प्रतारयतु वा धर्मक्रियाकोविदं
हन्तु स्वां जननीं पिबत्वपि सुरां शुद्धां वधूमुज्झतु ॥
वेदान्निन्दतु वा हिनस्तु जनतां किं बाऽनया चिन्तया
लक्ष्मीर्यस्य गृहे स एव भजति प्रायो जगत्पूज्यताम् ३१

शार्दूलविक्रीडित

होवो तो पशु धार्मिकांस फसवो, मारो स्वमातेसही
प्राशो मद्य, विशुद्ध पत्निस वनीं टाकोचि निष्पापही ॥
निंदो वेद; वधो जना; परि अहो चिंता किती व्यर्थ ही ?
होई पूज्यचि तो जगांत, बहुधा, लक्ष्मी जयाचे गृहीं ॥

गद्यार्थ—

लक्ष्मी शब्दाचे दोन अर्थ ( एक संपत्ति व दुसरी विष्णूची लक्ष्मी. ) ज्याच्या घरात लक्ष्मी, तो बहुधा जगाला पूज्य होतो मग तो पशूसारखा वागो-धार्मिकाला फसवो........ इत्यादि अर्थ पण दुसरा अर्थ—विष्णूच्या घरांत लक्ष्मी असल्यामुळें ( त्याची पुढील सर्व पापें पचून, वर, ) तो जगाला पूज्यच ! वराहावतारात तो प्रत्यक्ष पशू झाला ! वामनावतारांत धार्मिक बलीला फसविलें ! परशुरामावतारात आईचा वध केला कृष्णावताराचे शेवटीं मद्यप्राशन केलें ! रामावतारात निष्पाप पत्नीचा त्याग केला ! बुद्धावतारांत वेदांची निंदा केली ! कलि अवतारांत जनतेचा संहार केला व करीत आहे !

---

यद्यपि धनेन धनिकः क्षितितलनिहितेन भोगरहितेन ॥
तस्माद्वयमपि धनिनस्तिष्ठति नः काञ्चनो मेरुः ॥ ३२

आर्या

भूगत, अभुक्त ऐश्या
वित्तें श्रीमंत होय कुणिहि जर ॥
श्रीमंतचि मग आम्ही;
सुवर्णमेरुहि आमुचाच तर ॥ ३२ ॥

गद्यार्थ—

जर जमिनींत पुरून ठेवलेल्या व भोगल्या न जाणाऱ्या धनानें कोणी श्रीमंत होत असेल तर मग आम्हीहि ( आम्हीच काय पण जगांतील प्रत्येक मनुष्य ) श्रीमंतच आहों व तो सर्व सुवर्णमेरूही आमचाच

---

यो न ददाति न भुङ्क्ते सति विभवे नैव तस्य तद्द्रव्यम् ॥
तृणमयकृत्रिमपुरुषो रक्षति सस्यं परस्यार्थे ॥ ३३ ॥

आर्या

देई भोगी न च जो
धन असतां, तर न वित्त त्याचे तें ॥
बुजगावणें तृणाचें
रक्षी तृण जणुं परार्थ जेसें तें ॥ ३३ ॥

गद्यार्थ—

धन असून, जो, तें देत नाहीं किंवा उपभोगीत नाहीं, तर तें धन त्याचें नव्हे गवताचेंच बुजगावणें जसे गवताचें रक्षण हें परक्यासाठीं करतें, तसाच तो समजावा

———०———

परिक्षीणः कश्चित्स्पृहयति यवानां प्रसृतये
स पश्चात्संपूर्णो गणयति धरित्रीं तृणसमाम् ॥
अतश्चानैकान्त्याद्गुरुलघुतयार्थेषु धनिना-
मवस्था वस्तूनि प्रथयति च संकोचयति च ॥ ३४

शिखरिणी

पसा धान्या इच्छी अधन असतां जो नरचि तो
भरे वित्तानें तं तृणसम जगालाहि गणितो ॥
धनी लोकां कांहीं गुरु लघु असें निश्चित न तें
स्थितीसापेक्षत्वें, अधिक नि कमी वस्तु ठरते ॥ ३४ ॥

गद्यार्थ—

( आइन्स्टाइन्चाच की काय हा सापेक्षतावाद ? ) जो मनुष्य निर्धन असतां एक पसाभर धान्यासाठींसुद्धा याचना करीत असे, तो संपत्तीनें भरून गेल्यावर साऱ्या जगाला तृणवत् मानतो। धनिकांना, अमुक मोठें किंवा अमुक लहान असें कांहीं सततचें निश्चित नसल्यानं, स्थितीच्या सापेक्षत्वानें कोणतीही वस्तु लहान किंवा मोठी, कमी वा अधिक ठरत असते

———०———

संपदा सुस्थितंमन्यो भवति स्वल्पयाऽपि यः ॥
कृतकृत्यो विधिर्मन्ये न वर्धयति तस्य ताम् ॥ ३५ ॥

उपजाति

लाभोनिया अल्पहि संपदेस
वाटेल ज्या सुस्थितसें जिवास ॥
विधीच होई कृतकृत्य, वाटे
न वाढवी यास्तव तद्धनातें ॥ ३५ ॥

गद्यार्थ—

( वित्तार्जनाचा भानगडीचा नियम असा की त्यात अल्पसंतुष्ट होऊन चालत नाहीं )—जो थोडीही संपत्ति मिळून सुस्थ *स्वास्थ्यप्रिय ( म्हणजेच आळशी ) बनतो त्याचे बाबतींत,* मला वाटतें विधि स्वत ला कृतकृत्य समजून मग त्याचें धन वाढवि ण्याचें काम तो बंद करितो ( ज्याची वाढ नाहीं त्याचें मरण सुरु झालेंच )

———०———

किं तया सुमहत्यापि श्रिया देशांतरस्थया ॥
रिपवो या न पश्यन्ति सुहृद्भिर्या न भुज्यते ॥ ३६ ॥

अनुष्टुभ्

देशांतरीं जरी मोठे, असे निष्फल ते धन ॥
दिसते जें न शत्रूंना भोगूं शकति मित्र न ॥ ३६ ॥

मोठी संपत्ति, पण नुसती देशांतरांत असून काय उपयोग की, जी शत्रूच्या नजरेस पडत नाहीं ( आणि त्यामुळें स्वत चें महत्व त्याना दिसत नाहीं ) आणि आपले मित्र जिचा उपभोग घेऊ शकत नाहींत

———०———

———०———

# प्रकरण १० वें

## दारिद्र्य, निर्धनता.

दारिद्र्यात्पुरुषस्य बान्धवजनो वाक्ये न संतिष्ठते
सुस्निग्धा विमुखीभवन्ति सुहृदः स्फारीभवन्त्यापदः ॥
सत्त्वं ह्रासमुपैति, शीलशशिनः कान्तिः परिम्लायते
पापं कर्म च यत्परैरपि कृतं तत्तस्य संभाव्यते ॥ १ ॥

शार्दूलविक्रीडित

येतां निर्धनता, न बांधवजनीं ऐके नराचें कुणी
मोठा प्रेमळ मित्र तोंड फिरवी, आपत्ति ये वाढुनी ॥
जाई सत्त्व लयास, शीलशशिची कांती बने म्लान ती
केलें पाप दुज्या कुणीहि तरि तें यातेंच आरोपिती ॥१॥

गद्यार्थ—

माणसाला एकदां दारिद्र्य आलें की (अनर्थपरंपरा सुरू होऊन) नातेवाईक ऐकेनासे होतात, मोठे प्रेमळ मित्रही तोंड फिरवितात, संकटें वाढतात, सत्त्व कमी होतें, शीलरूपी चंद्राची कान्ति मलिन होते—व दुसऱ्या कोणी पाप केलें असेल त्याचाही आरोप यान्यावर येतो

———o———

उत्थाय हृदि लीयन्ते दरिद्राणां मनोरथाः ॥
बालवैधव्यदग्धानां कुलस्त्रीणां कुचाविव ॥ २ ॥

अनुष्टुभ्

मनोरथ दरिद्रांचे उठुनी हृदिं लोपती ॥
जळुनी बालवैधव्यें स्त्रीस्तनांची जशी गति ॥२॥

गद्यार्थ—

दरिद्री माणसाचे सारे बेत, (महत्त्वाकांक्षा) हृदयांतून उठतात तसेच तेथेंच जिरून जातात जसें बाळपणींच वैधव्य आलेल्या कुलस्त्रीच्या स्तनाचें होतें तसेंच.

———o———

परीक्ष्य सत्कुलं विद्यां शीलं शौर्यं सुरूपताम् ॥
विधिर्ददाति निपुणः कन्यामिव दरिद्रताम् ॥ ३ ॥

अनुष्टुभ्

कुलशील तसी, विद्या, शौर्य, रूप बघूनि तो ॥
कन्या-दरिद्रता त्यातें विधि सुज्ञ समर्पितो ॥ ३ ॥

गद्यार्थ —

(चतुर बाप ज्याप्रमाणें आपल्या मुलीसाठीं चांगले नवरे मुलगे हेरतात त्याप्रमाणें) ब्रह्मदेव एखाद्या माणसाचें कुल, शील, विद्या, शौर्य, सौंदर्य सर्व चांगलें आहे, याची, आधीं निश्चिति करून, मगच, त्याला, आपली कन्या दरिद्रता देतो (गुणवान माणसें नेहमीं दरिद्री का? याचें कारण हें)

———o———

वरं वनं व्याघ्रगजेन्द्रसेवितं
द्रुमालयं पत्रफलाम्बुभोजनम् ॥
तृणानि शय्या वसनं च वल्कलं
न बन्धुमध्ये धनहीनजीवनम् ॥ ४ ॥

इंद्रवंशा

व्याघ्रें गजें सेवितही वरें वन
झाडींत वस्ती फलपत्रभोजन ॥
शय्या तृणाची, तनुवस्त्र वल्कलें
बंधूंत निर्द्रव्य न राहणें भलें ॥ ४ ॥

गद्यार्थ—

हत्तीवाघसारख्या श्वापदांनीं भरलेल्या रानांत जाणें बरें. झाडाखालीं वस्ती केलेली बरी, फळें, पानें खाऊन पोट भरणें बरें, गवतावर निजणें बरें, वल्कलें नेसणेंही बरें, परंतु आपल्या बांधवांत निर्धन राहणें नको.

———o———

दारिद्र्य ! शोचामि भवन्तमेव
ह्रसच्छरीरे सुहृदित्युषित्वा ॥
विपन्नदेहे मयि मन्दभाग्ये
ममेति चिन्ता क्व गमिष्यसि त्वम् ॥ ५ ॥

वसंततिलका

दारिद्य ! शोच्य मज वाटसि तू मनांत
राहोनि मित्रसम दीर्घचि मत्तनूंत ॥
मी हाय हाय ! हतभाग्य मरुन जातां
जाशी कुठें ? म्हणुनिया मज होय चिंता ॥५॥

गद्यार्थ—

(दरिद्री मनुष्य दारिद्याच्या भवितव्याची काळजी करतो) हे दारिद्या ! तुझी अवस्था शोचनीय वाटते इतके दिवस, तू माझ्या शरीरांत, माझा मित्र म्हणून राहून, मी हतभागी मरुन गेल्यावर, तूं कुणाकडे जाशील ? याचीच मला रुखरुख लागून राहिली आहे

—०—

दग्धं खाण्डवमर्जुनेन बलिना दिव्यैर्द्रुमैः सेवितं
दग्धा वायुसुतेन रावणपुरी लङ्का पुनः स्वर्णभूः ॥
दग्धः पञ्चशरः पिनाकपतिना तेनाप्ययुक्तं कृतं
दारिद्र्यं भवतापकारकमिदं केनापि दग्धं न हि ॥ ६ ॥

शार्दूलविक्रीडित

जाळी अर्जुन दूर, खांडव, तरु स्वर्गीय होते जिथ
जाळी मारुति हाहि रावणपुरी सौवर्ण लंकेप्रत ॥
जाळी तो मदनास शंकर तयें तें योग्य केलें नसे
दारिद्या, भवतापकारक अशा, कोणी न जाळी
कसें ? ॥ ६ ॥

गद्यार्थ—

बलिष्ट अर्जुनानें, ज्यांत स्वर्गीय वृक्ष होते असें खाण्डववन जाळलें, मारुतीनें रावणाची सुवर्णनगरी लंका जाळली, शंकरानें मदनाला जाळलें-या सर्वांनी ते मोठें योग्य कृत्य केलें असें नाहीं, कारण उभ्या जगाला ताप देणारें दारिद्य कोणीच कसें जाळलें नाहीं ?

—०—

अहो नु कष्टः सततं प्रवास-
स्ततोऽतिकष्टः परगेहवासः ॥
कष्टाधिका नीचजनस्य सेवा
ततोऽतिकष्टा धनहीनता च ॥ ७ ॥

उपजाति

कष्टी किती हो सतत प्रवासी
त्याहूनि कष्टी परगेहवासी ॥
तीं नीचसेवा उभयांहुनीही
दारिद्य सर्वांहुनि कष्टदायी ॥ ७ ॥

गद्यार्थ—

नेहमीं प्रवास करणारा दुःखी दुसऱ्याच्या घरात राहणारा त्याहून दुःखी, नीचाची नोकरी करणारा त्या दोघाहून दुःखी, पण दरिद्री सर्वांहून दुःखी

—०—

गगनमिव नष्टतारं शुष्कमिव सरः श्मशानमिव रौद्रम् ॥
प्रियदर्शनमपि रूक्षं भवति गृहं धनविहीनस्य ॥ ८ ॥

आर्या

ताऱ्यांविण नभ, सुकलें तळें, भयाण स्मशानही जैसें ॥
प्रिय वाटे तरि रूक्षचि, धनहीनाचें असे गृहहि
तैसें ॥ ८ ॥

गद्यार्थ—

तारे नसलेलें आकाश, सुकलेलें सरोवर आणि भयाण स्मशान, यांच्यासारखेंच, धनहीनाचें घर (ज्याचें त्याला) प्रिय वाटलें तरी रूक्ष असतें.

—०—

पक्षविकलश्च पक्षी शुष्कश्च तरुः सरश्च जलहीनम् ॥
सर्पश्चोद्धृतदन्तस्तुल्यं लोके दरिद्रश्च ॥ ९ ॥

आर्या

पंखाविण पक्षी, तरु वठलेला, जलविना सरोवरही ॥
दांत उपटितां सर्पहि नरहि दरिद्रीच तुल्य जगतीं हीं ९

गद्यार्थ—

पंख नसलेला पक्षी, वठलेलें झाड, सुकलेलें तळें, दात उपटलेला सर्प—आणि दरिद्री हीं सर्व जगीं तुल्य आहेत.

(वरील दोन्ही श्लोकांनाला अंतर्गत अर्थ असा–दरिद्री हा रिक्त आकाशाप्रमाणें दुसऱ्यांना आनंद किंवा प्रभा देत नाहीं, वठलेल्या झाडाप्रमाणें कोणाला छाया आश्रय देत नाहीं, सुकल्या तळ्याप्रमाणें कोणाला जीवन (पाणी) देत नाहीं, पंख तुटलेल्या पक्ष्याप्रमाणें भरारी मारूं शकत नाहीं,—दांत उपटलेल्या सर्पाप्रमाणें—कोणाला दंश सुद्धां करूं शकत नाहीं—(भलें तर नाहींच पण वाईट सुद्धा करूं न शकण्याइतका तो संपूर्ण दुर्बल होतो.)

—०—

हे दारिद्र्य ! नमस्तुभ्यं सिद्धोऽहं त्वत्प्रसादतः ॥
पश्याम्यहं जगत्सर्वं न मां पश्यति कश्चन ॥ १० ॥

अनुष्टुभ्

त्वत्कृपें सिद्ध मी झालों; हे दारिद्र्य ! नमो तुला ॥
पाहें मी जगता साऱ्या न कोणीही बघे मला ! ॥ १० ॥

गद्यार्थ—

हे दारिद्र्या ! मी सर्व जग पाहूं शकतों, पण मला कोणी पहात नाहीं (दरिद्र्याला कोण पाहणार ?) यामुळें मग तुझ्या कृपेनें एक प्रकारची सिद्धीच प्राप्त झाली आहे ! (आपण अदृश्य राहून सर्वांना पाहूं शकणें याला तिरस्करिणी विद्या असें म्हणतात ती सिद्धी दरिद्री माणसाला प्रयास विना मिळते !)

---

जीवन्तोऽपि मृताः पञ्च श्रूयन्ते खलु भारते ॥
दरिद्रो व्याधितो मूर्खः प्रवासी नित्यसेवकः ॥ ११ ॥

अनुष्टुभ्

जीवंत असुनी मेलें वाटे हें सर्व पंचक ॥
दरिद्री मूर्ख अन् रोगी प्रवासी नित्यसेवक ॥११॥

गद्यार्थ—

पुढील पाच माणसें जिवंत असून मेल्या सारखींच आहेत — दरिद्री (हा पहिला) मूर्ख, रोगी, प्रवासी आणि कायमचा दास !

---

एको हि दोषो गुणसन्निपाते
निमज्जतीन्दोरिति यो बभाषे ॥
सत्यं न दृष्टं कविनाऽपि तेन
दारिद्र्यदोषो गुणराशिनाशी ॥ १२ ॥

उपजाति

"दोषैक लोपे शशिसद्गुणांत"
महाकवीनें जरि हेंच उक्त ॥
न सत्य त्याही दिसलें कवीस
दारिद्र्य नाशी अवघ्या गुणांस ॥ १२ ॥

गद्यार्थ—

"पुष्कळ गुणांत एक दोष लोपतो—जसा चंद्रकिरणांत चंद्राचा डाग" इत्यादि जें महाकवीन (कालिदासानें) म्हटलं आहे त्यालाही सत्य दिसलं नाहीं—कारण (एक) दारिद्र्य हा दोष गुणांच्या राशीही नष्ट करतो !

---

अविद्यं जीवनं शून्यं दिक् शून्या चेदबान्धवा ॥
पुत्रहीनं गृहं शून्यं सर्वशून्या दरिद्रता ॥ १३ ॥

उपजाति

विद्येविना जीवन शून्य होतें
शून्या दिशा, बांधव ज्या न, त्यातें ॥
पुत्राविना जें गृह तेंहि शून्य
दारिद्र्य हें चोंहिकडूनि शून्य ॥१३॥

गद्यार्थ—

विद्येशिवाय जीवन शून्य, नातेवाईक नसलेल्याला दिशा शून्य, निपुत्रिकाचें घर शून्य—दारिद्र्य हें सर्व बाजूंनी शून्य !

---

वरं दारिद्र्यमन्यायप्रभवाद्विभवादपि ॥
शरीरे कृशता रम्या, स्थूलता न तु शोफतः ॥ १४ ॥

अनुष्टुभ्

बरें दारिद्र्य, अन्यायें प्राप्त थोर धनाहुनी ॥
तनूची कृशता रम्य सुजेच्या 'बाळसा'हुनी ॥१४॥

गद्यार्थ—

अन्यायानें मिळविलेल्या ऐश्वर्यापेक्षा दारिद्र्य बरें ! सूज आल्यामुळें दिसणाऱ्या स्थूलपणापेक्षा शरीर कृश असलेंच चांगलें दिसतें.

---

दुःखं दुःखमिति ब्रूयान्मानवो नरकं प्रति ॥
दारिद्र्यादधिकं दुःखं न भूतं न भविष्यति ॥ १५ ॥

अनुष्टुभ्

'अत्यंत दुःखदायी' हें नरकास म्हणे नर ॥
झालें, होणें, न दारिद्र्याहुनि कांहीं भयंकर ॥ १५ ॥

गद्यार्थ—

'अत्यंत दुःखदायी' असें, मनुष्य, नरकाला खुशाल म्हणोत— पण, दारिद्र्याहून, अधिक दुःख देणारें, पूर्वी कांहीं झालें नाहीं, व पुढें होणारही नाहीं.

---

किं वाच्यं सूर्यशशिनोर्दारिद्र्यं महतां पुरः ? ॥
दिनरात्रिविभागेन परिधत्तो यदम्बरम् ॥ १६ ॥

आर्या

रविचंद्रांचे केसें वर्णूं दारिद्र्य सज्जनांपुढतीं ? ॥
एक समाइक अंबर दिनरात्रीं जे विभागुनी घेती ॥१६॥

गद्यार्थ—

(अंबर शब्दावर कोटि एक अर्थ वस्त्र व दुसरा अर्थ आकाश) सूर्य चंद्र (ज्यांना आपण मोठे ऐश्वर्यवंत समजतों) यांचें दारिद्र्य मी थोरांचे पुढे काय वर्णूं ? (हे दोघे जरी बाहेर मोठे तेजस्वी म्हणून झळकत असतात तरी स्वतःच्या घरीं खाजगी रीतीनं) हे दोघे एकच (सामायिक) अंबर (वस्त्र, आकाश) एकजण दिवसां व एकजण रात्रीं असें विभागणी करून वापरतात।

---

“कन्थाखण्डमयं प्रयच्छ यदि वा स्वाङ्के गृहाणार्भकं”
“रिक्तं भूतलमत्र नाथ ! भवतः पृष्ठे पलालोच्चयः ॥”
दम्पत्योर्निशि जल्पतोरिति यदा चोरः प्रविष्टस्तदा
लब्धं कर्पटमन्यतस्तदुपरि क्षिप्त्वा रुदन्निर्गतः ॥१७॥

सुमंदारमाला

“मला देइ गे खंड तो गोधडीचा—
मुलालाच वा घेइ मांडीवरी”
“तुसांची तुझ्या पाठिशीं रास नाथा !
नसे वस्त्र कांहीं इथें भूवरी ॥”
निशीं बोलती दंपती यापरी तों
तिथें पातला चोर त्यांच्या घरीं—
पुढें जाइ तो साधु, अन्यत्रहीं लब्ध
फेकोनियां गोधडी त्यांवरी ॥ १७ ॥

गद्यार्थ—

“अग, ए! पत्र, गृह गोधडीचा तुकडा (इथें देऊन तरी) इकडे टाक, नाहींतर या पोराला तू आपल्या मांडीवर तरी घे” असे, दरिद्री नवरा, बायकोला म्हणत आहे “नाथा! तुमच्या पाठीमागें तुसांचा ढीग आहे (तसाच टेका!)— इथें जमिनीवर कपडा पण नाहीं” असें बायको उत्तर देते. नवरा बायको, हें असें, आपसांत बोलताहेत, तों, चोर त्यांच्या घरीं आला (व, त्यानें हें ऐकलें, तेव्हां) गुपचूप, आपल्या पदरचे चोरलेली एक गोधडी, त्यांच्या अंगावर फेकून, तिथून, पळाला व्याकुळ होऊन पुढें चालता झाला।

---

वासश्चर्म विभूषणं शवशिरो भस्माङ्गलेपः सदा
ह्येको गौः स च लाङ्गलाचकुशलः संपत्तिरेतादृशी ॥
इत्यालोच्य विमुच्य शंकरमगाद्रत्नाकरं जाह्नवी
कष्टं निर्धनिकस्य जीवनमहो दारैरपि त्यज्यते ॥१८॥

शार्दूलविक्रीडित

अंगीं भस्म, नि वस्त्र चर्म, कवटी माळा गळां भूषण
शेती-योग्य न, बैल एकच, अशी संपत्ति ही पाहुन ॥
गंगा सोडुनि शंकरा, झणि करी रत्नाकराला पति !
दुःखी निर्धन! हाय! जीवन! नरा दाराहि की टाकिती॥१८

गद्यार्थ—

कातडें, हें वस्त्र, अलंकार, मुंडक्यांची माळ ! अंगाला सदा भस्माचे लेप, एकच बैल, आणि, तोही शेतीच्या कामाचा नव्हे ! ही अशी संपत्ति पाहून, गंगा ही, शंकराला सोडून, रत्नाकराकडे (समुद्राकडे, कारण तो शंकरासारखा भणंग नव्हे, तर रत्नांचा साठा) चालती झाली ! निर्धन माणसाचं जीवन, केवढें दुःखी की, त्याची बायकोसुद्धां त्याला सोडून जाते !

---

उत्तिष्ठ क्षणमेकमुद्वह सखे दारिद्र्यभारं मम
श्रान्तस्तावदहं चिरान्मरणजं सेवे त्वदीयं सुखम् ॥
इत्युक्तं धनवर्जितस्य वचनं श्रुत्वा श्मशाने शवो
दारिद्र्यान्मरणं वरं वरमिति ज्ञात्वैव तूष्णीं स्थितः ॥१९॥

आर्या

“क्षणभर ऊठ, शवा ! मम
धर हा दारिद्र्यभार उचलोनी।
जाण्या थकचा, तोंवर
मरणज तव सुख घेइन चाखोनी ॥”
ऐकुनि अधनवचन हें,
शव, स्मशानीं, मनांत चर्चोनी।
“मरण बरें दारिद्र्या-
हुनि” जाणुनि गप्प राहिलें निजुनी ॥ १९॥

गद्यार्थ—

दारिद्र्याचा भार डोक्यावर घेऊन थकलेला एक माणूस स्मशानांत जाऊन तेथल्या एका प्रेताला म्हणतो—) “हे प्रेता! क्षणभर ऊठ, आणि, माझें एवढें दारिद्र्याचें ओझें जरा उचलून घे, व, मी कित्येक दिवसांचा थकलेलो आहे, तेव्हां, थोडावेळ मी तुझें, मरणामुळें

तुला मिळालेलें सुख, चाखून वघेन म्हणतों," ( पण प्रेतानें कांहींच हालचाल केली नाहीं का? तर कवि म्हणतो, ) अहो त्या प्रेतानें, नीट विचार करून, ठरविलें, की, दारिद्र्यापेक्षां मरणच बरें म्हणूनच तें आपलें कांहीं उत्तर न देतां, होतें तसं, गप्प निजून राहिलं!

———o———

चाण्डालश्च दरिद्रश्च द्वावेतौ सदृशाविह ॥
चाण्डालस्य न गृह्णन्ति दरिद्रो न प्रयच्छति ॥ २० ॥

अनुष्टुभ

चांडाल नि दरिद्री हे दोघेही सम वाटती ॥
चांडालदत्त ना घेती दरिद्री हे न अर्पिती ॥ २० ॥

गद्यार्थ—

चांडाल आणि दरिद्री हे दोघे समान होत चांडालानं दिलेलें कुणी घेत नाहीं दरिद्री कुणाला देत नाहीं

———o———

न तथा बाधते राजन्प्रकृत्या निर्धनो जनः ॥
यथा भद्राणि संप्राप्य तैर्विहीनः सुखोचितः ॥२१॥

अनुष्टुभ

जन्मजात दरिद्री जो घृणास्पद तसा न तो ॥
जेसा श्री लाभुनी गेली तरी चैनीच राहतो ॥२१॥

गद्यार्थ—

संपत्ती मिळून, पुढें नष्ट झाल्यावरही, जो, पूर्वीप्रमाणेंच चैनी राहतो, तो, जितका घृणास्पद वाटतो, तितका, विचारा जन्मजात दरिद्री वाटत नाहीं

———o———

धनं यदि गतं, गतं चरणयुग्मरेणूपमं
धरा यदि गता, गतं कथय मे किमेतावता ? ॥
इदं पुनररुन्तुदं धनिगणैरिदानीन्तनै-
र्दरिद्रगणनाविधौ यदहमङ्कपाते धृतः ॥ २२ ॥

पृथ्वी

झटे धन, तदा गमे चरणधूळ गेलीच ती
त्यजी मज मही तयेंहि यद हानि माझी किती ? ॥
दरिद्रगणना परी, धनिक आज जेव्हां करी
मम प्रथम नाम घेइ—मज शल्य हें अन्तरीं ॥ २२ ॥

गद्यार्थ—

माझें धन गेलें, तर, माझ्या पायांवरची धूळ गेली, (इतकीच, मी त्याला किंमत देतों,) जरी पृथ्वी ( माझ्या हातची ) गेली, तरी, त्यानं माझी काय हानि आहे? सांग परंतु आजचे श्रीमंत लोक जेव्हां, दरिद्री लोकांची यादी करतात, तेव्हां, ते, माझें नांव प्रथम घेतात, हें शल्य, माझ्या मनाला लागून राहिलं आहे

———o———

प्रावरणैरङ्गारैर्गर्भगृहैः स्तनतटैश्च दयितानाम् ॥
सतर्जितमाल्यानां निपतति शीतं दरिद्रेषु ॥ २३ ॥

उपजाति

अग्नीमुळें पांघरुणांमुळेंही
अतर्गृहीं स्त्री कवळून देहीं ॥
श्रीमंत जें हांकलितात शीत
तें निर्धनांच्या शिरतें तनूंत ॥ २३ ॥

गद्यार्थ—

श्रीमंत लोक, पांघरुणें घेऊन, शेक करून, अतर्गृहांत ( निवाऱ्याला बसून ) स्त्रियांना आलिंगून, जी थंडी आपल्या घरांतून हांकलून देतात, ती विचारी, निर्धनाच्या शरीराच्या आश्रयाला येते!

———o———

प्रायेण श्रीमतां लोके, भोक्तुं शक्तिर्न विद्यते ॥
काष्ठान्यपि हि जीर्यन्ते दरिद्राणां च सर्वशः ॥२४॥

अनुष्टुभ

प्रायें श्रीमंत लोकांना, खाण्या शक्तिच ना कदा ॥
दरिद्र्यांना परी खातां काष्ठेंही पचती सदा ॥ २४ ॥

गद्यार्थ—

बहुधा श्रीमंत लोकांना खाण्याची शक्तिच नसते आणि इकडे पहावें तर दरिद्यांना लांकडें खाल्लीं तरी पचून जात!

———o———

# प्रकरण ११ वें

## याचक, हात पसरणारे, ओशाळें अन्न खाणारे, भिक्षुक, दान घेणारे.

करान्प्रसार्य रविणा दक्षिणाशावलम्बिना ॥
न केवलमनेनात्मा दिवसोऽपि लघूकृतः ॥ १ ॥

अनुष्टुभ्

करां पसरितां सूर्य दक्षिणाशेस लागुन ॥
न केवळ स्वताला तो, बनवी लघु तो दिन ॥ १ ॥

गद्यार्थ—

(कर, दक्षिणाशा व लघु या शब्दावर कोटि कर=किरणें किंवा हात, दक्षिणाशा=दक्षिण दिशा; किंवा दक्षिणा मिळविण्याची आशा लघु=हलक्या दर्जाचा, किंवा लांबीला कमी) (सूर्य जणूं याचक अशा अर्थानें)—दक्षिणाशेस लागून, सूर्य, जेव्हां कर पसरतो, (हिंवाळ्यात दक्षिणायनांत जातो,) तेव्हां, तो केवळ स्वतःलाच नव्हे, तर, आपल्याबरोबर, दिवसालाही लघु करतो (सूर्य, लघु म्हणजे कमी प्रखर, दिवस, लांबीला कमी.) याचकवृत्ति धरून, दक्षिणेच्या आशेला लागून, हात पसरले, म्हणजे, माणसाला स्वतःला, व दिनाला, म्हणजे स्वतःच्या जीवनालाही, हलकेपणा येतो, तो पत्करावा लागतो

---

फलं स्वेच्छालभ्यं प्रतिवनमखेदं क्षितिरुहां
पयः स्थाने स्थाने शिशिरमधुरं पुण्यसरिताम् ॥
मृदुस्पर्शा शय्या सुललितलतापल्लवमयी
सहन्ते संतापं तदपि धनिनां द्वारि कृपणाः ॥ २ ॥

शिखरिणी

मनीं इच्छावीं तीं वनिं वनिं फलें गोड मिळतीं
जलें ठायीं ठायीं मधुर सरितांचीं शिशिर तीं ॥
मऊ शय्या खाशी पसरनि लतापल्लव वनें
धनेशद्वारीं कां तरि अधन सोशी कुवचनें ? ॥ २ ॥

गद्यार्थ—

प्रत्येक वनांत हवीं तीं फलें झाडांवरून सहजीं मिळू शकतात, ठायीं ठायीं, पवित्र नद्यांचें थंड व गोड पाणी प्यावयास मिळतें, लुसलुशीत अशी पालवी, व, वेली पसरल्या, कीं, त्याची मृदु शय्या होऊं शकते, तरी निर्धन याचक माणसें, मोठ्या श्रीमंतांच्या दाराशीं जाऊन, त्याचे कटुशब्द सहन करतात (हें केवढें आश्चर्य!)

---

विद्या नाधिगता कलंकरहिता वित्तं च नोपार्जितं
शुश्रूषाऽपि समाहितेन मनसा पित्रोर्न संपादिता ॥
आलोलायितलोचना युवतयः स्वप्नेऽपि नालिङ्गिताः
कालोऽयं परपिण्डलोलुपतया काकैरिव प्रेरितः ॥३॥

शार्दूलविक्रीडित

विद्या शुद्ध न अर्जिली, मिळविलें मी वित्तही ना कधीं
लावोनी मन नीटसें न पितरां मी सेविलें वा कधीं॥
स्वप्नींही न मृगाक्षि सुंदर कुणी आलिंगिली मी पहा
काकाचे सम, अन्न खात परकें, मी कंठिला काळ हा॥३

गद्यार्थ—

पवित्र विद्या मिळविली नाहीं किंवा वित्तही मिळविलें नाहीं, मनापासून गुरुजनाची सेवाही केली नाहीं, किंवा एखादी तरललोचना तरुणी स्वप्नातसुद्धा आलिंगिली नाहीं. हाय, हाय, कावळ्यासारखें, परक्याचें, ओशाळलेलें अन्न खात, मी आयुष्य कंठिलें

---

मृत्पिण्डो जलरेखया वलयितः
सर्वोऽप्ययं नन्वणु-
स्तं स्वीकृत्य सदैव संयुगशतै
राज्ञां गणैर्भुज्यते ॥
नो दद्युर्ददतेऽथवा किमपि ते
क्षुद्रा दरिद्रा भृशं
धिग्धिक् तान्पुरुषाधमान् धनलवान्
वाञ्छन्ति तेभ्योऽपि ये ॥ ४ ॥

शार्दूलविक्रीडित

मातीचा अणु गोल, वेष्टित जलें, पृथ्वी तया मानुनी
त्यातें घेउनि भोगिती नृपति ते युद्धें किती झुंजुनी ॥
क्षुद्रांनीं न दिलें—भिकार नृप हे, देती तरी, अल्पसें
धिक् धिक् त्या अधमास अल्पधन जो
त्यांतेंहि याचीतसे ॥ ४ ॥

गद्यार्थ—

मातीचा अणूइतका लहान गोळा व तो पाण्यानें वेढलेला! त्याला पृथ्वी समजून, अनेक युद्धें झगडून राजे लोक त्या पृथ्वीचा स्वीकार करून तिचा उपभोग घेतात! असे हे भिकारडे क्षुद्र! यांनीं पूर्वी कधीं दान दिलें नाहीं—आज देत असलेच तर अगदीं अल्प! असल्याही नृपांपाशीं जो अधम अल्पसें धन याचितो त्याला धिक्कार असो.

———०———

फलमलमशनाय, स्वादु पानाय तोयं
शयनमवनिपृष्ठे वाससी वल्कले च ॥
धनलवमधुपानभ्रान्तसर्वेन्द्रियाणा-
मविनयमनुमन्तुं नोत्सहे दुर्जनानाम् ॥ ५ ॥

मालिनी

असुनि फल भुकेला, गोड पाणी पिण्याला
धरणिहि निजण्याला, वल्कलें नेसण्याला ॥
धनलवमदिरेनें धुंदशा दुर्जनांचें
सहन कुणि करावें घोर औद्धत्य साचें ? ॥ ५ ॥

गद्यार्थ—

खावयास पुरेशीं फळें, प्यावयास गोड पाणी, निजावयास भूमि, नेसावयास वल्कलें असतांना धनमदिरेनें धुंद झालेल्या दुर्जनांचा उद्धटपणा मी काय म्हणून सहन करूं? (व त्यांच्या पुढें याचना करूं?)

———०———

दीना दीनमुखैस्तथैव शिशुकैराकृष्टजीर्णाम्बरा
क्रोशद्भिः क्षुधितैर्निरन्नविधुरा दृश्येत चेद्गेहिनी ॥
याच्ञाभङ्गभयेन गद्गदगलत्त्रुट्यद्विलीनाक्षरं
को देहीति वदेत्स्वदग्धजठरस्यार्थे मनस्वी जनः ? ॥६

शार्दूलविक्रीडित

ज्या गेहीं अतिदीनशा गृहिणिचीं जीं जीर्णशीं लक्तरें
पोरें दीनमुखीं भुकीं रडुनियां तीं ओढताती करें ॥
याच्ञाभंगभयेंचि बोल अडुनी कंठीं तिथें क्षीणसे
"दे भिक्षा" म्हणवेल दीडवितिच्या पोटार्थ कोणा कसे? ॥ ६ ॥

गद्यार्थ—

ज्या घरच्या भुकेलेल्या दीनवाण्या पोरांकडून, तशाच भुकेलेल्या म्लान गृहिणीचीं फाटकीं वस्त्रें रडत रडत ओढलीं जात आहेत, असें दृश्य पाहून, 'येथें भीक मिळणार नाहीं' या भीतीनें गद्गद कंठांतून अस्पष्ट असे "भिक्षा वाढा" हे शब्द या वीतभरितीचें पोट भरण्यासाठीं कोण शहाणा काढूं शकेल?

———०———

पङ्गो ! वन्द्यस्त्वमसि, न गृहं यासि योऽर्थी परेषां
धन्योऽन्ध ! त्वं धनमदवतां नेक्षसे यन्मुखानि ॥
श्लाघ्यो मूक ! त्वमसि, कृपणं स्तौषि नार्थाशया यः
स्तोतव्यस्त्वं बधिर ! न गिरं यः खलानां शृणोषि ॥७॥

शार्दूलविक्रीडित

पंगो! तू मज वंद्य; अन्यगृहिं कीं भिक्षेस जातोस न
*अंधा! धन्यचि तू–कधीं न बघसी वित्तान्धलोकानन*
मूका! श्लाघ्यचि तू; स्तवीसि कृपणा
द्रव्या न लोभातुर्नी
वानावें बधिरा! तुला; खलवचां घेसी न तू पेकुनी ॥७

गद्यार्थ—

हे पांगळ्या! तू मला पूज्य वाटतोस, कारण तू कधीं दुसऱ्याच्या घरीं भिक्षेला जात नाहींस. हे आंधळ्या! तू खरा धन्य! कारण धनमत्त श्रीमंतांचीं तोंडें तू पाहात नाहींस. हे *मुक्या! तू स्तुतीला पात्र आहेस; कारण द्रव्याला लोभावून तू* कृपणाची स्तुति करीत नाहींस; आणि हे बहिऱ्या! तुला तरी किती वानावें! कारण खलांचे दुष्ट शब्द तू ऐकत नाहींस!

———०———

अनाहूताः स्वयं यान्ति रसास्वादविलोलुपाः ॥
निवारिता न गच्छन्ति मक्षिका इव भिक्षुकाः ॥८॥

अनुष्टुभ्

आगंतुक स्वयें जाती रस खाण्यास उत्सुक ॥
हांकलूनहि जाती ना मक्षिकेपरि भिक्षुक ॥ ८ ॥

गद्यार्थ—

भिक्षुक हे मक्षिकेप्रमाणें असतात. गोडाधोडावर तुटून पडण्यासाठीं, आपण होऊन, न बोलावतां, जातात, आणि हाकलिले तरी हटत नाहींत.

———०———

उच्चैरध्ययनं, पुरातनकथाः, स्त्रीभिः सहालापनं
तासामर्भकलालनं, पतिनुतिस्तत्पाकमिथ्यास्तुतिः ॥
आदेशस्य करावलम्बनविधिः पाण्डित्यलेखक्रिया
होरा-गारुड-मन्त्र-तन्त्रकविधिर्भिक्षोर्गुणा द्वादश ॥९॥

शार्दूलविक्रीडित

**मोठ्यानें पढणें, पुराण कथणें, नारींसवें बोलणें**
**बाळां खेळविणें, वृथा खुलवुनी सैंपाक वाखाणणें ॥**
**आदेशा करणें, पतीस नमणें, पांडित्यलेखक्रिया**
**जादू ज्योतिष, मंत्र तंत्र गुण हे बारा भिकाऱ्यांस या ९**

गद्यार्थ —

मोठ्यानें अभ्यास करणें, पुराणकथा सांगणें, बायकांत बोलणें, त्यांचीं मुलें खेळविणें, त्यांच्या नवऱ्यांना नमणें, त्यांच्या स्वयंपाकाची खोटी स्तुति करणें, त्यांचे हुकूम हातावर झेलणें, मोठ्या विद्वत्तेचे लेख जमविणें, पत्रिका पाहणें, जादू, मंत्र, तंत्र करणें असे हे भिकाऱ्यांत बारा गुण असतात

—०—

भो भाद्रपक्ष ! सकलद्विजकल्पवृक्ष !
कास्मान्विहाय गतवानसि देहि वाचम् ॥
डिण्डीरपिण्डपरिपाण्डुरवर्णभाजां
लाभः कथं त्वयि गते घृतपायसानाम् ॥१०

शार्दूलविक्रीडित

**सांगे बा पितृपक्ष! कल्पतरु तू साऱ्या जगीं भिक्षुकां**
**जासी सोडुनि निर्दयापरि कसा आम्हां कुठें आणि कां**
**लाडू पिंड नि भात यांतुनि झरे दुग्धाघृताची नदी**
**तू जातां निघुनी मिळेल कुठुनी आम्हां कशी ती कधीं**

गद्यार्थ —

(मिष्टान्नाची चंगळ करून सोडणारा पितृपक्ष सरल्यावर भिक्षुक शोक करतो—) सर्व भिक्षुकांना कल्पवृक्षाप्रमाणें असणाऱ्या हे पितृपक्षा! आम्हाला सोडून कोठें गेलास सांग! लाडू पिंड भात यांतून वाहणाऱ्या दुधातुपाच्या श्वेत वर्णी नदीचा लाभ आतां तू गेल्यावर आम्हाला कसा होणार?

—०—

तावन्महतां महती यावत्किमपि हि न याचते लोकः ॥
बलिमनुयाचनसमये श्रीपतिरपि वामनो जातः ॥११॥

आर्या

**तों महती मोठ्यांची,**
**जोंवरि याचिति न अल्प कोणाला ॥**
**बलिशीं याचन करण्या**
**श्रीपति असुनीहि वामनच झाला ॥ ११ ॥**

गद्यार्थ —

जोंवर ते कधीं कोणाची याचना करीत नाहींत तोंवर मोठ्यांचें मोठेंपण टिकून असतें बळिराजापाशीं याचना करतांना मोठा लक्ष्मीचा पति विष्णु यालाही ( मोठेपणा सोडून ) वामन ( बुटका ) व्हावें लागलें

—०—

तृणं लघु तृणात्तूलस्तूलादपि च याचकः ॥
"वायुना किं न नीतोऽसौ ?" "मामयं प्रार्थयेदिति" १२

वसंततिलका

**वाटे जरी गवत हें हलकें कितीही**
**कापूस त्याहुनि, नि याचक त्यांहुनीही ॥**
**"कां वायु नेइ न च ?" उत्तर हें तयास—**
**"याचील हा मजसि" ही जणुं भीति त्यास ॥१२॥**

गद्यार्थ —

गवत हलकें असतें, कापूस त्याहून हलका असतो, पण याचक त्या दोघांहून हलका असतो. "मग त्या याचकाला वायु उडवून कां नेत नाहीं?" असें कुणी विचारील त्याला उत्तर हें-" हा याचक माझ्यापाशींच कांहींतरी मागेल" ही भीति वाऱ्याला वाटत असावी म्हणून.

—०—

स्वार्थं धनानि धनिकात्प्रतिगृह्णतोऽपि
स्वास्यं भजेन्मलिनतां किमिदं विचित्रम् ? ॥
गृह्णन्परार्थमपि वारिनिधेः पयोऽपि
मेघोऽयमेति सकलोऽपि च कालिमानम् ॥१३

वसंततिलका

**स्वार्थार्थ वित्त धनिकाप्रति याचित्याचें**
**व्हावें मलीन मुख हें न विचित्र साचें ॥**
**घेतां परार्थ, उदधींतुनि मात्र पाणी**
**तें कालिमा अखिल मेघतनूस आणी ॥ १३ ॥**

गद्यार्थ —

( मेघ काळा कां दिसतो यावर कविकल्पनाविलास—) स्वार्थासाठीं श्रीमंतापासून याचना करून धन घेणाराचें तोंड मलीन होतें यात आश्चर्य वाटण्याजोगें काय आहे ? ( पण स्वार्थासाठीं नव्हे तर ) केवळ परोपकारासाठीं, ( कांहीं मौल्यवान् वस्तु नव्हे तर ) केवळ पाणी समुद्रापासून मागून घेणाऱ्या मेघाच्या ( नुसत्या तोंडाला नव्हे तर ) साऱ्या देहाला काळिमा लागतो

( सार्वजनिक निधि निःस्वार्थपणें जमविणाऱ्यांना म्लान व अपमानित होण्याचे प्रसंगांत या श्लोकाची संपूर्ण प्रतीति येते. )

———०———

धातस्तात ! ममत्वयाचकविधौ वैरायसे सर्वदा
यस्माद्विक्रमशालिवाहनमहीभृन्मुंजभोजादयः ॥
अत्यन्तं चिरजीविनो न विहिता ये विश्वदानप्रदा
मार्कंडेध्रुवलोमशप्रभृतयः सृष्टाः प्रभूतायुषः ॥ १४ ॥

शार्दूलविक्रीडित

हे धात्या ! गमतें सदैव असशी वैरीचि तूं याचकां
कीं या विक्रमशालिवाहन नृपां या मुंजभोजादिकां
विश्वाधार अशा तयांसहि तुवां केलें चिरंजीव न
मार्कंडि ध्रुव लोमशां परि दिलें तूं दीर्घ रे जीवन ॥१४॥

गद्यार्थ—

हे ब्रह्मदेवा ! याचकाचा तूं नित्याचा शत्रूच आहेस असें वाटतें. कारण तूं विक्रम, शालिवाहन, मुंज, भोज आदि दानशूर विश्वाधार अशा राजांना कांहीं तूं चिरजीव केलें नाहींस. ( तसें केलें असतेंस तर याचकांचें कायमचें कल्याण नसतें झालें ? ) आणि दीर्घ आयुष्य दिलेंस तें कोणाला तर म्हणे मार्कंडेय, ध्रुव लोमश ( सर्वसंग परित्याग केल्यानें जे दान देऊं शकत नाहींत ) अशांना !

———०———

जातः शूली कदशनवशाद्भैक्षयोगात्कपाली
वस्त्राभावाद्गगनवसनः स्नेहशून्याज्जटालः ॥
इत्थं राजंस्तव परिचरादीश्वरत्वं मयाप्तं
तस्मान्मह्यं किमिति कृपया नार्धचन्द्रं ददासि ॥१५॥

मंदाक्रान्ता

झालों शूली कदशनवशें, भैक्षयोगें कपाली
नंगा, वस्त्रें न च म्हणुनि, ना स्नेह, तेणें जटाळी ॥
नेलें राजा तव परिचरें ईश्वराच्या
( शंकराच्या ) पदासी
तेव्हां आतां नवल कसलें अर्धचन्द्रास देसी ॥ १५ ॥

गद्यार्थ—

(एका दरिद्री कवीला, त्याचा चरितार्थ नीट चालविण्याची आज्ञा देऊन, राजानें, त्याला आपल्या एका परिचारकाकडे सोंपविलें त्यानें त्याची अयंत आबाळ केल्यानें, तो कवि, राजाकडे तक्रार घेऊन आला. तेव्हां, तक्रारीची दाद न लावतां, कवीला अर्धचंद्र देऊन, राजानें घालविलें. तेव्हां कवि म्हणतो-)

हे राजा ! तुझ्या परिचारकानें, मला, ईश्वराच्या पदाला (वैभवाच्या पदाला, वक्रोक्तीनें ) (ईश्वर=शंकर, मला शंकरच केलें आहे.) नेलें आहे. वाईट अन्न खाण्यानें मी शूली (पोटशूळ असलेला; शंकर–शूली=त्रिशूल धारी ) भिक्षा लागल्यानें कपाली ( कपालदुखी असलेला. शंकर–भिक्षार्थ कवटी घेतलेला ) वस्त्रें नसल्यानें दिगंबर; ( शंकर नग्न असतो ) स्नेह नसल्यानें (त्या परिचारकाला माझ्याबद्दल प्रेम नसल्यानें–इकडे तेल नसल्यानें ) जटाधारी ( शंकरही जटाधारी ) झालों असून अशा रीतीनें शंकराचें बरेंच रूप मला आलें. आतां तूं प्रसन्न होऊन मला अर्धचंद्र (शंकरावरचा अर्धचंद्र) देऊन मला पूर्ण शंकरत्व दिलेंस ( गचांडी मारून हांकलिलेंस ) हें बरें योग्यच झालें !

———०———

विशाखान्ता गता मेघाः प्रसवान्तं हि यौवनम् ।
प्रणामान्तः सतां कोपो याचनान्तं च गौरवम् ॥१६॥

आर्या

लागति जों न विशाखा,
तोंवर दिसतील मेघ या गगनीं ॥
स्त्रीचें यौवन संपे
एकवार ती प्रसूत होवोनी ॥
क्रोधहि सुजनांचा त्यां
प्रणाम केला न तोंवरी असतो ॥
गौरव कोणाचाही
टिकतो जोंवर न भीक मागे तो ॥ १६ ॥

गद्यार्थ—

विशाखा नक्षत्र लागेपर्यंत मेघांचें अस्तित्व. एकदा प्रसूत होईपर्यंतच स्त्रीचें तारुण्य, आणि अपराधी पायां पडला नाहीं तों पर्यंतच सज्जनाचा कोप टिकून असतो तद्वतच कोणाचेंही मोठें—पण तो भीक मागत नाहीं तोंपर्यंतच टिकतें

———०———

हृदि लज्जोदरे वह्निः स्वभावादभिरुच्छ्रितः ।
तेन मे दग्धलज्जस्य पुनरागमनं नृप ॥ १७ ॥

वसंततिलका

पोटांत अग्नि, हृदयीं वर लाज राहे
अग्नि स्वयें उसळुनी तिज जाळताहे ॥
लज्जा अशी जळुनियां मम खाक होतां
आलों पुनश्च नृपते ! तव पायिं आतां ॥१७॥

गद्यार्थ—

(कोणी स्वाभिमानी कवि, राजापाशीं याचना करण्यास, प्रथम तयार नव्हता, पण, पुढें भुकेमुळें, लाज सोडून, राजाकडे आला, तेव्हां म्हणतो— ) लाज ही हृदयांत असते व (जठर) अग्नि हा पोटांत असतो (हृदय हे पोटाच्या वर असतें) विस्तवाच्या ज्वाला साहजिकच वर जायच्या, त्यामुळें, माझी लज्जा जळून गेली, म्हणून दग्धलज्ज होऊन हे राजा! तुझ्याकडे पुन आलों आहें

———०———

किमकारि न कार्पण्यं कस्यालङ्घि न देहली ? ॥
अस्य पापोदरस्यार्थे किमनाटि न नाटकम् ? ॥ १८ ॥

वसंततिलका

पापी असें उदर हें भरण्यास, हाय!
मी दाविलें सतत दैन्य न काय काय ? ॥
वा उंबरे झिजविले न कुणा कुणाचे ?
केलें न नाटकहि नित्य कशाकशाचे ? ॥१८॥

गद्यार्थ—

हे पापी उदर भरण्यासाटीं मी काय काय दैन्य प्रकट केलें नाहीं ? कोणकोणाचे उंबरठे झिजविले नाहींत ? आणि कशाकशाचें नित्य नवें नाटक केलें नाहीं ?

———०———

परान्नेन मुखं दग्धं हस्तौ दग्धौ प्रतिग्रहात् ।
परस्त्रीभिर्मनो दग्धं कुतः शापः कलौ युगे ? ॥ १९ ॥

उपजाति

ज्या ब्राह्मणाचें मुख हें परान्नें
जळे, जळे हातहि घेत दानें ॥
जळे परस्त्रीस्मरणांत चित्त
त्याचा फळे शाप कसा कलींत? ॥ १९ ॥

गद्यार्थ—

ज्याचें मुख, परान्नानें, हात दान घेण्यानें, चित्त परस्त्रीस्मरणानें कलुषित झालें अशाचा शाप कलियुगांत कसा फळेल !

———•———

अदृष्टमुखभङ्गस्य युक्तमन्धस्य याचितुम् ॥
अहो वत महत्कष्टं चक्षुष्मानपि याचते ॥ २० ॥

वसंततिलका

ज्यातें दिसे न मुख दुर्मुखलें कुणाचें
याचील अंध जर तो, तर युक्त साचें ॥
आश्चर्य हेंच मज वाटतसे मनांत
कीं याचितो अहह! डोळसही जगांत ॥२०॥

गद्यार्थ—

देणाराचें, दान देतांना, जें दुर्मुखलेलें तोंड होतें तें ज्याला दिसतच नाहीं, तो आंधळा भीक मागेल तर क्षम्य म्हणतां येईल पण हीच भयंकर दुःखदायी गोष्ट आहे कीं डोळसुद्धां याचना करतो!

———०———

एहि, गच्छ, पतोत्तिष्ठ, वद, मौनं समाचर ॥
एवमाशाग्रहग्रस्तैः क्रीडन्ति धनिनोऽर्थिभिः ॥ २१ ॥

अनुष्टुभ्

"ये, जा, तू पड; रे ऊठ; बोल रे; मौन तू धरी ॥
आशाळभूत अर्थीशीं धनी खेळति यापरी ॥ २१ ॥

गद्यार्थ—

"ये, जा, पड, ऊठ, बोल, गप्प बैस," अशा नाना आज्ञांनीं श्रीमंत हे आशेच्या मगरमिठींत सांपडलेल्या याचकांशीं खेळत असतात

———०———

साधुरेवार्थिभिर्याच्यः क्षीणवित्तोऽपि सर्वदा ॥
शुष्केऽपि हि नदीमार्गे खन्यते सलिलार्थिभिः ॥ २२ ॥

अनुष्टुभ्

भिक्षूंनी नित्य याचाया साधूच; जरि निर्धन ॥
जलार्थी शुष्कही पाहे नदीपात्रींच खोदुन ॥ २२ ॥

गद्यार्थ—

याचकांनीं भीक मागावयाची ती नेहमीं सज्जनापाशींच मागावी मग तो निर्धन झालेला कां असेना पाणी मिळविण्यासाटीं खोदून पाहावयाचें तें सुकलेल्या नदीपात्रांतच पाहतात इतर तें व्यर्थ

———•———

वदनात् बहिर्यान्ति प्राणा याच्ञाक्षरैः सह ॥
ददामीत्यक्षरैर्दातुः पुनः प्राणाविशन्ति हि ॥ २३ ॥

आर्या

"द्या" वचनांसह निघती
प्राणचि बाहेर जे मुखामधुनी ॥
दाता "देतों" म्हणतां
शिरती कानीं पुनश्च परतोनी ॥ २३ ॥

गद्यार्थ—

"भिक्षा द्या" असे याचनेचे शब्द व प्राण दोन्ही एकदमच याचकाच्या मुखांतून बाहेर निघतात. पण जेव्हां दाता 'देतों' असें म्हणतो तेव्हां तेच प्राण, या 'देतों' शब्दासह कानांतून देहांत पुन: प्रवेश करितात!

---

पुरतः प्रेरयत्याशा लज्जा पृष्ठावलम्बिनी ।
ततो लज्जाशयोर्मध्ये दोलायत्यर्थिनां मनः ॥ २४ ॥

आर्या

प्रेरी आशा पुढतीं–लज्जा मागेंचि ओढुनी धरिते ॥
आशे–लज्जे मध्यें झोंके घसनात भिक्षुचित्तातें ॥२४॥

गद्यार्थ —

भीक मागतांना याचकाला, आशा पुढें प्रेरीत असते व लाज मागें ओढीत असते. त्यामुळें याचकाचें मन आशा व लज्जा यांमध्यें झोंके खात असतें.

---

गुरुतामुपयाति यन्मृतः पुरुषस्तद्विदितं मयाधुना ।
ननु लाघवहेतुरर्थिता न मृते तिष्ठति सा मनागपि ॥२५

वैतालीय छंद

" मरतां जड कां बने नर ? "
मज तें आज कळे खरोखर ॥
लघुकारक त्यास याचना
लवही त्यांत असूं शकेच ना ॥ २५ ॥

गद्यार्थ—

"मेल्यावर मनुष्य जड कां होतो !" याचें खरें कारण मला आज समजलें. मनुष्याला हलकट करणारी याचना ही मेलेल्या माणसांत थोडी सुद्धां असूंच शकत नाहीं ! म्हणून.

---

मद्रे वाणि ! ममानने कुरु दयां पूर्वानुकारीं चिरं
चेतः ! स्वास्थ्यमुपैहि, याहि करुणे ! प्रज्ञे ! स्थिरत्वं भज ॥
लज्जे ! तिष्ठ पराङ्मुखी क्षणमहो तृष्णे ! पुरः स्थीयतां
पापो यावदहं ब्रवीमि धनिनां देहीति दीनं वचः ॥२६

शार्दूलविक्रीडित

पूर्वीच्यासम मन्मुखावरि दया वाणी करें ! तू कर
चित्ता ! शांतिच ठेव; जाइ करुणे ! प्रज्ञे ! रहा तू स्थिर
लज्जे ! तू फिरवी मुखा क्षणभरी; तृष्णे ! पुढें तू रहा
पापी जोंवर मी वदेन धनिकां "द्या" दीनसा शब्द
हा ॥ २६ ॥

गद्यार्थ—

(भीक मागण्याची सिद्धता करतांना याचक म्हणतो)— हे माझे वाणी ! पूर्वीमारखीच तू माझ्या मुखावर दया कर (मी भीक मागत नव्हतों तेव्हांप्रमाणेंच शब्द तोंडांतून उमटूं दे) चित्ता ! तू शांत रहा ( भीक मागण्याची चीड दाखवूं नको. ) करुणे ! तू निघून जा; प्रज्ञे ! तू स्थिर रहा (मागतांनेवेळीं धीर खचूं देऊं नकोस ) लज्जे ! तू आपली क्षणभर तोंड फिरवून बैस ( नाहींतर त्वजेनें मागता वेळीं मी भिक्षेचे शब्द बोलूं शकणार नाहीं. ) तृष्णे ! तू पुढें हो. ( तू मागें राहिलीस म्हणजे माझी धनतृष्णा नष्ट झाली तर मी भीक काय मागणार ?) आणि हें सर्व थोडा वेळच करा. एवढ्यांत श्रीमंतांच्या पुढें मी पापी, 'द्या' असा दीनवाणा शब्द उच्चारतों !

---

मौनं कालविलम्बश्च प्रयाणं भूमिदर्शनम् ॥
भ्रुकुट्यन्यमुखी वार्ता नकारः षड्विधः स्मृतः ॥२७॥

उपजाति

विलंब वा मौन तसें प्रयाण
अन्यत्र भाषा, बघणें जमीन ॥
आठ्या कपाळीं धरणें हि फार
सहा प्रकारें प्रकटे नकार ॥ २७ ॥

गद्यार्थ—

कोणी याचक आला कीं त्याला त्या त्या परिस्थितीप्रमाणें नकार देण्याचे सहा प्रकार आहेत. खूप उशीर लावणें ( कीं कंटाळून त्यानें जावें ) मौन धरणें, ( म्हणजे तो तरी काय बोलेल ? ) दुसरीकडे जाणें, ( म्हणजे तो कोणाशीं बोलेल ? ) दुसऱ्याशीं बोलणें, ( त्याला बोलायला सधीच न देणें ) जमिनीकडे बघत बसणें, ( म्हणजे त्यानें कोणाच्या तोंडाकडे पहावें ? ) कपाळाला आठ्या घालणें ( म्हणजे त्याला वाटावें, कीं इथें आपण कुठून आलों ? )

---

# प्रकरण १२ वें

## कृपण

दृढतरनिबद्धमुष्टेः कोशनिषण्णस्य सहजमलिनस्य ॥
कृपणस्य कृपाणस्य च केवलमाकारतो भेदः ॥१॥

आर्या

घट्ट मुठीचा, पडला कोशामध्यें, निसर्गमलिन दिसे ॥
कृपण-कृपाणांमध्यें केवळ 'आ' कार हाच भेद असे १

गद्यार्थ—

पहिली सर्व ओळ व आकार हे चार शब्द घ्यावीं—कृपण व कृपाण (तरवार) हे दोन्ही घट्ट मुठीचे (कृपणाच्या मुठींतून कांहीं सुटत नाहीं, तरवारीची मूठ बळकट) कोशांत पडलेले. (कृपण धनागारांत व तरवार म्यानांत) दोघेही मूळचे मलिन (कृपण, धुण्याचा खर्च वाचवण्यामुळें, तर तरवार लोखंडाची म्हणून काळी) इतकें सर्व साम्य खरें पण त्याच्यांत केवळ आकाराचाच (कृपण माणसाएवढा; तरवार लहान) भेद आहे पण शिवाय 'आ'काराचाच भेद म्हणजे कृपणांतला 'प' हा 'अ'कार पण कृपाणांत 'पा' हा 'आ' कार

———•———

कृपणेन समो दाता न भूतो न भविष्यति ॥
अस्पृशन्नेव वित्तानि यः परेभ्यः प्रयच्छति ॥२॥

अनुष्टुभ्

कृपणासम दाता, ना झाला, होईल ना कदा।
देई धन दुज्यांना जो त्या न हात हि लावितां ॥ २ ॥

गद्यार्थ—

चिक्कू माणसासारखा दाता पूर्वी झाला नाहीं व पुढें होणार नाहीं. (सर्व साधारण दाता दान देतांना धनाला हातानें उचलल्याशिवाय कसा देईल!) पण कृपण दान मुद्दाम न करतां धन लोकांना देतो. (मेल्यावर तें धन आपोआपच लोकांचें होतें.)

———•———

शूरं त्यजामि वैधव्यादुदारं लज्जया पुनः।
सापत्न्यात्पण्डितमपि तस्मात्कृपणमाश्रये ॥३॥

वसंततिलका

वैधव्यभीतिवश मी त्यजितेंच शूरा
लज्जेमुळें त्यजितसें नित मी उदारा ॥
विद्वद्गृहा त्यजितसें सवती बघून
जातें म्हणूनि कृपणागृहिं मी रमून ॥ ३ ॥

आणखी स्पष्टीकरणार्थ आर्येत

मेला तो तर विधवा होइन मी या भयें त्यजी शूर
देइ कुणासहि मज तो या लज्जेनें त्यजी महोदार
विद्वद्गृहीं सरस्वति सवती मम पाहुनी त्यजी त्यार
म्हणुनि गृहीं कृपणाच्या मी लक्ष्मी ठेविते सदा वास

गद्यार्थ—

(कृपणाच्या घरीं लक्ष्मी कां रमते याचें कारण लक्ष्मी सांगते) (शूर नेहमीं लढणारा सेव्हा) मला केव्हां वैधव्य येईल ही सतत भीति असल्यानें मी शूरापाशीं रहात नाहीं. उदार, मला दुसऱ्याला देऊन टाकील (व मला वेश्यावृत्ति येईल) या लज्जेनें मी उदाराकडे जात नाहीं (विद्वानांच्या घरीं) माझी सवती सरस्वती राहात असल्यानें मी पंडितापाशींही रहात नाहीं. म्हणून मी आपली शेवटीं कृपणाकडे आश्रय घेतें (त्याच्यासारखें माझें लालन, पोषण व रक्षण दुसरे कोणीच करीत नाहींत)

———•———

कृपणः स्ववधूसङ्गं न करोति भयादिव।
भविता यदि मे पुत्रः स मे वित्तं हरेदिति ॥ ४ ॥

आर्या

"झाला पुत्र मला तर तो मम घेईल वित्त हें हरुन॥"
जणुं धाय या भयानें स्त्रीसंगहि करीच ना कृपण ४

गद्यार्थ—

"मला पुत्र झाला तर तोच माझें वित्त हरण करील" या भीतीनें जणुं काय कृपण हा स्त्रीसंग्रहि करीत नसला पाहिजे

———०———

अयश्चणकचर्वणं फणिफणामणेः कर्षणं
करेण करितोलनं जलनिधेः पदा लङ्घनम् ॥
प्रसुप्तहरिबोधनं निशितखड्गसंरोपणं
कदाचिदपि संभवेन्न कृपणाद्धनोपार्जनम् ॥ ५ ॥

फटका

लोखंडाचे चणे चावणें,
नागमणी ओढुनि घेणें
करीं तोलणें गजास, पायीं
समुद्र ओलांडुनि जाणें ॥
निजल्या सिंहा जागे करणें
सुतीक्ष्ण खड्गावर चढणें
शक्य कदाचित्; अशक्य कृपणा-
पासुनि धन हो मेळविणें ॥ ५ ॥

गद्यार्थ—

लोखंडाचे चणे खाणें, नागावरचा मणि ओढणें, हातावर हत्ती पेलणें, समुद्र पायीं ओलांडणें, निजलेल्या सिंहाला उठविणें, तीक्ष्णखड्गावर चढणें, हें सर्व एकवेळ शक्य होईल, पण कृपणापासून धन मिळविणें शक्य होणार नाहीं.

———०———

रक्षन्ति कृपणाः पाणौ द्रव्यं कव्यमिवात्मनः ।
तदेव सन्तः सततमुत्सृजन्ति यथा मलम् ॥ ६ ॥

आर्या

द्रव्या निजकव्यासम रक्षिति हातींच ठेवुनी कृपण।
संत, परंतु मलापरि संतत त्यातेंच देति सोडून ॥६॥

गद्यार्थ—

कृपण हे धनाला, आपल्या हातींच ठेवून रक्षितात-इतक्या काळजीनें कीं जणूं तें आपल्या अंगाचा पिंडच. उलट संत तेंच द्रव्य टाकून देतात—जणूं काय मलच.

———०———



# प्रकरण १३ वें

## वीर, धीर, शूर, विक्रमशाली, सत्त्वशाली, पराक्रमी, आर्य, तेजस्वी.

को वीरस्य मनस्विनः स्वविषयः को वा विदेशस्तथा ?
यं देशं श्रयते तमेव कुरुते बाहुप्रतापार्जितम् ॥
यद्दंष्ट्रानखलाङ्गलप्रहरणः सिंहो वनं गाहते
तस्मिन्नेव हतद्विपेन्द्ररुधिरैस्तृष्णां छिनत्त्यात्मनः ॥१॥

शार्दूलविक्रीडित

शूराला घुठला स्वकीय, परका वा कोठला देश तो ?
जेथें वास करील तोच अपुल्या बाहूबलें जिंकितो ॥
शस्त्रें दांत नखेंच घेउनि शिरे जो सिंह ज्या ज्या वनी
तृष्णा तो रुधिरें तिथेंच शमवी मत्तद्विपां मारुनी ॥१॥

गद्यार्थ—

शूरवीराला अमुक स्वदेश, अमुक परदेश असें कधीं वाटतें काय ? ज्या देशांत जाईल त्यालाच आपल्या बाहुबलानें जिंकून तो स्वकीय करून टाकतो सिंह ज्या ज्या अरण्यांत ( केवळ ) दांत, नखें ( हेच जणु नांगर ) अशीं शस्त्रें घेऊन शिरतो तेथेंच मत्त-हत्तींना मारून त्यांच्या रक्तानें आपली तहान भागवीत असतो

रत्नैर्महार्हैस्तुतुषुर्न देवा
न भेजिरे भीमविषेण भीतिम् ॥
सुधां विना न प्रययुर्विरामं
न निश्चितार्थाद्विरमन्ति धीराः ॥ २ ॥

उपेंद्रवज्रा

न तोषले देव अमोल रत्नें
महाविषें व्यग्र न या भयानें ॥
सुधेविना थांबविती न यत्ना
सुनिश्चया टाकिति धीर ते ना ॥ २ ॥

गद्यार्थ—

( समुद्रमंथनाचे वेळीं ) महामोलाचीं रत्नें मिळालीं म्हणून देव हे हरखून गेले नाहींत, किंवा, हालाहल हें महाविष निघाल्यानें भयग्रस्त झाले नाहींत अमृतप्राप्तीचें ध्येय गांठीपर्यंत यत्न त्यांनी थांबविले नाहींत धैर्यशाली हे निश्चित कार्यापासून ढळत नाहींत

निन्दन्तु नीतिनिपुणा यदि वा स्तुवन्तु
लक्ष्मीः समाविशतु गच्छतु वा यथेष्टम् ॥
अद्यैव वा मरणमस्तु युगान्तरे वा
न्याय्यात्पथः प्रविचलन्ति पदं न धीराः ॥ ३ ॥

वसंततिलका

निंदा करोत अथवा स्तुति, नीतिमंत
येवो घरीं, दुरि पळो धन वा यथेष्ट ॥
ये अद्य वा मरण दूर पुढें कधीं तें
सोडी न धीर तरि न्याय्य अशा पथातें ॥३॥

गद्यार्थ—

नीतिवेत्ते निंदा करोत वा स्तुति करोत, संपत्ति तिच्या इच्छानुरूप घरांत येवो वा पळो, मरण आज येवो वा युगांनी येवो–धीराची माणसें न्याय्य मार्गापासून ढळत नाहींत

विनाप्यर्थैर्वीरः स्पृशति बहुमानोन्नतिपदं
समायुक्तोऽप्यर्थैः परिभवपदं याति कृपणः ॥
स्वभावादुद्भूतां गुणसमुदयावाप्तिविषया
द्युतिं सैंहीं किं श्वा धृतकनकमालोऽपि लभते ? ॥४॥

शिखरिणी

पदा लाभे धीरा अधन असुनी थोर पद तें
असोनी संपत्ती पदहि कृपणा हीन मिळतें ॥
द्युती सिंहाची-जी गुणगण निसर्गेंचि वितरी
मिळे कां श्वानाला कधि कनकमाला जरि धरी ? ॥४

गद्यार्थ—

सदा धीर–मग तो निर्धन असला तरी बहुमानाचें पद मिळवितोच उलट मोठी संपत्ति असलेले कृपण कर्दे अपमानास्पदच ठरतात. स्वभावतः अनेक गुण सिंहाला देणारें त्याचें तेजोवैभव, हें, मोठ्या सोन्याच्या माळा घातलेल्या कुत्र्याला थोडेंच लाभत असतें ?

कदर्थितस्यापि हि धैर्यवृत्ते-
न शक्यते धैर्यगुणः प्रमार्ष्टुम् ॥
अधोमुखस्यापि कृतस्य वह्ने-
र्नाधः शिखा याति कदाचिदेव ॥ ५ ॥

उपजाति

धीरास ये संकट घोर भारी
न धैर्य त्याचें परि तेंहि हारी ॥
मशाल केली उलटी जरी ती
ज्वाला न खालींच कधींहि जाती ॥ ५ ॥

गद्यार्थ—

धीराचा पुरुष संकटानी गांजला तरी त्याचा धैर्यगुण काहीं पुसला जात नाहीं. मशाल उलटी केली तरी तिची ज्वाला कधीं खालीं जात नाहीं

———

सन्त्यन्येऽपि बृहस्पतिप्रभृतयः संभाविताः पञ्चषा-
स्तान्प्रत्येष विशेषविक्रमरुची राहुर्न न वैरायते ॥
द्वावेव ग्रसते दिनेश्वरनिशाप्राणेश्वरौ भासुरौ
भ्रातः पर्वणि पश्य दानवपतिः शीर्षावशेषीकृतः ॥६॥

शार्दूलविक्रीडित

विश्वीं पांच सहा महाग्रह जरी होती गुरूच्या परी
त्यांशीं, शौर्यविशेष ज्या प्रिय, असा राहून वैरा धरी
पर्वी, ज्या तनु शीर्षमात्र उरली तो दानवांचा पति
ग्रासी केवळ सूर्य चंद्र असल्या तेजस्वि दोघांप्रति ६

गद्यार्थ—

आकाशांत, गुरु इत्यादि पाचसहा मोठे ग्रह असले, तरी, राहु हा त्यांच्याशीं वैर धरीत नाहीं कारण, त्याला, विशेष पराक्रम करून दाखविण्याची हौस असते, म्हणून, ज्याला, केवळ डोकें इतकाच देह उरला आहे, असा, तो दानवपति, पर्वापर्वांचे ठायीं, तेजस्वी सूर्यचंद्र, असल्या दोलजया दोन त्यांच्याशींच झुंज घेत असतो.

———

एकेनापि हि शूरेण पादाक्रान्तं महीतलम् ॥
क्रियते भास्करेणेव स्फारस्फुरिततेजसा ॥ ७ ॥

अनुष्टुभ्

एकही शूर पृथ्वीला पादाक्रान्त करी तसा ॥
अत्यंत थोर तेजस्वी किरणांनीं रवी जसा ॥ ७ ॥

गद्यार्थ—

आपल्या अत्यंत तेजस्वी किरणांनीं जसा सूर्य, तसाच शूरही, एकाकी, पृथ्वी, पादाक्रान्त ( सूर्याकडे पाद म्हणजे किरण ) करीत असतो

———

स्वल्पं स्नायुवसावशेषमलिनं निर्मांसमप्यस्थि गोः
श्वा लब्ध्वा परितोषमेति, न तु तत्तस्य क्षुधाशान्तये ॥
सिंहो जम्बुकमङ्कमागतमपि त्यक्त्वा निहन्ति द्विपं
सर्वः कृच्छ्रगतोऽपि वाञ्छति जनः सत्त्वानुरूपं फलम् ८

शार्दूलविक्रीडित

छोटें हाड वसामलीन मिळतां निर्मांसही, गाइचें
येई श्वान खुषींत, सौख्य न जरी लाभे क्षुधाशांतिचें
कोल्हा चालत अंकिं ये, त्यजुनि त्या, हत्तीच मारी हरी
सत्त्वा योग्यचि सर्व इच्छिति फलें आपत्ति आली तरी ॥ ८ ॥

गद्यार्थ—

लहानसें स्नायुचरबीन लडबडलेलें मासहीन असें गाईचें हाड मिळालें की कुत्रें खूप—मग त्याची भूक कां त्यानें न भागेना. उलट ( मानी ) सिंह मात्र, कोल्ह्यासारखें ( क्षुद्र ) जनावर आपण होऊन मांडीवर येऊन बसलें, तरी, त्याला सोडून हत्ती फाडून खाईल संकटांत सुद्धा, जो तो, आपआपल्या सत्त्वाला अनुसरूनच फलें इच्छितो

———

प्रायः कन्दुकपातेनोत्पतत्यार्यः पतन्नपि ॥
तथा पतत्यनार्यस्तु मृत्पिण्डपतनं यथा ॥ ९ ॥

अनुष्टुभ्

पडूनिहि उठे चेंडू-धैर्यवंत पडे तसा ॥
परि ढेकूळ मातीचें जैसें-भीरु पडे तसा ॥ ९ ॥

गद्यार्थ—

( पडणें कोणालाही चुकत नाहीं, पण ) धीराचा पुरुष पडतो तो चेंडूसारखा, पडून पुन्हां उसी घेणारा भित्रा मात्र पडतो तो मातीच्या ढेकळासारखा—कायमचाच !

———

कान्ताकटाक्षविशिखा न खनन्ति यस्य
चित्तं न निर्दहति कोपकृशानुतापः ॥
कर्षन्ति भूरिविषयाश्च न लोभपाशै-
र्लोकत्रयं जयति कृत्स्नमिदं स धीरः ॥ १० ॥

वसंततिलका

स्त्रीचे कटाक्षशर विंधिति ज्या हृदीं न
क्रोधाग्नि जाळित जया हृदया कधीं न ॥
ओढी न ज्या विषय फेकुनि लोभ-जाल
जिंकी त्रिलोक सगळा असला सुधीर ॥ १० ॥

गद्यार्थ—

ज्या धैर्यशाली पुरुषाच्या हृदयाला, स्त्रीचे कटाक्षबाण भेदीत (खोंचीत) नाहींत; किंवा, क्रोधाग्नि ज्याचे हृदयाला जाळीत नाहीं; किंवा, विषयसुखें हीं, लोभाचें जाळें पसरून, त्यांत ज्याला ओढीत नाहींत, असला पुरुष सारें त्रिभुवन जिंकूं शकतो.

———०———

सिंहः शिशुरपि निपतति मदमलिनकपोलभित्तिषु गजेषु।
प्रकृतिरियं सत्त्ववतां, न खलु वयस्तेजसो हेतुः ॥११॥

आर्या

सिंहाचा छावा हा तुटुनि पडे मत्तही गजांवरतीं ॥
प्रकृतिच ही शूरांची; अवलंबे तेज कां वयावरतीं? ११

गद्यार्थ—

सिंहाचें पिलूंही, ज्याचे गाल मदानें मलिन झाले आहेत अशा हत्तींवर तुटून पडतें. हा शूराचा स्वभावच आहे तेज हें वयावर थोडेंच अवलंबून असतें ?

———०———

सूचीमात्रविभेदसंभ्रमगुणः श्रोणीशयामभ्रुवा-
मुत्तुंगस्तनमण्डलेषु लभते लीलारतिं कञ्चुकः ॥
नाराचैर्निविडैर्विभिन्नवपुषां पुंसां महायोधने
स्वर्गस्त्रीकुचकुम्भसंभ्रमपरीरम्भः कथं दुर्लभः ? ॥१२॥

शार्दूलविक्रीडित

जी चोळी बनतेच केवळ सुई टोंचून मोठी गुणी
लीलारंग मिळे तिलाहि जर हो राजस्त्रियांच्या स्तनीं
योद्ध्यांना, मग, बाणसंतति रणीं घायाळ जे लागुन
होई दुर्मिळ काय स्वर्गरमणी यांचें स्तनालिंगन? १२

गद्यार्थ—

चोळीसारखी साधी वस्तु; पण शिवत'ना तिला सुईच्या द्या टोंचल्या, एवढ्या पुण्यानें, तिला जर राजस्त्रियांच्या पुष्टस्तनांवर लीलारंग करावयास मिळतो, तर, युद्धांत अनेक बाण लागून घायाळ झालेल्या योद्ध्यांना, स्वर्गांतल्या अप्सरांचें स्तनालिंगन काय दुर्मिळ असेल ?

———०———

यदचेतनोऽपि पादैः स्पृष्टः प्रज्वलति सवितुरिनकान्तः ॥
तत्तेजस्वी पुरुषः परकृतनिकृतिं कथं सहते ? ॥१३॥

आर्या

जर रविपादस्पर्शें निर्जीवहि सूर्यकांत भडके तो ॥
तर परकृत अपमाना तेजस्वी नर कसा सहन करितो?॥

गद्यार्थ—

सूर्यासारख्या, महान् ज्योतीचा सुद्धा, पादस्पर्श (पायाचा स्पर्श–किरणाचा स्पर्श) होतां, सूर्यकांत मण्यासारखा निर्जीव पदार्थ, जर भडकून उठतो, तर, माणसासारखा माणूस–त्यांतून तेजस्वी पुरुष, हा, दुसऱ्यानें केलेला अपमान, कसा सहन करील!

———०———

बालस्यापि रवेः पादाः पतन्त्युपरि भूभृताम् ॥
तेजसा सह जातानां वयः कुत्रोपयुज्यते ? ॥ १४ ॥

अनुष्टुभ्

पाद बालरवीचेही पडती गिरिशेखरीं ॥
जन्में तेजस्वि पेशांचें वय कां वघणें तरी? ॥ १४ ॥

गद्यार्थ—

उगवत्या सूर्याचीं (बाल रवीचीं) सुद्धां किरणें (पाद) (पक्षीं पाय) भूभृतांच्या (डोंगराच्या, राजाच्या) डोक्यावर पडत असतात. तेज ज्यांच्या पाचवीला पुजलें आहे (तेजासह जन्मले) त्यांच्या वयाचा प्रश्नच कुठे येतो ?

———०———

न तेजस्तेजस्वी प्रसृतमपरेषां विषहते
स तस्य स्वो भावः प्रकृतिनियतत्वादकृतकः ॥
मयूखैरश्रान्तं तपति यदि देवो दिनकरः
किमाग्नेयग्रावा निकृत इव तेजांसि वमति ? ॥ १५ ॥

आर्या

तेजस्वी दुसऱ्यांचें पसरे तें तेज ना करी सहन ।
त्याचा स्वभावची तो
सहज असा निधिच देइ घडवून ॥
दिनकर रवि आकाशीं
अविरत किरणीं प्रकाश जधिं देतो ॥
अपमानित जणुं होउनि
आगचि कां सूर्यकांत ओके तो? ॥ १५ ॥

गद्यार्थ—

दुसऱ्याचें तेज पसरलेलें सहन न करणें, हा, तेजस्वी माणसाचा जन्मस्वभाव ब्रह्मदेवानेंच घडवून ठेवला आहे. नाहींतर, सूर्य आकाशांत, अखंड तेजानें प्रकाश देत असतां, सूर्यकांत मणि अपमान झाल्यासारखा आग ओकतो, याचा दुसरा काय अर्थ लावायचा ?

———०———

एकचक्रो रथो, यन्ता विकलो, विषमा हयाः ॥
आक्रमत्येव तेजस्वी तथाप्यर्को नभस्तलम् ॥ १६ ॥

अनुष्टुभ्

एक चाक रथा, हाके लंगडा, अश्व सात ते ॥
तरीहि रवि तेजस्वी आक्रमी नभ सर्व तें ॥ १६ ॥

गद्यार्थ—

सूर्याच्या रथाला पहावें तर एकच चाक ! हांकणारा (अरुण) लंगडा ! घोड्यांची संख्या विषम ! ( सात ) तरीहि सूर्य सर्व आकाश पादाक्रांत करतो, कारण तो तेजस्वी !

———०———

मत्तेभकुम्भदलने भुवि सन्ति शूराः
केचित्प्रचंडमृगराजवधेऽपि दक्षाः ॥
किन्तु ब्रवीमि बलिनां पुरतः प्रसह्य
कन्दर्पदर्पदलने विरला मनुष्याः ॥ १७ ॥

वसंततिलका

मारी प्रमत्तहि गजा वधी जगिं शूर कोणी
सिंहा प्रचंडहि वधी परि अन्य कोणी ॥
शूरांपुढें वदत मी मन नावरोनी
कंदर्पगर्व जिरवी विरळाच कोणी ॥ १७ ॥

गद्यार्थ—

उन्मत्त हत्ती, सिंह, प्रचंड सिंह, मारणारे शूर पुष्कळच आहेत पण, मदनाचा गर्व जिरवू शकणारा शूर विरळाच. हें सांगितल्याशिवाय मला राहवत नाहीं

———०———

ज्वलति चलितेन्धनोऽग्निर्विप्रकृतः पन्नगः फणां कुरुते ॥
प्रायः स्वं महिमानं क्षोभात्प्रतिपद्यते जन्तुः ॥ १८ ॥

आर्या

भडके अग्नि हलवुनी दुखावतां सर्प ही फणा करितो।
बहुधा रागांतचि नर निजतेजातें पुनश्च मिळवीतो१८

गद्यार्थ—

हलवला असतां विस्तव प्रज्वलित होतो-धक्का लावला की सापहि फणा काढतो साधारणपणें माणूस रागावला म्हणजे त्याचें खरें तेज प्रकट होतें

———०———

रामात् परः शूरतरो न कश्चित्
पराभवः स्त्रीहरणान्न चान्यः ॥
तथापि नाब्धिं प्रविवेश रामो
बबंध सेतुं विजयी सहिष्णुः ॥ १९ ॥

पृथ्वी

कुणीहि जगिं राघवाहुनि न शूर झाला असे
पराभव न घोर पत्निहरणाहुनी वा दिसे ॥
तरी न उदधींत राम बुडला; सहिष्णू मनें
रचीच परि सेतुबंध, विजयी अशा वृत्तिनें ॥ १९ ॥

गद्यार्थ—

रामाहून शूर कोणी ( झाला ) नाहीं व स्वत ची पत्नी दुसऱ्यानीं हरण करण्याहून मोठा पराभवही दुसरा नाहीं पण रामानें कांहीं समुद्रात बुडून आत्महत्या केली नाहीं तर सारें सहन करीत त्यानें विजयी वृत्तीनं सेतु बांधला !

———०———

तरन्ति मातङ्गघटातरङ्गं
रणाम्बुधिं ये मयि ते न शूराः ॥
शूरास्त एवेह मनस्तरङ्गं
देहेन्द्रियाम्भोधिमिमं तरन्ति ॥२०॥

उपजाति

हस्ती-तरंगीं रणसागरांतीं
जे पोहती ते मच शूर होती ॥
मनस्तरंगीं तनुसागरांत
तरेल तो शूर खरा जगांत ॥ २० ॥

गद्यार्थ—

हत्तीरूपी लाटा असलेल्या, युद्धरूपी समुद्रात, जे पोहतात त्यांना, मी शूर म्हणत नाहीं. मनोविकाराच्या लाटा असलेल्या, देहसागरांत, जे ( न बुडतां ) तरंगतील, ते खरे शूर !

———०———

संपदि यस्य न हर्षो विपदि विषादो, रणे च धीरत्वम् ॥
तं भुवनत्रयतिलकं जनयति जननी सुतं विरलम् ॥२१

आर्या

विभवें हर्ष न; संकटिं—
दुःख न, जो धीरता रणीं दावी ॥
त्रिभुवनमंडन ऐसा
सुपुत्र जननी कधींतरी प्रसवी ॥ २१ ॥

गद्यार्थ—

वैभव आलें म्हणून हर्ष नाहीं, संकट आलें म्हणून खेद नाहीं-युद्धांत नेहमीं धीराने राहाणें अशा वृत्तीचा त्रिभुवन-भूषण मुलगा क्वचितच कधींकाळीं जन्मत असतो

———०———

शमयति गजानन्यान् गन्धद्विपः कलभोऽपि सन्
भवति सुतरां वेगोदग्रं भुजङ्गशिशोर्विषम् ॥
भुवमधिपतिर्बालावस्थोऽप्यलं परिरक्षितुं
न खलु वयसा जात्येवायं स्वकार्यसहो भरः ॥ २२ ॥

स्रग्धरा

एक्या गन्धद्विपाचा
शिशुहि नमवितो अन्य मोठ्या गजांस ॥
नागाच्याही पिलाचें
द्रुतगति विष तें ठार मारी नरास ॥
छोटाही बालराजा
क्षम सकल असे रक्षिण्याला जगातें ॥
कार्याचा भार साहे
कुणि वयिं न वयें; होइ रक्तांतची तें ॥ २२ ॥

गद्यार्थः—

( एका विशेष जातीच्या ) गंधगजाचें पिलूंसुद्धां इतर हत्तींना ताब्यांत ठेवतें सर्पाच्या पिलांचेंहि विष जल्द चढणारें व भयंकर असतें, बालही राजा जगाचें राज्य हाकूं शकतो-महान् कार्याचा भार सहन करण्याची शक्ति ही वयावर नसते, ती जन्मजात रक्तांनच असते

———०———

चलन्तु गिरयः कामं युगान्तपवनाहताः ॥
कृच्छ्रेऽपि न चलत्येव धीराणां निश्चलं मनः ॥ २३ ॥

आर्या

वाऱ्याच्या क्षोभानें
प्रलयीं हालोत थोर गिरिहि भले ॥
निश्चल मन धीरांचें
कसल्याही संकटीं कधीं न चळे ॥ २३ ॥

गद्यार्थ—

प्रलयकाली, वाऱ्याच्या आघातानें, प्रत्यक्ष डोंगर पर्वतही हालोत बिचारे। पण धैर्यवंताचें निश्चल मन, कसल्याही संकटांनीं चळत नाहीं

———०———

लज्जागुणौघजननीं जननीमिव स्वा-
मत्यन्तशुद्धहृदयामनुवर्तमानाम् ॥
तेजस्विनः सुखमसूनपि संत्यजन्ति
सत्यव्रतव्यसनिनो न पुनः प्रतिज्ञाम् ॥२४॥

शार्दूलविक्रीडित

देई जन्म सलज्जतादिक गुणां, जी स्वीय मातेपरी
चित्तानें अतिशुद्ध; जी अनुसरे त्यां नित्य आज्ञाकरी।
सत्याचें व्रत हेंचि ज्यां व्यसनसें ऐसेचि तेजोनिधि
प्राणांही त्यजिती सुखें, न परि ही ऐशी प्रतिज्ञा कधीं २४

गद्यार्थ—

सत्याचे व्रत हेंच ज्याचें व्यसन असे तेजस्वी पुरुष, सुखानें स्वत चे प्राण देतील पण, जी त्याच्यात सलज्जतादि गुण उत्पन्न करते, जी त्यांना मातेसारखी वाटते, जी निर्मल मनाची व जी त्यांना सतत अनुसरत असते अशी प्रतिज्ञा मात्र कधीं सोडणार नाहींत

———०———

विरम विरसायासादस्माद्दुरध्यवसायतो
विपदि महतां धैर्यध्वंसं यदीक्षितुमीहसे ॥
अपि जडमते कल्पापाये व्यपेतनिजक्रमाः
कुलशिखरिणः क्षुद्रा नैते न वा जलराशयः ॥२५॥

हरिणी

"त्यजिति धृति कां विपीं मोठे?" तुला जर पाहणें
निफल तर रे हे दुःखान्त प्रयासचि सोडणें ॥
प्रलयसमयीं, मूर्खा! जाती निजक्रम सोडुनी
कुलगिरि तसे अब्धी ऐसे न नीचचि हे गुणी ॥२५॥

गद्यार्थ—

हे मूर्खा! मोठे लोक हे संकटांचे वेळीं आपलें धैर्य सोडून बसतात कीं काय हें पाहण्याची तुला जी अपेक्षा आहे ती विफल, निश्चित दुःखान्त ठरणारी, असल्यानें तूं सोडून दे. प्रलयकालीं आपापलें स्थान सोडून जाणाऱ्या कुलगिरींप्रमाणें किंवा समुद्राप्रमाणें हे कांहीं कोणी क्षुद्र नव्हेत (थोर लोक आपलें क्रमप्राप्त कर्तव्य कसल्याही संकटांनीं डगमगून सोडीत नाहींत.)

---

स एव धन्यो विपदि स्वरूपं यो न मुञ्चति ।
त्यजत्यर्ककरैस्तप्तं हिमं देहं न शीतताम् ॥ २६ ॥

आर्या

सोडी न संकटांतहि,
जो निजरूपास धन्य तो जगतीं ॥
हिम, पोळतां उन्हानें,
सोडी तनु, परि न शीतता कधिं ती ॥२६॥

गद्यार्थ—

संकटांत सुद्धां जो आपला स्वभाव सोडीत नाहीं तोच खरा धन्य! हिम हें उन्हानें तापलें तर स्वतःचा देह सोडतें पण शीतता सोडीत नाहीं.

---

अलातं तिन्दुकस्येव मुहूर्तमपि हि ज्वल ।
मा तुषाग्निरिवानर्चिर्धूमायस्व चिरं पुनः ॥ २७ ॥

अनुष्टुम्

जळ तूं ज्योतिरूपानें क्षणही कोलितापरी ॥
नको धुमसणें दीर्घ ज्योतिर्हीण तुसापरी ॥ २७ ॥

गद्यार्थ—

टेंभुर्णीच्या कोलिताप्रमाणें, क्षणभर कां होईना, तू ज्योतिरूपानें पेट घे; पण भाताच्या तुसाप्रमाणें जाळ न होतां धुमसत दीर्घकाळ जगूं नको.

---

संप्राप्तमवमानं यस्तेजसा न प्रमार्जति ॥
कस्तस्य पौरुषेणार्थो महताप्यल्पचेतसः ॥२८॥

अनुष्टुम्

अपमान मिळालेला जो स्वतेजें न धूतसे ॥
अर्थ तत्पौरुषा मोठ्या काय हो? क्षुद्र तो असे ॥२८॥

गद्यार्थ—

दुसऱ्यांनीं स्वतःचा केलेला अपमान, जो स्वतेजानें धुऊन टाकीत नाहीं त्या क्षुद्रचित्ताच्या मोठ्या पौरुषाला काय अर्थ आहे?

---

एतावानेव पुरुषो यदमर्षी यदक्षमी ।
क्षमावानिरमर्षश्च नैव स्त्री न पुनः पुमान् ॥ २९ ॥

अनुष्टुम्

प्रतिकारी स्वाभिमानी खरा पुरुष एक तो ॥
नित्यक्षमी लायखाऊ, न स्त्री, पुरुषही न तो ॥ २९ ॥

गद्यार्थ—

*अपमानाचा प्रतिकार करणारा, व त्याबद्दल क्षमा न करणारा* एवढाच काय तो मनुष्य पुरुष म्हणता येईल. सारखी क्षमाच करणारा व सहन करीत बसणारा (लायखाऊ) हा स्त्रीसुद्धां म्हणतां येणार नाहीं—पुरुष तर नव्हेच नव्हे.

---

*हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम् ।*
तस्मादुत्तिष्ठ कौन्तेय युद्धाय कृतनिश्चयः ॥३०॥

अनुष्टुभ्

मरूनी स्वर्ग लाभे वा जग भोगिसि जिंकुनी ॥
ऊठ यास्तव पार्था! तू युद्धा निश्चय बांधुनी ॥३०॥

गद्यार्थ—

(गीता. कृष्ण अर्जुनास म्हणतो—) युद्धांत एकतर तूं मरशील किंवा जिंकशील. मेलास तर तुला स्वर्ग मिळेल; जिंकलास तर पृथ्वीचें *राज्य भोगशील.* तेव्हां हे *अर्जुना!* (दोन्हींकडून तुझें हितच असल्यानें) युद्धाचा निश्चय करून ऊठ.

---

स्पृहयति भुजयोरन्तरमायतकरवालकररुहविदीर्णम् ।
विजयश्रीर्वीराणां व्युत्पन्नप्रौढवनितेव ॥ ३१ ॥

आर्या

सुज्ञप्रौढस्त्रीपरि विजयश्री ही सदैव इच्छिलसे ॥
वीराचें वक्षःस्थल खड्गनखांनीं विदीर्ण बहु ऐसें ॥३१॥

गद्यार्थ—

जाणती प्रौढ स्त्री, ही ज्याप्रमाणें (रतिक्रीडेंत) स्वनखांनीं विदीर्ण केलेलें, असें, पतीचें भुजांमधलें अंतर, म्हणजे, वक्ष स्थळ (तेथें विश्रांति घेण्यास) इच्छिते, त्याप्रमाणें, विजयलक्ष्मी, ही, तरवारीनें विदीर्ण झालेलें असें वीराचें वक्ष स्थळ इच्छिते! (इतरत्र ती विश्रांति घेणार नाहीं.)

---

# प्रकरण १४ वें

मान; स्वाभिमानी; निस्पृह; अपमान; निर्लज्जपणा; लाचारी; मिथ्याभिमान.

सहते शरशतघातानश्वः सहते कदापि नैव कशाम् ॥
सहते विपत्सहस्रं मानी नैवापमानलेशमपि ॥ १ ॥

आर्या

शरशत सहे तुरग, परि,
कधीं न चाबूक तो करी सहन ॥
सोशी सहस्र विपदा,
मानी, परि अल्पही न अपमान ॥ १ ॥

गद्यार्थ—

घोडा ( अर्थात जातिवंत ) शेंकडों बाणाचा माराही सहन करतो, पण, चाबूक सहन करणार नाहीं मानी मनुष्यही सहस्र संकटें सहन करील, पण, थोडाही अपमान सहन करीत नाहीं.

———•———

पादाहतं यदुत्थाय मूर्धानमधिरोहति ।
स्वस्थादेवापमानेऽपि देहिनस्तद्वरं रजः ॥ २ ॥

अनुष्टुभ्

पादाघातें, उठोनी जी चढुनी बसते शिरीं ॥
अपमानेंहि जो स्वस्थ, त्याहुनी धूळ ती बरी ॥ २ ॥

गद्यार्थ—

अपमान झाला, तरी प्रतिकार न करतां, जो स्वस्थ राहतो, अशा त्या मुर्दाडापेक्षां, पायांनीं तुडविली, तरी जी उठून तुडवणाराच्या डोक्यावर जाऊन बसते, ती धूळ बरी.

———•———

तावदाश्रियते लक्ष्म्या तावदस्य स्थिरं यशः ॥
पुरुषस्तावदेवासौ यावन्मानान्न हीयते ॥ ३ ॥

आर्या

तोंवर लक्ष्मी धरिते, तोंवर तत्कीर्ति राहते टिकुन ॥
तोंवर पुरुष असे नर, जोंवर सांभाळुनी असे मान ॥ ३ ॥

गद्यार्थ—

तोंवरच लक्ष्मी त्याच्या आश्रयाला येते; तोंवरच त्याची कीर्ति टिकून राहते, तोंवरच तो पुरुष या नांवाला पात्र असतो, जोंवर, मनुष्य आपला मान संभाळून राहतो.

———•———

श्वशुरगृहनिवासः स्वर्गतुल्यो नराणा-
मिति भवति विवेकी पञ्च वा षड् दिनानि ॥
दधिमधुघृतलोभान्मासमेकं वसेच्चे-
द्भवति विगतलज्जो मानवो मानहीनः ॥ ४ ॥

शार्दूलविक्रीडित

वाटे स्वर्गसमान वास मनुजा जो सासऱ्याचे घरीं
होतां पांच सहा दिनावधि, तया औचित्य येई परी ॥
लोभानें, मधु, दूध, तूप दधि या, मासैक राहे जधीं
सांडोनी बहुमान मानव तिथें निर्लज्ज होई तधीं ॥ ४

गद्यार्थ—

माणसाला, आपल्या सासऱ्याच्या घरीं राहणें, जें अगदीं स्वर्गसमान वाटतें, तें, पांचसहा दिवसांपर्यंत झालें, तर, त्यांत औचित्य आहे. पण जर, श्वशुरगृहींच्या साखर, दूध, तूप दहीं असल्या लोभाला बळी पडून माणूस महिनाभर तेथें राहिला तर त्याचें तें राहणें, मानहीन व निर्लज्जपणाचें होतें.

———•———

क्षुत्क्षामोऽपि जराकृशोऽपि शिथिलप्रायोऽपि कष्टां दशा-
मापन्नोऽपि विपन्नदीधितिरपि प्राणेषु गच्छत्स्वपि ॥
मत्तेभेन्द्रविभिन्नकुम्भपिशितग्रासैकबद्धस्पृहः
किं जीर्णं तृणमत्ति मानमहतामग्रेसरः केसरी ? ॥ ५ ॥

शार्दूलविक्रीडित

म्हातारा, थकला, भुका, कठिणही
आली दशा त्या जरी
गेलें तेज गिळोपुर्ती तरि, गळां
स्वप्राण आले तरी ॥
हत्ती मत्तचि मारुनी कवळ तो
खाया अशी ज्या स्पृहा
मानीश्रेष्ठ कधीं सुकें गवतही
खाईल कां सिंह हा ? ॥ ५ ॥

गद्यार्थ—

भुकेनें कळकळला, वार्धक्यानें क्षीण झाला, थकला, दशा सर्व वाऱ्यांनीं कठीण झाली, तेज त्याला गेलें, अगदीं प्राण गळ्याशीं आले, तरी मानी प्राण्यांत श्रेष्ठ, व ज्याची एकच इच्छा, कीं, उन्मत्त हत्तींना मारून त्यांच्या गंडस्थळांतील मांस खावें, असा सिंह, कधीं सुकलेलें गवत खाईल ?

———o———

न क्वचिन्न बहिर्यान्ति मानिनां प्रार्थनागिरः ।
यदि निर्यातुमिच्छन्ति तदा प्राणपुरस्सराः ॥ ६ ॥

आर्या

मानी, कधिं तोंडांतुनि
शब्द भिकेचे निघूं न देतील ॥
जरि निघती, कधिं, तरि ते
प्राण पुढें घालुनीच निघतील ॥ ६ ॥

गद्यार्थ—

मानी मनुष्याच्या तोंडातून, भिकेचे शब्द, कधीं निघणारच नाहींत. जर कदाचित् निघाले तर, ते प्राणाना पुढें घालून निघतील–(म्हणजे प्राण गेले, तरी ते भीक मागणारच नाहींत.)

———o———

लाङ्गूलचालनमधश्चरणावपातं
भूमौ निपत्य वदनोदरदर्शनं च ॥
श्वा पिण्डदस्य कुरुते; गजपुङ्गवस्तु
धीरं विलोकयति चाटुशतैश्च भुङ्क्ते ॥ ७ ॥

वसंततिलका

श्वा पुच्छ हालवित लोळण पायिं घेतो
पोशील त्या उदर आनन दाखवीतो ॥
डौलांत पाहत परी गज, शेंकडों तो
घे आर्जवें करुनिया, मग घांस खातो ॥ ७ ॥

गद्यार्थ—

( लाचार आणि मानी दोघांना एकत्र आणून विरोध दाखविला आहे. यांत कुत्र्याच्या विषयीं उत्तम स्वभावोक्ति आहे. ) कुत्रें अन्न देईल त्याच्यापुढें, शेपूट हलवितें, पायाशीं लोळण घेतें, जमिनीवर पडून आपलें पोट आणि तोंड दाखवितें ! पण, मानी हत्ती, हा डौलांत पहात, ( माहुताकडून ) शेंकडों आर्जवें करून घेतो आणि मग पुढें घांस खातो.

———o———

उड्डीना गुणपक्षिणः सुखफलान्यारद्विकीर्णान्यधः
पर्यस्ताः परितो यशःस्तवकिताः संपल्लतापल्लवाः ॥
भ्रागेवापमृतः प्रमोदहरिणश्छाया कथान्तं गता
दैन्यारण्यमतङ्गजेन सहसा भग्नेऽभिमानद्रुमे ॥ ८ ॥

सुमंदारमाला

उडाले गुणांचे सुपक्षी; सुखाचीं
फळें सर्व विस्कारिलीं खालतीं ॥
यशोरूपही गुच्छ, अन् वैभवाची
झडे पालवीही तरूभोंवतीं ॥
त्यजी मोदसारंग आधींच; वार्ता
मुळीं सांवलीची न आतां उरे
झणीं स्वाभिमानद्रुमा दैन्यरूपी
गजें वन्य, या भंगितां हाय! रे ॥ ८ ॥

गद्यार्थ—

( माझें ) स्वाभिमानरूपी झाड, अचानक, दैन्य, ( लाचारी ) नांवाच्या रानटी हत्तीनें उपटून टाकल्या बरोबर, गुणरूपी पक्षी या झाडावरून उडून गेले, सुखरूपी फळें सर्व खालीं पिस्काळून पडलीं, कीर्तिरूप पुष्पाचे गुच्छ आणि वैभवरूपी पल्लव खालतीं भोंवतीं झडून पडले; आनंदरूपी हरिण आधींच येथून सटकून गेला, आणि ( आल्या गेल्याला दुसरें कांहीं नाहीं तर निदान छाया तरी कोठलाही वृक्ष देतो ) ती छाया सुद्धां नावाला उरली नाहीं. ( स्वाभिमान सोडून लाचारी पत्करणाऱ्याच्या जीवनाची काय दशा होते; पहा ! )

———o———

त्वं राजा वयमप्युपासितगुरुप्रज्ञाभिमानोन्नताः
ख्यातस्त्वं विभवैर्यशांसि कवयो दिक्षु प्रतन्वन्ति नः ॥
इत्थं मानद ! नातिदूरमुभयोरप्यावयोरन्तरं
यद्यस्मासु पराङ्मुखोऽसि वयमप्येकान्ततो निःस्पृहाः ॥ ९

शार्दूलविक्रीडित

तूं राजा; तर मी गुरूचरणीं ये प्रज्ञा, तिनें उन्नत
तूतें वैभवकीर्ति; कीर्ति ममही लोकीं कवी वर्णित ॥
गर्विष्ठा! न असें विशेषचि तुझ्यामाझ्यांतलें अंतर
भारी निःस्पृह मी, पराङ्मुख मला होशील तूही तर॥९॥

गद्यार्थ—

तूं राजा (म्हणून उच्चपदस्थ असशील) तर आम्हीही गुरूपासनाप्राप्त प्रज्ञा व अभिमान यांनीं उन्नत (उच्च मान वरून चालणारे) आहों, तू आपल्या वैभवानें प्रसिद्ध, तर आमची (ज्ञानाची) कीर्ति कवि सर्व दिशांत पसरवीत आहेत पहा गर्विष्ठा! याप्रमाणें तुझ्याआमच्यात कांहीं विशेषसें अंतर नाहीं तेव्हां (उगाच राजेपणाची ऐट आणून) आम्हांसारख्या विद्वानांशी तू पराङ्मुख होशील तर (ध्यानात ठेव,) आम्ही सुद्धां अत्यंत निःस्पृह आहों.

---

अमीषां प्राणानां तुलितबिसिनीपत्रपयसां
कृते किं नास्माभिर्विगलितविवेकैर्व्यवसितम् ॥
यदाढ्यानामग्रे द्रविणमदनिःसञ्ज्ञमनसां
कृतं म्लानव्रीडैर्निजगुणकथापातकमपि ॥ १० ॥

शिखरिणी

स्थिती ज्या प्राणांची, जल कमलपत्रांवर, तशी
न केली त्यांसाठीं कृति मतिविना काय नि कशी ? ॥
पुढें श्रीमंतांच्या, धनमदभरें धुंद, असल्या
गुणांची मी केली, स्तुति, न धरतां लाज, अपुल्या १०

गद्यार्थ—

कमलाच्या पानावरील पाण्यादतकी (चंचल) स्थिति ज्या प्राणांची आहे, त्या (क्षुद्रां) साठीं मी आजपर्यंत, विवेक सोडून काय काय केलें नाहीं ? धनमदानें धुंद झालेल्या श्रीमंतांच्या पुढें, लाज सोडून, मी स्वत च्या गुणांची स्तुति करण्याचें पातक सुद्धां केलें !

---

पुण्ये ग्रामे, वने वा
　महति, सितपटच्छन्नपालीकपालीं-
मादाय न्यायगर्भं
　द्विजहुतहुतभुग्धूमधूम्रोपकण्ठम् ॥
द्वारं द्वारं प्रवृत्तो
　वरमुदरदरीपूरणाय क्षुधार्तो
मानी प्राणी स धन्यो
　न पुनरनुदिनं तुल्यकुल्येषु दीनः ॥ ११ ॥

स्रग्धरा

झांकोनी चेत हातीं
　सुनगरिं वनिं वा खपरी शुभ्रवस्त्रीं
न्यायी, धूम्रें हुताच्या
　भुरकट वनल्या श्रोत्रियांच्याच दारीं ॥
मानी प्राणी, फिरे जो
　वण वण, भरण्या, खांच पोटांतली ती
लोकीं तो धन्य ! नित्य
　स्वसमनरपदीं दीनता हो जळो ती ॥ ११ ॥

गद्यार्थ—

(मधुकरीसुद्धां श्रेष्ठाच्या घरची घ्यावी, स्वत सारख्याच क्षुद्रापाशीं दीनता दाखविणें ही गोष्ट मानहानीची !) हातात शुभ्रवस्त्रात झांकलेली खापरी घेऊन, चांगल्या गांवांत वा वनांत, धर्मकर्मांच्या आहुतींच्या धुरानें भुरकटलेल्या, न्यायी ब्राह्मणांच्याच दारीं, पोट भरण्यासाठीं मानी प्राणी फिरतो, तो धन्य ! स्वत च्याच तुल्यस्थितींतल्या माणसापाशीं रोज दीनवाणें हें, मानहानि करणारें, मागणें नको

---

"पातालान्न विमोचितो बत बली, नीतो न मृत्युः क्षयं
नोन्मृष्टं शशिलाञ्छनं सुमलिनं नोन्मूलिता व्याधयः ॥
शेषस्यापि भरं विधृत्य न कृतो भारावतारः क्षणं"
चेतः सत्पुरुषाभिमानमनिशं मिथ्या वहन् खिद्यसे १२

सुमंदारमाला

"न पाताळिचा मीं बळी मुक्त केला
　न अद्यापि मृत्यूस वा जिंकिलें ॥
न चंद्रस्थ वा डाग मीं नष्ट केला !
　घणोनी न रोगांस वा काढिलें ॥
न वा अल्पही काळ देवोनिया हात,
　मीं शेषभारास केलें कमी" ॥
मना! कष्टमी व्यर्थ मिथ्याभिमानें
　"जणूं काय मोठा महात्माच मी" ॥ १२ ॥

गद्यार्थ—

म्हणे–पाताळांतल्या बळीची अद्याप मुक्तता केली नाहीं ! काय म्हणे, मी अजून मृत्यूचा नायनाट केला नाहीं ! चंद्रावरचा तो घाणेरडा डाग मी अजून पुसला नाहीं ! जगांतले रोग खणून काडले नाहींत ! शेषावरचें ओझें क्षणभर स्वत उचलून धरून मी त्याचा अद्याप भार कमी करूं शकलों नाहीं ! हे माझ्या मना ! स्वत ला कोणी महात्माच मानून (त्यांनाच साधणारीं कार्यें स्वत ला साधणें नाहींत म्हणून) मिथ्याभिमानानें हळहळत कां उगाच स्वत ला दुःख करून घेत आहेस ?

# प्रकरण १५ वें

## दाता, दान, दातृत्व—

शतेषु जायते शूरः सहस्रेषु च पण्डितः ।
वक्ता दशसहस्रेषु दाता भवति वा न वा ॥ १ ॥

अनुष्टुभ्

शंभरांत मिळे शूर, सहस्रांतचि तीव्रधी ।
वक्ता दश सहस्रांत, मिळे दाता न वा कधीं ॥

किंवा उपजाति

शतामधें शूर चुकूनि एक
विद्वान् सहस्रांत चुकून एक ॥
दहा सहस्रांतहि एक वक्ता
असे नसे वा परि एक दाता ॥ १ ॥

गद्यार्थ—

शंभरांत एखादाच शूर निघतो सहस्रांत एखादाच पंडित नेघतो, दशसहस्रांत एखादाच वक्ता असतो, पण, इतक्या मोठ्या उरयेत हि दाता सापडेल, कीं, नाहीं, याची वानवाच

---

दातुरुन्नतचित्तस्य गुणयुक्तस्य चार्थिनः ।
दुर्लभः खलु संयोगः सद्बीजक्षेत्रयोरिव ॥ २ ॥

उपजाति

श्रीमंत दाता हृदयीं उदार
त्या याचिताही गुणयुक्त थोर ॥
संयोग हे दुर्मिळ होति ऐसे
सुपीक शेतात सुबीज जैसे ॥ २ ॥

गद्यार्थ—

महोदार असा दाता व गुणयुक्त असा याचक, असा योग, चांगल्या बीजाला सुपीक शेत मिळण्याइतका दुर्मिळ आहे

---

एकेन तिष्ठताधस्तादन्येनोपरि तिष्ठता ।
दातृयाचकयोर्भेदः कराभ्यामेव सूचितः ॥ ३ ॥

अनुष्टुभ्

एकाचा पालथा (वरतीं) हात
दुज्याचा उलथा (खालतीं) असे ।
दाता याचक हा भेद
हातांवरनिही दिसे ॥ ३ ॥

गद्यार्थ—

दाता कोण व याचक कोण हें, हातांच्या स्थितीवरून चटकन् ध्यानात येतें दात्याचा पालथा (शब्दशः–वरतीं) असतो व याचकाचा उलथा (शब्दशः–खालतीं) असतो

---

तावत्प्रीतिर्भवेल्लोके यावद्दानं प्रदीयते ॥
वत्सः क्षीरक्षयं दृष्ट्वा परित्यजति मातरम् ॥ ४ ॥

अनुष्टुभ्

जोंवरी दान हो द्यावें, तोंवरी, प्रेम राहतें ॥
वासरूं, आटतां दूध स्वमातेसहि सोडितें ॥ ४ ॥

गद्यार्थ—

मनुष्य पुष्कळ दान देत असतो, तोंवर त्यावर प्रेम करणारांचें प्रेम टिकतें दूध आटल्यावर, वासरू, प्रत्यक्ष आपल्या आईचाच, त्याग करीत नाहीं कां ?

---

दानोपभोगरहिता दिवसा यान्ति यस्य वै ।
स लोहकारभस्त्रेव श्वसन्नपि न जीवति ॥ ५ ॥

अनुष्टुभ्

दिन जाती जयाचे, न दान देत न भोगत ।
लोहाराचाच तो भाता श्वास घेतो तरी मृत ॥ ५ ॥

गद्यार्थ—

ज्याचें आयुष्य, संपत्तीचें दान न देतां, किंवा, न उपभोगतांच सरत आहे, तो, लोहाराचा भाताच समजावा श्वास घेतो पण जिवंत नव्हे

---

गौरवं प्राप्यते दानान्न तु वित्तस्य सचयात् ।
स्थितिरुच्चैः पयोदानां पयोधीनामधः स्थितिः ॥ ६ ॥

अनुष्टुभ्

उच्चता येइ दानानें, न द्रव्या सांठूनि ती ।
असती मेघ आकाशीं समुद्र नित खालतीं ॥ ६ ॥

गद्यार्थ—

दानानं उच्चता येते, द्रव्य सांठवून येत नाहीं मेघ आकाशात (जलदान करणारे,-उच्चस्थानीं) व समुद्र खालतीं (जलसंचय करणारा, अगदीं खालच्या सपाटीला)

—•—

अनुकूले विधौ देयं यतः पूरयिता हरिः ।
प्रतिकूले विधौ देयं यतः सर्वं हरिष्यति ॥ ७ ॥

आर्या

द्यावें सुदैव असतां, कारण भांडार देव भरणार ॥
द्यावें दुर्दैवांतहि, कारण, तें सर्व तोच हरणार ॥७॥

गद्यार्थ—

दैव अनुकूल असता दान द्यावें कारण भंडार भरण्यास त्याचेकडे दैव सिद्ध असतो दुर्दैव आलें, तरी, द्यावें कारण, नाहींतर दैवच सर्व हरणार ।

—•—

दाता नीचोऽपि सेव्यः स्यान्निष्फलो न महानपि ।
जलार्थी वारिधिं त्यक्त्वा नीचं कूपं निषेवते ॥ ८ ॥

आर्या

कोणी म्हणती "निजले,"
"गेले बाहेर," या असें कोणी ।
"आहेत आंत," कोणी,
"गेले कोठें कळे न तें," कोणी ॥ ९ ॥

गद्यार्थ—

(दातृत्व मिरविणाऱ्या पण वास्तविक याचकांना नुसतेच खेळविणाऱ्यांच्या घरी याचकांना काय सांगतात तें पहा—) कोणी (कोणाकुणाचे नोकर) म्हणतात—' धनी निजले आहेत " कुठें सांगतात "बाहेर गेले आहेत " कुठें सागतात "आत (अंतर्गृहात किंवा खासगी कामांत) आहेत." कुठें सांगतात "कुठे गेले तें माहीत नाहीं ।"

—•—

मीयतां कथमभीप्सितमेषां
दीयतां द्रुतमयाचितमेव ॥
तं धिगस्तु कलयन्नपि वाञ्छा-
मर्थिवागवसरं सहते यः ॥ १० ॥

वसंततिलका

कैसें कळे तुजसि ईप्सित काय त्या तें ?
देई अयाचितचि तू झणिं याचकातें ॥
धिक्कार त्या, कळुनि इष्टहि सदा ज्यातें
येतील दीनवच तोंवरि थांबणे तें ॥ १० ॥

गद्यार्थ—

याचकाला काय हवें, ते (त्याने याचना केल्याशिवाय) कसें कळणार ? पण, तू (याचना करणें भाग पाडून त्यास लाजविल्याशिवाय) दान न मागतांच त्वरित दे। याचकानें,

गद्यार्थ—

दाता दान देताना, याचकांचें विडम्बन करील, त्यांना दीनवाणें बोलण्यास लावून लाजवील, तर, त्यामुळें, जें पाप दात्याला लागतें, तें, मग सावकाशीन दान जरी दिलें, तरी ( त्या दानाच्या पुण्यान सुद्धां ) धुतलें जात नाहीं

———०———

युद्धन्ते पक्षिपशवः पठन्ति शुकसारिकाः ।
दातुं शक्नोति यो वित्तं स शूरः स च पण्डितः ॥ १२ ॥

आर्या

पशुपक्षीही लढती, पोपट अन् सारिकाहि शिकतात ।
ते शूर, तेचि पंडित, देऊं जे शकति मात्र निजवित्त १२

गद्यार्थ—

केवळ लढण्यानें कोणी शूर होत नाहीं कारण पशुपक्षीही लढतात पढण्यानें केवळ कोणी पडित होत नाहीं कारण पोपट व साळुंक्याहि शिकतात पण आपली सपत्ति देऊ शकतो तोच शूर व तोच पडित

———०———

कर्णस्त्वचं शिबिर्मांसं जीवं जीमूतवाहनः ॥
ददौ दधीचिरस्थीनि नास्त्यदेयं महात्मनाम् ॥ १३ ॥

आर्या

त्वक् कर्ण देइ, मांसहि शिवि अन् जीमूतवाहन प्राण
हाडे दधीचि देई, देतां थोरांसि वर्ज्य कांहीं न ॥१३॥

गद्यार्थ—

कर्णानें त्वचा ( कवच ) दिली, शिबीनें मांस दिलें, जीमूतवाहनानें प्राण दिले, दधीचीनें हाडें दिलीं . महात्म्यांना, अदेय ( देण्यांत वर्ज्य ) अशी कोठलीच वस्तु नाहीं

———०———

देहीति वचनकामस्य यद्दुःखमुपजायते ।
दाता चेत्तद्विजानीयाद् दद्यात् स्वपिशितान्यपि ॥१४॥

आर्या

'द्या' म्हणतां जें घडतें दुःख मना, तें कळेल दात्यास
तरि तो देईलचि निजमासहि काढूनि याचका त्यास १४



गद्यार्थ—

याचकाच्या तोंडांतून, 'द्या' हे शब्द निघतांना, त्याच्या मनाला ज्या यातना होतात, त्या, जर दात्याला, कळल्या तर, दाता, आपल्या अंगातलें मांस सुद्धां, काढून, त्या याचकाला देईल

———०———

दातुरापत्तिसम्प्राप्तौ याचके समुपस्थिते ।
'नास्ति' तिवाग्जीवितयोर्गेहान्नि:सरणे रणः ॥ १५ ॥

उपजाति

आपत्तिनें ग्रस्त असून दाता
त्याच्या घरीं याचक हाय! येतां ॥
'नाहीं' असा शब्द जधीं निघे, तों
वाणीजिवांचा झगडाचि होतो ॥ १५ ॥

गद्यार्थ—

दात्यावर सकट आलें असतांना, नेमका त्याच्याकडे याचक आल्यास, त्याला, 'नाहीं' शब्द उच्चारण्याच्या वेळीं, (“आधीं कोणी देहाबाहेर पडावें ” याविषयीं ) वाणी व प्राण यांच्यांत झगडा होतो ( असे शब्द बोलण्यापेक्षा प्राण जावोत असें त्या दात्यास वाटतें )

———०———

स्वस्त्यस्तु ते ! निर्गलिताम्बुगर्भं
शरद्घनं नार्दति चातकोऽपि ॥
पर्यायपीतस्य सुरैर्हिमांशोः
कलाक्षयः श्लाघ्यतरो हि वृद्धेः ॥ १६ ॥

उपजाति

सुखी रहा! वारि गळून रिक्त
शरद्घना चातकही न याची ॥
क्रमें पिता देव सुधेसि, कोर,
पूर्णाहुनी सुंदर त्या शशीची ॥ १६ ॥

गद्यार्थ—

( रघुराजान, आपली सर्व सपत्ति, यज्ञामध्य दान देऊन तो स्वत अक्षरश अकिंचन झाला अशा वेळीं त्याचकडे एक याचक आला त्यान, राजाची ही स्थिति पाहतां, त्याच तोंडून, याचने-ऐवजीं धन्योद्गाराचे शब्द बाहेर पडले—) रघुराजा ! सुखी रहा ! ज्याच्यातलें सर्व पाणी गळून गेलें, अशा, शरद् ऋतूतील मेघापाशीं, चातक सुद्धां, जलाची याचना करीत नाहीं क्रमान,

पाळीपाळीनें, देवांनीं सुधा प्राशन केल्यामुळें कलाक्षय होऊन उरलेली, चंद्राची लहान कोर, ही, (त्याच्या वाढीपेक्षां) पूर्णचंद्रापेक्षां, अधिक पूज्य असते (लोक प्रतिपच्चंद्राची पूजा करतात पूर्णचंद्राची नव्हे) त्याप्रमाणें, तुझ्या समृद्ध राजवैभवापेक्षा तुझी आजची ही रिक्तावस्थाच सुंदर आहे)

(हा श्लोक दोन निरनिराळया श्लोकांचे अर्थ जोडून केला आहे)

---

तृषार्तैः सारङ्गैः प्रति जलधरं भूरि विरुतं
घनैर्मुक्ता धाराः सपदि पयसस्तान्प्रति मुहुः ॥
खगानां के मेघाः ? क इह विहगा वा जलमुचा-
मयाच्यो नार्तानामनुपकरणीयो न महताम् ॥ १७ ॥

आर्या

तृषार्त सारंगांनीं घनांस आक्रोश फार जधिं केला ।
दिधलें पुनः पुन्हां त्यां मेघांनींही त्वरेंचि वृष्टिजला ॥
घन कोण त्या खगांचे? खग नि घनांचेंहि काय हो नातें?
आर्तांस याचितां ना देतां ना, कुणिहि वर्ज्य थोरांतें १७

गद्यार्थ—

तृष्णार्त सारंगांनीं, मेघांकडे पाहून, पाण्यासाठीं आक्रोश केला तो काय, आणि मेघांनीं तावडतोब पुन पुन्हा जलधारा सोडल्या त्या काय ! ते पक्षी मेघांचे कोण? आणि मेघ पक्ष्यांचे कोण? पण दुःखितांना, कोणापाशीं मागावें, याबद्दल, विधिनिषेध नसतो, आणि, थोरांना, दान देतांना अमुकाला द्यावें, अमुकाला देऊं नये, असें, वर्ज्य अवर्ज्य, कोणी नसतें! दुःखिताला अयाच्य असें कोणी नसतें-थोरांना अनुपकरणीय कोणी नसतें

---

मणिः शाणोल्लीढः समरविजयी हेतिनिहतो
मदक्षीणो नागः शरदि सरितः श्यानपुलिनाः ॥
कलाशेषश्चन्द्रः सुरतमृदिता बालललना
तनिम्ना शोभन्ते गलितविभवाश्चार्थिषु नृपाः ॥ १८ ॥

शार्दूलविक्रीडित

पैलू पाडुनि रत्न, वीर विजयी घायाळ युद्धामधीं
हत्ती क्षीण मद स्रवूनिः शरदीं रोडावलेली नदी ॥
चंद्राची उरली कलाहि, सुरतें बाला परिम्लान ती
देवोनी धन याचकां नृप; असे हे क्षीणचीं शोभती ॥

गद्यार्थ—

पैलू पाडताना, सहाणेवर घांसून झिजलेलें रत्न, युद्धात जखमामुळें, क्षीण झालेला विजयी वीर; मद वाहून वाहून क्षीण झालेला हत्ती, शरदृतूंत वाळवंटें उघडीं पडलेलीं, रोडावलेली नदी, चंद्राची कलाक्षयानंतर उरलेली कोर; सुरतश्रमाने थकलेली बाला, याचकाना धन देऊन गलितविभव राजा; या सर्वांना त्याची क्षीणता, हीच, (त्यांच्या पुष्टीपेक्षा) अलंकाराप्रमाणें सुंदर शोभिवंत होते

---

मेरुर्दूरगतो महान् हिमगिरिः प्रालेयमात्रोऽभव-
च्चंद्रः श्रीसहितोऽपि याचकभयात्क्षीणत्वमालम्बते ॥
कौपीनं धृतवान् हरोऽपि सहसा विष्णुर्जले संस्थितो
वारां राशिरपेयतामुपगतः को नाम दातुं क्षमः ॥१९॥

शार्दूलविक्रीडित

गेला मेरुगिरी दुरी, हिमगिरी, गोठूनि गेला उरीं
मोठा पूर्णहि चंद्र याचकभयें क्षीणत्व हो आदरी ॥
लंगोटी शिव नेसतो, निजतसे विष्णू जळीं जाउनी
होई अब्धि अपेय खारट, मिळे दाता खरा कोठुनी?

गद्यार्थ—

(दान करण्यास महान् समर्थ असे सारे, अनेक कारणांनीं असमर्थ ठरले) महान् हिमालय गारठून हिममय झाला, पूर्ण चंद्र असून क्षय पावला, शंकराने लंगोटी स्वीकारली (सर्व सोडून) विष्णु घाई घाईनें पाण्यावर जाऊन राहिला; समुद्र खारट अपेय झाला, हें सर्व याचकभयाने असावें,—मग, शेवटीं, समर्थ असा दाता, उरला तरी कोण?

---

उपार्जितानां वित्तानां त्याग एव हि रक्षणम् ॥
तडागोदरसंस्थानां परीवाह इवाम्भसाम् ॥ २० ॥

अनुष्टुभ्

स्वयें अर्जितही वित्ता दान हेंच सुरक्षण ।
तडागाचें जसें पाणी रक्षिती पाट फोडुन ॥ २० ॥

गद्यार्थ—

स्वकष्टार्जित संपत्तीचें सुद्धा रक्षण करण्याचा खरा मार्ग म्हणजे दान, तेंच त्याचें संरक्षण जसें तळ्याचें पाणी रक्षण करण्याचा उत्तम मार्ग म्हणजे तें वाटूं देणें. (नाहींतर पूर आल्यास तें बंधारा फोडील, किंवा इतरवेळीं नासून जाईल.)

---

# प्रकरण १६ वें

## परोपकार, प्रत्युपकार.

पद्माकरं दिनकरो विकचीकरोति
चंद्रो विकासयति कैरवचक्रवालम् ॥
नाभ्यर्थितो जलधरोऽपि जलं ददाति
संतः स्वयं परहितेषु कृताभियोगाः ॥ १ ॥

वसंततिलका

पद्मां रवी उमलवी स्वयमेव जैसा
चंद्र स्वयें फुलवितो कुमुदांस जैसा ॥
दे वारि वारिद जसा नच मागतां तो
तैशी परोपकृति सज्जनही करीतो ॥ १ ॥

गद्यार्थ—

सूर्य कमलांना विकासित करतो, चंद्र कुमुदाना फुलवितो, मेघही न मागतांच पाणी देतात, तसेच, सज्जन, आपण होऊन परोपकार करतात.

---

परोपकाराय फलन्ति वृक्षाः
परोपकाराय वहन्ति नद्यः ॥
परोपकाराय दुहन्ति गावः
परोपकारार्थमिदं शरीरम् ॥ २ ॥

उपजाति

परोपकारार्थ फळें तरुंना
परोपकारार्थ जळें नद्यांना ॥
गो दुग्ध दे हाहि परोपकार
परोपकारार्थचि हें शरीर ॥ २ ॥

गद्यार्थ—

झाडांना फळें येतात तीं परोपकारासाठीं, नद्यांतून पाणी वाहतें, तें परोपकारासाठीं, गाई परोपकारार्थच दूध देतात हें शरीर परोपकारासाठींच आहे.

---

श्रोत्रं श्रुतेनैव न कुण्डलेन
दानेन पाणिर्न तु कङ्कणेन ॥
विभाति कायः खलु सज्जनानां
परोपकारैर्न तु चन्दनेन ॥ ३ ॥

उपजाति

ज्ञानेंचि कानासि, न कुंडलानें
दानेंच हातास न कंकणानें ॥
शोभा स्वदेहासहि संत माने
परोपकारेंचि, न चंदनानें ॥ ३ ॥

गद्यार्थ—

सज्जनांच्या कानाला विद्येनेंच शोभा येते, कुंडलानें नव्हे, हाताला शोभा दानानेंच; कंकणानें नव्हे देहालाही शोभा परोपकारानें; चंदनादि लेपानीं नव्हे.

---

रत्नाकरः किं कुरुते स्वरत्नै—
र्विन्ध्याचलः किं करिभिः करोति ? ॥
श्रीखण्डखण्डैर्मलयाचलः किं ?
परोपकाराय सतां विभूतयः ॥ ४ ॥

उपजाति

अब्धि स्वरत्नीं करणार काय ?
विंध्याचला हत्ति असूनि काय ? ॥
त्या चंदनांचें मलयास काय ?
परोपकारार्थचि थोर होय ॥ ४ ॥

गद्यार्थ—

आपल्या रत्नांचा समुद्राला, आपल्या हत्तींचा विंध्याद्रीला, तसेंच आपल्या चंदनवृक्षाचा मलयाला काय उपयोग आहे ? थोरांचे जन्म परोपकारासाठीं असतात.

---

कस्मादिन्दुरसौ धिनोति जगतीं पीयूषगर्भैः करैः ?
कस्माद्वा जलधारयैव धरणीं धाराधरः सिञ्चति ? ॥
भ्रामं भ्राममयं च नन्दयति वा कस्मात्त्रिलोकीं रविः ?
साधूनां हि परोपकारकरणे नोपाध्यपेक्षं मनः ॥ ५ ॥

शार्दूलविक्रीडित

या पृथ्विप्रति चंद्र कां रिझवितो तेजें सुधापूर्ण तो ?
हाही मेघ जगास काय म्हणुनी धाराजलें शिंपितो ? ॥
त्रैलोक्या, भ्रमुनी भ्रमुनि, रवि ही आनंद कां देतसे ?
कष्टांची न, परोपकार करतां, साधूंस पर्वा असे ॥ ५ ॥

गद्यार्थ—

स्वत:च्या अमृतमय किरणांनी न्हाऊन चंद्र काय म्हणून पृथ्वीला तुष्ट करतो ? मेघ तरी स्वत:च्या जलधारांनीं धरणीला काय म्हणून शिंपीत असतो ? भ्रमून भ्रमून सूर्य ही त्रैलोक्याला कां एवढा आनंद देत असतो ? सज्जन हे परोपकार करतांना स्वत:ला किती कष्ट पडतात याची क्षिति बाळगीत नाहींत

---

धवलयति समग्रं चन्द्रमा जीवलोकं
किमिति निजकलङ्कं नात्मसंस्थं प्रमार्ष्टि ? ॥
भवति विदितमेतत्प्रायशः सज्जनानां
परहितनिरतानामादरो नात्मकार्ये ॥ ६ ॥

मालिनी

धवल करित साऱ्या चंद्र जो जीवलोका
परि न निजतनूच्या, कां धुवी तो कलंका ? ॥
विदितचि बहुधा हें नित्य कीं सज्जनांस
परहितनिरतांना नैव आस्था स्वतांस ॥ ६ ॥

गद्यार्थ—

"चंद्र सर्व जगाला धवल करून सोडतो पण स्वत:च्या देहावरील कलंक तो कां धुऊन टाकीत नाहीं ?" याला उत्तर बहुधा सर्वांना माहीतच आहे कीं परोपकारांत गढलेल्या सज्जनांना आपल्या स्वत:च्या कार्याची आस्था नसते.

---

गाढान्धकारभिदुरोऽपि च दीप्तिजालै-
र्दीपस्तमो न निजमूलगतं निहन्ति ॥
प्रायः परार्थपरिसाधनकामुकानां
स्वार्थे मनागपि न सज्जति चित्तवृत्तिः ॥ ७ ॥

वसंततिलका

अंधार गाढ निज जो किरणें निवारी
तोची दिवा, निजतळीं तम, तें न वारी ॥
प्रायें परार्थ झटती असल्या नरांचें
स्वार्थी मुळीं न जडतें कधि चित्त साचें ॥ ७ ॥

गद्यार्थ—

जो दिवा स्वत:च्या किरणांनीं गाढ अंधाराचा भेद करतो, तोच, स्वत:च्या खालीं असलेला अंधार कांहीं निवारीत नाहीं. बहुधा परोपकाराचें प्रेम असलेल्या लोकांना, स्वार्थाविषयीं कांहींचीही आस्था नसते.

---

तृणं चाहं परं मन्ये नरादनुपकारिणः ।
घासो भूत्वा पशून्पाति भीरून्पाति रणाङ्गणे ॥८॥

आर्या

उपकार न जो करितो, त्याहुनि बरवें मला तृणचि गमतें
खातां पशूंस, दांतीं धरतां, भिऱ्यां रणांत रक्षी तें ॥८॥

गद्यार्थ—

उपकार न करणाऱ्या माणसापेक्षां मला य:कश्चित् गवत हेंच श्रेष्ठ वाटतें. पशूंचें अन्न होऊन तें त्यांचें रक्षण करतें व भित्र्यांचें दातीं धरण्यानें रणांगणांत रक्षण करतें. (दातीं तृण धरून भित्रे शरण जातात व मग त्यांना कोणी ठार मारीत नाहीं )

---

परोपकारशून्यस्य धिङ्मनुष्यस्य जीवितम् ।
यावन्तः पशवस्तेषां चर्माप्युपकरोति हि ॥ ९ ॥

आर्या

करितो परोपकार न, असो तयाचा त्रिवार धिक्कार ॥
चर्महि पशुमात्राचें सर्व जगावर करीच उपकार ॥ ९ ॥

गद्यार्थ—

परोपकार न करणाऱ्या माणसाच्या जीवनाला धिक्कार असो ! जेवढे म्हणून पशु आहेत त्यांचें चामडें सुद्धां उपकार करतें.

---

एकैकस्योपकारस्य प्राणान् दास्यामि ते कपे ।
शेषस्येहोपकारस्य भवाम ऋणिनो वयम् ॥ १० ॥

अनुष्टुभ्

एकेक उपकाराला फेडूं स्वप्राण अर्पुनी ।
कपे ! उर्वरितासाठीं राहूं आम्ही सदा ऋणी ॥ १० ॥

गद्यार्थ—

( हा व पुढील श्लोक हे श्रीरामानें हनुमंताचे, स्वतःवर झालेल्या उपकाराविषयीं आभार व कृतज्ञता व्यक्त करतांना काढलेले रामायणांतील उद्गार आहेत. ) हे हनुमंता ! तुझ्या एकेका उपकाराची फेड करण्यासाठीं एकेक प्राण देईन ( इतक्या मोलाचे ते उपकार आहेत. व प्राण तर अवघे पाचच. तेव्हां आणखी किलेक ) उपकार जे शिल्लक राहतील त्याचेसाठीं आम्ही तुझे जन्मभराचे ऋणी राहूं.

---

मदङ्गे जीर्णतां यातु यत्त्वयोपकृतं कपे ।
नरः प्रत्युपकाराणामापत्स्वायाति पात्रताम् ॥११॥

शार्दूलविक्रीडित

मोठे जे उपकार हे कपिवरा ! केलेस माझ्यावरी
ते राहोत जिरून नित्य मम या सारेचि देहांतरीं ॥
होई प्रत्युपकारपात्र नर तो—आपत्ति जो भोगितो
फेडाया उपकार-संकट तुला येवो-न हें इच्छितों ११

गद्यार्थ—

( श्रीराम हनुमंताला म्हणतात ) हे हनुमंता ! ( १० व्या श्लोकांतील उपकार फेडण्याची कल्पनाही युक्त नव्हे. तर त्या ऐवजीं ) तू जे माझ्यावर उपकार केलेस ते सारे माझ्या अंगांतच जिरून राहोत ( माझ्या शिरावर तें ओझें कायमचेंच राहूं दे. ) कारण उपकाराची फेड प्रत्युपकारानीं करावयाची, तर, माझ्या-प्रमाणें तुझ्यावर कांहीं आपत्ति यावी, तेव्हां तू प्रत्युपकारपात्र होणार ! आणि, केवळ, मी तुझी परतफेड करावयाची, एवढ्या-साठीं, तुझ्यावर आपत्ति यावी, अशी, मी, कशी बरें इच्छा करूं ?

---

# प्रकरण १७ वें

## जग, जीवन, जन्म, संसार, आयुष्य, गृहस्थाश्रम.

असेवितेश्वरद्वारमदृष्टविरहव्यथम् ।
अनुक्तक्लीववचनं धन्यं कस्यापि जीवनम् ॥ १ ॥

वसंततिलका

लाङ्गूलचालन कधीं धनिकां न केलें
किंवा न दुःख विरहांतिल पाहियेलें ॥
उच्चारिले न कधिं शब्द नपुंसकाचे
हें धन्य जीवन असेल कचित् कुणाचें ॥ १ ॥

गद्यार्थ—

श्रीमंतांच्या दारीं तिष्ठत उभे राहावें लागलें नाहीं, विरहाच्या व्यथा सहन कराव्या लागल्या नाहींत, नपुंसकासारखे दुर्बल शब्द उच्चारले नाहींत-असें धन्य जीवन कचितच कोणाचें असेल.

---

यदि रामा, यदि च रमा, यदि तनयो विनयधीगुणोपेतः ।
तनये तनयोत्पत्तिः सुरवरनगरे किमाधिक्यम् ? ॥ २ ॥

आर्या

स्त्री सुंदर, संपत्ती, पुत्र मिळे ज्यास विनयबुद्धियुत ।
पुत्रा पुत्रहि व्हावा अधिकचि याहून काय स्वर्गांत ॥२॥

गद्यार्थ—

सुंदर सुयोग्य पत्नी लाभलेली असावी, पुरेशी संपत्ती हातीं असावी, विनयशाली विद्यासंपन्न बुद्धिमान् मुलगा असावा आणि मुलाला मुलगा झालेला असावा...याहून स्वर्गांत तरी अधिक काय आहे ?

---

यज्जीव्यते क्षणमपि प्रथितं मनुष्यै–
विज्ञानविक्रमयशोभिरहीयमानम् ॥
तन्नाम जीवितमिह प्रवदन्ति सन्तः
काकोऽपि जीवति चिराय बलिं च भुङ्क्ते ॥३॥

वसततिलका

सन्मान्य जीवन नरें क्षणही जगावें
विज्ञान शौर्य यश हीं मिळवीत जावें ॥
हें सत्य जीवन असें बुध बोलतात
तो काकही चिर जगे—बलिभक्ष्य खात ॥ ३ ॥

गद्यार्थ—

विशेष ज्ञान, शौर्य, कीर्ति, यांची प्राप्ति करीत करीत, सन्मान्य जीवन,—मग तें अल्पकाल कां होईना—माणसानें जगावें, याला खरें जीवन, असें सज्जन म्हणतात नाहींतर कावळाही, दीर्घकाळ, बलि खात जगतोच !

———०———

जातः कूर्मः स एकः पृथुभुवनभरायार्पितं येन पृष्ठं
श्लाघ्यं जन्म ध्रुवस्य भ्रमति नियमितं यत्र तेजस्त्रिचक्रम्॥
सञ्जातव्यर्थपक्षाः परहितकरणे नोपरिष्टान्न चाधो
ब्रह्माण्डोदुम्बरान्तर्मशकवदपरे जन्तवो जातनष्टाः ॥४॥

स्रग्धरा

देई जो पाठ, पृथ्वी उचलुनि धरण्या,
धन्य तो कूर्म एक
जन्म श्लाघ्य ध्रुवाचा, नियत जिथ फिरे
तारकाचक्र देख ॥
लाभोनी व्यर्थ पंख, श्रम न परहिता,
ना वरी या न खालें
विश्वाच्या उंबरीं या किति वसति किडे
जन्म होतांचि मेले ॥ ४ ॥

गद्यार्थ—

जड पृथ्वीचा भार उचलून धरण्यास, ज्यानें आपली पाठ दिली, त्या एका कूर्माचें जीवन धन्य म्हणतां येईल ! जो आपल्या प्रभावानें, सर्व तारकाचक्र, नियमितपणें, आपल्या भोंवतीं फिरवितो त्या ध्रुवाचा जन्म धन्य ! नाहींतर, या विश्वरूपी उंबराच्या फळामध्यें, ज्यांच्या पंखांचा, कांहीं उपयोग नाहीं, कारण जे परहितासाठीं खालीं व वर कुठेंच उडूं शकत नाहींत, असे मासा चिलटासारखे, किडे, जन्मतांच मेल्यासारखे, काय थोडे आहेत ?

———०———

परिवर्तिनि संसारे मृतः को वा न जायते ? ।
स जातो येन जातेन याति वंशः समुन्नतिम् ॥५॥

अनुष्टुभ्

मेलेला कोण जन्मे न, संसारीं फिरत्या, नर ? ।
आणी उन्नति जो वंशा, तोचि जन्मे खरोखर ॥ ५ ॥

गद्यार्थ—

चाकाप्रमाणें फिरणाऱ्या या संसारात मेलेला कोण जन्माला येत नाहीं ? पण जो जन्मल्यानें, वंश उन्नति पावतो, तोच खरा जन्मला

———०———

असारे खलु संसारे सारं श्वशुरमन्दिरम् ॥
हरो हिमालये शेते हरिः शेते महोदधौ ॥ ६ ॥

अनुष्टुभ्

खोट्या संसारिं या एक, सासऱ्याचें खरें घर ।
सागरांत निजे विष्णु, हिमाद्रीवर शंकर ॥ ६ ॥

गद्यार्थ—

मायामय या संसारामध्यें, खरें खुरें असें, एकच स्थळ, म्हणजे सासऱ्याचें घर ! ( जीवाला खराखुरा सुखोपभोग तेथें मिळावयाचा ! ) ( म्हणूनच जणूं काय ) शंकर हिमालयावर व विष्णु समुद्रावर झोंप घेत आहेत. ( विनोद )

———०———

आदित्यस्य गतागतैरहरहः संक्षीयते जीवनं
व्यापारैर्बहुकार्यभारगुरुभिः कालो न विज्ञायते ॥
दृष्ट्वा जन्मजराविपत्तिमरणं त्रासश्च नोत्पद्यते
पीत्वा मोहमयीं प्रमादमदिरामुन्मत्तभूतं जगत् ॥७॥

शार्दूलविक्रीडित

जाई येइ रवी, अहर्निश झडे हें नेणतां जीवन
काळाचें तुरतेंच भान, बहुतां कार्यांमधें गुंतुन ॥
व्हावें, जन्म, जरा, विपत्ति, मरणें, पाहून ना दुःख तें
मोहभ्रांतिसुरा पिऊन जग हें उन्मत्तसें वाटतें ॥ ७ ॥

गद्यार्थ—

सूर्य जातो येतो, आणि दिन प्रतिदिन, आयुष्य झडत जातें. अनेक कार्यांच्या व्यापांमुळें, माणसाला, काळाचें भान राहात नाहीं. जन्म, वार्धक्य, संकट, मरण हीं पाहूनही दुःखाची टोंचणी लागत नाहीं,—तेव्हां मोहाची भ्रमविणारी मदिरा पिऊन हें जग उन्मत्त झालें असलें पाहिजे

———०———

आयुर्वर्षशतं नृणां परिमितं, रात्रौ तदर्धं गतं
तस्यार्धस्य परस्य चार्धमपरं बालत्ववृद्धत्वयोः ॥
शेषं व्याधि-वियोग-दुःखसहितं सेवादिभिर्नीयते
जीवे वारितरङ्गबुद्बुदसमे सौख्यं कुतः प्राणिनाम् ॥८॥

शार्दूलविक्रीडित

आर्धी शंभर वर्षं आयु अवघें; रात्रींत अर्धें सरे
अर्धें त्यांतिल बाल्य वृध्दपण तें; अर्ध्यात अर्धें उरे ॥
सेवा, रोग, वियोगदुःख मिळुनी जें शेष तें संपलें
पाण्याचा जणुं जीव हा बुडबुडा त्या सौख्य हो कोठलें८

गद्यार्थ —

माणसाला, आयुष्य, आर्धी शंभर वर्षांचें मर्यादित. त्यांतलें अर्धें, रात्रींत जायचें; त्या अर्ध्यांतलें अर्धें, बाळपण व वार्धक्य;- आणि जें उरलें सुरलें, तें सेवा, रोग, वियोग, दुःख, या सर्वांमिळून संपून जायचें! जीवन हेंच मुळीं, पाण्याच्या बुडबुड्यासमान असल्यानें माणसाला, सुख कोठून मिळणार?

---

"अतिपरिचयादवज्ञा" इति यद्वाक्यं मृषैव तद्भाति ॥
अतिपरिचितेऽप्यनादौ संसारेऽस्मिन् न जायतेऽवज्ञा ९

आर्या

"अतिपरिचयें अवज्ञा
होई" हें वाक्य वाटतें खोटें ॥
अतिपरिचयें अनादिहि
संसारीं वीट कां न हो वाटे? ॥ ९ ॥

गद्यार्थ—

"अतिपरिचय झाल्यानें, अनादर वाटूं लागतो," ही जी कव्युक्ति आहे, ती खोटी वाटते. अतिपरिचित व अनादि, अशा या संसाराविषयीं, कोणाला कधीं वीट वाटला आहे काय?

---

अनंताः पितरो यान्ति यान्त्यनन्ताश्च मातरः ।
इह संसारिणां पुंसां वनपादपपर्णवत् ॥ १० ॥

उपजाति

संसारिं, माता नि पिते अनंत
नरा मिळोनी विलयास जात ॥
पानें तरूंच्या वरुनी वनांत
लागोनि जैशीं गळतीं अनंत ॥ १० ॥

गद्यार्थ—

या संसारांत ( जन्ममरणाच्या फेऱ्यांत ) माणसाला, अनेक पिते येऊन जातात. अनेक माताही येऊन जातात. रानांतल्या वृक्षाला ज्याप्रमाणें, अनंत पानें लागतात, आणि, गळून पडतात, तद्वत्.

---

यावत्स्वस्थमिदं कलेवरगृहं यावच्च दूरे जरा
यावच्चेन्द्रियशक्तिरप्रतिहता यावत्क्षयो नायुषः ॥
आत्मश्रेयसि तावदेव विदुषा कार्यः प्रयत्नो महान्
प्रोद्दीप्ते भवने तु कूपखननं प्रत्युद्यमः कीदृशः? ॥११॥

शार्दूलविक्रीडित

आहे स्वस्थचि देहरुप गृह हें,
वार्धक्य राहे दुरी
जों हे चालति हातपाय, सरलें
आयुष्य ना जोंवरी ॥
आत्मश्रेयचि तोंवरी मिळविण्या
मोठ्या प्रयत्ना करी
लागे आग तदा विहीर खणणें
ही रीत कां हो बरी? ॥ ११ ॥

गद्यार्थ—

देहरूपी घर, जोंवर, डळमळीत झालें नाहीं; वार्धक्य जोंवर दूर आहे; इंद्रियें जोंवर नीट काम देत आहेत; आयुष्य जोंवर संपलें नाहीं; तोंवरच, माणसानें स्वतःला श्रेयस्कर तें प्राप्त करून घेण्याचा महान् प्रयत्न केला पाहिजे. घराला आग लागल्यावर मग विहीर खणण्यास निघणें, याला काय म्हणावें?

---

हिंसाशून्यमयत्नलभ्यमशनं धात्रा मरुत्कल्पितं
व्यालानां पशवस्तृणाङ्कुरभुजः सृष्टाः स्थलीशायिनः ॥
संसारार्णवलङ्घनक्षमधियां वृत्तिः कृता सा नृणां
यामन्वेषयतां प्रयान्ति सततं सर्वे समाप्तिं गुणाः ॥१२॥

शार्दूलविक्रीडित

हिंसेवीण, विनाप्रयास, उरगा
भक्ष्यार्थ वायू दिला
देवानें पशु भूमिशायि, तृणची
भक्षी असा निर्मिला ॥
संसाराब्धि तरूं शके नर; तया
पेठी दिली नेमुन—
वृत्ती-जी करण्यांत प्राप्त-सरती
सारे सदा सद्गुण ॥ १२ ॥

गद्यार्थ—

(परमेश्वरानें माणसावर मोठाच अन्याय केला आहे.) सर्पाला, ब्रह्मदेवानें हिंसेवाचून, विनाप्रयास मिळणारा वायु हें खाणें दिलें, गवत खावें व भूमीवर निजावें इतकी सोपी वृत्ति पशूंना दिली, पण हा संसारसागर तरून जाऊं शकेल, अशा पात्रतेचा मनुष्यप्राणी असतां, त्याची उपजीविका, अशी अवघड करून ठेवली, कीं, जी मिळविण्याच्या प्रयत्नांतच, माणसाचे सारे सद्गुण संपून जावेत!

———०———

क्वचिद्विद्वद्गोष्ठी क्वचिदपि सुरामत्तकलहः
क्वचिद्वीणावाद्यं क्वचिदपि च हा हेति रुदितम् ॥
क्वचिद्रामा रम्या क्वचिदपि जराजर्जरतनु–
र्न जाने संसारः किममृतमयः किं विषमयः? ॥१३॥

शिखरिणी

कुठें विद्वद्वाणी, कलहचि कुठें मद्य पिउनी
कुठें वाजे वीणा, रुदनचि कुठें येत श्रवणीं ॥
कुठें नारी रम्या, जरठ दिसतो जर्जर कुठें
न जाणे, संसारीं अमृत भरलें वा विषचि तें ॥ १३ ॥

गद्यार्थ—

कुठें, एकीकडे विद्वानांचीं भाषणें चाललेलीं आहेत; तर दुसरीकडे, कुठेंतरी, दारुड्यांचीं भांडणें चाललीं आहेत; कुठें, वीणावादन, तर कुठें, हाय हाय म्हणून रोदन! कुठें सुंदर रमणी दृष्टीस पडते, तर कुठें, जर्जरतनु म्हातारा दृष्टीस पडतो. यामुळें हा संसार अमृतपूर्ण आहे, कीं, विषपूर्ण आहे तेंच समजत नाहीं.

———०———

बन्धोन्मुक्त्यै खलु मखमुखान्कुर्वते कर्मपाशान्
अन्तःशान्त्यै मुनिशतमतानल्पचिन्तां भजन्ते ॥
तीर्थे मज्जन्त्यशुभजलधेः पारमारोढुकामाः
सर्वं प्रामादिकमिह भवभ्रान्तिभाजां नराणाम् ॥१४॥

शार्दूलविक्रीडित

होण्या बन्धनमुक्त, यज्ञ करुनी घेती नवीं बंधनें
अंतःशांतिस येति लागुनि नवीं शास्त्रादि हीं चिन्तनें ॥
तीर्थी येति बुडया अनेक, तरण्या पापाब्धि तो दुस्तर!
संसारीं भ्रमतां प्रमाद करिती सारेच, ऐसे नर ॥ १४

गद्यार्थ—

बन्धनमुक्त होण्यासाठीं मनुष्य करतो काय? तर यज्ञयागादि कर्में; म्हणजे नवे कर्मपाश! अंतःशांति प्राप्त होण्यासाठीं करतो काय? तर निरनिराळ्या ऋषींच्या मताचीं म्हणजे शास्त्राचीं चिन्तनें! म्हणजे अंतःशांतीचें हटकून वाटोळें! पापसागर तरून जाण्यासाठीं करतो काय? तर नानातीर्थांत बुड्या! म्हणजे हे बुडून तरणार! संसारानें भ्रमल्यामुळें मनुष्य आपलें जीवन असें प्रमादमय करून ठेवतो!

———०———

वातान्तर्दीपकशिखालोलं जगति जीवितम् ।
तडित्स्फुरणसंकाशा पदार्थश्रीर्जगत्त्रये ॥ १५ ॥

उपजाति

वाऱ्यामुळें चंचल जेविं ज्योत
सारें तसें जीवित या जगांत ॥
लकाकुनी वीज विलुप्त व्हावी
पदार्थ तैसा क्षणमात्रजीवी ॥ १५ ॥

गद्यार्थ—

वाऱ्यानें हलणाऱ्या दिव्याच्या ज्योतीइतकें, जीवित, चंचल असतें. सर्व पदार्थही, वीज लकाकून जशी लुप्त होते तसे, क्षणमात्रजीवी असतात.

———०———

क्षणं बालो भूत्वा क्षणमपि युवा कामरसिकः
क्षणं वित्तैर्हीनः क्षणमपि च संपूर्णविभवः ॥
जराजीर्णैरङ्गैर्नट इव वलीमण्डिततनु–
र्नरः संसारान्ते विशति यमधानीजवनिकाम् ॥१६॥

शिखरिणी

क्षणीं होई बाल, क्षणिं तरुण रंगेल, कधिं तो—
भिकारी होई वा क्षणिक धनसंपन्न बनतो ॥
क्षणें हो म्हातारा–किति सुरकुत्या त्या तनुवरी
अशा संसारान्तीं नटसमचि लोपे यमपुरीं ॥ १६ ॥

गद्यार्थ—

माणसाचें जीवन हें नाटक व मनुष्य हा नट. तो क्षणांत पहावें तों बाल; क्षणांत रंगेल तरुण, क्षणांत भिकारी, तर क्षणांत धनसंपन्न! अखेर, अगदीं सुरकुतलेल्या देहाचा जख्ख म्हातारा; आणि अशा संसाराच्या नाटकाच्या शेवटीं तो यमपुरीच्या पडद्याआंत लुप्त होतो.

———०———

न संसारोत्पन्नं चरितमनुपश्यामि कुशलं
विपाकः पुण्यानां जनयति भयं मे विमृशतः ॥
महद्भिः पुण्यौघैश्चिरपरिगृहीताश्च विषया
महान्तो जायन्ते व्यसनमिव दातुं विषयिणाम् ॥ १७॥

शिखरिणी

न वाटे संसारीं स्वहितकर कांहीं हि घडतें
विचारें, पुण्यांची परिणति मनाला भिवविते ॥
महापुण्यौघांनीं विषय बनती पुष्टचि वरे
जणूं वाटे द्याया विषयि मनुजा दुःखचि खरें ॥ १७॥

गद्यार्थ—

संसारी जीवनापासून कांहीं कुशल घडतें, असें वाटत नाहीं. विचार करून पाहिले, तर पुण्याच्या परिणामाची, मनाला भीतीच वाटते; जे विषय सांपडून, पुष्कळ काळ आधींच भोगून झाला, त्यांना मोठीं पुण्यें हीं पुष्ट करतात; आणि, अशा तऱ्हेनें विषयी माणसाला, अधिकच संकटांत पाडतात कीं काय, असें वाटतें.

---

आयुषः क्षण एकोऽपि सर्वरत्नैर्न लभ्यते ।
नीयते तद्वृथा येन प्रमादी सुमहानसौ ॥ १८॥

अनुष्टुभ्

जरी रत्नेंहि देऊन आयुःक्षण न लाभतो।
तोहि जो दवडी व्यर्थ महादोषी ठरेल तो ॥ १८॥

गद्यार्थ—

सर्व रत्नें देऊन आयुष्याचा एक क्षण विकत सुद्धां, मिळत नाहीं. अशा मोलाचें आयुष्य जो व्यर्थ घालवितो, त्याला केवढा अपराधी म्हणावें?

---

क्रोशन्तः शिशवः सवारि सदनं पङ्कावृतं चाङ्गणं
शय्या दंशवती च रूक्षमशनं, धूमेन पूर्णं गृहम् ॥
भार्या निष्ठुरभाषिणी प्रभुरपि क्रोधेन पूर्णः सदा
स्नानं शीतलवारिणा च सततं; धिग्धिग्गृहस्थाश्रमम् ॥

शार्दूलविक्रीडित

पोरें ओरडतीं, गळे घर, भरे
ज्या अंगणीं पंकही
चाचे ज्या शयनीं, कदन्न अशनीं
अन् धूर साऱ्या गृहीं ॥
पत्नी निष्ठुरभाषिणी, घरधनी
हा नित्य कोपक्षम
स्नानाला जल शीत संतत असा
धिक् धिक् गृहस्थाश्रम ॥ १९ ॥

गद्यार्थ—

पोरें ओरडताहेत; घर गळत आहे; अंगणांत चिखल, अंथरुणांत ढेकूण, पिसा; खायला कदन्न; घरांत सर्वत्र धूर भरलेला; बायको कर्कशा; आणि घरधनी रागीट; आंघोळीला सदा गार पाणी; ... असल्या गृहस्थाश्रमाला धिक्कार असो!

---

यत्रानेके क्वचिदपि गृहे तत्र तिष्ठत्यथैको
यत्राप्येकस्तदनु बहवस्तत्र नैकोऽपि चान्ते ॥
इत्थं चेमौ रजनिदिवसौ दोलयन्द्वाविवाक्षौ
कालः काल्या भुवनफलके क्रीडति प्राणिसारैः ॥ २० ॥

मन्दाक्रान्ता

होत्या जेथें कितिक, गृहिं त्या एक राहे टिकून
आधीं थोड्या, मग बहु, तिथें शेवटीं एकही न ॥
फांसे रात्री दिन हलवुनी कालिशीं काल खेळे
संसाराचा पट, निनर हे, सोंगट्या तेथ झाले ॥ २० ॥

गद्यार्थ—

सोंगट्याच्या पटावरील एका घरांत, सुरुवातीला अनेक सोंगट्या असतां त्यांत शेवटीं एखादीच टिकून रहावी- आधीं एक मध्यंतरीं त्यांत घरात बऱ्याच जमाव्या, शेवटीं एकही राहूं नये, असा हा संसाराचा सारीपट व त्यावर मानव या सोंगट्या व रात्र व दिन हे फांसे खुळखुळवीत काळ हा कालीशीं खेळत आहे!

---

प्राप्ताः श्रियः सकलकामदुधास्ततः किं ?
दत्तं पदं शिरसि विद्विषतां ततः किम् ?॥
सम्मानिताः प्रणयिनो विभवैस्ततः किं ?
कल्पं स्थितं तनुभृतां तनुभिस्ततः किम् ?॥ २१ ॥

शार्दूलविक्रीडित

आलें वैभव सर्वकामद, तरी
बोला पुढें काय तें ?
शत्रूंच्या शिरिं पाय देउनि, तरी
सांगा पुढें काय तें ? ॥
अर्पोनी विभवें निजप्रियजना,
सांगा पुढें काय तें ?
कल्पान्तावधि आयु लाभुनि नरा,
- बोला पुढें काय तें ? ॥ २१ ॥

गद्यार्थ—

कामधेनूसारखें, सर्व देणारें वैभव प्राप्त झालें, असें समजा, तरी पुढ काय? डोक्यावर पाय देऊन शत्रु जमीनदोस्त केले, समजा, तरी पुढ काय? आपल्या सर्व प्रियजनांना विमत्र देऊन उच पदाला नेलें, तरी पुढ काय? आणि अगदीं कल्पान्तापर्यंत आयुष्य मानवी देहाला लाभलें तरी पुढें काय? (हें अजून तरी कुणाला कळलेलें नाहीं)

---

वासनावागुराकृष्टो मनोहरिणको नृणाम् ।
परां विवशतामेति ससारवनगुल्मके ॥ २२ ॥

उपजाति

संसार हें घोर अरण्य साचे
जाळें जणूं त्यांतचि वासनांचे ॥
मन:स्वरूपी मृग हा तयांत
गुंते नि होई दुबळा नितांत ॥ २२ ॥

गद्यार्थ—

या ससाररूप घोर अरण्यांत, वासनारूपी जाळें पसरलेलें असतें, त्यांत गुरफटून, मनरूपी हरिण अगत इतवल होतो

---

व्रजन्ति न निवर्तन्ते स्रोतांसि सरितां यथा ।
आयुरादाय मर्त्यानां सदा रात्र्यहनी तथा ॥२३॥

अनुष्टुभ्

समुद्रांत नद्या जैशा जाती, परत येति न ।
आयु घेऊन मर्त्यांचे जाती रात्री तसे दिन ॥ २३ ॥

गद्यार्थ—

नद्यांचे प्रवाह, जसे (समुद्रांत) जातात पण परत येत नाहींत, तसेच, रात्र आणि दिवस हे, नित्य माणसाचें आयुष्य (क्षणाक्षणांनीं आणि कणाकणांनीं) घेऊन जातात पण परत येत नाहींत

---

यथा काष्ठं च काष्ठं च समेयातां महोदधौ ।
समेत्य च व्यपेयातां तद्वद्भूतसमागमः ॥ २४ ॥

उपजाति

लांकूड लांकूड समीप येतीं
घुसून अर्ध्यांवरती जशीं तीं ॥
क्षणैक भेटून विभक्त होतीं
जिवाजिवांच्याहि अशाच भेटी ॥ २४ ॥

गद्यार्थ—

समुद्राच्या पृष्ठावर सहज भरकटत, दोन लाकडें एकमेकांच्या समीप यावीत,—आणि क्षणभरात दूर जावींत, त्यासारखी, जिवाजिवाची भेट असते

---

सर्वे क्षयान्ता निचयाः पतनान्ताः समुच्छ्रयाः ।
संयोगा विप्रयोगान्ताः सर्वे संसारवर्त्मनि ॥ २५ ॥

उपजाति

क्षयास सारे निधि, कोष, जाती
चढोनी सारे पडतात अंतीं ॥
एकत्र येतां हि वियुक्त होत
संसारमार्गीं सगळेंच सान्त ॥ २५ ॥

गद्यार्थ—

जें जें साचवावें तें तें सर्व क्षयास जायचें, उच चढलेलें, तें तें, सर्व पडावयाचें, जें जें एकत्र आलें तें तें वियोग पावावयाचेंच ससारांत असा प्रत्येक परिस्थितीचा (लौकरच) अंत येतो (परिवर्तन मात्र नित्याचें)

---

युज्यते वेष्टनं वायोराकाशस्य च खण्डनम् ।
ग्रथनं च तरङ्गाणामास्था नायुपि युज्यते ॥ २६ ॥

वसततिलका

वायूस वेष्टित करूं वघणेंहि युक्त
आकाश खंडित करूं झटणेंहि युक्त ॥
लाटांस गुंफुं धरणें हि ठरेल युक्त
आस्था न योग्य ठरते परि जीवनांत ॥२६॥

गद्यार्थ—

एकवेळ, वाऱ्याला गवसणी घालणें, आकाशाचे तुकडे पाडणें, पाण्याच्या लाटा गुंफून पाहणें, या गोष्टीही योग्य ठरतील, पण ससारांत आस्था ठेवणें युक्त नव्हे

---

यो नात्मजे न च गुरौ न च भृत्यवर्गे
दीने दयां न कुरुते न च बन्धुवर्गे ॥
किं तस्य जीवितफलं हि मनुष्यलोके ?
काकोऽपि जीवति चिराय बलिं च भुङ्क्ते ॥२७॥

वसंततिलका

जो आत्मजां, गुरुजना, न च नोकरांस
दीनास, बंधुस, भलें न करी कुणास ॥
झाला मनुष्य, तरि सार्थक काय त्यांत ?
ते काकही जगति दीर्घ, बळीच खात ॥ २७ ॥

गद्यार्थ—

जो आपल्या मुलाचें, वडील किंवा गुरूंचें, नोकरांचें, दीनांचें किंवा आप्तांचें कोणाचेंच भलें करीत नाहीं, तो मनुष्यजन्माला येऊन फल काय ? बळी खात कावळासुद्धां दीर्घ जगत नाहीं काय ?

---

गतास्ते राजानः परतरणिभोजप्रभृतयो
गुणो, दानं त्यागस्त्रयमपि च येषां स्थिरमभूत् ॥
गुणः कोदण्डेऽद्य, द्विरदवदने दानमधुना
सतां देशत्यागे निवसति वचस्त्याग इति च ॥२८॥

स्रग्धरा

गेले भोजादि राजे रिपुसि रविपरी
तेज ज्यांचें, असे ते !
ज्यांच्या अंगीं सदाचे टिकुन गुण, तसें
दान अन् त्याग होते ॥
आतां चापांतची तो 'गुण,' गजवदनीं
'दान' राहे टिकून
देशा सोडोनी जाती सुजन, तधिं तिथें
'त्याग' येई दिसून ! ॥ २८ ॥

गद्यार्थ—

( संसाराचा, वैभवापत्तींचा चक्रनेमिक्रम जसा व्यक्तींना तसाच देशांनाही आपल्या कचाट्यांतून सोडीत नाहीं. देशाच्या अनन्त कालाचें वर्णन. ) शत्रूशीं सूर्यासम प्रखर, आणि ज्यांच्या अंगीं, गुण, दान, त्याग तिन्हीं स्थिर होते असे भोजप्रभृति राजे गेले. आणि ( आजच्या या दुरवस्थेत ) 'गुण' केवळ धनुष्यात, ( गुण=दोरी. ) 'दान' केवळ हत्तीच्या मुखांत, ( दान=मद. ) आणि, ( दुःस्थितीला कंटाळून ) सज्जन देशत्याग करीत आहेत या कृत्यातच केवळ 'त्याग' दिसून येतो. ( इतरत्र कोठें त्याचा पत्ता नाहीं. )

---

खालील २९ व ३० हे मूळ संस्कृत श्लोक कै. गु. म. पां. ओक यांनीं रचलेले आहेत.

ना वेद जन्मापि न जायमानो
मृत्योर्वशं यात्यवशेन्द्रियः सन् ॥
जीवंस्तु जानन्नपि नोपयुङ्क्ते
सामर्थ्यमात्मस्थमनास्थ एव ॥ २९ ॥

वसंततिलका

जन्मूनही न समजे नर जन्म काय
मृत्यूप्रती शरण दीन बनून जाय ! ॥
जीवंतही असुनि जाणतही असून
आस्थाविहीन निजशक्तिहि योजितो न ॥ २९ ॥

गद्यार्थ—

मनुष्य, जन्मूनही, जन्म हें काय आहे तें उमजत नाहीं ! आणि मृत्यूला दुबळ्यासारखा शरण जातो ! जिवंत असून आणि सगळें कळत असून, मनुष्य स्वतांतील शक्ति केवळ निष्काळजी-पणानें, अनास्थेमुळें हलगर्जीपणामुळें उपयोजीत नाहीं !

---

सर्गस्थितिप्रलयवहारभाजो मनुष्यजातेरितिहास एवम् ॥
संक्षेपतो वर्णयितुं यथावन्न शक्यते किं सुधियो वदन्तु ॥

वसंततिलका

जन्मे, जगे, मग मरे असल्या नराचा
ऐसाच हाय ! दिसतो इतिहास साचा ॥
तो चित्रिणें सुलभ काय न थोडक्यांत
जें वर्णिलेंच वर पंक्तिचतुष्टयांत ॥ ३० ॥

गद्यार्थ—

जन्म घेऊन, थोडें जगून, मरणाऱ्या मनुष्यजातीचा असा हा इतिहास थोडक्यांत ( वरील २९ व्या श्लोकांत ) यथायोग्य सांगणें शक्य नाहीं काय तें पंडितांनीं सांगावें.

---

# प्रकरण १८ वें

## काल, मरण, यम, परलोकगमन.

व्योमैकान्तविहारिणोऽपि विहगाः संप्राप्नुवन्त्यापदं
बध्यन्ते निपुणैरगाधसलिलान्मत्स्याः समुद्रादपि ॥
दुर्नीतं किमिहास्ति, किं सुचरितं, कः स्थानलाभे गुणः ?
कालो हि व्यसनप्रसारितकरो गृह्णाति दूरादपि ॥ १ ॥

शार्दूलविक्रीडित

पक्षी, मात्र नभींच संचरति, त्यां येनीं, तरी, संकटें;
मत्स्यां, खोलहि अब्धितून धरिती कोळी पटाईत ते ॥
लोकीं पाप नि पुण्य काय ? कुठला
स्थानामुळें लाभ तो ?
ओढी काळ दुरूनही पसरुनी
आपत्तिहस्तांस तो ॥ १ ॥

गद्यार्थ—

पक्षी केवळ आकाशांत संचार करतात, तरी त्यांच्यावरही संकटें येतातच. अगदीं खोल समुद्रांतून सुद्धां, पटाईत कोळी, माशांना पकडतातच ! या जगांत पाप काय ? पुण्य काय ? विशेष (सुरक्षित) स्थान लाभण्याचा तरी काय उपयोग ? आपले संकटरूपी हात, दूरवर पसरून, काळ हा, दूरच्या वस्तूंनासुद्धां खेचून घेत असतो

सा रम्या नगरी महान्स नृपतिः सामन्तचक्रं च तत्
पार्श्वे सा च विदग्धराजपरिषत् ताश्चन्द्रबिम्बाननाः ॥
उद्वृत्तः स च राजपुत्रनिवहस्ते वन्दिनस्ताः कथाः
सर्वं यस्य वशादगात्स्मृतिपथं कालाय तस्मै नमः ॥ २ ॥

शार्दूलविक्रीडित

ती रम्या नगरी, महानृपहि तो, सामन्त ते भोवतीं
विद्वद्राजसभा समीप तिथ ती-चंद्रानना त्या किती ॥
तो उच्छृंखल राजपुत्रगण, ते वन्दी, कथा त्या, अहा !
केलें हें स्मृतिशेष सर्वचि जयें-
काला नमस्कार हा ॥ २ ॥

गद्यार्थ—

ती सुंदर नगरी, तो महानृप, तें मांडलिकाचें कोंडाळें, आजूबाजूचें ते विद्वन्मंडळ, त्या चंद्रानना, ते उच्छृंखल राजपुत्र, ते भाट, चारण, त्या त्यानीं गाइलेल्या कथा...—हें सर्व ज्यानें आपल्या सामर्थ्यानें स्मृतिशेष केलें त्या कालास नमस्कार !

क्व गताः पृथिवीपालाः ससैन्यबलवाहनाः ? ।
वियोग-साक्षिणी येषां भूमिरद्यापि तिष्ठति ॥ ३ ॥

अनुष्टुभ्

चतुरंगदळी मोठे । गेले पृथ्वीश ते कुठें ? ॥
त्यांची वियोगसाक्षी ही । जगे अद्यापही मही ॥ ३ ॥

गद्यार्थ—

चतुरंगदळ असलेले ते पृथ्वीपति गेले कोठें ? पण त्यांच्या वियोगाची साक्षी ही पृथ्वी मात्र अद्याप अस्तित्वात आहे.

मान्धाता स महीपतिः कृतयुगालङ्कारभूतो गतः !
सेतुर्येन महोदधौ विरचितः क्वासौ दशास्यान्तकः ? ॥
अन्ये चापि युधिष्ठिरप्रभृतयो याता दिवं, भूपते !
नैकेनापि समं गता वसुमती, नूनं त्वया यास्यति !! ॥ ४

शार्दूलविक्रीडित

मान्धाता नृप भूपवी कृतयुगा-केव्हांच गेला कुठें !
सेतू बांधुनि जो वधी दशमुखा तो राम आहे कुठें ? ॥
गेले स्वर्गिं युधिष्ठिरादि दुसरे; संगें न गेली मही-
एकाच्याहि कधीं; परी नृप तुझ्या जाईल रे
खास ही ! ॥ ४ ॥

गद्यार्थ—

(भोजप्रबंध. पृथ्वीपतित्वाचा गर्व झालेल्या एका राजाला वकोक्तीनें मृत्यूचें माहात्म्य कवि सांगतो—) कृतयुगाला भूषविणारा एवढा मोठा तो मान्धाता नृपति...पण तोही निघून गेला ! महासमुद्रावर सेतुबंधन करून दशमुख रावणाला मारणारा महापराक्रमी राम; तो तरी आज कोठें आहे ?

आणखी असेच युधिष्ठिरप्रभृति अनेकानेक स्वर्गाला गेले पण त्यांच्यापैकी एकाच्याही बरोबर ( ही त्यांची सती पत्नी ) पृथ्वी गेली नाहीं-ती, हे राजा, आतां तुझ्याबरोबर मात्र नक्की जाणार।

---

आक्रान्तं मरणेन जन्म; जरया चात्युल्वणं यौवनं;
संतोषो धनलिप्सया; शमसुखं प्रौढाङ्गनाविभ्रमैः ॥
लोकैर्मत्सरिभिर्गुणा, वनभुवो व्यालैर्नृपा दुर्जनै-
रस्थैर्येण च संपदोऽप्युपहता ग्रस्तं न किं केन वा ? ॥ ५ ॥

शार्दूलविक्रीडित

ग्रासी या जनमास मृत्यु; नि जरा उन्मत्तही यौवना;
संतोषा धनलोभ; शांति ढळवी लीलामुळें अंगना ॥
ग्रासी मत्सर सद्गुणां, भुजगही रानां; नृपां दुर्जन;
श्रीला चंचलता; न कोण जगीं या टाकी कुणा
ग्रासुन ? ॥ ५ ॥

गद्यार्थ—

जीवनाला मृत्यूनें ग्रासलेलें आहे. यौवनावर आगामी वार्द्धक्याची भयाण छाया पडलेली आहे, संतोषावर धनलोभाचा पगडा बसलेला आहे. शांतीची लीला शांति ढळविण्यास टपून बसलेली आहे. सद्गुणांना मत्सरानें ग्रह दिलेला आहे. रानाला सर्पांनीं पछाडलेलें आहे. राजाला दुर्जनांनीं आपल्या पकडींत धरलेलें आहे. संपत्तीवर चंचलतेची छाप पडलेली आहे जगांत कोणी वा कोणाला ग्रासलेलें नाहीं ?

---

उत्थायोत्थाय बोद्धव्यं महद्भयमुपागतम् ।
मरणव्याधिशोकानां किमद्य निपतिष्यति ? ॥ ६ ॥

भुजंगप्रयात

उठोनी उठोनी पहावें सदाचें
महासंकटांचे परी येइ जें जें ॥
कुठें रोग वा शोक वा मृत्यु पैकीं
पडे येउनी आज तें तें विलोकीं ॥ ६ ॥

गद्यार्थ—

माणसानें रोज उठून उठून नीट पहावें कीं, आज आपल्यावर काय महासंकट येणें शक्य आहे ? रोग, शोक, मृत्यु यापैकीं आज आपणांवर काय कोसळणार आहे ?

---

यामेव रात्रिं प्रथमामुपैति
गर्भे निवासं नरवीरलोकः ॥
ततः प्रभृत्यस्खलितप्रयाणः
स प्रत्यहं मृत्युसमीपमेति ॥ ७ ॥

उपजाति

ज्या रात्रिं गर्भीं वसण्यास येतो
मोठा असो शूरहि मानवी तो ॥
अखंड तेथून क्षणांक्षणांही
तो प्रत्यहीं मृत्युसमीप जाई ॥ ७ ॥

गद्यार्थ—

कितीही मोठा शूर मनुष्य कां असेना, तो ज्या रात्री प्रथम, गर्भांत वसण्यास येतो, त्या दिवसापासून, खंड न पडतां दिवसादिवसाला, तो मृत्यूच्या अधिकाधिक जवळजवळ जात असतो.

---

आपदः क्षणमायान्ति क्षणमायान्ति संपदः ।
क्षणं जन्म क्षणं मृत्युर्मुने किमिव न क्षणम् ? ॥ ८ ॥

अनुष्टुभ्

येती क्षणिक आपत्ति येई संपत्तिही क्षण ।
क्षणीं जन्म क्षणीं मृत्यु साधो ! क्षणिक काय न ? ८

गद्यार्थ—

क्षणभर संकटें येतात क्षणांत संपत्ति येते. क्षणांत जन्म होतो. क्षणांत मृत्यु येतो. हे मुने ! क्षणिक नाहीं असें काय आहे ?

---

मरणस्य मुने ! राज्ञो जराधवलचामरा ।
यात्रा जगति निर्याति स्वाधिव्याधिपताकिनी ॥ ९ ॥

उपजाति

या व्याधि आधि ध्वज उंच ज्याचे
वार्धक्य हें चामर शुभ्र साचें ॥
यात्रा जगीं चालतसे सदाची
सम्राट् महाराज अशा यमाची ॥ ९ ॥

गद्यार्थ—

हे मुने ! महाराज यमाची ही मिरवणूक जगांत ( अखंड ) चाललेली आहे. वार्धक्याच्या ( शुभ्र केसांच्या ) चवऱ्या ढाळल्या जात आहेत व शारीरिक व मानसिक रोगरूपी ध्वज उंच फडफडत आहेत.

---

विद्राविते शत्रुजने समस्ते
समागतायामभितश्च लक्ष्म्याम् ॥
सेव्यन्त एतानि सुखानि याव–
त्तावत्समायाति कुतोऽपि मृत्युः ॥ १० ॥

उपजाति

हरून, जातां रिपु ते पळून
लक्ष्मी जधीं येइ चहूंकडून ॥
हें सौख्य भोगूं बघतो कुणी, तों
कोठूनसा सत्वर मृत्यु येतो ! ॥ १० ॥

गद्यार्थ—

युद्धांत, आपण पराभूत केलेले सर्व शत्रु पळून चाललेले आहेत. चहूंकडून लक्ष्मी वरदहस्त उभवून आपणांकडे येत आहे— असें हें सौख्य मनुष्य जों भोगूं बघतो तोंच अचानक कोठूनसा मृत्यु दत्त म्हणून येऊन उभा राहतो.

———०———

वङ्गाः कथमङ्गाः कथमित्यनुयुङ्क्ते जनस्तथा देशान् ।
कीदृक् कृतान्तपुरमिति कोऽपि न जिज्ञासते मूढः ॥ ११

आर्या

" सांगा हो वंग कसा ?
अंग कसा ? " जन तपास हे करिती ।
यमपुरिची जिज्ञासा
कुण्याहि मूर्खाचिया नसे चित्तीं ॥ ११ ॥

गद्यार्थ—

" वंगदेश कसा आहे ? " " अंगदेश कसा आहे ? " अशा चौकशा मनुष्य करीत बसेल. पण " यमाची नगरी कशी आहे ? " याविषयीं जिज्ञासा कोणालाही नाहीं, इतका मनुष्यप्राणी मूर्ख आहे.

———०———

मृत्युः शरीरगोप्तारं वसुभाजं वसुंधरा ।
दुश्चारिणीव हसति स्वपतिं पुत्रलालनात् ॥ १२ ॥

उपजाति

रक्षी तनू त्याप्रति मृत्यु हांसे
रक्षी धना त्याप्रति भूमि हांसे ॥
मुला करी लाड अशा पतीस
स्त्री जारिणी जेवि बघे सहास ॥ १२ ॥

गद्यार्थ—

आपल्या जारापासून झालेल्या पुत्राचे, आपला पति ( त्याला आपलाच मुलगा समजून ) लाड करतांना पाहून, ज्याप्रमाणें, जारिणी स्त्री, त्या पतीला हंसत असते, त्याप्रमाणें, देहाचें कोड-कौतुक करणाऱ्याला मृत्यु व धनाची जपणूक करणाऱ्याला ( कृपणाला ) भूमि, हंसत असते. ( कारण देह हा मृत्यूचें बालक व धन हें भूमीचें बालक असून त्यांच्यावर खरें स्वामित्व त्यांचेंच असतें. )

———०———

बालत्वं च मृता माता, वृद्धत्वं च मृताः सुताः ।
यौवनं च मृता भार्या पातकं किमतः परम् ? ॥ १३ ॥

अनुष्टुभ्

बाल्यांत मरणें माता, वार्धक्यांतहि पुत्र ते ।
यौवनीं मरणें कांता पाप याहुनि कोणतें ? ॥ १३ ॥

गद्यार्थ—

बाळपणींच आई मरून जावी, वृद्धपणीं ( कर्ते सवरते ) मुलगे मेलेले पाहण्यास मागें उरावें, ऐनतारुण्यांत पत्नी मरून जावी, यापेक्षां आणखी मोठें पाप ( पापफल ) तें कोणतें !

———०———

पण्डिते चैव मूर्खे च बलवत्यपि दुर्बले ।
ईश्वरे च दरिद्रे च मृत्योः सर्वत्र तुल्यता ॥ १४ ॥

अनुष्टुभ्

पंडिताशीं नि मूर्खांशीं—सबला अबलासि तो ।
धनी, दरिद्री, सर्वांसी समत्वें मृत्यु वर्ततो ॥ १४ ॥

गद्यार्थ —

पंडित असो, मूर्ख असो, बलवान् असो, दुबळा असो. श्रीमंत असो, दरिद्री असो, मृत्यु, सर्वांशीं समभावानेंच वागतो.

———०———

दाराः पुत्रेषु रताः पुत्राः पितृधनपरिग्रहव्यग्राः ।
जननी रोदनशरणा परलोकगतस्य को बन्धुः ? ॥१५॥

उपजाति

पत्नी स्वतांच्याच मुलांत रक्त
निमग्न पोरें धन वांटण्यांत ॥
आयुष्य कंठी जननी रडून
मेल्या नराचा परि बंधु कोण ? ॥ १५ ॥

गद्यार्थ—

( मेलेला मरुन जातो त्याची पर्वाच कोणाला नाहीं. ) त्याची पत्नी मुलांगळात रगून जाते, त्याची मुलें मिळकतीच्या वाटण्या करुन त्या इस्तगत करण्यात दंग; त्याची आई विचारी ( मलाच यमानें मागें कां ठेवलें ? आता माझी वास्तपुस्त कोण करणार इत्यादि विवेमुळें ) रडून रडून दिवस कंठिते, पण मेलेल्या माणसाच्या प्रेमानें ( बंधु होऊन ) रडणारें कोण ?

---

धनानि भूमौ, पशवश्च गोष्ठे;
भार्या गृहद्वारि; जनः श्मशाने ॥
देहश्चितायां परलोकमार्गे
कर्मानुगो गच्छति जीव एकः ॥ १६ ॥

शार्दूलविक्रीडित

जाई राहुनि वित्त भूमिंत; तशी गोठ्यांत गाईगुरें
दारार्शीं दयिता घरींच; अवघे स्नेही स्मशानांत रे ॥
राहे देह चितेंत; मानव जधिं लोकांतरा जातसे
कर्मामागुनि एकटेच पथिं त्या जाणें कपाळीं असे
॥ १६ ॥

गद्यार्थ—

मनुष्य मरुन परलोकाच्या मार्गाला जाताना, त्याची संपत्ति याच भूमींत राहून जाते; गाई गुरें गोठ्यात राहतात. पत्नी घराच्या दाराशीं राहून जाते; स्नेही आप्त, स्मशानात राहून जानात; आणि त्याचा देह चितेंत राहून जातो आणि त्याला एकट्यालाच त्याच्या कर्माच्या मागून परलोक मार्गावर जावें लागतें.

---

मृत्योर्बिभेषि किं मूढ भीतं मुञ्चति किं यमः ? ।
अजातं नैव गृह्णाति कुरु यत्नमजन्मनि ॥ १७ ॥

उपजाति

कशास मृत्यूस भितोस मूर्खा ?
मितो तयाला यम सोडितो कां ? ॥
जन्मेच ना, त्या यम नेत नाहीं
अजन्म होण्या कर यत्न तूही ॥ १७ ॥

गद्यार्थ—

मूर्खा ! मृत्यूला कशासाठीं भितोस ? भ्यालेल्या माणसास मृत्यू सोडून देतो की काय ? जो जन्मलाच नाहीं, त्यालाच काय तो, यम, नेऊं शकत नाहीं; तेव्हां जन्मच न येईल, अशी स्थिति मिळविण्याचा प्रयत्न कर.

---

पञ्चभिः संस्कृते देहे पञ्चत्वं च पुनर्गते ।
स्वां स्वां योनिमनुप्राप्ते धीर ! का परिदेवना ? ॥ १८ ॥

अनुष्टुभ्

पांचांनीं सजला देह—पंचत्वा परते यदा ।
मूळ स्थितीस तो जातां कां नरा शोक हा वृथा ? ॥१८॥

गद्यार्थ—

मानवदेह हा पंचमहाभूतांच्या संस्कारानें झाला आहे-तो पुन्हा त्या पांचाप्रत गेला व त्या पाच भूतांना, पुन्हां, मूळ रुप प्राप्त झालें यात, हे धैर्यशाली नरा ! शोक कशाचा करावयाचा ?

---

मूळ संस्कृत श्लोक १९ ते २६ हे कै. गुरुवर्य म. गो. ओक यानीं रचलेले आहेत

असाध्य-रोगस्य नरस्य वैद्य
मृत्यो ! क्षणेनैव विनौषधेन ॥
भूतं भवन्तं खलु भाविनं च
रोगं समुन्मूलयसि प्रपन्नः ॥ १९ ॥

उपजाति

तूं वैद्य, ज्यां रोग असाध्य, त्यांचा
मृत्यो ! क्षणीं औषधिवीण साचा— ॥
झाला, असे, होईल रोग त्यास
येतांच संपूर्णचि नाशितोस ॥ १९ ॥

गद्यार्थ—

हे मृत्यो ! ज्याना असाध्य रोग झालेला आहे अशा माणसांचा खरा वैद्य तू ! तू रोग्याजवळ येताक्षणींच औषधावाचून, रोग्याला पूर्वी झालेल्या, आज असलेल्या, व पुढें होणाऱ्या सर्व रोगाचा समूळ नाश करतोस !

---

प्रेष्यश्च ते नानयनाय कोऽपि
न वाहनं वा किमपि प्रदेयम् ॥
काले समायासि विना विलम्बं
श्रमस्य मूल्यं न हि याचसे च ॥ २० ॥

उपजाति

धाडूं न कोणी तुज आणण्यास
गाडी न लागे तुज यावयास ॥
तू योग्य काळीं अविलंब येसी
निजश्रमांचें न च मूल्य घेसी ॥ २० ॥

गद्यार्थ—

तुला आणण्यास कोणाला धाडावें लागत नाहीं. तुला येण्यास गाडी धाडावी लागत नाहीं. तू योग्य काळीं अविलंब येतोस आणि आपल्या श्रमाचें मूल्यहि तू मागत नाहींस !

———०———

एवंविधं सर्वगुणोपपन्नं
विहाय वैद्यं निपुणं भवन्तम् ॥
वयं यदन्यान् समुपाश्रयामो
हा ! जीविताशैव किलात्र हेतुः ॥ २१ ॥

उपजाति

अशा तुला सर्वगुणोपपन्न !
प्रवीण वैद्यासहि रे त्यजून ॥
दुज्यांकडे जें नर जात राहे
त्या जीविताशा वध हेतु आहे ॥ २१ ॥

गद्यार्थ—

अशा तुला, सर्वगुणसंपन्न प्रवीण वैद्यासही सोडून आम्ही मानव, जे दुसऱ्या वैद्यांकडे जातों त्याचें कारण जीविताशा !

———०———

सजीवितं रोगमपाकरोपि
विरोगमुच्चैश्चिरजीवितं तु ॥
त्वं जीवितस्यैशिप एव नित्यं
वैद्यस्तु रोगस्य कदाचिदेव ॥ २२ ॥

उपजाति

रोगांसवें प्राणहि नेसि; दीर्घ—
आयुष्य व्हावें मनुजा विरोग ॥
जीवेश तू संततही असून
रोगेश हा वैद्य कधीं चुकून ॥ २२ ॥

गद्यार्थ—

( तू वैद्य खरा पण ) तू रोगांच्या बरोबरच माणसाचे प्राणहि हरण करतोस ! आणि माणसाला तर, रोगविरहित असे, दीर्घ आयुष्य हवें असतें ( म्हणून तुला सोडून मनुष्य दुसऱ्या वैद्यांकडे जातो परंतु ) तू जीवेश कायमचाच आहेस ( जीवनावर तुझी सत्ता अबाधित व कायमची ) पण हाय ! हाय ! आमचे हे मानवी वैद्य, चुकून, कधीं काळीं, रोगेश होतात. ( म्हणजे रोग एखेवेळीं बरा करतीलच, इतकी, त्यांची, रोगावर अबाधित सत्ता नाहीं. )

———०———

भो, भो, भीषणरूप दारुणमते मृत्योऽन्तकृत्प्राणिनां
साम्राज्यं भुवने बिभर्षि निखिले निर्बाधमेव प्रभो ॥
राजानोऽपि वशे तवेह सकलाः सामात्यभृत्या यदा
सामान्येषु जनेषु दुर्बलतमेष्वस्मासु का वा कथा ? ॥२३

शार्दूलविक्रीडित

मृत्यो भीषणरूप निर्दयमते ! तू अंतकारी जनां
तू साम्राज्य उभ्या जगीं मिरविसी देवा ! विरोधाविना
मंत्री नोकर यांसवें शरण ज्या राजेहि जाती जिथें
आहे काय कथा अम्हांसम अशा या दुर्बलांची
तिथें ॥२३॥

गद्यार्थ—

हे भयंकर, निर्दय मृत्यो ! तू सर्वांचा अंत करणारा ! तू सर्व जगभर अविरोध साम्राज्यसत्ता मिरवतोस. मंत्री, नोकर यांसह प्रत्यक्ष नृपतीच जिथें तुला शरण येतात तिथें आम्हासारख्या दुर्बल सामान्यजनांची काय कथा !

———०———

ये सन्ता वसुधातले भगवतो भक्ता महान्तोऽपि ते
हा ! हा ! विग्रहवान् स्वयं स भगवान् देवाधिदेवोऽपि च
सावेगं प्रहतास्त्वया ध्रुवममी साष्टांगपातं भुवि
व्यापन्नोद्धरणक्षमा अशरणाः सर्वे पतन्त्यञ्जसा ॥ २४॥

शार्दूलविक्रीडित

देवाचे जरि भक्त संतहि महा या मर्त्यलोकावरी
हा ! हा ! देहधर स्वयेंच भगवान् तो देवराणा जरी ॥
त्वेषानें प्रहरून लोळविसि तू साष्टांग त्यां भूवर
आर्तोद्धारक तेहि सर्व पडती निःसाह रे
सत्वर ॥२४॥

गद्यार्थ —

या मर्त्यलोकावरील महान् भगवद्भक्त संत असोत, इतकेंच काय, प्रत्यक्ष देहधारी देवाधिदेव जरी असला, तरी, हा मृत्यो, तू अशा त्वेषानें तडाखा मारतोस कीं आर्तांचे उद्धार करणारे, ते, सर्व च निःसहायपणें, त्वरित, भूमीवर साष्टांग लोटांगण घालतात !

———०———

नाहं वेद्मि न नाम मे विलिखितं हन्तव्यनामावली
प्राप्तव्या बत भूमिवर्धनधनावस्था कदाचिन्मया ॥
नूनं भीतिमुपैति नो मम मनो यद्भाव्यवश्यं ततः
शय्योपान्तगतान् प्रियांस्तु रुदतो द्रक्ष्यामि बन्धून्
कथम् ? ॥ २५ ॥

शार्दूलविक्रीडित

जाणें मी, मम नाम लेखित असे, द्यावे बळी, त्यांमधें
आहे संभव कीं बनून खत मी जाईन मातीमधें ॥
जें होणार अवश्य, त्याविषयींची भीती न मन्मानसा
शय्येशीं रडत्या मम प्रिय अशा बंधूंस पाहूं
कसा ? ॥ २५ ॥

गद्यार्थ—

मला माहीत नाहीं, असें नाहीं, कीं, बळी द्यावयाचा प्राण्यांच्या तुझ्या यादींत माझें नांव लिहिलेलें आहे! संभव आहे, कीं, खत बनून, मी मातींतच मिसळून जावयाचा असेन. हें जें काय अटळ होणारें असेल त्याची मला भीति वाटत नाहीं. पण माझ्या शय्येशीं माझे प्रिय आप्त रडतील त्यांचें तोंड कसें पाहूं हीच मला चिंता लागली आहे

तस्माद्भो यमराज ! मां नय यदा नेतुं त्वदीया मति-
र्मा मा स्वागमनस्य देहि सदयां प्राक्सूचनां कामपि ॥
हन्तारं सकलस्य जीवनिवहस्य त्वां न कोऽनुव्रजेत् ?
मर्त्यो निष्प्रतिकार एव भुवने, स्वाङ्गस्य भङ्गेन किम् ॥ २६

शार्दूलविक्रीडित

तेव्हां हे यमराज ! ने मज जधीं
इच्छा तुझ्या ये मनीं
येण्याचें लव पूर्व सूचनहि ना
देणें दया वाहुनी ॥
तू जीवां सकलांस अंतक ! तुझ्या
मागें न येणें कुणा ?
लोकीं अप्रतिकार मर्त्य ! तनु ही
भंगो ! न चिन्ता मना ॥ २६ ॥

गद्यार्थ—

तेव्हां हे यमराज ! मला नेण्याची जेव्हां तुला इच्छा होईल, तेव्हां, सुखेनैव मला ने, आणि, दयावतपणें, तुझ्या आगमनाची यत्किंचितहि पूर्वसूचना तू यावीस, अशी माझी अपेक्षा नाहीं तू सर्व जीवजाताचा अंतक ! तुझ्यामागून जाणें कोणाला भाग पडत नाहीं ? या जगीं मानव, तुला प्रतिकार करण्यास संपूर्ण असमर्थ आहे ! तेव्हां खुशाल हा देह जावो ! त्याची मला चिंता नाहीं

---

# प्रकरण १९ वें

सृष्टींतलें वैषम्य; विधिलिखित; सुदैव, दुर्दैव, बरे व वाईट योगायोग, नियति; प्राक्तन, कर्म, कलिप्रभाव.

भूतिर्नीचगृहेषु, विप्रसदने दारिद्र्यकोलाहलो
नाशो हन्त सतामसत्पथजुषामायुः शतानां शतम् ॥
दुर्नीतं तव वीक्ष्य कोपदहनज्वालाजटालोऽपि सन्
किं कुर्वे जगदीश ! यत्पुनरहं दीनो भवानीश्वरः ॥ १ ॥

शार्दूलविक्रीडित

नीचांच्या गृहिं वित्त, विप्रसदनीं दारिद्र्य आक्रोशतें
होती संतचि नष्ट, दुष्टचरितां आयु:शतांचीं शतें ॥
अन्यायें तव या जळे मम जरी क्रोधाग्निनें अंतर
देवा ! काय करूं शकेन तुजसी ? मी दीन, तूं ईश्वर ॥

गद्यार्थ—

नीचांच्या घरीं ऐश्वर्य नांदावें, आणि ब्राह्मणांच्या घरीं दारिद्र्य ओरडत उठावें, सज्जनांना (अकाल) मृत्यु यावा, आणि कुमार्ग–गामी दुष्टांना शेकडोंच्या शेकडों वर्षांचें आयुष्य लाभावें, हाय ! हाय ! देवा ! तुझे हे सर्व अन्याय पाहून, माझ्या हृदयात, क्रोधाचा भयंकर अग्नि भडकून उठतो पण, मी, तुझें काय वाकडें करू शकणार ? मी दीन आहें, आणि तूं सर्व शक्तिमान ईश्वर आहेस

---

सृजति तावदशेषगुणाकरं
पुरुषरत्नमलङ्करणं भुवः ॥
तदपि तत्क्षणभङ्गि करोति चे-
दहह कष्टमपण्डितता विधेः ॥ २ ॥

द्रुतविलंबित

बहुगुणी नर विश्वविभूषण
विधि कधींतरि ठेवित निर्मुन ॥
परि करी क्षणभंगुर त्यास तो
अहह ! घोर किती विधि मूर्ख तो ॥ २ ॥

गद्यार्थ—

सर्व जगाला भूषण होण्याजोगा, सर्वगुणसंपन्न असा पुरुष, ब्रह्मदेव, केव्हांतरी ( चुकून ) उत्पन्न करतो; पण त्याबरोबर त्या माणसाला अत्यंत अल्पायु करतो ! हाय हाय ! विधीचा काय भयंकर मूर्खपणा हा !

—०—

यः सुन्दरस्तद्वनिता कुरूपा
पतिः कुरूपः खलु रूपवत्याः ॥
यत्रोभयं तत्र दरिद्रता च
विधेर्विचित्राणि विचेष्टितानि ॥ ३ ॥

उपजाति

सुरूप जो त्यास कुरूप भार्या
कुरूप जो त्यास सुरेख जाया ॥
दोन्ही जियें तेथ दरिद्रताही
विचित्र चेष्टा विधिची अशी ही ॥ ३ ॥

गद्यार्थ—

सुंदर पुरुषाला कुरूप स्त्री, सुंदर स्त्रीला कुरूप पति, दोन्ही सुंदर असतील तिथें दारिद्र्य ! विधीच्या चेष्टा अत्यंत विचित्र !

—०—

शशी दिवसधूसरो, गलितयौवना कामिनी
सरो विगतवारिजं मुखमनक्षरं स्वाकृतेः ॥
प्रभुर्धनपरायणः सततदुर्गतः सज्जनो
नृपाङ्गणगतः खलो; मनसि सप्त शल्यानि मे ॥ ४ ॥

पृथ्वी

शशीहि दिवसां भुरा; तरुणिचें झडे यौवन
तळें कमलहीन, रूपयुत हाय ! विद्येविण
धनीच धनलुब्ध; नित्य सुजनांस ये दुर्गती
नृपाघरिंच दुष्ट-सात खुपतात शल्यें हृदीं ॥ ४ ॥

(किंवा हेंच) शार्दूलविक्रीडित

व्हावा चंद्र भुरा फिकाच दिवसां, स्त्रीचें झडे यौवन
व्हावें पद्मविहीन तें सर; मुखीं सौंदर्य विद्येविण ॥
पैशाचा प्रभुलाच लोभ असणें, थोरां सदा दुःस्थिति
राजांच्या गृहिं दुष्ट; सात मज हीं शल्यें मनीं टोंचतीं ॥

गद्यार्थ—

दिवसा चंद्र भुरकट दिसावा, स्त्रीचें तारुण्य झडून जावें, तळ्यांतलीं कमळें नष्ट व्हावीं, सुंदरमुखाला विद्या नसावी, श्रीमंतालाच धनलोभ असावा; सज्जनांना नेहमीं दुःस्थितीच कपाळीं असावी, राजांच्या भोंवतीं दुष्टांचें कोंडाळें असावें हीं सात शल्यें माझ्या मनाला खुपत राहतात.

—०—

कुमुदवनमपश्रि श्रीमदम्भोजखण्डं
त्यजति मुदमुलूकः प्रीतिमांश्चक्रवाकः ॥
उदयमहिमरश्मिर्याति शीतांशुरस्तं
हतविधिलसितानां हन्त चित्रो विलासः ॥५॥

मालिनी

मिटुनि कुमुद जाती, शोभतो पद्मलोक
त्यजिति घुवड मोदा, हो सुखी चक्रवाक ॥
उदय इथ रवीचा, तेथ तो चंद्र लुप्त
कृति हतविधिची ही काय वैचित्र्ययुक्त ॥५॥

गद्यार्थ—

इकडे चंद्र विकासी नील कमलें म्लान होत आहेत. तर पद्मांचें जग उत्फुल्ल होत आहे. घुबडाचा आनंद नष्ट होत आहे तर चक्रवाकांना प्रेमाचें भरतें येत आहे. इकडे सूर्य उगवत आहे तर तिकडे चंद्र मावळत आहे. जळल्यामेल्या विधीची किती विचित्र करणी ही !

—०—

गन्धः सुवर्णे फलमिक्षुदण्डे
फलं न पुष्पं खलु चन्दनेषु ॥
विद्वान्धनाढ्यो न तु दीर्घजीवी
धातुः पुरा कोऽपि न बुद्धिदोऽभूत् ? ॥ ६ ॥

उपजाति

गंध सोन्यास, फळें उंसाला
येती न पुष्पें कधि चंदनाला ॥
विद्वान् धनी, दीर्घ न आयु त्याला !
कुणी दिली बुद्धि न कां विधीला ? ॥ ६ ॥

गद्यार्थ—

सोन्याला सुवास नाहीं, उंसाला फळें नाहींत, चंदनाला फुलें नाहींत, विद्वान् श्रीमंताला दीर्घ आयुष्य नाहीं! (हीं सर्व वैगुण्यें काढून टाकण्याइतकी) बुद्धि देणारा सृष्टिकर्त्याला पूर्वी भेटलाच नाहीं कीं काय?

———

गजभुजङ्गमयोरपि बन्धनं
शशिदिवाकरयोर्ग्रहपीडनम् ॥
मतिमतां च विलोक्य दरिद्रतां
विधिरहो बलवानिति मे मतिः ॥ ७ ॥

द्रुतविलंबित

गज नि सर्प असांसहि बंधन
रविशशींसहि त्यां ग्रहपीडन ॥
बघुनि पंडित निर्धन नित्य ते
विधि बलिष्ठचि हें हृदया पटे ॥ ७ ॥

गद्यार्थ—

हत्ती, साप, अशा या दुर्धर्ष प्राण्यांना सुद्धा बंधनात पडावें लागावें; सूर्य चंद्र अशा तेजोनिधींना, ग्रहांची पीडा असावी; आणि, विद्वानांना कायमचें दारिद्र्य असावें, हें पाहिलें, म्हणजे विधि केवढा बलिष्ठ, याची खात्री पटते.

———

रात्रिर्गमिष्यति भविष्यति सुप्रभातं
भास्वानुदेष्यति हसिष्यति चक्रवालम् ॥
इत्थं विचिन्तयति कोषगते द्विरेफे
हा हन्त ! हन्त ! नलिनीं गज उज्जहार ॥८॥

वसंततिलका

जाईल रात्र, मग येइ प्रभातकाल
तैं सूर्य पाहुनि हंसेलचि चक्रवाल ॥
कोषांत भृंग जधिं दंग अशा विचारीं
तों हाय! हत्ति उपटी नलिनी बिचारी ॥८॥

गद्यार्थ—

'आतां लौकरच रात्र संपेल, सुप्रभात होईल, सूर्य उगवेल आणि कमलें हंसून उमलतील (आणि मी या कमलांत अडकलों आहें तो मुक्त होईन)" अशा विचारांत कमलाच्या पोटांतला भृंग दंग आहे तों एवढ्यात अचानकपणें हाय हाय! हत्तीनें कमलाची वेलच उपटली!

———

स्वस्वव्यापृतिमग्नमानसतया मत्तो निवृत्ते जने
चञ्चूकोटिविपाटितारपुटो यास्याम्यहं पञ्जरात् ॥
एवं कीरवरे मनोरथमयं पीयूषमास्वादय-
त्यन्तः संप्रविवेश वारणकराकारः फणिग्रामणीः ॥ ९ ॥

शार्दूलविक्रीडित

जो तो कार्यनिमग्न; हा जन दुरी जाईल जेव्हां जरा
द्वारा तोडुनि चंचुनें त्यजुनिया जाईन मी पिंजरा ॥
जों हा कीर मनोरथामृत असें चाखीतसे अंतरीं
तों सोंडेपरि जाड सर्प घुसला त्या पंजराभीतरीं ॥९॥

गद्यार्थ—

घरांतील माणसें, आपापल्या कामांत गुंतून, माझ्यापासून थोडावेळ दूर जातील, तेव्हा, मी आपल्या चोंचीनें, दार तोडून, या पिंजऱ्यांतून बाहेर पडेन...अशा तऱ्हेच्या मनोरथरूपी अमृताचा आस्वाद पिंजऱ्यांतला पोपट जों घेत आहे, तों हत्तीच्या सोंडेसारखा जाड सर्प त्या पिंजऱ्यांत घुसला!

———

स हि गगनविहारी ज्योतिषां मध्यचारी
दशशतकरधारी कल्मषध्वंसकारी ॥
विधुरपि विधियोगाद्ग्रस्यते राहुणासौ
लिखितमपि ललाटे प्रोज्झितुं कः समर्थः ? १० ॥

मालिनी

विहरत गगनीं जो तारकामध्यवासी
दशशत किरणें ज्या, नाशितो जो तमासी ॥
विधिहत विधु तोही राहुनें होइ ग्रस्त
विधिलिखित पुसाया कोण आहे समर्थ ? ॥ १० ॥

गद्यार्थ—

आकाशांत संचार करणारा, नक्षत्रतारे यांच्या मध्यवर्ती असणारा, सहस्र किरणें असणारा, अंधाराचा नाश करणारा

असा तो चंद्र! पण त्याला सुद्धा विधियोगानें राहू ग्रासतो! कपाळावर लिहिलेलें कोण पुसूं शकणार?

---

कैवर्तकर्कशकरग्रहणच्युतोऽपि
जाले पुनर्निपतितः शफरो वराकः ॥
जालात्पुनर्विगलितो गिलितो बकेन
वामे विधौ वद कुतो व्यसनान्निवृत्तिः? ॥११॥

वसंततिलका

कोळ्याचिया दृढ करांतुनिही सुटून
जाळ्यामधेंचि पडला परि मत्स्य दीन ॥
खाई तयास बक, जालविमुक्त होतां
लोपेल संकट कसें विधि वक्र होतां? ॥११॥

गद्यार्थ—

कोळ्याच्या घट्ट मुठींतून, मासा, सुटला खरा पण नेमका पुन्हां जाळ्यांत जाऊन पडला. नशिबानें जाळ्यातूनही सटकला, तों बगळ्यानें त्याला गट्ट केलें! दैवच वांकडें झालें, मग संकटें कशीं टळणार?

---

खल्वाटो दिवसेश्वरस्य किरणैः सन्तापितो मस्तके
वाञ्छन्देशमनातपं विधिवशात्तालस्य मूलं गतः ॥
तत्राप्यस्य महाफलेन पतता भग्नं सशब्दं शिरः
प्रायो गच्छति यत्र भाग्यरहितस्तत्रैव यान्त्यापदः ॥१२॥

शार्दूलविक्रीडित

दुर्दैवें टकल्या कुणी नर शिरीं सूर्यातपें तापला
छायेला म्हणुनीच तालतरुच्या खालीं पहा पातला
मोठ्यानें, पडुनी महाफल तदा टाकी शिरा भंगुनी
दुर्दैवी जिथ जाइ तेथ बहुधा आपत्ति ये धांवुनी ॥१२॥

गद्यार्थ—

मध्याह्नकाळीं, उन्हानें डोकें तापल्यामुळें, कुणी एक टकल्या, सावलीसाठी म्हणून, दैववशात्, ताडाच्या झाडाखालीं गेला. पण तेथेंही मोठें फल पडून धाडकन् त्याचें डोकें फुटलें. दुर्दैवी माणूस जेथें जातो तेथेंच बहुधा आपत्तीहि जातात

---

कान्तं वक्ति कपोतिकाऽऽकुलतया नाथान्तकालोऽधुना
व्याधोऽधो धृतचापसज्जितशरः श्येनः परिभ्राम्यति ॥
इत्थं सत्यहिना स दष्ट इषुणा श्येनोऽपि तेनाहव-
स्तूर्णं तौ तु यमालयं प्रति गतौ दैवी विचित्रा गतिः॥१३॥

शार्दूलविक्रीडित

"आला मृत्यु" म्हणे कपोति रमणा
होऊनियां घावरी
"खालीं व्याध सुसज्जचापशर हा,
अन् हा ससाणा वरी" ॥
व्याधा सर्प डसे, नि बाण सुटुनी
विंधी ससाण्याप्रति
दोघे जाति यमाघरीं झडकरी;
दैवी विचित्रा गति ॥ १३ ॥

गद्यार्थ—

(दुर्दैवी योगायोगाप्रमाणें क्वचित् सुदैवी योगायोगहि येतात) (झाडावर बसलेली) कपोती, घाबरीघुबरी होऊन, आपल्या नाथाला म्हणते—"आज आपलें मरण ओढवलेलें दिसतें! झाडाखालीं धनुष्याला बाण लावून व्याध बसला आहे, आणि, (वर) ससाणा उडतो आहे." पण काय चमत्कार! त्या व्याधाला सर्प चावला; आणि बाण धनुष्यांतून सुटला त्यानें ससाणा मारला गेला. अशा रीतीनें झटपट दोघेही यमपुरीं गेले! दैवाची विचित्र लीला!

---

दैवं फलति सर्वत्र, न विद्या न च पौरुषम् ।
समुद्रमन्थनाल्लेभे हरिर्लक्ष्मीं हरो विषम् ॥ १४ ॥

अनुष्टुभ्

फळे दैवचि सर्वत्र, न विद्या न च पौरुष ।
ये अब्धिमन्थनें लक्ष्मी विष्णूला, शंकरा विष ॥ १४॥

गद्यार्थ—

दैवच सर्वत्र फळाला येतें-ना विद्या, ना पौरुष; समुद्रमंथनां-तून विष्णूला लक्ष्मी मिळाली व शंकराला विष!

---

अयममृतनिधानं नायकोऽप्योषधीनां
शतभिषगनुयातः शंभुमूर्ध्नोऽवतंसः ॥
विरहयति न चैनं राजयक्ष्मा शशांकं
विधिहतपरिपाकः केन वा लङ्घनीयः? ॥ १५॥

मालिनी

मृतनिधि असोनी औषधींचा पती तो
तमिपगहि मागें, जो शिवा भूपवीतो ॥
य न तरिहि पेशा चंद्रराजा त्यजील
ाधिहत फल लोकीं कोण टाळूं शकेल ? ॥ १५ ॥

यार्थ—

स्वतः अमृताचा निधि असून, औषधींचा पति असून, मागें शंभर सिपावरांचा तांडा असून, शंकराच्या मस्तकासारख्या उच पदाला भूषवीत असून, चंद्राचा क्षय सोडीत नाहीं. दुष्ट विधीचें फळ कोण टाळूं शकेल?

---

उच्चीयन्ते स्म वेदमन्यशनविरहिते निर्धने श्रोत्रियाणां
यत्र श्यामाकबीजान्यपि चटकवधूचञ्चुकोटिच्युतानि ॥
दैवे दातर्यकस्माच्चपलशिशुकराकृष्टमुक्तावलीक-
भ्रष्टास्तत्रैव दृष्टा युवतिभिरलसं घूर्णिता
मौक्तिकौघाः ॥ १६ ॥

सुमंदारमाला

गळे धान्य चोंचींतुनी पांखरांच्या,
घरांतून तीं येति जाती तदा
न ज्या अन्न, ना द्रव्य, त्या ब्राह्मणांच्या
घरीं वेचिलें जात होतें सदा ॥
अकस्मात् तयां दैव देतांच, अर्वाच्य
पोरें गळां माळ जी तोडिती
तिच्या मौक्तिकांचा सडा त्या गृहींच्या
स्त्रिया जांभया देत हो पाहती ॥ १६ ॥

गद्यार्थ—

ज्याच्यापाशीं खायला मुद्दां नाहीं, इतक्या निर्धन वैदिक ब्राह्मणाच्या घरीं, पाखरांच्या चोंचींतून गळलेले धान्याचे कण वेचिले जात, त्या ब्राह्मणाला, दैवानें अकस्मात् श्रीमंत करून सोडलें, तें इतकें, कीं, त्याच्या अवखळ मुलानें, गळ्यांतली मोत्यांची माळ हातानें सहज ओढून तोडली, मोत्यांचा सडा घरांत पडला, त्याकडे घरच्या स्त्रिया जांभया देत आळसानें पहात राहिल्या. ( मोती मुद्दां त्या घरीं इतका क्षुद्र पदार्थ ठरला. ते वेंचण्याच्या लायकीचे कोणाला वाटले नाहींत. )

---

विधौ विरुद्धे न पयः पयोनिधौ
सुधीघसिन्धौ न सुधा सुधाकरे ॥
न वाञ्छितं सिध्यति कल्पपादपे
न हेम हेमप्रभवे गिरावपि ॥१७ ॥

वसंततिलका

होतां विरुद्ध विधि, ना जल सागरांत
लाभे सुधा अमृतपूर्णहि ना शशींत ॥
कल्पद्रुमाकडुनि इष्ट न सिद्ध होतें
मेरूंत कांचन मुळीं न दिसूनि येतें ॥ १७ ॥

गद्यार्थ—

दैव विरुद्ध असलें, कीं, जलनिधींत जल सांपडणार नाहीं; सुधाकरांत सुधा मिळणार नाहीं; कल्पद्रुमाकडून कल्पितप्राप्ति होणार नाहीं; सुवर्णगिरि मेरूंत सोनें सांपडणार नाहीं!

---

सर्वज्ञोऽपि बहुज्ञोऽपि माधवोऽपि हरोऽपि च ।
अन्यथा नियतिं कर्तुं न शक्तः कश्चिदेव हि ॥ १८ ॥

अनुष्टुभ्

सर्वज्ञानी बहुज्ञानी । विष्णु शंकर वा कुणी ।
नसे शक्ति कुणाही यां । नियती बदलावया ॥ १८ ॥

गद्यार्थ—

सर्वज्ञानी, बहुज्ञानी, विष्णु, शंकर, कुणीहि असो, यांपैकीं, कोणालाहि नियति बदलण्याची शक्ति नाहीं.

---

चित्रं चित्रं बत बत महच्चित्रमेतद्विचित्रं
जातो दैवादुचितघटनासंविधाता विधाता ॥
यन्निम्बानां परिणतफलस्फीतिरास्वादनीया
यच्चैतस्याः कवलनकलाकोविदः काकलोकः ॥ १९ ॥

मंदाक्रान्ता

जो नेमानें अनुचित करी त्या विधात्याकडून
पेका ! पेका ! उचित घटना दोन झाल्या चुकून ॥
कीं लिंबाचें फळहि पिकुनी खायया योग्य व्हावें
तैसें, त्यांची रुचि समजण्या ज्ञान काकां असावें ॥१९॥

गद्यार्थ—

(विधाता कधीं उचित करणारा नव्हे) पण अहो आश्चर्यम्! चुकून, विधात्याकडून दोन समुचित घटना घडल्या. त्या अशा

की, कडूलिंबाचें फळ पिकून खाण्यालायक ठरावें आणि त्याची रुचि समजण्याची रसज्ञता कावळ्यांना असावी!

---

विपत्तौ किं विषादेन सम्पत्तौ हर्षणेन किम्? ।
भवितव्य भवत्येव कर्मणो गहना गतिः ॥ २० ॥

अनुष्टुभ्

संकटें दुःख, वा, वित्तें हर्ष दोन्ही कशास तीं?।
होणारें होतची राहे, कर्माची गूढ हो गति ॥ २० ॥

गद्यार्थ—

संकटांनीं वाईट वाटणें, व संपत्तीनें हर्ष वाटणें, दोन्ही व्यर्थ होणारें तें होणारच कर्माची गति अगम्य असते

---

प्राप्तव्यमर्थं लभते मनुष्यो
देवोऽपि तं लङ्घयितुं न शक्तः ॥
तस्मात्र शोचामि न विस्मयो मे
यदस्मदीयं न हि तत्परेषाम् ॥ २१ ॥

उपजाति

मिळे नराला मिळणें असे तें
देवासिही शक्य न टाळणें तें ॥
न शोक वा विस्मय होइ मातें
माझेंचि जें तें न मिळे परातें ॥ २१ ॥

गद्यार्थ—

माणसाला मिळावयाचें, तेंच मिळतें, त्याला टाळण्याची देवाला सुद्धां शक्ति नाहीं म्हणून मी शोक करीत नाहीं मला विस्मयहि वाटत नाहीं, कारण जें माझें आहे, तें दुसऱ्याला मिळणारच नाहीं

---

यथा धेनुसहस्रेषु वत्सो विन्दति मातरम् ।
तथा पूर्वकृतं कर्म कर्तारमनुगच्छति ॥ २२ ॥

अनुष्टुभ्

जसें सहस्र गाईंत, लाधे वत्सासि माय ती।
पूर्वकर्म तसें जाई कर्त्याच्या नित्य मागुतीं ॥ २२ ॥

गद्यार्थ—

सहस्र गाईंत ज्याप्रमाणें वासराला आपली आई सांपडते त्याप्रमाणें पूर्वीचें कर्म (कर्त्याच्या) त्याच्या मागून जातें

---

यद्धात्रा निजभालपट्टलिखितं स्तोकं महद्वा धनं
तत्प्राप्नोति मरुस्थलेऽपि नितरां मेरौ ततो नाधिकम्
तद्धीरो भव वित्तवत्सु कृपणां वृत्तिं वृथा मा कृथाः
कूपे पश्य पयोनिधावपि घटो गृह्णाति तुल्यं जलम् २

शार्दूलविक्रीडित

दैवानें लिहिलें कमी अधिक वा
भाळीं तुझ्या जें धन
तें सारें तुज वाळवंटिंहि मिळे,
मेरूंत आधिक्य न ॥
श्रीमंतास न दावि दैन्यचि फुका,
धैर्या धरी उज्वल
पाहे हा घट, अब्धि कूप उभयीं
घे सारखेंची जल ॥ २३ ॥

गद्यार्थ—

दैवानें जें तुझ्या कपाळीं थोडें किंवा पुष्कळ धन लिहिलें असेल, तें सर्व तुला वाळवंटांतही मिळेल, मेरुवर गेल्याव त्याहून अधिक मिळणार नाहीं तेव्हां धीर धर, आ श्रीमंताच्यापुढें दैन्य उगाच दाखवूं नको हा घट पहा– विहिरींत समुद्रांत कुठेंही बुडविला, तरी, सारखेंच पाणी घेतो

---

पत्रं नैव यदा करीरविटपे दोषो वसन्तस्य किं?
नोलूकोऽप्यवलोकते यदि दिवा, सूर्यस्य किं दूषणम्।
धारा नैव पतन्ति चातकमुखे मेघस्य किं दूषणं?
यत्पूर्वं विधिना ललाटलिखितं तन्मार्जितुं कः क्षमः ॥२

शार्दूलविक्रीडित

ये ना पत्र करीरिं, दोष म्हणुनी
लागे वसंता कसा?
घूकाला दिवसा दिसे न म्हणुनी
तो दोष सूर्या कसा? ॥
धाराही पडती न चातकमुखीं
तो दोष मेघा कसा?
आधींचा विधिलेख जो पुसु शके,
आहे कुणी कां असा? ॥ २४ ॥

गद्यार्थ—

वसंतांत सुद्धां, करीराच्या पानें फुटत नाहींत, हा व वसंताचा दोष? घुबडाला दिवसा दिसूं नये, हा काय सूर्याच

दोष? चातकाच्या मुखीं, वृष्टीच्या धारा न पडल्या, तर, त्याचा मेघाला दोष कां? आधींच विधीनें कपाळावर लिहिलें, तें पुसून टाकण्यास कोण समर्थ आहे?

———०———

नमस्यामो देवान्ननु हतविधेस्तेऽपि वशगा
विधिर्वन्द्यः सोऽपि प्रतिनियतकर्मैकफलदः ॥
फलं कर्मायत्तं किममरगणैः किं च विधिना?
नमस्तत्कर्मभ्यो विधिरपि न येभ्यः प्रभवति ॥ २५ ॥

शिखरिणी

नमूं देवां; तेही विधिशरणची; वंद्य विधि तो
परी कर्मांलागी घरुनि फल तोही वितरितो ॥
फलें कर्मा हातीं! सुरगण विधि व्यर्थचि खरे
नमूं या कर्मा, ज्यापुढतिं विधिही दुर्बल ठरे ॥ २५ ॥

गद्यार्थ—

देवांना नमावें, तों, ते स्वतः विधीच्या अंकित; तेव्हां विधीलाच वन्दावें. पण तो झाला तरी ज्याच्या त्याच्या कर्माचें नियत फलच देत असतो. फल हें कर्माच्या अधीन असतें म्हणून देव व विधि, यांचें, कांहीं महत्त्व उरत नाहीं. तेव्हां आपण, ज्याच्यापुढें विधीसुद्धां हतबल ठरतो त्या कर्मालाच वन्दूं या.

———०———

ब्रह्मा येन कुलालवन्नियमितो ब्रह्माण्डभाण्डोदरे
विष्णुर्येन दशावतारगहने क्षिप्तो महासंकटे ॥
रुद्रो येन कपालपाणिपुटको भिक्षाटनं कारितः
सूर्यो भ्राम्यति नित्यमेव गगने तस्मै नमः कर्मणे ॥ २६ ॥

शार्दूलविक्रीडित

ब्रह्माण्डोदरिं नेमिला विधि जयें, कुंभारकामाप्रत
विष्णूलाहि दशावतार दिधले ज्यानें महादुर्घट
केलें भिक्षु जयें शिवास, कवटी देऊनि हातीं सदा
सूर्यो जें फिरवी नभीं सतत, त्या कर्मा नमस्ते वदा ॥

गद्यार्थ—

ज्यानें, या ब्रह्मांडगोलामध्यें, ब्रह्मदेवाला, एखाद्या कुंभारासारखें कामाला जुंपलें आहे, ज्यानें, महासंकटपूर्ण अशा दहा अवतारांच्या जंजाळांत, विष्णूलाहि फेंकलें; ज्यानें, शंकराला हातीं कवटी देऊन भीक मागत भटकावयास लाविलें; आणि, आकाशांत सूर्याला जें संतत फिरविते, त्या कर्माला नमस्कार असो!

———०———

मज्जत्वम्भसि यातु मेरुशिखरं शत्रूञ्जयत्वाहवे
वाणिज्यं कृषिसेवनादिसकला विद्याः कलाः शिक्षतु ॥
आकाशं विपुलं प्रयातु खगवत्कृत्वा प्रयत्नान् बहून्
नाभाव्यं भवतीह कर्मवशतो भाव्यस्य नाशः कुतः? २७

शार्दूलविक्रीडित

जावो अब्धित वा सुमेरुशिखरीं, शत्रूंस जिंको रणीं
घेवो वा कृषि विक्रयादि सकला विद्या कला जाणुनी ॥
यत्नें थोर उडो खगासम महान् आकाशमार्गांतुनी
जें होणें न, घडे न; कर्मवश तें, होणें टळे कोठुनी ॥

गद्यार्थ—

कोणी समुद्रांत बुडो; किंवा मेरुवर चढो; युद्धांत शत्रूंना जिंको, किंवा, नोकरी, शेती, व्यापार इत्यादि सर्व विद्या कला शिको; महाप्रयत्नांनीं, पक्ष्याप्रमाणें, अफाट आकाशांत उड्डान करो;—जें होणें नाहीं तें घडणार नाहीं; आणि कर्मवश जें होणार, तें टळणार नाहीं.

———०———

नेता यस्य बृहस्पतिः, प्रहरणं वज्रं, सुराः सैनिकाः
स्वर्गो दुर्गमनुग्रहः किल हरेरैरावतो वारणः ॥
इत्याश्चर्यबलान्वितोऽपि बलिभिर्भग्नः परैः संगरे
तद्व्यक्तं वरमेव दैवशरणं धिग्धिग्वृथा पौरुषम् ॥ २८ ॥

शार्दूलविक्रीडित

हातीं वज्र, गुरू बृहस्पति, रणीं सेना सुरांची जिथ
दुर्ग स्वर्ग; कृपा जयासि हरिची, हत्तीहि ऐरावत ॥
इंद्रा अद्भुत शक्ति ही तरि रणीं त्या शत्रु जिंकी कसा!
वाटे दैवचि थोर सर्व वघतां, धिक्कार त्या पौरुषा! २८

गद्यार्थ—

ज्याला बृहस्पति हा नेता; वज्रासारखें शस्त्र; सैनिक देव; किल्ला स्वर्ग; विष्णूचें पाठबळ, ऐरावतासारखा हत्ती; असलें विलक्षण बळ इंद्रापाशीं असून त्याचाही बलिष्ठ शत्रूंनीं युद्धांत पराजय केला! सर्व पाहतां, दैवालाच शरण जाणें अधिक बरें; धिक्कार असो पौरुषाला!

———०———

आधिव्याधिशतैर्जनस्य विविधैरारोग्यमुन्मूल्यते
लक्ष्मीर्यत्र, पतन्ति तत्र विवृतद्वारा इव व्यापदः ॥
जातं जातमवश्यमाशु विवशं मृत्युः करोत्यात्मसात्
तत्किं कस्य निरंकुशेन विधिना यन्निर्मितं सुस्थिरम् ॥ २९

शार्दूलविक्रीडित

पीडा, रोग अनेक येउनि जनीं, आरोग्य तें नासतें
मुक्तद्वारचि आपदांस मिळतें, संपत्ति राहे तिथें ॥
येई जन्म तया तया अटळ तो मृत्यू क्षणीं खातसे
कोणा सुस्थिर तें निरंकुश विधी देतो कधीं
कायसें ? ॥ २९ ॥

गद्यार्थ—

मन आणि शरीराचे अनेक रोग, माणसाचें आरोग्य नष्ट करून टाकतात; संपत्ति असेल, तेथें मुक्तद्वार असल्यासारख्या आपत्ति कोसळतात; जो जो म्हणून जन्माला आला, त्याला त्याला, अटळपणें त्वरित मृत्यू खाऊन टाकतो निरंकुश असा विधि, कोणाला कोणती सुस्थिर अशी वस्तु देतो ?

---

भग्नाशस्य करण्डपीडिततनोर्म्लानेन्द्रियस्य क्षुधा
कृत्वाखुर्विवरं स्वयं निपतितो नक्तं मुखे भोगिनः ॥
तृप्तस्तत्पिशितेन सत्वरमसौ तेनैव यातः पथा
लोकाः पश्यत दैवमेव हि नृणां वृद्धौ क्षये कारणम् ॥३०

शार्दूलविक्रीडित

पेटारीं अहि कोंडला, क्षुधित तो,
व्हावी कशी मुक्तता ?
रात्रीं बीळ करूनि उंदिर घुसे
त्याच्या मुखीं आयता ॥
तन्मांसें परितृप्त त्याचि विवरें
बाहेर ये तत्क्षण !
पाहा दैवचि लोकहो ! सकळिकां
वृद्धिक्षया कारण ॥ ३० ॥

गद्यार्थ—

एक सर्प पेटाऱ्यांत कोंडला गेला व क्षुधेनें व्याकुळ झाला. पण दैवयोग असा कीं, रात्रीं पेटाऱ्याला बीळ पाडून उंदीर आंत शिरला तो नेमका त्याच्या तोंडांत त्याला खाऊन त्याच्या मांसानें तृप्त होऊन उंदरानें केलेल्या विवरानेंच त्वरें बाहेर पडला ! जनहो ! पहा सगळ्यांच्या वृद्धिक्षयाचें कारण दैवच !

---

वैद्या वदन्ति कफपित्तमरुद्विकारा-
ञ्ज्योतिर्विदो ग्रहगतिं परिवर्तयन्ति ॥
भूताभिषंग इति भूतविदो वदन्ति
प्राचीनकर्म बलवन्मुनयो वदन्ति ॥ ३१ ॥

आर्या

कफ, पित्त, वात म्हणती
वैद्य, वदोनी शरीररोगांस ।
ज्योतिर्विद म्हणती कीं
ग्रहगति फिरली असे इथें खास ॥
मांत्रिक निदान करिती
कीं भूतानीं पछाडिलें यास ।
प्राक्तन कर्मांचें फळ
अटळ असें मुनिहि मानिती त्यास ॥ ३१ ॥

गद्यार्थ—

शारीरिक विकृति पाहून वैद्य म्हणतात, कफ, पित्त, वात, असें कांहींतरी, ज्योतिषी म्हणतात ग्रहगति फिरलेली आहे, मांत्रिक म्हणतात याला भूतांनीं पछाडलें आहे, मुनि म्हणतात प्राक्तन कर्माचें हें अटळ फळ आहे !

---

लब्धं जन्म सह श्रिया, स्वयमपि त्रैलोक्यभूषाकरः
स्थित्यर्थं परमेश्वराभ्युपगतस्तेनापि मूर्ध्ना धृतः ॥
वृद्धिं शीतकरस्तथापि न गतः क्षीणः परं प्रत्युत
प्रायःप्राक्तनमेव कर्म बलवत् कः कस्य कर्तुं क्षमः? ॥३२

शार्दूलविक्रीडित

लक्ष्मीच्या सह जन्मुनी, स्वयमपि
त्रैलोक्यभूषाकर
ज्याचा आश्रय घेइ तो शिव धरी
ज्याला स्वशीर्षावर ॥
वाढे चंद्र न तो तरीहि; उलटा
सुक्षीण होई किती !
कोणी साह्य कुणा न होइ ! बलवान्
त्या प्राक्तनाची गति ॥ ३२ ॥

गद्यार्थ—

जो चंद्र, लक्ष्मीच्या बरोबर जन्माला आला, स्वतः त्रैलोक्याचें भूषण आहे, ज्या शंकराचा त्यानें आश्रय घेतला, त्यानेंच, त्याला मस्तकीं धारण केलें; तो चंद्र, वाढावयाचें तर दूरच, राहो, उलट क्षीण मात्र होतो. कोणी कोणाला साह्य करूं शकत नाहीं कारण प्राक्तन कर्माचेंच बल फार मोठें !

---

दैवे समर्प्य चिरसंचितकर्मभारं
सुस्थाः सुखं वसत किं परयाचनाभिः ? ॥
मेरुं प्रदक्षिणयतोऽपि दिवाकरस्य
ते तस्य सप्त तुरगा न कदाचिदष्टौ ॥ ३३ ॥

वसंततिलका

दैवावरी धरुनि संचितभार पूर्ण
व्हा स्वस्थ शांतः करणें परयाचना न ॥
मेरूस, सूर्य करितांहि प्रदक्षिणा ती
ते सात अश्व कधिं आठहि काय होती ? ॥३३

गद्यार्थ—

चिरसंचित कर्माचा सर्व भार दैवावर टाकून खुशाल स्वस्थ शांत चित्तानें रहा! निष्कारण कोणाची याचना कां करता? सूर्य हा सुवर्णगिरि मेरूभोंवतीं प्रदक्षिणा सतत करीत असून सुद्धां, त्याचे अश्व, साताचे आठ कधीं झाले आहेत कां?

---

अरक्षितं तिष्ठति दैवरक्षितं
सुरक्षितं दैवहतं विनश्यति ॥
जीवत्यनाथोऽपि वने विसर्जितः
कृतप्रयत्नोऽपि गृहे विनश्यति ॥ ३४ ॥

शार्दूलविक्रीडित

दैवें रक्षित, तें जगेल, नसतां
त्या अन्य संरक्षण
दैवानें हत तें, मरेल दुसरें
अत्यंतही रक्षुन ॥
रानीं टाकुनियां, अनाथहि, जगे
हा एक कोणी पहा
केले यत्न तरी, घरींहि मरतो,
कोणीतरी अन्य हा ॥ ३४ ॥

गद्यार्थ—

दुसऱ्या कोठून संरक्षण नसतां, ज्याचें दैवच रक्षक असतें, तें जगणारच. इतर कितीहि मोठें संरक्षण असो, पण, ज्याला दैवानें मारावयाचें ठरविलें, तें नाश पावणारच. अनाथ, रानांत टाकलेला माणूसहि जगतो; तर दुसरीकडे, ज्याच्यासाठीं प्रयत्नांची शिकस्त चाललेली आहे, असा माणूस घरांतल्या घरांत सुद्धां मरतो.

---

येनाञ्चलेन सरसीरुहलोचनाया-
स्त्रातः प्रभूतपवनादुदये प्रदीपः ॥
तेनैव सोऽस्तसमयेऽस्तमनं विनीतः
क्रुद्धे विधौ भजति मित्रममित्रभावम् ॥३५॥

वसंततिलका

झांकोनि ज्या पदरिं, दीपक लावियेला
वाऱ्यांतुनी प्रबलही मग रक्षियेला ॥
तोची तया पदर मालवितोचि अंतीं
कोपे विधीच तधिं मित्रहि शत्रु होती ॥३५॥

गद्यार्थ—

दिवा लावतेवेळीं, स्त्रीच्या ज्या पदरानें प्रबल वाऱ्यापासून त्याचें रक्षण केलें त्यानेंच शेवटीं त्याला विझवितांना पदर दिला! विधि रागावला म्हणजे मित्रहि शत्रूप्रमाणें वागतात.

---

त एवामी बाणास्तदपि हरलब्धं धनुरिदं
स एवाहं पार्थः प्रमथितसुरारातिनिचयः ॥
इमास्तास्ता गोप्यो हरिचरणचित्तैकशरणा
ह्रियन्ते गोपालैर्विधिरपि बलीयान् न तु नरः ॥ ३६ ॥

शार्दूलविक्रीडित

तेची हे शर; जो शिवें मज दिला
तोची असे चाप हा!
पूर्वींचा सुरशत्रुनाशक असा
जो पार्थ तो मीच हा! ॥
गोपी त्याच अनन्यभक्त हरिच्या;
त्यां हायरे ओढुन—
नेती गोपहि; तो विधीच बलवान्!
या मानवा शक्ति न ॥ ३६ ॥

गद्यार्थ—

( कृष्णावतार संपला व गोपींना संरक्षण देत, अर्जुन, त्यांना हस्तिनापुरास नेत असतां, यःकश्चित् गुराख्यांनीं हल्ले करून गोपी ओढून नेल्या. अवतारकार्य सरलें आणि अर्जुनाचें कांहीं चाललें नाहीं. त्यावेळीं तो म्हणतो—) माझे बाण होते तेच आहेत; शंकरानें दिलेलें धनुष्यहि तेंच आहे, दैवाच्या शत्रूचा पराभव करणारा पराक्रमी अर्जुन पूर्वींचाच आहे; कृष्णाच्या भक्त गोपीहि त्याच त्या पण हाय, माझ्या नाकावर टिच्चून आज

गोपींना गोप सोडून नेत आहेत व मी हतबल झालों आहें। विधीच बलिष्ठ होय मानव नव्हे। दुसरें काय?

---

कांश्चित्तुच्छयति प्रपूरयति वा कांश्चिन्नयत्युन्नतिं
कांश्चित्पातविधौ करोति च पुनः कांश्चिन्नयत्याकुलान्॥
अन्योन्यप्रतिपक्षसंहतिमिमां लोकस्थितिं बोधयन्
एष क्रीडति कूपयन्त्रघटिकान्यायप्रसक्तो विधिः ॥३७॥

शार्दूलविक्रीडित

कोणां रिक्त करी, दुज्यांस भरतो,
नेतो कुणाला वरी
पाडी अन्य कुणास, आकुळ दुज्या
कोणास तोची करी॥
एका एक विरुद्ध माळ फिरवी
संसार वस्तु स्थिति-
दावाया जणुं कूपयन्त्रघटिका—
न्यायेंच खेळे विधि॥ ३७॥

गद्यार्थ—

*कांहींना रिकामे करतो, कांहींना भरतो, कांहींना वर नेतो, कांहींना खालीं पाडतो,-कांहींना वाकडे तिकडे करतो माळेचे दोन भाग उलट सुलट फिरत ठेवतो, अशा तऱ्हेनें, संसाराची स्थिति दर्शविण्यासाठीं जणुं रहाटगाड्याच्या पद्धतीनें, विधि क्रीडा करीत असतो.*

---

"दैवं संप्रेरयति" मामिति दग्धधियां मुखम्।
अदृष्टश्रेष्ठदृष्टीनां दृष्ट्वा लक्ष्मीर्निवर्तते॥ ३८॥

अनुष्टुभ्

"अदृष्ट श्रेष्ठ" जो मानी "दैव प्रेरी मला" असें॥
दुर्मुखा पाहुनी त्याच्या लक्ष्मी परत जातसे॥ ३८॥

गद्यार्थ—

*अदृष्टाला श्रेष्ठ मानून, दैव मला प्रेरणा देतें, असें म्हणणाऱ्या, हतभाग्याचें दुर्मुख पाहून, लक्ष्मी परत जाते।*

---

सा गता शुभमयी युगत्रयी
देव संप्रति युग कलिः पुनः॥
सेवकेषु न कृत्यं, कृतज्ञता
नापि भूपतिषु यत्र दृश्यते॥ ३९॥

रथोद्धता

तीन तीं शुभ युगेंहि संपलीं
देव! आज यच येतसे कलि॥
भृत्य कार्य न करी; कृतज्ञता
वा दिसे न नृपतींमधें अतां॥ ३९॥

गद्यार्थ—

*राजा! तीं तीन शुभयुगें गेलीं, आणि, आतां कलियुग आलें आहे,—ज्यामध्यें नोकर कामें करीत नाहींत व राजांत कृतज्ञताहि उरली नाहीं*

---

सीदन्ति सन्तो विलसन्त्यसन्तः
पुत्रा म्रियन्ते जनकश्चिरायुः॥
परेषु मैत्री स्वजनेषु वैरं
पश्यन्तु लोकाः कलिकौतुकानि॥ ४०॥

वसततिलका

संतांस दुःख, सुख केवळ दुर्जनांस
अल्पायु पुत्र, परि बाप चिरायु खास॥
स्वीयांस वैर, करणें, परक्या स्वमित्र
कैशी पहा कलि करी कृति ही विचित्र॥४०॥

गद्यार्थ—

*कलियुगाचा खेळ पहा-सज्जनांना दुःख, दुर्जनांना सुख, मुलें मरताहेत आणि बाप चिरायु! परक्याशीं मैत्री आणि सज्जनाशीं वैर!*

---

वाग्जालेतसर्व मात्रं, तत्क्रियां कर्तुमक्षमाः।
कलौ वेदान्तिनो भान्ति फाल्गुने बालका इव॥ ४१॥

आर्या

आनंद बडबडींतचि, कृति ती करण्या सदैव असमर्थ।
कलींतले वेदान्ती गमती पोरेंचि जेविं शिमग्यांत॥४१॥

गद्यार्थ—

*मुख या बोलण्यांतला आनंद; तेवढा पाहून त्या कृतीला नेणारे असे हे कलियुगांतले वेदान्ती, शिमग्यांतल्या पोरांप्रमाणें वाटतात*

आसाद्यापि महोदधिं न विटपो जातो जलैर्वाडवो
मेघं प्राप्य न चातकोऽपि; चरणौ भानुं न लेभेऽरुणः ॥
चंद्रः शंकरशेखरेऽपि निवसन् पक्षक्षये क्षीयते
सर्वः सज्जनसङ्गमेऽपि लभते दैवानुरूपं फलम् ॥ ४२ ॥

शार्दूलविक्रीडित

झाला वाडव तृप्त ना जलभरें अब्धींतही राहुन
मेघें चातक ना; रवीहि अरुणा देऊं शके पाय न ॥
राहोनी शिवमस्तकींहि शशि तो पक्षक्षयें व्याकुळ;
सर्वां सज्जनसंगमींहि मिळतें दैवाप्रमाणें फल ॥४२॥

गद्यार्थ—

वडवानलाला, राहण्यास समुद्र सांपडला म्हणून कांहीं त्याची तहान भागली नाहीं, किंवा चातकाला, प्रत्यक्ष मेघ सांपडूनही, त्याचीहि तहान संपत नाहीं; मोठ्या सूर्याचा सारथि झाल्यानें, लंगड्या अरुणाला, पाय प्राप्त झाले नाहींत; शंकराच्या मस्तकीं राहून सुद्धां चंद्राचा प्रत्येक महिन्याचा पंधरवड्याचा क्षय कांहीं थांबला नाहीं, सर्वांना, सज्जनाच्या संगतींत राहूनहि दैवाप्रमानें काय मिळावयाचें तेंच फल मिळतें.

---

गतः स कालो यत्रासन्देवाः सेवानुवर्तिनः ।
दशानन! दशां पश्य तरन्ति दृपदोऽम्भसि ॥ ४३ ॥

अनुष्टुम्

गेला तो काल कीं जेव्हां देवांनीं सेविलें तुला ।
रावणा! ही दशा पाहे—शिलाहि तरती जला ॥४३॥

गद्यार्थ—

(३६ व्या श्लोकांतल्या प्रमाणें कालचक्राचा प्रभाव अर्जुना-सारख्या सज्जनांनाच भोगावा लागला असें नव्हे तर रावणाला सुद्धां ती पाळी आली.)—रावणा! ज्यावेळीं प्रत्यक्ष देव तुझी सेवा करीत होते, तो काल गेला! आता हा चमत्कार पहा—(आज तुझ्या नाशासाठीं) दगडसुद्धां पाण्यावर तरंगून (रामाचे साहाकारी होत) आहेत.

---

# प्रकरण २० वें

## उद्यम, पौरुष, आत्मशक्ति, पुरुषकार, यत्न, उत्साह, अभ्यास, आळस, निद्रा.

पूर्वजन्मजनितं पुराविदः कर्म दैवमिति संप्रचक्षते ।
उद्यमेन तदुपार्जितं चिराद्दैवमुद्यमवशं न तत्कथम्? ॥ १

रथोद्धता

पूर्वजन्मकृतकार्य आज तें
दैव हेंच म्हणतात जाणते ॥
उद्यमें मिळविलेंचि तें जर
उद्यमें वश न दैव कां तर? ॥ १ ॥

गद्यार्थ—

पूर्वजन्मीं केलेलें कर्म, तेंच आजचें दैव, असें पुरातत्ववेत्ते म्हणतात. जर याप्रमाणें, दैव हें उद्योगानेंच मिळविलेलें आहे, तर, दैव हें उद्योगालाच वश नाहीं, असें कसें म्हणतां येईल?

---

उद्यमेन हि सिध्यन्ति कार्याणि न मनोरथैः ।
न हि सुप्तस्य सिंहस्य प्रविशन्ति मुखे मृगाः ॥ २ ॥

अनुष्टुम्

होती सफल हो कार्यें उद्योगें न मनोरथें, ।
येतेना मृग, सिंहाच्या मुखीं झोंपेंत आयते ॥२॥

गद्यार्थ—

कार्यें सफल व्हावयाचीं, तीं उद्योगानें होतात; नुसते मनोरथ करून नव्हे निजलेल्या सिंहाच्या तोंडांत, पशु काय आयते येऊन पडतात?

---

उद्योगः खलु कर्तव्यः फलं मार्जारवद्भवेत् ।
जन्मप्रभृति गौर्नास्ति पयः पिबति नित्यशः ॥ ३ ॥

अनुष्टुम्

उद्योग पाहिजे केला; फल ये मांजरापरी ।
नसुनी गाय आजन्म, नित्य दूध पितें तरी ॥ ३ ॥

गद्यार्थ—

उद्योग करीत राहिलें पाहिजे. माजराला मिळतें, तसें फळ मिळेल. जन्मापासून स्वत ची गाय नमताहि, तें दूध निस पिवेंच ना ?

उद्योगिनं पुरुषसिंहमुपैति लक्ष्मी-
दैवं प्रधानमिति कापुरुषा वदन्ति ॥
दैवं विहाय कुरु पौरुषमात्मशक्त्या
यत्ने कृते यदि न सिध्यति कोऽत्र दोषः ? ॥४

वसंततिलका

लक्ष्मी मिळे करिति उद्यम त्या नरांस
'दैवप्रभाव' म्हणती परि मूढ त्यास ॥
सोडूनि दैव, कर पौरुष स्वप्रयत्नें
यत्नांतिही न फल, हा न च दोष मानें ॥ ४ ॥

गद्यार्थ—

जो उद्योग करील, त्या नरश्रेष्ठाला, लक्ष्मी मिळते; तर हा दैवाचा प्रभाव असें, मूर्ख म्हणत बसतात तू दैवाची कल्पना सोडून देऊन स्वशक्तीनें पौरुष कर; प्रयत्न करूनहि यश न मिळालें, तर त्यांत तुला काय दोष आहे ?

किं जन्मना च महता पितृपौरुषेण ?
शक्त्या हि याति निजया पुरुषः प्रतिष्ठाम् ॥
कुम्भो न कूपमपि शोषयितुं समर्थः
कुम्भोद्भवेन मुनिनाम्बुधिरेव पीतः ॥ ५ ॥

वसंततिलका

तो व्यर्थ जन्म, कृति थोरहि पूर्वजांची
येई महत्त्व मनुजा निजशक्तिनेंची ॥
तो कुंभ आटवु शके न च कूपमात्र
टाकी पिऊन उदधीसहि कुम्भपुत्र ॥ ५ ॥

गद्यार्थ—

मोठ्या कुळांत जन्म, पूर्वजांची महान् कृत्यें, या सर्वांचा माणसाला काय उपयोग आहे ? माणूस जो महत्त्व पावतो, तो केवळ स्वत च्या शक्तीनें ! कुम्भ हा, एकादी विहीर सुद्धां आटवू शकत नाहीं, पण, कुम्भांत उत्पन्न झालेल्या अगस्तिऋषीनें समुद्रच पिऊन टाकला. (अगस्ति हा मित्रावरुणांपासून कुम्भांत उत्पन्न झाला अशी कथा.)

व्रजत्यधः प्रयात्युच्चैर्नरः स्वैरेव चेष्टितैः ।
अधः कूपस्य खनक ऊर्ध्वं प्रासादकारकः ॥ ६

अनुष्टुभ्

खालीं जाई वरी जाई कर्मेंचि अपुल्या नर ।
खोदी विहीर तो खालीं ! बांधी प्रासाद तो वर ॥६

गद्यार्थ—

माणूस खालीं जातो काय, किंवा, वर जातो काय, दोन्ही केवळ स्वत च्याच कर्मानें ! विहीर खणणारा, खालीं खालीं जात असतो;—राजवाडा बांधणारा वर वर जात असतो.

नैवाकृतिः फलति नैव कुलं न शीलं
विद्यापि नैव न च यत्नकृतापि सेवा ॥
भाग्यानि पूर्वतपसा किल संचितानि
काले फलन्ति पुरुषस्य यथैव वृक्षाः ॥ ७ ॥

वसंततिलका

विद्या, स्वरूप, कुल, शील, सयत्न सेवा
(तात्काल) हीं न फल देति कधींच जीवा ॥
आधीं करून तप, संचित भाग्य होतें
वृक्षापरी अवसरीं फल तेंच देतें ॥ ७ ॥

गद्यार्थ—

स्वरूप, कुल, शील, विद्या, कष्ट करून केलेली सेवा, यांपैकी कोणतीहि गोष्ट, माणसाला कांहीं (तात्काल) फळ देत नाहीं. आधीं तपश्चर्या करून (त्याचे फलित म्हणून) जें भाग्य संचित होतें, तें एखाद्या (पूर्वीच लावून ठेवलेल्या) झाडाप्रमाणें, योग्य वेळीं फल देतें.

न दैवमिति संचिन्त्य त्यजेदुद्यममात्मनः ।
अनुद्यमेन कस्तैलं तिलेभ्यः प्राप्तुमिच्छति ? ॥ ८॥

अनुष्टुभ्

न दैवाच्या विचारांनीं, सोडावा यत्न आपुला ।
मिळेल तेल कोणाला कधीं न पिळतां तिळां ? ॥८॥

गद्यार्थ—

दैव (असेल तसेंच होणार, असल्या) विचारांनीं कोणींहि आपला उद्योग सोडूं नये. निरुद्योगानें (तेल पिळण्याचें काम न करतां) तिळांपासून तेल मिळण्याची इच्छा कोणी कशी करावी ?

सूतो वा सूतपुत्रो वा यो वा को वा भवाम्यहम् ।
दैवायत्तं कुले जन्म मदायत्तं तु पौरुषम ॥ ९ ॥

अनुष्टुभ्

**कोळी वा पुत्र कोळ्याचा कोणीहि असलों जरी ।**
**दैवाहातीं कुळीं जन्म शौर्य माझ्या करीं परी ॥ ९॥**

गद्यार्थ—

(द्रौपदीस्वयंवराच्या वेळीं केवळ तो हलक्या कुळांतला म्हणून कर्णाला लक्ष्यवेधाच्या चढाओढींत घेतलें नाहीं तेव्हांचें त्याचें तेजस्वी भाषण !—) मी कोळी असेन, कोळ्याचा मुलगा असेन किंवा आणखी कोणी असेन (त्याकडे तुम्ही न पाहतां केवळ माझ्या शौर्याकडे, पौरुषाकडे, पाहिलें पाहिजे ) चांगल्या कुळांत जन्म लाभणें हें दैवाच्या स्वाधीन, पण माझें पौरुष हें माझ्या स्वाधीनचें आहे ।

———०———

विहाय पौरुषं यो हि दैवमेवावलम्बते ।
प्रासादसिंहवत् तस्य मूर्ध्नि तिष्ठन्ति वायसाः ॥ १० ॥

अनुष्टुभ्

**दैव आधार जो माने सोडुनी निज पौरुष ।**
**शिल्पसिंहापरी त्याच्या शिरीं वसति वायस ॥१०॥**

गद्यार्थ—

आपलें पौरुष सोडून, जो, दैवावर अवलंबून राहतो त्याच्या डोक्यावर, राजवाड्यातील सिंहाच्या पुतळ्यावर, बसतात त्याप्रमाणें कावळे बसतात (तो अवहेलेस पात्र ठरतो )

———०———

यथा बीजं, विना क्षेत्रमुप्तं भवति निष्फलम् ।
तथा पुरुषकारेण विना दैवं न सिद्ध्यति ॥ ११ ॥

अनुष्टुभ्

**असें शेतीविना बीज ठरे निष्फळ पेरन ।**
**नरयत्नाविना तैसें दैव सिद्धीस जाइ न ॥ ११ ॥**

गद्यार्थ—

। बीज पेरन झालें, जर तें शेतीशिवाय अन्यत्र ( माळ खडकाळ भूमींत ) पेरल्यास जसें फलदायी होत नाहीं, तद्वत् मनुष्याच्या यत्नाशिवाय दैव सिद्धीस जात नाहीं.

———०———

उद्यमः साहसं धैर्यं बुद्धिः शक्तिः पराक्रमः ।
षडेते यत्र वर्तन्ते तत्र देवः सहायकृत् ॥ १२ ॥

अनुष्टुभ्

**धैर्य, साहस, उद्योग बुद्धि शक्ति नि शौर्य तें ।**
**हीं सहा वसतीं जेथें देव साह्य करी तिथें ॥ १२ ॥**

गद्यार्थ—

धैर्य, साहस, उद्योग, बुद्धि, शक्ति, पराक्रम हीं सहा जेथें असतात तेथें देव साह्यकारी होतो

———०———

यथा ह्येकेन चक्रेण न रथस्य गतिर्भवेत् ।
एवं पुरुषकारेण विना दैवं न सिद्ध्यति ॥ १३ ॥

अनुष्टुभ्

**रथा न गति ये जैशी एकची चाक ज्या असे ।**
**नरयत्नाविना, तैसें यशस्वी दैवही नसे ॥ १३ ॥**

गद्यार्थ—

( कार्यसिद्धीच्या रथाला, पुरुषयत्न व दैव अशीं दोन चाकें असतात ) कोणत्याहि रथाला एकाच चक्रानें गति येत नाहीं पुरुषप्रयत्नाविना, एक दैव हेंच चाक असून कार्यसिद्धीचा रथ चालणार नाहीं

———०———

नाद्रव्ये निहिता काचित् क्रिया फलवती भवेत् ।
न व्यापारशतेनापि शुकवत्पाठ्यते बकः ॥ १४ ॥

उपजाति

**अपात्र वस्तूवरतीं प्रयत्न**
**केले तरी ते सुफलत्वहीन ॥**
**न ये, करोनी शतही प्रयास**
**शुकापरी बोलवितां बकास ॥ १४ ॥**

गद्यार्थ—

( पण दैवाच्या समान दर्जा प्रयत्न, उद्योग यांना दिला तरी त्याच्याहि मर्यादा ओळखल्या पाहिजेत दान काय, शिक्षण काय, प्रयत्न काय, सत्पात्रावर केले तरच फळ )

अपात्र वस्तूवर कष्ट केले तर त्याला कधींच फळ येत नाहीं शेकडों प्रयत्न करून बगळ्याला पोपटासारखें बोलावयास शिकविणें शक्य होईल काय ?

———०———

काष्ठादग्निर्जायते मथ्यमानाद्
भूमिस्तोयं खन्यमाना ददाति ॥
सोत्साहानां नास्त्यसाध्यं नराणां
मार्गारब्धाः सर्वयत्नाः फलन्ति ॥ १५ ॥

वसंततिलका

काष्ठांतुनी, अनल घासुनियां निघेल
खोदून भूमि, जलही मनुजा मिळेल ॥
उत्साहसाध्य न, असें जगिं कार्यची न
मार्गेंच योग्य, करतां फळती प्रयत्न ॥ १५ ॥

गद्यार्थ—

लाकडावर लाकूड घासून अग्नि निघतो जमीन खोदून पाणी मिळतें. उत्साही माणसाला असाध्य असें काहींच नाहीं योग्य मार्गानें आरंभल्यास सर्व प्रयत्न सफल होतात.

———•———

पुरुषार्थात्फलप्राप्तिर्देशकालवशादिह ।
प्राप्ता चिरेण शीघ्रं वा यासौ दैवमिति स्मृता ॥ १६ ॥

अनुष्टुभ्

पुरुषार्थें फलप्राप्ति देशकालानुसार ती ।
उशीरां लौकरी होई तिलाची दैव बोलती ॥ १६ ॥

गद्यार्थ—

माणसाच्या ( शौर्य धैर्य, प्रयत्न, उद्योग, चिकाटी, इत्यादींनीं ) पुरुषार्थानें अर्थात् देश कालादि ( मर्यादांना ) अनुसरून जी काय फलप्राप्ति, उशीरा, लौकर, होते तिलाच दैव असें म्हटलें जातें.

———•———

अकृत्वा पौरुषं या श्रीर्विकासिन्यपि किं तया ? ।
जरद्गवोऽपि चाश्नाति दैवादुपगतं तृणम् ॥ १७ ॥

अनुष्टुभ्

पौरुषावीण मोठी श्री मिळुनी काय भूषण ? ॥
म्हातारा बैलही खाई यदृच्छाप्राप्त तें तृण ॥ १७ ॥

गद्यार्थ—

कांहीं तरी विशेष पराक्रम केल्याशिवाय मोठें वैभव मिळालें तरी त्यांत काय भूषण आहे ? म्हातारा बैल सुद्धां नाहीं का दैवानें मिळेल तें गवत खात बसत !

———•———

उद्योगादनिवृत्तस्य ससहायस्य धीमतः ।
छायेवानुगता तस्य नित्यं श्रीः सहचारिणी ॥ १८ ॥

भद्रा

उद्योग न जो सोडी,
सुमित्रही ज्यास, बुद्धि ज्यांत वसे ।
श्री सहचरी सदाची
छायेपरि त्याग अनुसरीत असे ॥ १८ ॥

गद्यार्थ—

जो उद्योग सोडीत नाहीं; ज्याला साह्यकर्ते आहेत, व ज्याच्यापाशीं बुद्धि आहे, त्याच्या मागून, सावलीसारखी त्याची सहचरी होऊन, लक्ष्मी नेहमीं चालत असते.

———•———

गच्छत्पिपीलिकापङ्क्तिः समुद्रमधिगच्छति ।
न गच्छन् वैनतेयोऽपि पदमेकं न गच्छति ॥१९॥

अनुष्टुभ्

चालेल रांग मुंग्यांची तर गांठी समुद्रही !
न चालतां गरुडही जाई न पद एक ही ॥ १९ ॥

गद्यार्थ—

( क्षुद्र मंदगामी ) मुंग्याची रांगसुद्धां चालतच असली, म्हणजे ती ( दूरचा ) समुद्र सुद्धा गांठील ( अत्यंत शीघ्र उडणारा ) गरुड सुद्धां, चालतच जर नसेल, तर, एक पाऊल तरी पुढें कसा जाईल ?

———•———

न स्वल्पमप्यध्यवसायभीरोः
करोति विज्ञाननिधिर्गुणं हि ॥
अन्धस्य किं हस्ततलस्थितोऽपि
प्रकाशयत्यर्थमिह प्रदीपः ? ॥ २० ॥

उपजाति

करूं भितो स्वल्पहि जो प्रयत्न
त्या व्यर्थ विज्ञाननिधी असून ॥
करीं दिला दीपक आंधळ्यास
तो काय त्या दावितसे प्रकाश ? ॥ २० ॥

गद्यार्थ—

ज्याला, यत्किंचित् सुद्धां प्रयत्न करून पाहण्याची भीति वाटते, त्याच्यापाशीं, उच्च ज्ञानाचा मोठा साठा असून उपयोग काय ! आंधळ्याच्या हातीं दिवा असून, तो त्याला, कोणत्या वस्तूला उजळवून दाखविणार आहे !

———•———

प्राक्तनं चैहिकं चेति द्विविधं विद्धि पौरुषम् ।
प्राक्तनोऽद्यतनेनाशु पुरुषार्थेन जीयते ॥ २१ ॥

वसंततिलका

त्या प्राक्तनासमचि ऐहिक विद्यमान
आहे असें द्विविध पौरुष नीट जाण ॥
( ये प्राक्तनें फल, न तें अनिवार्य खास )
जिंकीच अद्यतन सत्वर प्राक्तनास ॥ २१ ॥

गद्यार्थ—

पौरुष हें दोन प्रकारचें आहे हें नीट ध्यानीं घ्या एक प्राक्तन म्हणजे काल किंवा पूर्वी घडलेलें, व, एक ऐहिक, म्हणजे या जगांतलें, आतां घडत असलेलें या दोनापैकीं प्राक्तनानें येणारें फल हें अद्यतन म्हणजे आज घडणाऱ्या पौरुषानें त्वरित जिंकतां येतें (म्हणजे प्राक्तनाचा दुष्परिणाम टालविता येतो )

———

ना यथा यतते नित्यं यद्भावयति यन्मयः ।
यादृगिच्छेच्च भवितुं तादृग्भवति नान्यथा ॥ २२ ॥

अनुष्टुभ्

नेत्य चिंती, करी यत्न, ज्याशीं तद्रूप वा असे ।
इच्छी होण्या जसें तैसा, नान्यथा, नर होतसे ॥२२॥

गद्यार्थ—

ज्याचें, मनुष्य नेहमीं चिंतन करतो, ज्याच्यासाठीं प्रयत्न करतो, ज्याच्याशीं तद्रूप होतो, जसा स्वत होऊं इच्छितो तसाच मनुष्य होतो, इतर कशासारखा नाहीं

———

निपानमिव मण्डूकाः सरः पूर्णमिवाण्डजाः ।
सोद्योगं नरमायान्ति विवशाः सर्वसम्पदः ॥ २३ ॥

अनुष्टुभ्

जैसे बेडूक कूपातें, मासे पूर्ण तळ्याकडे ।
ये उद्योगी नरा तैसें, धन, होऊन बापुडें ॥ २३ ॥

गद्यार्थ—

जसे बेडूक विहिरीकडे, जसे भरलेल्या तळ्याकडे मासे, तसें अगतिक होऊन, सारें वैभव उद्योगी पुरुषाकडे चालत येतें

———

पदमतुलमुपैतुमिच्छतोच्चैः
प्रथममियं मतिरेव लालनीया ॥
फलममिलषता कृषीवलेन
प्रथमतरं ननु कृष्यते धरैव ॥ २४ ॥

वैतालीय छंद

पद अतिशय उच्च इच्छिल्यानें
प्रथमचि ही निजबुद्धि तुष्टवीणें ॥
कृषकहि फल इच्छितो जधीं तो
प्रथम न कां निजभूमि नांगरीतो ? ॥ २४ ॥

गद्यार्थ—

अति उंच पदीं जाऊं इच्छिणाऱ्यानें प्रथम आपल्या ( बुद्धीचा आळस ज घ्यासाठीं तिला प्रयत्नशील उद्यमप्रवण करण्यास ? ) बुद्धीला गोंजारलें पाहिजे फलप्राप्तीची इच्छा धरणारा शेतकरी पाहल्या प्रथम आपल्या जमीनीला नीट नांगरीत नाहीं कां ?

———

न लभन्ते विनोद्योगं जन्तवः संपदां पदम् ।
सुराः क्षीरोदधिक्षोभमनुभूयामृतं पपुः ॥ २५ ॥

अनुष्टुभ्

उद्योगाविण कोणाला मोठें पद मिळेच न ।
प्याले देव सुधा, आधीं क्षीराब्धिक्षोभ सोसुन ॥२५॥

गद्यार्थ—

उद्योगावांचून कुणालाहि वैभवाचे पद प्राप्त होत नाहीं समुद्रमथनाच्या वेळीं, क्षीरसागर राग‍ावला, व त्यांतून हालाहल बाहेर पडलें,—त्या सर्वांवर तोड काढून पुढ कष्टत राहिले तेव्हां देवांना अमृत पितां आलें

———

नात्युच्चशिखरो मेरुर्नातिनीचं रसातलम् ।
व्यवसायद्वितीयानां नाप्यपारो महोदधिः ॥ २६ ॥

अनुष्टुभ्

न भूतल अती खोल मेरुहि अति उंच न ।
उद्योगप्रिय लोकांना समुद्रहि अपार न ॥ २६ ॥

गद्यार्थ—

उद्योगप्रिय माणसाना ( असाध्य कांहींच नाहीं )मेरु अति उंच आवाक्याबाहेर नाहीं—रसातळ अति खोल नाहीं, किंवा समुद्र अनुल्लंघ्य नाहीं ।

———

अज्ञोऽपि तज्ज्ञतामेति शनैः शैलोऽपि चूर्ण्यते ।
बाणोऽप्येति महालक्ष्यं पश्याभ्यासविजृंभितम् ॥२७॥

उपजाति

हो अज्ञ ही तज्ज्ञ, परिश्रमानें
चुरा गिरीचाहि घडे प्रयत्नें ॥
विंधी स्वलक्ष्यास अचूक बाण
अभ्यास हा काय करूं शके न ? ॥ २७ ॥

गद्यार्थ—

अभ्यासानें अज्ञहि तज्ज्ञ होतो, डोंगराचा हळूहळू भुगा करतां येतो, सरावानें बाण लक्ष्यवेध करतो,—अभ्यासाचा प्रभाव पहा.

———

अभ्यासभास्वति तपत्यवनौ वने च
वीरस्य सिध्यति न यन्न तदस्ति किञ्चित् ॥
अभ्यासतो भुवि भयान्यभयीभवन्ति
सर्वासु पर्वतगुहास्वपि निर्जनासु ॥ २८ ॥

वसंततिलका

अभ्यासरूप रवि जों तळपे नभांत
वीरा असाध्य लवही न कुठें जगांत ॥
राहील निर्जन गुहांत अशा जनास
अभ्यास हा अभयरूप करी भयास ॥ २८ ॥

गद्यार्थ—

अभ्यासरूपी सूर्य जोंवर जगावर प्रकाशत आहे, तोंवर, वीराला जें साधणार नाहीं, असें कांहींच नाहीं भयाण पर्वत-गुहांत राहणाऱ्यांना, प्रत्यक्ष भयच, अभयरूप करण्याचें कार्य, अभ्यास करीत असतो.

———०———

अर्धं सज्जनसंसर्गादविद्याया विनश्यति ।
चतुर्भागस्तु शास्त्रार्थैश्चतुर्भागः स्वयत्नतः ॥ २९ ॥

अनुष्टुभ्

सज्जनांच्या संगतींन । अज्ञानार्ध बने मृत ॥
चतुर्थांश स्वयत्नांनीं । चौथाई, शास्त्र जाणुनी ॥२९॥

गद्यार्थ—

अज्ञानाचा नाश करण्याचें कार्य विधाकडून होत असतें-अर्धें सुजनसंगतीनें; चौथाई शास्त्राभ्यासानें, व उरलेलें चतुर्थांश स्वप्रयत्नानीं होत असतें.

———०———

पुण्यानि यान्ति वैफल्यं वैफल्यं यान्ति मातरः ।
भाग्यानि यान्ति वैफल्यं नाभ्यासस्तु कदाचन ॥३०॥

अनुष्टुभ्

पुण्येंहि फोलची होती । व्यर्थची मातृभक्ति ती ॥
वैफल्य येइ भाग्यांना । अभ्यासातें कधींच ना ॥३०॥

गद्यार्थ—

( असे प्रसंग येतात, कीं, त्यावेळीं ) पुण्यें निष्फल ठरतात; मातृभक्ति फोल ठरते, भाग्योदय सुद्धां विफल होतात; पण, अभ्यासाला वैफल्य हा शब्दच ठाऊक नाहीं.

———०———

आलस्यं हि मनुष्याणां शरीरस्थो महारिपुः ।
नास्त्युद्यमसमो बन्धुः कुर्वाणो नावसीदति ॥ ३१ ॥

अनुष्टुभ्

देहांतील महाशत्रु, मनुजा आळशीपणा ।
उद्योगासम ना बंधु, जो करी त्या विनाश ना ॥ ३१ ॥

गद्यार्थ—

शरीरांतला आळस हा मनुष्याचा सर्वांत मोठा शत्रु आहे. उद्योगासारखा बंधु नाहीं. कार्य करील त्याला नाश नाहीं.

———०———

आलस्यं यदि न भवेज्जगत्यनर्थः
को न स्याद्बहुधनको बहुश्रुतो वा ? ॥
आलस्यादियमवनिः ससागरान्ता
संपूर्णा नरपशुभिश्च निर्धनैश्च ॥ ३२ ॥

प्रहर्षिणी

आलस्याविण घडता जगीं अनर्थ
विद्वान् वा धनिक न कोण कोण होत ? ॥
आलस्यें जलवलया विशाल भू ही
संपूर्णा नरपशु आणि निर्धनांही ॥ ३२ ॥

गद्यार्थ—

( आळसाची व्यंगार्थानें स्तुति ) अहो या जगांत आळस नसता, तर मोठाच अनर्थ झाला असता. जगांतले कोण विद्वान् व धनिक झाले नसते ? ( पण तसें नाहीं म्हणूनच बरें आहे. ) आळस आहे, म्हणूनच ही समुद्रवलयांकित पृथ्वी नरपशु व निर्धन जन्तूंनीं पुरेपूर भरलेली आहे !

———०———

निद्राप्रियो यः खलु कुम्भकर्णो
हतः समीके स रघूत्तमेन ॥
वैधव्यमापद्यत तस्य कान्ता
श्रोतुं समायाति कथापुराणम् ॥ ३३ ॥

शार्दूलविक्रीडित

निद्रेचा पति कुंभकर्णचि खरा !
त्याची प्रिया ती खरी !
लंकेच्या समरीं रघूत्तम जधीं
त्या राक्षसा संहरी ॥
तेव्हां पासुनि हाय ! हाय ! विधवा
निद्रा जहाल्यावरी
ऐकायास कथापुराणचि सदा
ती येतसे मंदिरीं ॥ ३३ ॥

गद्यार्थ—

निद्रेचा पति कुंभकर्ण, त्याला लंकेच्या युद्धांत रामानें मारिलें त्यामुळें निद्रा विधवा झाली, व तेव्हांपासून ती देवळांत कथापुराण ऐकावयास येत असते. ( म्हणून कथापुराणास बसलेल्या पुष्कळ बायका पेंगत असतात. )

# प्रकरण २१ वें

## मित्र, मैत्री, संगति ( चांगली व वाईट, ) प्रेम, परिचय, संघट्टन.

मित्रं प्रीतिरसायनं नयनयोरानन्दनं चेतसः
पात्रं यत्सुखदुःखयोः सह भवेन्मित्रेण तद्दुर्लभम् ॥
ये चान्ये सुहृदः समृद्धिसमये द्रव्याभिलाषाकुला-
स्ते सर्वत्र मिलन्ति तत्त्वनिकषग्रावा तु तेषां विपत् ॥१॥

शार्दूलविक्रीडित

नेत्रां प्रीतिरसायनापरि, मना आनंद दे मित्र तो
ऐसा दुर्लभ मित्र, दुःख सुख जो मित्रासवें भोगतो ॥
होती मित्र दुजे नरास विभवीं, द्रव्याभिलाषें खरे
ते सर्वत्रचि भेटतात; विपदा त्यांची कसोटी ठरे ॥ १ ॥

गद्यार्थ—

मित्र हा, प्रेमरसांत घोटलेल्या दिव्यौषधीसारखा, नेत्रांना वाटतो, व हृदयाला आनंद देतो. दुःखांत, सुखात दोन्ही स्थितींत मित्रासह राहून तीं भोगणारा मित्र दुर्मिळ. वैभव काळीं, त्याच्या द्रव्याची अभिलाषा धरून चिकटणारे मित्र जगभर सर्वत्र दिसतात पण विपत्ति त्यांची कसोटी ठरते.

———०———

क्षीरेणात्मगतोदकाय हि गुणा दत्ताः पुरा तेऽखिलाः
क्षीरे तापमवेक्ष्य तेन पयसा ह्यात्मा कृशानौ हुतः ॥
गन्तुं पावकमुन्मनस्तदभवद् दृष्ट्वा तु मित्रापदं
युक्तं तेन जलेन शाम्यति; सतां मैत्री पुनस्त्वीदृशी ॥ २ ॥

शार्दूलविक्रीडित

भेटे नीर तयास सर्वच दिले दुग्धें स्वतांचे गुण
दुग्धीं ताप बघूनि तें जल स्वतां अग्नींत घे होमुन ॥
मित्रापत्ति बघूनि दूध उठलें अग्नींत जाण्या त्वरें
भेटोनी जल शांत होइ; सुजनीं मित्रत्व ऐसें खरें ॥ २ ॥

गद्यार्थः—

भेटीस आलेल्या पाण्याला ( मित्रधर्मास अनुसरून ) दुधानें स्वतःचे सर्व गुण दिले ( हें मिश्रण दुधाच्याच भावानें विकूं लागलें ) पुढें हें दूध चुलीवर ठेवल्यावर ( आपल्यासाठीं ) दुधाला ताप लागतो, हें पाहून ( आपण आपलें जाईं म्हणजे त्याचा ताप वांचेल म्हणून ) पाण्यानें स्वतःचें, अग्नींत बलिदान केलें. ( वाफ होऊन तें उडून गेलें. ) आतां ( दूध आटल्यानें ) तें ( जणूं काय आपल्या जलमित्राला अग्नीनें जाळलें तेव्हां आपणहि सहगमन करावें अशा विचारानें ) दूध भराभर वर उसळून अग्नींत जाण्यास निघालें ( उतूं आलें ) तेव्हां ( गृहिणीनें पाण्याचा हबका मारल्यानें ) दुधाला पुन्हां आपला मित्र भेटल्याचा आनंद होऊन तें शांत झालें —सज्जनांची मैत्री अशी असते !

———०———

पापान्निवारयति योजयते हिताय
गुह्यं च गूहति गुणान्प्रकटीकरोति ॥
आपद्गतं न च जहाति, ददाति काले
सन्मित्रलक्षणमिदं प्रवदन्ति सन्तः ॥ ३ ॥

वसंततिलका

पापें निवारुनि सदा हितमार्गि नेतो
गुह्यासि झांकुनि, गुणां उघडें करी तो ॥
सोडी न संकटिं, सुकाळिं सहाय्य देत
सन्मित्रलक्षण असें म्हणतात संत ॥ ३ ॥

गद्यार्थ—

मित्र हा मित्रास पापापासून परावृत्त करून हिताच्या मार्गावर नेतो. गुपित किंवा दुर्गुण झांकून, गुण तेवढे प्रकट करतो, संकटात सोडीत नाहीं, वेळेवर सहाय्य देतो,...थोरांनीं सन्मित्राचें असें लक्षण सांगितलें आहे.

———०———

वाग्वादश्चार्थसम्बन्धः परोक्षे दारभाषणम् ।
यदीच्छेद्विपुलां मैत्रीं त्रीणि तत्र न कारयेत् ॥ ४ ॥

शार्दूलविक्रीडित

पैशांची नित देवघेव करणें, वादंग वा घालणें
या त्याच्या अनुपस्थितींत कांहींही पत्नीसवें बोलणें ॥
मैत्री गाढ असो टिकूनि, असली इच्छा जयाच्या मनीं
मित्राशीं अपुल्या, तयें, न करणें गोष्टी कधीं या तिन्ही ॥ ४ ॥

गद्यार्थ—

गाढमैत्रीच टिकावी असें वाटत असल्यास मित्राशीं पैशाचे व्यवहार करणें, वितंडवाद घालणें, त्याच्या अनुपस्थितींत त्याच्या पत्नीशीं बोलणें, या तिन्ही गोष्टी टाळाव्या

———•———

उपचारः कर्तव्यो यावदनुत्पन्नसौहृदाः पुरुषाः ।
उत्पन्नसौहृदानामुपचारः कैतवं भवति ॥ ५ ॥

आर्या

जोंवरि जडे न मैत्री तोंवरि जावें करीत उपचार ।
जुळतां मैत्री, पुढतीं उपचारचि होति दांभिकाचार ५

गद्यार्थ—

गाढमैत्री जोंवर उत्पन्न झाली नाहीं तोंवर औपचारिक वागणें ठीक आहे पण गाढ स्नेह जमल्यावर मग औपचारिकपणा हा दांभिकपणाच वाटतो

———•———

कलहान्तानि हर्म्याणि कुवाक्यान्तं च सौहृदम् ।
कुराजान्तानि राष्ट्राणि कुकर्मान्तं यशो नृणाम् ॥ ६ ॥

अनुष्टुभ्

कुवाक्यें नासतो स्नेह । कलहें बुडतें गृह ॥
कुराजें नाश राष्ट्राचा । कुकर्मांनीं सुकीर्तिचा ॥ ६ ॥

गद्यार्थ—

कलहामुळें घर बुडत, वाईट बोलण्यानं स्नेह नासतो, वाईट राजामुळें राष्ट्र लयाला जातें, वाईट कर्मांनीं सुकीर्तीचा नाश होतो

———•———

आरम्भगुर्वी क्षयिणी क्रमेण
लघ्वी पुरा वृद्धिमती च पश्चात् ॥
दिनस्य पूर्वार्धपरार्धभिन्ना
छायेव मैत्री खलसज्जनानाम् ॥ ७ ॥

उपजाति

आरंभि मोठी, लघु हो क्रमें ती
लहान आधीं परि थोर अंतीं ॥
छाया सकाळीं नि दुपारिं जैशी
मैत्री खलांची, सुजनांचि तैशी ॥ ७ ॥

गद्यार्थ—

खलाची मैत्री ही सकाळच्या सावलीसारखी असते–सुरवातीस मोठी, पण पुढें लहान होत होत शेवटीं नष्ट होणारी पण सज्जनाची मैत्री दुपारच्या सावलीसारखी, आधीं लहान व पुढें वाढत जाणारी असते

———•———

कराविव शरीरस्य नेत्रयोरिव पक्ष्मणी ।
अप्रोक्तमपि कुर्वन्ति तन्मित्रं, मित्रलक्षणम् ॥ ८ ॥

अनुष्टुभ्

देहकार्य जसे हात, पांपण्या नेत्ररक्षण ।
अनुक्त करिती जे, ते मित्र, तें मित्रलक्षण ॥ ८ ॥

गद्यार्थ—

देहाचें काम जसे हात, डोळ्याचें रक्षण जसें पापण्या, या, न सांगता करतात, तसेंच मित्रकार्य न सांगता करणारा तो मित्र व तसें करणें हें मित्रलक्षण

———•———

संतप्तायसि संस्थितस्य पयसो नामापि न श्रूयते
मुक्ताकारतया तदेव नलिनीपत्रस्थितं राजते ॥
स्वात्यां सागरशुक्तिसंपुटगतं तज्जायते मौक्तिकं
प्रायेणाधममध्यमोत्तमगुणः संसर्गतो जायते ॥ ९ ॥

शार्दूलविक्रीडित

प्रायें उत्तममध्यमाधमपणा ये संगतीच्यामुळें ।
अब्धीशुक्तित गोड मौक्तिक बने पाणीहि स्वातींतलें ।
मोत्यांचेसम तेंच नीर नलिनीपत्रांवरी शोभतें
तापे लोह, तिथे पडे जल तदा त्याचें उरे नांव तें ॥ ९

गद्यार्थ—

( मराठींत अधम मध्यम उत्तम असा क्रम वरवर्ता आल्यानं उलटा क्रम धरला आहे ) तापल्या लोखंडावर पाणी पडलें तर त्याचें क्षणाभरांत नांव सुद्धां उरत नाहीं तेंच कमळाच्या पानांवर पाण्याचें थेंब मोत्याचें ( मुक्तें ) रूप धारण करतात आणि स्वातीनक्षत्रांत तेच थेंब समुद्रांतल्या शिंपल्यांत पडले तर प्रत्यक्ष मोतीच त्यापासून तयार होतें ( असें म्हणतात ) अधम, मध्यम, उत्तम या स्थिति बहुधा संगतीमुळें प्राप्त होतात ( मराठी पद्यांत, दुसऱ्या ओळींत उत्तम तिसरींत मध्यम, व चौथींत अधम संसर्गाचा दाखविल्या आहेत )

———•———

उत्कृष्टमध्यमनिकृष्टजनेषु मैत्री
यद्वच्छिलासु सिकतासु जलेषु रेखा ॥
वैरं क्रमादधममध्यमसज्जनानां
यद्वच्छिलासु सिकतासु जलेषु रेखा ॥ १० ॥

आर्या

उत्तम,मध्यम अधमचि यांची मैत्री जर्धी कुणा घडते।
दगडांवरि वाळूवरि, जलावरी रेघ ती जणूं ठरते ॥
वैरहि अधम, नि मध्यम, उत्तम यांचें अनुक्रमें तैसें-
घोंडे, वाळू, पाणी यांवर रेघेपरीनि होत असे ॥१०॥

गद्यार्थ—

एकाद्याला अनुक्रमें उत्तम मध्यम अधम अशा माणसांची मैत्री घडली तर अनुक्रमें ती दगडावरील रेघेप्रमाणें ( उत्तमांची, चिरस्थायी ) वाळूवरील रेघेप्रमाणें ( मध्यमांची; अल्पकाळ टिकणारी. ) व पाण्यावरील रेघेप्रमाणें ( अधमांची; तत्कालभंगी ) असते. उलट, वैर, जर अधमांशीं, मध्यमांशीं, उत्तमांशीं घडलें, तर तेंहि अनुक्रमें दगडावरील रेघ ( कायमचें ) वाळूंतील रेघ ( अल्पजीवी ) व पाण्यावरील रेघ ( तत्कालभंगी ) ठरतें.

---

मृगा मृगैः सङ्गमनुव्रजन्ति
गावश्च गोभिस्तुरगास्तुरङ्गैः ॥
मूर्खाश्च मूर्खैः सुधियः सुधीभिः
समानशीलव्यसनेषु सख्यम् ॥ ११ ॥

शार्दूलविक्रीडित

पाहोनी हरिणांसि मात्र हरिणें जातीं तयामागुतीं
बैलांशीं बघ बैल; संग धरिती घोडेचि घोड्यांप्रति ॥
मूर्खांशीं नित मूर्ख, सख्य करिती सुज्ञाप्रती सुज्ञ ही
ज्यांचें शील नि आवडी सम, जडे त्यांचीच मैत्री महीं ॥ ११ ॥

गद्यार्थ—

हरिणांशीं हरिण, बैलांशीं बैल, घोड्यांशीं घोडे, मूर्खांशीं मूर्ख, व सुज्ञांशीं सुज्ञ संगत धरीत असतात. समान शील व आवडी-निवडी असतात त्यांचेंच सख्य जमतें.

---

सरलयोः किल सख्यमुदाहृतं
कुटिलयोर्घटनैव कदाचन ॥
यदि भवेत्सरलेन खलेन वा
न चिरमस्ति धनुःशरयोरिव ॥ १२ ॥

रथोद्धता

म्हणति सख्य घडे सरलांमधें
कधि कधीं घडतें कुटिलांमधें ॥
सरल अन् कुटिलांत घडे जधीं
धनुशरांसम अल्प टिके तधीं ॥ १२ ॥

गद्यार्थ—

असा सामान्य नियम, कीं, सरलासरलांत मैत्री घडते. वक्र व वक्र यांचीहि मैत्री कधीं कधीं घडते. पण कधीं जर वक्र व सरल यांची संगत घडलीच, तर, ती धनुष्य व बाण यांच्या सान्निध्याप्रमाणें क्षणभरच टिकते. ( धनुष्य वांकडें व बाण सरळ; धनुष्याला बाण क्षणभरच लागतो, व बाण लगेच त्यास सोडून दूर जातो. )

---

सखे साहजिकः स्नेहो दूरादपि विराजते ।
चकोरीनयनद्वंद्वमानंदयति चंद्रमाः ॥ १३ ॥

अनुष्टुभ्

सहज स्नेह, हे मित्रा, सिद्ध होई दुरूनही ॥
देई मोद नभश्चंद्र चकोरीनयनां महीं ॥ १३ ॥

गद्यार्थ—

मित्रा ! सहज स्नेह हा दुरून सुद्धां दिसून पडतो. आकाशांतला चंद्र पृथ्वीवरच्या चकोरीनेत्रांना आनंद देत नाहीं कां ?

---

व्यतिषजति पदार्थानान्तरः कोऽपि हेतु-
र्न खलु बहिरुपाधीन्प्रीतयः संश्रयन्ते ॥
विकसति हि पतङ्गस्योदये पुण्डरीकं
द्रवति च हिमरश्मावुद्गते चन्द्रकान्तः ॥ १४ ॥

मालिनी

निगडित करि जीवां आंतली ओढ कांहीं
प्रणयहि बहिरंगीं आश्रया घेत नाहीं ॥
उमलवि रवि एका पुंडरीकाचि कां तो ?
विधु उदयिंच कां हो चंद्रकांत द्रवे तो ? ॥ १४ ॥

गद्यार्थ—

कांहीं एक, गूढ, अंतःस्थ, अशी ओढ असते, ती जीवाजीवांना निगडित करते. प्रेम हें बाह्य ( रंगरूपादि ) उपाधीवर अवलंबून नसतें. सूर्य हा एकट्या पुंडरीकालाच कां उमलवितो ? चंद्रोदयाला एक चंद्रकांतच कां द्रवतो ?

---

सौहार्दस्वर्णरेखाणामुच्चनीचत्वदर्शकः ।
परोक्षमिति कोऽप्यस्ति परीक्षानिकषोपलः ॥ १५ ॥

आर्या

मित्रत्वकांचनाचा
उच्च नीच कस परीक्षिण्या दिधला ।
देवानें अद्भुतसा
'परोक्ष' हा निकष खास मनुजाला ॥ १५ ॥

गद्यार्थ—

मित्रत्वरूपी सोन्याचा उच्च नीच कस पाहण्यास 'परोक्ष (दृष्टीआड)' नामक अद्भुत कसोटीचा दगड देवानें उत्पन्न केलेला आहे. (मित्र मित्राच्या पश्चात्, दृष्टीआड, 'परोक्ष' कसा वागतो यावरून त्याची खरी परीक्षा होत असते.)

———०———

महाजनस्य संसर्गः कस्य नोन्नतिकारकः ? ।
पद्मपत्रस्थितं वारि धत्ते मुक्ताफलश्रियम् ॥ १६ ॥

अनुष्टुभ्

थोरांचा संग कोणाला नसे उन्नतिकारक ? ।
पद्मपत्रांवरी पाणी, शोभतें जणुं मौक्तिक ॥ १६ ॥

गद्यार्थ—

मोठ्यांची संगत कोणाला उच्चस्थितीस नेत नाहीं ? कमलाच्या पानावर, वःचत्थित पाणीहि मोत्याचें सौंदर्य धारण करतें.

———०———

क्व सरसि वनखण्डं पङ्कजानां, क्व सूर्यः ?
क्व च कुमुदवनाली कौमुदीबन्धुरिन्दुः ? ॥
चिरपरिचयबद्धा प्रायशः सज्जनानां
न हि विचलति मैत्री दूरतोऽपि स्थितानाम् ॥१७॥

आर्या

कोठें सरोवरांतिल
कमलें अन् सूर्य दूर तो कोठें ? ।
कोठें कुमुदवनें या,
त्यांचा प्रिय चंद्र तो नभीं कोठें ? ॥
चिरपरिचय होउनि जी
अतिदृढ मैत्री घडेचि सुजनांची ।
दूरहि परस्परांहुनि
ते राहुनि कधि ढळे न ती साची ॥ १७ ॥

गद्यार्थ—

सरोवरांतील कमलें कोठें व सूर्य कोठें ? कुमुदवन कोठें त्यांचा प्रिय चंद्र कोठें ? चिरपरिचयानें दृढ झालेली सज्जनांची मैत्री दूर दूर राहिल्यानें बहुधा कमी होत नाहीं.

———०———

कल्पद्रुमः कल्पितमेव सूते
सा कामधुक् कामितमेव दोग्धि ॥
चिन्तामणिश्चिन्तितमेव दत्ते
सतां तु सङ्गः सकलं प्रसूते ॥ १८ ॥

वसंततिलका

दे कल्पवृक्ष नित केवळ कल्पिलें तें
ती कामधेनु मनिं ईप्सित मात्र देते ॥
चिंतामणी वितरि केवळ चिंतिलें तें
सत्संग मात्र वितरी सगळें जनांतें ॥ १८ ॥

गद्यार्थ—

कल्पवृक्ष कल्पावें तेवढेंच देतो. कामधेनु इच्छावें तितकेंच देते; चिन्तामणि चिंतावें तेवढेंच देतो;—सत्संग मात्र सगळेंच देतो.

———०———

असज्जनः सज्जनसंगिसंगात्
करोति दुःसाध्यमपीह साध्यम् ॥
पुष्पाश्रयाच्छम्भुशिरोऽधिरूढा
पिपीलिका चुम्बति चन्द्रबिम्बम् ॥ १९ ॥

उपजाति

क्षुद्रा जधीं सज्जनसंग होतो
दुःसाध्यही साध्य तदा करी तो
पुष्पांचिया संगिं शिवोत्तमांगीं
चढूनि चुंबी शशिबिम्ब मुंगी ॥ १९ ॥

गद्यार्थ—

सज्जनसंगानें क्षुद्रमुद्रा असाध्यहि साध्य करतो. पुष्पसंगतीं मुंगी शंकराचे शिरीं चढून चंद्राचेंहि चुंबन घेते.

———०———

काचः काञ्चनसंसर्गाद्धत्ते मारकतीं द्युतिम् ।
तथा सत्सन्निधानेन मूर्खो याति प्रवीणताम् ॥ २० ॥

अनुष्टुम्

कांचेसि तेज पाचूचें येतसे स्वर्णकोंदणीं।
तैसाचि मूर्खही होई शुद्ध, सत्संग लाभुनी ॥ २० ॥

गद्यार्थ—

सोन्याच्या कोंदणांत हिरवी कांच, पाचूचें तेज धारण करते. सज्जनसंगानें मूर्खहि शुद्ध होतो.

—•—

बन्धनानि किल सन्ति बहूनि
प्रेमरज्जुकृतबन्धनमन्यत् ॥
दारुभेदनिपुणोऽपि षडङ्घ्रि-
र्निष्क्रियो भवति पङ्कजकोषे ॥ २१ ॥

स्वागता

बंधनें कितितरी असुनी रे
प्रेमबन्धन तयांहुनि न्यारें ॥
भृंग काष्ठ जरि पोखरितो, तो
पद्मकोषगत कुंठित होतो ॥ २१ ॥

गद्यार्थ—

बंधनें खरोखर पुष्कळच प्रकारचीं आहेत. पण त्यांत प्रीतिरज्जूचें बंधन कांहीं आगळेंच लांकूड पोखरण्यांत प्रवीण भुंगा कमलकोषांत कुंठित कां होतो?

—•—

सर्वकर्माणि संत्यज्य कुर्यात्सज्जनसंगमम् ।
एतत्कर्म निराबाधं लोकद्वितयसाधनम् ॥ २२ ॥

अनुष्टुम्

कर्मे सर्वहि सोडून, करा सत्संगसेवन ।
निर्बाध कर्म हें एक, त्रैलोक्याचेंच साधन ॥ २२ ॥

गद्यार्थ—

सारीं कर्में सोडून एक सत्संग धरावा हें कर्म एक निर्बाध, इहपरलोकांतलें साध्य देणारें आहे

—•—

खलसख्यं प्राङ्मधुरं, वयोऽन्तराले, निदाघदिनमन्ते ।
एकाऽऽदिमध्यपरिणतिरमणीया साधुजनमैत्री ॥२३॥

आर्या

खलसंग गोड आधीं,
चचल मध्यें, निदाघदिन अतीं ।
आधीं, मध्यें, अतीं,
मधुरचि सर्वत्र साधुसंगति ती ॥ २३ ॥

गद्यार्थ—

सत्संगति हा सुरवातीस गोड, मध्यमार्गी (मानवी वय= आयुष्य=जीवन त्यासारखी) चचल, शेवटीं उन्हाळ्यासारखी (वैराग्य रखरखीत!) साधुसगति आदि मध्य शेवट तिन्ही अवस्थांत रमणीय.

—•—

मा भूत् सज्जनयोगो, यदि योगो मा पुनः स्नेहः ॥
स्नेहो यदि विरहो मा, यदि विरहो जीविताशा का? २४

आर्या

न घडो सज्जनपरिचय,
परिचय होतां नसोत ते स्नेही ।
स्नेही तर विरह नको,
जीवित आशा कुठूनि तद्विरहीं? ॥ २४ ॥

गद्यार्थ—

माझा सज्जनांशीं मुळांत परिचयच न घडो परिचय घडलाच तर निदान स्नेह उत्पन्न न होवो स्नेह झालाच तर मग निदान विरह न घडो—(कारण सत्संग हा जिवाला असा चटका लावणारा आहे, की) त्यांचा विरह घडला, तर जीविताशा कुठून राहणार?

—•—

जाड्यं धियो हरति सिञ्चति वाचि सत्यं
मानोन्नतिं दिशति पापमपाकरोति ॥
चित्तं प्रसादयति दिक्षु तनोति कीर्तिं
सत्सङ्गतिः कथय किं न करोति पुंसाम्? ॥२५॥

वसन्ततिलका

धीमांद्य नष्ट करिते, मुखिं सत्य आणी
मानांत वाढ करिते, अघ तें हरोनी ॥
चित्ता करी मुदित, कीर्ति दिगन्ति नेते
सत्संगती वद न काय करी नरांतें? ॥२५॥

गद्यार्थ—

बुद्धीचें जडत्व नष्ट करते, सत्य बोलण्यास शिकविते, मान वाढविते, पापहरण करते, मन प्रसन्न करते, दशदिशात कीर्ति पसरविते—सत्संगति काय करीत नाहीं? सांगा

———o———

दुर्जनसहवासादपि शीलोत्कर्षं न सज्जनस्त्यजति ।
प्रतिपर्वतपनवासी निःसृतमात्रः शशी शीतः ॥ २६॥

आर्या

दुर्जनसंगहि घडुनी
शीलोत्कर्षा न टाकितो सुजन ।
प्रतिपर्वी रविसंगति,
सुटतांक्षणिं चंद्र शीत, ना उष्ण ॥ २६॥

गद्यार्थ—

दुर्जनसंगत घडली तरी स्वत चें मोठें शील सज्जन सोडीत नाहीं प्रत्येक पर्वाला सूर्याचा संग घडूनहि, तो सपताच, चंद्र पुन्हा आपला शीतल तो शीतलच राहतो

———o———

कीटः सुमनसः सङ्गादारोहति सतां शिरः ।
अश्मापि याति देवत्वं महद्भिः सुप्रतिष्ठितः ॥ २७॥

अनुष्टुभ्

किडा सुमनसंगानें शिरीं थोरांचिया वसे ।
स्थापितां थोर लोकांनीं शिलाही देव होतसे ॥ २७॥

गद्यार्थ—

पुष्पसंगानें किडासुद्धा थोरांच्या शिरावर चढतो थोरमोठ्यांनीं स्थापना केली म्हणजे दगडाचाहि देव होतो (सुमन=पुष्प किंवा थोरमनाचे)

———o———

सत्सगाद्भवति हि साधुता खलानां,
साधूनां न हि खलसङ्गमात्खलत्वम् ॥
आमोदं कुसुमभवं मृदेव धत्ते
मृद्गन्धं न हि कुसुमानि धारयन्ति ॥ २८॥

प्रहर्षिणी

सत्संगें मिळतचि साधुता खलांतें
दुःसंगें कधि न खलत्व सज्जनांतें ॥
पुष्पाचा परिमल मृत्तिकाचि घेई
मातीचा, सुमन न गंध घे कधींही ॥ २८॥

गद्यार्थ—

सत्संगानें खलांना साधुत्व येतें, दुःसंगानें साधूना माः दुष्टत्व येत नाहीं फुलाचा वास मातीला लागतो. पण मातीचा वास फुलांनीं घेतला असें होत नाहीं

———o———

यः स्नातः शीतसितया साधुसंगतिगंगया ।
किं तस्य दानैः किं तीर्थैः किं तपोभिः किमध्वरैः ?॥२९॥

उपजाति

सत्संगगंगाजल शुभ्र शीत
जो त्यांत नाहूनि बनेल पूत ॥
कशासि त्या दान, कशासि तीर्थं
तपांत यज्ञांतहि काय अर्थ ? ॥ २९॥

गद्यार्थ—

सत्संगरूपी स्वच्छ शीतल गंगाजलांत जो स्नान करतो त्याला दान कशाला, तीर्थयात्रा कशाला, तप कशाला आणि यज्ञ तरी कशाला?

———o———

कुलीनैः सह संपर्कं पण्डितैः सह मित्रताम् ।
ज्ञातिभिश्च समं मेलं कुर्वाणो न विनश्यति ॥ ३०॥

अनुष्टुभ्

संघट्टन कुलीनांशीं सुज्ञांशीं स्नेह ठेवितो ।
प्रेम नातलगांसंगें करी त्या ये न नाश तो ॥ ३०॥

गद्यार्थ—

कुलीनांशीं संघट्टन, सुज्ञांशीं मैत्री, बांधवांशीं प्रेम जो ठेवतो त्याचा नाश होत नाहीं

———o———

साधूनां दर्शनं पुण्यं तीर्थभूता हि साधवः ।
कालेन फलते तीर्थं सद्यः साधुसमागमः ॥ ३१॥

अनुष्टुभ्

साधुदर्शन हें पुण्य, तीर्थरूपचि साधु रे ।
फळे तीर्थ उशीरानें सत्संग फळतो त्वरें ॥ ३१॥

गद्यार्थ—

साधुदर्शन हें पुण्यदायी असतें. साधु हे प्रत्यक्ष तीर्थच. (पण त्यांतल्या त्यांत साधुसगच श्रेष्ठ) तीर्थाचें फल कालांतरानें मिळतें; सत्संगाचें तावडतोब!

---

असाधुः साधुर्वा भवति खलु जात्यैव पुरुषो
न सङ्गाद्दौर्जन्यं न च सुजनता कस्यचिदपि ॥
प्ररूढे संसर्गे मणिभुजगयोर्जन्मजनिते
मणिर्नाहेर्दोषान् स्पृशति न हि सर्पो मणिगुणान् ३२

शिखरिणी

असाधू वा साधू अनृत निज जात्या नर असे
न संगें कोणीही सुजन अथवा दुर्जन तसे ॥
जरी जन्मावेरीं भुजग मणि सोडीचि कधिं ना
न सर्पाच्या दोषां मणि, न च फणी घे
मणिगुणां ॥ ३२ ॥

गद्यार्थ—

सौजन्य किंवा दुर्जनता ही जात्याच मनुष्यांत असते. संगतीनें कुणाला दुर्जनता किंवा सुजनता येते असें नाहीं सर्प आणि त्याच्या डोक्यावरचा मणि यांचें संघट्टन तर जन्मापासूनचें आहे ना? पण तरी सर्पाचे दोष त्या मण्याला स्पर्श करीत नाहींत किंवा तो सर्प त्या मण्याचे गुणहि घेत नाहीं

---

दुर्वृत्तिसङ्गतिरनर्थपरम्पराया
हेतुः सतामधिगतं वचनीयमत्र ॥
लंकेश्वरो हरति दाशरथेः कलत्रं
प्राप्नोति बंधमथ दक्षिणसिंधुराजः ॥ ३३ ॥

वसंततिलका

लोकीं अनर्थ बहु दुर्जनसंग आणी
थोरां अकारणहि तो घडवील हानि ॥
त्या रावणें हरियलें परक्या स्त्रियेस
आलें उगाचि बघ बंधन सागरास ॥३३॥

गद्यार्थ—

दुर्जनसंग हा संकटपरंपरा कोसळविणारा आहे, आणि, सज्जनांनाहि त्याची मापूर्वी झळ लागलेली आहे लंकापति रावणानें, परक्या रामाची स्त्री पळविली, पण, त्यापायीं त्या बिचाऱ्या दक्षिण सागराला सेतूचें बंधन प्राप्त झालें!

---

अतिपरिचयादवज्ञा संततगमनादनादरो भवति ।
मलये भिल्लपुरन्ध्री चंदनतरुकाष्ठमिन्धनं कुरुते ॥ ३४ ॥

आर्या

अतिपरिचयें अवज्ञा नित जाण्यानें नुरेचि आदरही।
मलयावरि भिल्ल स्त्री जाळी सर्पण म्हणून चंदनही ३४

गद्यार्थ—

(अति सर्वत्र वर्जयेत्) परिचय सुद्धां अति झाला, की, मान राहात नाहीं सतत जाण्यानें अनादर होऊं लागतो मलय पर्वतावरील भिल्ल स्त्री चंदनच सर्पण म्हणून जाळीत असते

---

प्रेमैव मास्तु, यदि चेत्पथिकेन सार्धं,
तेनापि चेद्गुणवता न समं कदाचित् ॥
तेनापि चेद्भवतु मास्तु कदापि भङ्गो,
भङ्गोऽपि चेद्भवतु वश्यमवश्यमायुः ॥ ३५ ॥

आर्या

प्रेमचि न जडो माझें,
त्यांतुनि न जडो पथांत कोणाशीं।
त्यांतुनि जडेचि तें तर
न जडो गुणवान् अशाचि मनुजाशीं ॥
जडलें प्रेम तशांतहि
तरि तें जावो कधीं न भंगून।
तें भंगे तर राहो मम हें
आयुष्य पूर्ण मदधीन ॥ ३५ ॥

गद्यार्थ—

कोणावरहि माझें प्रेम न जडो, जडलें तर पांथाशीं नको, त्याच्याशीं जडलें तर तो गुणवान् नसो, तो गुणवान् असेल तर तें प्रेम न भंगो तें भंगावयाचें असेल तर माझें आयुष्य तरी माझ्या स्वाधीन असो (म्हणजे प्रेमभंगाचें दुःख सहन करण्यापेक्षां मी निदान आत्महत्या तरी करू शकेन)

---

वृक्षं क्षीणफलं त्यजन्ति विहगाः, शुष्कं सरः सारसा
निर्द्रव्यं पुरुषं त्यजन्ति गणिका, भ्रष्टं नृपं मन्त्रिणः ॥
पुष्पं पर्युषितं त्यजन्ति मधुपा, दग्धं वनान्तं मृगाः
सर्वं कार्यवशाज्जनोऽभिरमते, कस्यास्ति को वल्लभः ? ३६

शार्दूलविक्रीडित

पक्षी निष्फळशा तरूसि, सुकल्या, सोडी तळ्या सारस
मंत्री भ्रष्ट नृपा, त्यजीचि गणिका निर्द्रव्यसा माणुस ॥
टाकी शुष्क फुलास भृंग, मृगही त्या जाळलेल्या वना
स्वार्थाचेस्तव प्रेम, वल्लभ जगीं, आहे कुणी कां कुणा ? ॥ ३६ ॥

गद्यार्थ—

झाडावरचीं फळें सपलीं, कीं, पक्षी उडाले, तळ्याचें पाणी आटलें, कीं, सारस दुसरीकडे, यजमानाजवळचे पैसे सपले, कीं, वेश्या चालली सोडून, पदच्युत झाला, कीं, त्या राजाला मत्री थोडेच धरून राहणार ? मध सपला, कीं, त्या फुलाकडे भृग फिरकतो कशाला ? रानाला आग लागून तें खाक झालें, कीं, हरिण त्याला सोडून जाणारच कोणीहि कामापुरते मामा ! वल्लभ ( नि स्वार्थप्रेमी ) कोण कुणाचा ?

———०———

प्रेम सत्यं तयोरेव ययोर्योगवियोगयोः ।
वत्सरा वासरीयन्ति वत्सरीयन्ति वासराः ॥ ३७ ॥

अनुष्टुभ्

खरें प्रेम जियें संगें वर्षे जाती दिनांपरी ।
दिन वर्षांपरी दीर्घ वियोगें होतसे परी ॥ ३७ ॥

गद्यार्थ—

भेट झाली म्हणने ज्याचीं वर्षे भुर्रकन् दिवसांसारखीं उडून जातात, आणि वियोगामुळें, ज्यांचे दिवस वर्षांसारखे दीर्घ होतात त्यांचेंच प्रेम खरें

अतिपरिचयादवज्ञा सततगमनादनादरो भवति ।
लोकः प्रयागवासी कूपे स्नानं समाचरति ॥ ३८ ॥

आर्या

अतिपरिचयें अवज्ञा, जाण्यानें नित्य आदरहि नुरतो।
वसुनी प्रयाग क्षेत्रीं स्नानें विहिरीवरीचि जन करितो ॥ ३८ ॥

गद्यार्थ—

फाजील ओळख झाली, किंवा, वारवार जाणें येणें झालें, कीं, साधारणत आदर नाहींसा होतो प्रयागात त्रिवेणी सगम असून तेथले लोक घरींच विहिरीवर अंघोळी करतात

———०———

दुर्जनजनसंसर्गात् सज्जनपुरुषोऽपि दोषमायाति ।
रावणकृतापराधाज्जलधेरपि बन्धनं प्राप्तम् ॥ ३९ ॥

आर्या

दुष्टांच्या संसर्गे सुजनासहि दोष चिकटती फार।
अपराध रावणाचा, तेणें अब्धीसि बंध ये थोर ॥३९॥

गद्यार्थ—

दुष्टांच्या संसर्गाने सज्जनाना सुद्धां दोष जडतो रावणानें केला अपराध आणि बंधन आलें समुद्राला !

———०———

विकृतिं नैव गच्छन्ति दुष्टसंगेन साधवः ॥
आवेष्टितो महासर्पैश्चन्दनः किं विषायते ? ॥४०॥

अनुष्टुभ्

दुष्टमैत्रीमुळें साधु कधीं पालटतीच न ।
सर्पांनीं वेढिलेलाही विष कां होइ चंदन ? ॥ ४० ॥

गद्यार्थ—

दुष्टांच्या सगतीनें सज्जन मूळ स्वभाव कांहीं सोडीत नाहींत सर्पांनीं वेढला म्हणून काय चदन विषारी थोडाच होतो !

———०———

# प्रकरण २२ वें

## × × × × × पातु वः



संस्कृत काव्यवाङ्मयांतलें हें एक मोठें चमत्कारिक प्रकरण आहे. बहुधा प्रत्येक नाटकाच्या सुरुवातीस मंगलाचरणाचा म्हणून एक श्लोक असतो, त्याला नांदी असें म्हणतात त्या त्या कवीच्या आराध्य दैवताचें वर्णन त्यांत असतें व असा असा तो अमुक देव, वाचकांचें व प्रेक्षकांचें, तुमचें रक्षण करो (... पातु व ) अशा तऱ्हेनें त्या श्लोकाचा शेवट असतो. बहुतेक नांद्या अर्थाला साधारण क्लिष्टच दिसतात. पण जोंवर त्या त्या आराध्य दैवताचें नुसतें वर्णन त्यांत असतें तोंवर त्यास नांवें ठेवण्याचें कारण नाहीं पण नांदीच्या धर्तीवर अनेक संस्कृत कवींनीं, चमत्कृतीची हौस फेडून घेण्यासाठीं रचना केली, येथपर्यंतहि ठीक आहे; पण, त्याच्याहि पुढें जाऊन त्यांत शृंगारहि घुसडून कित्येक कवींनीं अगदीं कहर केला आहे. यांत देवतांचें निष्कारण विडम्बन होतें हेंहि त्यांनीं लक्षांत घेतलेलें नाहीं. काव्याच्या नांवा-खालीं शिवपार्वतींचा भरपूर शृंगार जिथें कालिदासानेंच वर्णन केला आहे तिथें इतर कवींना काय बोल लावावा ?

शार्दूलविक्रीडित

विष्णोरागमनं निशम्य, सहसा कृत्वा फणींद्रं गुणं
कौपीनं परिधाय चर्म करिणः, शंभुः पुरो धावति ॥
दृष्ट्वा विष्णुरथं सकम्पहृदयः सर्पोऽपतद्भूतले
कृत्तिर्विस्खलिता, ह्रिया नतमुखो नग्नो हरः पातु वः॥१॥

शार्दूलविक्रीडित

येतां विष्णु बघूनि घाईंत उठे; सर्पास दोरी करी
लंगोटी करिचर्म बांधुनि कटीं, धांवे पुढें सत्वरीं ॥
पाहोनी गरुडा, भुजंग भिउनी खालीं गळे भूवर
लंगोटी फिटुनी सलज्ज नत तो रक्षो तुम्हां शंकर ॥१॥

हेंच सवृत्तांत—

पेकोनी " विष्णु येई " शिव लगबगुनी
सर्प दोरी करी तो
लंगोटी हस्तिचर्मा, धरुनि कटिस, तत्—
स्वागता धांव घेतो ॥
विष्णूचा पाहुनी तो गरुड, भयभरें
सर्प खालीं गळाला
नग्नत्वें लाजला तो शिव अविल जनां—
च्या करो रक्षणाला ॥ १ ॥

गद्यार्थ—

( शंकर नेहमीं नग्न असतो हें प्रसिद्धच आहे ) "विष्णु भेटण्यास येत आहे" असें ऐकून शंकर घाईंत उठला व गळ्यांतल्या नागाचा करगोटा करून, हत्तीच्या चर्माचीच लंगोटी बांधून ( विष्णूच्या स्वागताला ) धावला. पण विष्णूचा रथ जो गरुड ( हा सर्पांचा शत्रूच ) त्याला पाहून भयभीत होऊन सर्प भूमीवर गळून पडला, व कातड्याची ती लंगोटीहि फिटली. या परिस्थितीमुळें लाजून खालीं तोंड केलेला तो नग्न शंकर तुमचे रक्षण करो !

———०———

शार्दूलविक्रीडित

"स्वेदस्ते कथमीदृशः प्रियतमे?" "त्वन्नेत्रवह्नेर्विभो !"
"कस्माद्वेपितमेतदिन्दुवदने ?" "भोगीन्द्रभीतेस्तव" ॥
"रोमाञ्चः कथमेष देवि ?" "भगवन्! गंगाम्भसः
सीकरैः"-
रित्थं भर्तरि भावगोपनपरा गौरी चिरं पातु वः॥ २ ॥

शार्दूलविक्रीडित

"कां गे घाम तुला प्रिये ? " " प्रभु ! तुझ्या
नेत्रांतल्या अग्निनें "
"कां हा कंप तनूस ? इंदुवदने ? "
" सर्पांचिया भीतिनें ॥"
"कां रोमांच असा ? " "प्रभो ! शिरशिरी
गंगाजळें आणिती "
झांकी प्रेम असें शिवाकडुनि, ती
रक्षो तुम्हां पार्वती ! ॥ २ ॥

गद्यार्थ—

( शिवाच्या सान्निध्यांत, पार्वतीला शृंगाराची ओढ लागली. पण, तें कबूल करण्याची लाज वाटली त्यावेळचा संवाद ) शंकर विचारतो, "प्रिये ! तुला असा घाम का ! " पार्वती उत्तरते- "तुझ्या नेत्रांतल्या अग्नीच्या धगीनें." शंकर—" हे चन्द्रवदने अंगाला हा कंप का बरें ! " पार्वती—"तुझ्या गळ्यातल्या सर्पांच्या भयानें !" शंकर—"देवि अंगावर हे रोमांच कां ?"

पार्वती–"तुझ्या डोक्यावरील गंगेच्या गार तुषारांनीं उत्पन्न केलेली ही थंडीची शिरशिरी आहे ( रोमांच नव्हे )" अशा रीतीनें आपला खरा भाव शंकरापासून लपवून ठेवणारी ती पार्वती तुमचें चिरकाल रक्षण करो

———

शार्दूलविक्रीडित

आलोलामलकावलीं विलुलितां बिभ्रच्चलत्कुण्डलं
किञ्चिन्मृष्टविशेषकं तनुतरैः स्वेदाम्भसः शीकरैः ॥
तन्व्या यत्सुरतान्तशान्तनयनं वक्त्रं रतिव्यत्यये
तत्त्वां पातु चिराय किं हरिहरस्कंदादिभिर्देवतैः ? ॥३॥

शार्दूलविक्रीडित

झाले कोमल केस सैल; डुलतीं कानांतलीं कुंडलें
झाला म्लान विलोल कोमलपणा स्वेदांबुबिंदूमुळें ॥
थांबोनी रत, तृप्त नेत्र मिटतां जे शोभतें आनन
तें रक्षो रसिकां! वृथा हरिहरस्कंदां नको प्रार्थन ॥ ३॥

गद्यार्थ—

कोमल कोमल केश सैल झालेले आहेत, कानांतलीं कुंडलें डुलताहेत, स्वेदबिंदूंनीं ज्यांचा थोडासा कोमलपणा म्लान झालेला आहे, सुरतसमाप्तिनंतर (तृप्तीनें) ज्या मुखावरचे नेत्र मिटले आहेत असें तें प्रियेचें मुख तुह्मं ( साक्षात् रतिकांचें ) चिरकाल रक्षण करो। विष्णु शंकर कार्तिकस्वामी असलीं दैवतें हवीं आहेत कशाला ?

———

स्रग्धरा

उत्तिष्ठन्त्या रतान्ते भरमुरगपतौ पाणिनैकेन कृत्वा
धृत्वा चान्येन वासो विगलितकबरी भारमंसे वहन्त्याः॥
भूयस्तत्कालकान्तिद्विगुणितसुरतप्रीतिना शौरिणा वः
शय्यामालिंग्य नीतं वपुरलसलसद्बाहु लक्ष्म्याः
पुनातु ॥ ४ ॥

स्रग्धरा

शेषीं, लक्ष्मी, रतातें
उरकुनि उठतां एक टेकूनि हात
वेणी स्कंधीं गळे ती
निजवसनसवें अन्य हस्तें धरीत ॥
पाहोनी कांति देही,
द्विगुणित वनतां काम, नेलें जियेला
शय्येप्रती पलंगीं, वपु ढकलुनि,
कमला तीच रक्षो तुम्हांला ॥ ४ ॥

गद्यार्थ—

सुरत संपल्यानंतर, एक हात शेषावर टेकून, व दुसऱ्या हातानें वस्त्र व गळलेली वेणी खांद्यावर सांवरून लक्ष्मी उठूं पहाते, तों, हें तिचें लावण्यचें स्वरूप पाहून, काम द्विगुणित झाल्यामुळें, विष्णूनें जिला पुनश्च कवळून शय्येवर नेलें अशा त्या लक्ष्मीचें बाहु थकून गेलेलें शरीर तुम्हांस पावन करो।

———

स्रग्धरा

कस्तूरीयन्ति भाले, तदनु नयनयोः कज्जलीयन्ति,कर्ण-
प्रान्ते नीलोत्पलीयन्त्युरसि मरकतालंकृतीयन्ति देव्याः॥
रोमालीयन्ति नाभेरुपरि हरिमणीमेखलीयन्ति मध्ये
कल्याणं कुर्युरेते त्रिजगति पुरभि—
त्कण्ठभासां विलासाः ॥ ५ ॥

स्रग्धरा

कस्तूरीभास भाळीं,
घडविति, नयनीं कज्जलीभास, कर्णा
शोभा नीलोत्पलांची,
उरजिं गिरिसुताभूषणें पांचुवाणी ॥
रोमाली नाभिदेशीं,
जघनिं हरिमणीमेखलेचाच भास
व्हावे कल्याणकारी
त्रिजगतिं पुरभित्कण्ठतेजोविलास ॥ ५ ॥

गद्यार्थ—

( शिवकण्ठाची काळसर निळसर हिरवट छाया पार्वतीच्या देहावर पडून काय काय भास उत्पन्न करते, तें वर्णन ) ही काळी छाया पार्वतीच्या कपाळीं जणूं कस्तुरीचा आभास उत्पन्न करते; नेत्रांत काजळ घातल्यासारखें दाखविते, कानांवर नील कमळें ठेवल्याचा आभास करते, हृदयावर पाचूचे अलंकारांचा भास, नाभीचे वर रोमालीचा भास व कंबरेभोवतीं पाचूच्या रत्नमेखलेचा भास करते, असे शंकरकण्ठच्छायाविलास त्रिजगाचें कल्याण करोत.

———

मालिनी

स्फटिकमरकतश्रीहारिणोः प्रीतियोगात्
तदवतु वपुरेकं कामकंसद्विपोर्वः ॥
भवति गिरिसुतायाः सार्धमम्भोधिपुत्र्या
सदहमहसि कण्ठे यत्र सीमाविवादः ॥ ६ ॥

आर्या

मन्मथकंसरिपूंच्या
    एकत्रित तनु करोत जगद्वन ।
स्फटिक नि मरकत शोभा
    प्रत्यर्धीं, परि गळ्यांत नीलघन ॥
" तव कुठवर?" " मम कुठवर?"
    हा न दिसे जधिं गळ्यामधें भेद ।
प्रेमें सीमेविपर्यी
    उमा नि लक्ष्मींत होय जिथ वाद ! ॥ ६ ॥

गद्यार्थ—

( भक्तांतल्या शैव वैष्णव या मारामाऱ्या टाळण्यासाठीं शंकर व विष्णु यांनीं एक देह धारण करून 'हरिहर' हें नांव धारण केलें. पण त्यामुळें एक फार मोठें सीमारेषेचें भांडण सुरूं झालें । ) शंकराचा देह स्फटिकशुभ्र व विष्णूचा घननीळ. त्यामुळें गळ्यापर्यंत दोन्ही देहांचा अर्धा अर्धा भाग निरनिराळ्या रंगाचा असल्यानें त्यांच्या सीमारेषा स्पष्ट दिसून पडत. पण कंठामध्यें शिव नीलकंठ व विष्णूहि घननील असल्यानें कंठाचा सर्वच रंग सारखा नील झाल्यामुळें शंकराचा अर्धा कंठ कोणता व विष्णूचा अर्धा कंठ कोणता हें त्या उभयतांच्या अर्धांगी असलेल्या पार्वती व लक्ष्मी यांना न दिसल्यामुळें, सीमारेषेबाबत त्यांच्यांत प्रेमकलह जेथें होत राहतो. अशा त्या कामरिपु शंकर व कंसरिपु विष्णु यांच्या एकत्रित तनु जगाचें रक्षण करोत ।

—•—

शार्दूलविक्रीडित

"मातस्तर्णकरक्षणाय यमुनाकच्छं न गच्छाम्यहं"
"कस्माद्वत्स?" "पिनष्टि पीवरकुचद्वंद्वेन गोपीजनः" ॥
भ्रूसंज्ञाविनिवारितोऽपि बहुशो जल्पन्यशोदामतो
गोपीपाणिसरोजमुद्रितमुखो गोपीपतिः पातु वः ॥७॥

शार्दूलविक्रीडित

"आई मी यमुनेस गाइ वळण्या जाणार नाहीं कदा!"
" कां बाळा ? " " मज गोपिका चिरडती
    पुष्टस्तनांनीं सदा ! "
भ्रूसंज्ञें बहु वारितांहि गुपितें सांगे यशोदेप्रति
गोपी यन्मुख दाबिती, जगत तो रक्षोच गोपीपति!७॥

गद्यार्थ—

( बालकृष्ण आई यशोदेकडे तक्रार आणितो ) "आई ! मी यापुढें यमुनेकांठीं वासरें राखणीला जाणार नाहीं जा ! तेव्हां यशोदा विचारते "कां बरें बाळा ?" कृष्ण उत्तर करतो– "अग ! या गोपी आपल्या पुष्ट स्तनांनीं मला चिरडून टाकतात !" ( आपलें हें गुपित त्यानें यशोदेस न सांगावें म्हणून ) भुवयांनीं खुणा करून गोपींनीं त्याला किती दटावलें तरी त्यांच्या कागाळ्या हा यशोदेपाशीं करीतच राहिला. तेव्हां ज्याचें मुख गोपींनीं आपल्या करकमलांनीं दाबून धरलें असा तो गोपीपति बालकृष्ण तुमचें रक्षण करो ।

—•—

शार्दूलविक्रीडित

"अम्ब ! श्राम्यसि, तिष्ठ; गोरसमहं मथ्नामि;" मन्थानकं
आलम्ब्य स्थितमीश्वरं सरभसं दीनाननो वासुकिः ॥
सासूयं कमलालया, सुरगणाः सानन्दमुद्यद्भयं
राहुः प्रैक्षत यं स वोऽस्तु
    शिवदो गोपालबालो हरिः ॥ ८ ॥

शार्दूलविक्रीडित

" आई ! तूं दमलीस ! मी घुसळितों
    तें ताक" हें बोलुन
घेतां कृष्ण रवीसि, वासुकि बघे
    होऊनि दीनानन
मात्सर्यें कमला, समोद सुर हे,
    राहू भयें पाहतो
होवो गोप हरी शिवप्रद तुम्हां
    बालस्वरूपांत तो ॥ ८ ॥

गद्यार्थ—

"आई यशोदाबाई ! तूं दमलीस, थांब, मी तें ताक घुसळतों." असें म्हणून बालकृष्णानें रवी हातांत घेतांच ( समुद्रमंथनाचा प्रसंग डोळ्यांपुढें उभा राहून ) वासुकि सर्प ( याचीच समुद्र मंथनाचे वेळीं दोरी केलेली होती तेव्हांप्रमाणें पुन्हां आतां आपलें कांडात काडलें जाणार या ) भयानें दीनवाणा होऊन कृष्णाकडे पाहूं लागला; ( समुद्रमंथनातल्या प्रमाणें या मंथनांतून आणखी एक लक्ष्मी बाहेर पडते कीं काय या कल्पनेनें ) लक्ष्मी मत्सरानें पाहूं लागली. ( पुन्हां अमृत मिळणार या कल्पनेनें ) देव आनंदानें पाहूं लागले व ( त्या वेळेस आपलें धड तोडलें गेलें, आतां आणखी काय होणार या ) भयानें राहु त्याच्याकडे पाहूं लागला असा तो बालगोपाल हरि तुम्हांस कल्याणदायी होवो.

—•—

शार्दूलविक्रीडित

यन्नाम्नः प्रथमाक्षरं विजयते भानौ, द्वितीयाक्षरं
नृत्यं नृत्यति सत्कवीन्द्रवदने भूत्वान्त्यवर्णद्वयम् ॥
रामो रावणमाजघान समरे, शम्भोः शिरःशालिनी
सा सर्वाक्षरमालिनी भवतु मे
भाग्याय भागीरथी ॥ ९ ॥

आर्या

यन्नामप्रथमाक्षर
शोभे भानूंत, अक्षरहि दुसरें ।
नाचे कवीन्द्रवदनीं;
होउनि वर्णद्वयापरी तिसरे ॥—
रामें रावण वधिला
समरीं; शंकरशिरस्थ भूषण तें ।
चतुराक्षर मिळुनी ती
देवो भागीरथी विभव मातें ॥ ९ ॥

गद्यार्थ—

जिच्या नांवाचें पहिलें अक्षर ( भा= तेज ) भानूत शोभतें दुसरें अक्षर ( गिर्, गी= वाणी, शब्द ) महाकवींच्या मुखांत नृत्य करतें, आणि शेवटल्या दोन अक्षरांप्रमाणें ( रथी=रथांत बसलेला ) होऊन रामानें रावणाचा युद्धांत वध केला, जी स्वत शंकराच्या मस्तकी राहते अशी तीं चारही अक्षरें मिळून होणारी भागीरथी माता भाग्योदय करो.

———०———

आर्या

युगपत्स्वगण्डचुम्बनलोलौ पितरौ निरीक्ष्य हेरम्बः ।
तन्मुखमेलनकुतुकी स्वाननमपनीय
परिहसन् पायात् ॥ १० ॥

आर्या

चुंबाया स्वमुखा जधीं हुरळले दोघेहि एक क्षणीं
पाहोनी शिवपार्वती; गणपती थट्टा मनीं योजुनी ॥
होतां दूर क्षणीं परस्पर घडे मातापिताचुंबन
तें पाहून हंसे, असा गणपती रक्षो जगालागुन ॥१०॥

शार्दूलविक्रीडित

गणपतीच्या गालाचें चुंबन घेण्याची इच्छा एकाच क्षणीं शिव व पार्वती दोघांना झालेली आहे हें गणपतीच्या ध्यानीं आलें ( बुद्धिमानच तो ) तेव्हां त्या उभयतांचेंच परस्पर चुंबन घडवून आणावें, असें योजून, ते दोघे दोन्हीकडून चुंबन घेण एवढ्यात ज्या गणपतीनें आपलें मुख मागें चोरून ( घेता शिवपार्वतीचें परस्पर चुंबन घडलें तें पाहून ) विनोदानें व हंसला तो तुमचें रक्षण करो ।

———०———

मालिनी

कुसुमशरविलासे भङ्गुरत्वाद्रिपुत्री-
करतलवलयस्य क्ष्मागतस्यार्धमेकम् ॥
निजमिव शशिखण्डं याचमानस्य शम्भो-
र्भवतु सह विवादः कान्तया कौतुकाय ॥ ११ ॥

आर्या

रतिरंग खेळतांना,
हिसक्यानें पार्वतीकरांतून ।
वलयाधखंड गळला
भूवर, त्या चंद्रखंड समजून ॥
मागे शिव तिजपाशीं,
'वलय' म्हणे ती; नि 'चंद्र' हा म्हणतो
चाले वाद असा जो,
रंजक वाटो उभ्या जगाला तो ॥ ११ ॥

गद्यार्थ—

सुरतप्रसंगीं गडबडीत, पार्वतीच्या हातांतल कंकण अ तुटून भुईवर पडलं तें ( अर्धवट अंधारांत ) आपला चंद्रखं असा भास शंकराला होऊन त्यानें तें पार्वतीपाशीं मागतां, म्हणते हें वलय, व तो म्हणे हा चंद्रखंड असा जो वादविवा झाला तो सर्व जगाला कौतुकास्पद वाटो

———०———

अनुष्टुभ्

हृदयं कौस्तुभोद्भासि हरेः पुष्णातु नः श्रियम् ।
राधाप्रवेशरोधाय दत्तमुद्रमिव श्रिया ॥ १२ ॥

आर्या

श्री देवो, विष्णूचें
कौस्तुभ—शोभित असें हृदय मातें ।
राधा न शिरो म्हणुनी
श्री जणुं मुद्रांक कौस्तुभें करिते ॥ १२ ॥

गद्यार्थ—

राधा ( आपली सवत ) विष्णूच्या हृदयांत शिरूं नये म्हणून क्मीनें, जणूं, कौस्तुभरूपी मुद्राच ज्या हृदयावर केली आहे ।शा, त्या कौस्तुभ रत्नानें शोभणारें विष्णूचें हृदय, आम्हांस, ।ी म्हणजे वैभव देवो.

आर्या

ततिविपुलं कुचयुगलं रहसि करैरामृशन्मुहुर्लक्ष्म्याः ।
ादपहृतं निजहृदयं जयतु हरिर्मृगयमाण इव ॥ १३ ॥

आर्या

जय पावो तो हरि, जो,
फिरवी कर बहुतवार एकांतीं ।
स्वहृदय तद्हृत, शोधित,
लक्ष्मीच्या पुष्टशा कुचांवरतीं ॥ १३ ॥

द्यार्थ—

लक्ष्मीनें हरण केलेलें स्वतःचें हृदय शोधण्यासाठींच जणूं ।य, जो आपला हात लक्ष्मीच्या पुष्ट अशा स्तनावरून एकांतात निकवार फिरवितो तो श्रीहरि विजयी होवो.

शार्दूलविक्रीडित

सव्रीडा दयिताननें, सकरुणा मातङ्गचर्माम्बरे
सत्रासा भुजगे सविस्मयरसा चन्द्रेऽमृतस्यन्दिनि ॥
ईर्ष्या जह्नुसुतावलोकनविधौ, दीना कपालोदरे
पार्वत्या नवसङ्गमप्रणयिनी दृष्टिः शिवायास्तु वः ॥१४

शार्दूलविक्रीडित

ी लाजूनि शिवानना, सकरुणा त्या हस्तिचर्माप्रत
ीतीनें भुजगा, सुधास्रव बघे चंद्राकडे विस्मित ॥
गेला बघते समत्सर, उमा, दीना कपालोदरीं
यो श्री नवसंगमप्रणयिनी दृष्टी तिची शंकरीं ॥१४॥

द्यार्थ—

पार्वतीशंकरांच्या प्रथममीलनसमयीं, विविधरूपें धारण केलेली ी पार्वतीची दृष्टि, तुमचें कल्याण करो ! शिवमुखास तिनें ाजून पाहिलें. हत्तीचें कातडें पाहतां तिची दृष्टि सकरुण झाली र्पास पाहतां सभय झाली. अमृत स्रवणाऱ्या चंद्रास पाहतां स्मयपूर्ण झाली, गंगेला पाहतांना ( ती सवत म्हणून ) ामत्सर झाली. व भिक्षेची कवटी पाहतां दीन झाली !

शार्दूलविक्रीडित

"हे हेरम्ब !" "किमम्ब ?" "रोदिषि कथं ?"
"कर्णौ लुठत्यग्निभूः"
"किं ते स्कन्द ! विचेष्टितं ?" "मम पुरा
संख्या कृता चक्षुषाम्" ॥
"नैतत्तेऽप्युचितं गजास्य! चरितं"
"नासां मिमीतेऽम्ब मे"
तावेवं सहसा विलोक्य हसित—
व्यग्रा शिवा पातु वः ॥ १५ ॥

शार्दूलविक्रीडित

"हेरम्बा ! रडसी कशास ?" "उपटी
मत्कर्ण गे स्कंद हा !"
"कां रे स्कंद ! असें ?" "तयेंच गणिले
मन्नेत्र आधीं पहा ॥"
"हें ना योग्य तुला गणेश !" "मम हा
ही सोंड मापी, उमा !"
दोघां यापरि जी हंसूनि बघते,
रक्षो शिवा ती तुम्हां ॥ १५ ॥

गद्यार्थ—

( शिवाच्या मुलांत भांडण होऊन गणपति रडूं लागला तेव्हां पार्वती विचारते-) "कां रे हेरंबा रडतोस ?" तो उत्तरतो-"हा स्कंद माझे कान उपटतो ग !" पार्वती मग स्कंदास विचारते- "कां रे असें करतोस स्कंदा ?" स्कंद म्हणतो-"हा माझे डोळे मोजतो ग." ( स्कंद=षडानन=सहा तोंडांचा ) मग पार्वती पुन्हां गणपतीला बजावते "गणेश तुला हें शोभत नाहीं हं" गणेश म्हणतो, "हा माझी सोंड मापतो ग आई" ( असें कधीं न संपणारें भांडण ऐकून ) त्या दोघांकडे पाहून हंसण्यांत गर्क झालेली पार्वती तुमचें रक्षण करो

वसंततिलका

राधा पुनातु जगदच्युतदत्तचित्ता
मन्थानमाकलयती दधिरिक्तपात्रे ॥
यस्याः स्तनस्तबकचुञ्चुकलोलदृष्टि—
र्देवोऽपि दोहनधिया वृषभं दुदोह ॥ १६ ॥

सुमंदारमाला

" वदे कोण तूं ? " " मीच शूली " " पुढें वैद्य
तू शोध " " मी नीलकण्ठ, प्रिये " ॥
" करी एक केका " " पशूंचा पती मी "
" तुझें शृंग कैसें न दृष्टीस ये ? " ॥
" असें स्थाणु मुग्धे " " वदे वृक्ष ना " " मी
शिवेचाच जीवेश " " जा तूं वनीं " ॥
तुम्हां ईश रक्षोचि तो, मूक केलें
जया पार्वतीनें असें बोलुनी ॥ १९ ॥

गद्यार्थ—

(शंकर घरीं आला तेव्हां पार्वती दार न उघडतां विचारते-) "कोण रे तूं ?" शंकर म्हणतो "मी तो शूली;" पार्वती—"मग तुला कपाळशूळ आहे तर वैद्य शोध." शंकर—"प्रिये मी नीलकंठ आहें ! " पार्वती-"नीलकंठ म्हणजे मोर होय तूं ! मग एक केकारव काढ बघूं." शंकर म्हणतो "तसें नव्हे, मी पशुपति." पार्वती—"मग तुला शिंगें दिसत नाहींत तीं ! " शंकर—"अग मुग्धे मी स्थाणु ! " पार्वती—"स्थाणु म्हणजे झाड तूं ! ण झाड तर कधीं बोलत नाहीं !" शंकर—"मी शिवेचा णनाथ !" पार्वती—"अस्सं ? तूं शिवेश म्हणजे कोल्हीचा णनाथ म्हणजे कोल्हा होय तूं ! मग इथें कशाला ? रानांत जा." अशा तऱ्हेनें ( प्रत्येक शब्दाचा दुसराच अर्थ घेऊन जाणून बुजून पेडगांवला गेलेल्या ) पार्वतीनें ज्या शंकराला निरुत्तर करून टाकलें तो तुमचें रक्षण करो !

उपजाति

क तिष्ठतस्ते पितरौ ममेवेत्यपर्णयोक्ते परिहासपूर्वम् ॥
क वा ममेव श्वशुरौ तवेति तामीरयन्सस्मितमीश्वरोऽव्यात् ॥ २० ॥

वसंततिलका

" मातापिता मज, तसे तुज सांग कोठें ? "
थट्टेंत पार्वति पुसे जधिं शंकरातें ॥
" कोठें तुला श्वशुर मत्सम ? " जो तियेतें
बोले असा शिव करो जगरक्षणातें ॥ २० ॥

गद्यार्थ—

( शंकर हा स्वयंभू ! त्याला आई नाहीं, बाप नाहीं, यावरून त्याला खिजवण्याची पार्वतीला लहर आली. ) पार्वती थट्टेंत शंकराला विचारते "माझ्या सारखे आई वडील तुला कुठें आहेत ? ( म्हणजे एवढ्या बाबतींत तरी तुला माझ्यापेक्षां कमीपणा खासच आहे ! ) या प्रश्नाला ज्या शंकरानें, हंसत हंसत, प्रतिप्रश्नानेंच उत्तर दिलें- "पण मग माझ्यासारखे सासूसासरे तरी तुला कोठें आहेत ? " तो जगाचें रक्षण करो !

## प्रकरण २३ वें

सृष्टिसौंदर्य ( प्रथम १३ श्लोक कुमारसंभवांतील हिमालयवर्णन. ) पुढें संकीर्ण वर्णनात्मक.

उपजाति

अस्त्युत्तरस्यां दिशि देवतात्मा
हिमालयो नाम नगाधिराजः ।
पूर्वापरौ तोयनिधी वगाह्य
स्थितः पृथिव्या इव मानदण्डः ॥ १ ॥

शार्दूलविक्रीडित

ाहे उत्तर या दिशेस—जणुं कीं आत्माच देवांप्रति
ोकीं नाम जया हिमालय, असे, जो पर्वतांचा पति ॥
ोन्ही अब्धित (पूर्व पश्चिम अशा) नाहोनि जो राहिला
थ्वीचें जणुं मोजमाप करण्या दंडापरी ठाकला ॥१॥

गद्यार्थ—

देवांचा जणूं काय आत्माच असा, पर्वतराज, ज्याला हिमालय म्हणतात, तो, उत्तर दिशेस आहे. पूर्व पश्चिम दोन्ही समुद्रांत नाहात राहून (तेथपर्यंत स्वतःला विस्तारून) जो जणूं काय पृथ्वीची लांबी रुंदी मोजण्याचा मानदंड (फूटपट्टी) असा उभा आहे.

उपजाति

अनन्तरत्नप्रभवस्य यस्य
हिमं न सौभाग्यविलोपि जातम् ।
एको हि दोषो गुणसन्निपाते
निमज्जतीन्दोः किरणेष्विवाङ्कः ॥ २ ॥

शार्दूलविक्रीडित

रत्नें थोर अनंत नित्य निघतीं जेथील भूमींतुनी
त्याची सुंदरता कधीं न हिमही टाकूं शके लोपुनी ॥
एखादा लय दोष लोपत असे मोठ्या गुणांभीतरीं
चंद्राच्या धवलप्रकाशिं लपल्या त्याच्या कलंकापरी २

गद्यार्थ—

ज्या हिमालयाच्या भूमींतून अनंत रत्नें जन्माला येतात त्याची शोभा हिमामुळें कांहीं कमी होत नाहीं कारण एखादा दोष हा गुणसमुदायामध्यें, चंद्राच्या किरणांत जसा त्याच्या वरील डाग,–बुडून जातो.

———•———

इंद्रवज्रा

आमेखलं संचरतां घनानां
छायामधः सानुगतां निषेव्य ।
उद्वेजिता वृष्टिभिराश्रयन्ते
शृंगाणि यस्यातपवन्ति सिद्धाः ॥ ३ ॥

शार्दूलविक्रीडित

हत्ती मारुनि, सिंह रक्तभरल्या पायीं जधीं संचरे
वाहोनी हिम तेथ तीं न दिसतीं व्याधां जरी पाउ
पजांतून फुटें फुटें गळति जे वाटेमधें मौक्तिक
सिंहाचा पथ तेच दाविति तिथें व्याधांस आकस्मि

गद्यार्थ—

हिमालयामध्यें, जेव्हां हत्तींना मारून, सिंह रक्तभर पायीं संचार करतो, तेथें हिमप्रवाह वाहून, ते रक्ताचे असलेलीं सिंहाचीं पदचिन्हें नाहींशीं होऊन, सिंहाच्या माग असलेल्या शिकाऱ्यांना, यामुळें तो जरी न सांपडला, सिंहाच्या नखाच्या फटींतून (हत्तीच्या गंडस्थळांतील) मो जे ठिकठिकाणीं गळलेले असतात, त्यावरून सिंहाचा आकस्मिकपणें सांपडतो

———•———

उपजाति

यः पूरयन्कीचकरन्ध्रभागान्
दरीमुखोत्थेन समीरणेन ।

शार्दूलविक्रीडित

गालींचा निजकंडु शांत करण्या हत्ती जिथें रानटी
आवेगें सरलद्रुमांस अपुल्या गालां जधीं घांसती।
वाहे चीक दुधासमान; निघतो जो गंध त्याच्यांतुनी
शृंगें भोंवतिचीं सुगंधित करी सर्वत्र फैलाउनी ॥६॥

गद्यार्थ—

ज्या हिमालयावर (रानटी) हत्ती आपल्या गालांची कंड शमविण्यासाठीं तेथील सरल (देवदार) वृक्षांवर आपले गाल घांसतात; त्यामुळें त्या देवदारांतून चीक वाहून जो सुगंध निघतो, तो आजूबाजूंच्या शिखरांना सुगंधित करतो.

---

उपेन्द्रवज्रा

वनेचराणां वनितासखानां
दरीगृहोत्संगनिषिक्तभासः ।
भवन्ति यत्रौषधयो रजन्या-
मतैलपूराः सुरतप्रदीपाः ॥ ७ ॥

शार्दूलविक्रीडित

जेथें वन्य नर, प्रियांसह दरीरूपी गृहीं राहती
तेजानें भरुनी गृहांतर निशीं दिव्यौषधी टाकिती।
रात्रीं तीं युगलें जधीं निजरतिक्रीडेस आरंभिती
तेव्हां तैलविहीन दीपचि तयां त्या औषधी भासती७

गद्यार्थ—

त्या हिमालयामध्यें, दरींतच आपलीं घरें करणाऱ्या वन्य मानवांच्या गृहांतून, आजूबाजूस उगवलेल्या प्रकाश देणाऱ्या दिव्यौषधि, आपलीं किरणें पसरतात, आणि त्यामुळें त्या वन्य युगलांना रतिक्रीडेच्या प्रसंगीं तेलाशिवाय प्रकाश देणाऱ्या दिव्यासारखा उपयोग त्या औषधींचा होतो.

---

उपजाति

उद्वेजयत्यङ्गुलिपार्ष्णिभागान्
मार्गे शिलीभूतहिमेऽपि यत्र ।
न दुर्वहश्रोणिपयोधरार्ता
भिन्दन्ति मन्दां गतिमश्वमुख्यः ॥ ८ ॥

शार्दूलविक्रीडित

गोठोनी हिम तें शिलाचि बनलें, मार्गीं अशा, किन्नरी
थंडीनें बनल्या बधीर जरि त्या टांचा तथा अंगुली॥
सोडोनी गति मंद मूळ अपुली जातीच ना सत्वर;
श्रोणीभार तसाचि दुर्वह तयां पुष्टस्तनांचा भर!॥८

गद्यार्थ—

ज्या हिमालयामध्यें, गोठून घट्ट दगड झालेल्या हिमामुळें पायांच्या टांचा व बोटें कांकडून गेलीं, तरी स्तन त्या बाहून नेण्यास कठीण अशा पुष्ट स्तनांच्या व श्रोणींच्या भारामुळें, किन्नर युवतींना, आपली मंदचाल टाकून, भरभर चालतां येत नाहीं.

---

उपजाति

दिवाकराद्रक्षति यो गुहासु
लीनं दिवाभीतमिवान्धकारम् ।
क्षुद्रेऽपि नूनं शरणं प्रपन्ने
ममत्वमुच्चैःशिरसां सतीव ॥ ९ ॥

शार्दूलविक्रीडित

जो अंधार गुहागुहांत लपतो त्या नीच घूकापरी
सूर्यापासुनि हा हिमालय सदा तद्रक्षणातें करी।
येतां क्षुद्रहि आश्रयास, तितुकी मास्या तयाचें घर
मोठ्याचे वरतीं जशी नि जितुकी, दावील ऊर्जस्वल९

गद्यार्थ—

हा हिमालय, आपल्या गुहागुहांतून, एखाद्या घुबडाप्रमाणें लपून बसलेल्या, अंधकाराचें सूर्यापासून रक्षण करतो. ज्याचें मस्तक उंच आहे (उच्चैःशिरस्) असे म्हणजे ऊर्जस्वल असे महात्मे हे, आश्रयार्थ आलेल्या थोरामोठ्यांवर जितकी ममता दाखवितात, तितकीच, क्षुद्र शरणार्थींवरहि दाखवितात. (हिमालय अक्षरशः उंच मस्तक असलेला.)

---

उपजाति

लाङ्गूलविक्षेपविसर्पिशोभै-
रितस्ततश्चन्द्रमरीचिगौरैः ।
यथार्थयुक्तं गिरिराजशब्दं
कुर्वन्ति बालव्यजनैश्चमर्यः ॥ १० ॥

शार्दूलविक्रीडित

चंद्राच्या किरणांपरी धवलशा केसांमुळें सुंदर
लालित्यें हलवीत पुच्छ अपुलें, ज्या धांवती सत्वर।
केसांचीं, चमरी-मृगी जणुं अशीं हीं विंझणें वारुनी
याचें नाम गिरीश सार्थ करिती चौऱ्याच या ढाळुनी

गद्यार्थ—

चंद्रांश किरणांसारखे धवल केश असलेल्या आपल्या शेपट्या, त्यांच्यानें इकडे तिकडे धावतांना चमरीमृगी ज्या हालवितात, त्यामुळें, या गिरिराज हिमालयावर या चौऱ्या ढाळीत आहेत, असें भासून, गिरींचा राजा हे त्याचें नांव सार्थ करतात

———•———

उपजाति

यत्रांशुकाक्षेपविलज्जितानां
यदृच्छया किंपुरुषाङ्गनानाम् ।
दरीगृहद्वारविलम्बिबिम्बा-
स्तिरस्करिण्यो जलदा भवन्ति ॥ ११ ॥

शार्दूलविक्रीडित

वस्त्रें नेसुनि रेशमी, विहरती ज्या तेथल्या किन्नरी
केव्हां तींच तनूवरुन ढळतां त्या लाजती सुंदरी ।
दाराच्याच समोरच्या दरिंतुनी तेव्हां यदृच्छेंच तो
जो येई घन, तो बनून पडदा, लज्जेस त्या झांकितो ११

गद्यार्थ—

ज्या हिमालयावरील किन्नरी, ज्यांच्या अंगावरील रेशमी वस्त्र (मुळमुळीत असल्यामुळें किंवा वाऱ्यामुळें) ढळून (अंग उघडें पडल्यामुळें) लज्जित होतात, परंतु, केव्हां केव्हां अचानक त्याचवेळीं त्यांच्या अगदीं दारासमोर एखादा मेघ आलेला असतो, तो, त्यांचे दारावरचा जणूं काय पडदा होऊन त्यांची लाज झांकतो।

———•———

इन्द्रवज्रा

भागीरथीनिर्झरसीकराणां
वोढा मुहुः कम्पितदेवदारुः ।
यद्वायुरन्विष्टमृगैः किरातै-
रासेव्यते भिन्नशिखण्डिबर्हः ॥ १२ ॥

शार्दूलविक्रीडित

होई शीतल जो तुषार मिसळुनी गंगाप्रवाहांतले
वारंवार हि देवदार हलवी जो वायु रानांतले ।
मोरांचे मृदु पंख जो उपटले विस्तारुनी टाकितो
शोधोनी हरिणांस व्याधगण ते, ते सेविती वायु तो १२

गद्यार्थ—

ज्या हिमालयावर, गंगाप्रवाहातले तुषार मिसळून शीतल झालेला, देवदारांची झाडें वारंवार हलवणारा, व मोरांचे पंख (आपल्या वेगामुळें) विस्कटून टाकणारा, असा वारा, हरिणांना सापडवून दमलेले शिकारी सेवन करतात.

———•———

उपजाति

सप्तर्षिहस्तावचितावशेषा-
ण्यधो विवस्वान् परिवर्तमानः ।
पद्मानि यस्याग्रसरोरुहाणि
प्रबोधयत्यूर्ध्वमुखैर्मयूखैः ॥ १३ ॥

शार्दूलविक्रीडित

पद्में वाढति या गिरीशिखरिंच्या
मोठ्या तडागांतलीं
सप्तर्षी खुडितात तीं निजकरें;
त्यांतून जीं वांचलीं ।
तीं पद्में फुलवावयास किरणें
खालून सोडी रवि
खालीं सूर्य हिमालयाहुनि !
किती त्या अद्रिची थोरवी ॥ १३ ॥

गद्यार्थ—

ज्या हिमाल्याच्या शिखरावरील सरोवरातील कमलें सप्तर्षि (पहाटे) आपल्या हातांनीं खुडून नेतात, त्यानंतर जीं (मिटलेलीं) कमलें शिल्लक राहतात त्यांना हिमालयाच्या खालूनच फिरणारा सूर्य हा खालूनच आपलीं किरणें वर (ऊर्ध्वमुख) सोडून उमलवितो. (सूर्य हा हिमालयाइतका उंच चढूं शकत नाहीं अशी कालिदासकालीन कविकल्पना असावी!)

———•———

शिखरिणी

अभूल्याची पिङ्गा रसपतिरिव प्राश्य कनकं
गतच्छायश्चन्द्रो बुधजन इव ग्राम्यसदसि ।
क्षणं क्षीणाम्भारा नृपनय इवानुपमपरा
न दीप्ता राजन्ते द्रविणरहितानामिव गुणाः ॥ १४ ॥

शिखरिणी

भुरी झाली पूर्वा कनक पिउनी पारद जसा
जसा ग्रामीणाच्या गृहिं बुध, शशी निष्प्रभ तसा।
निरुद्योगी राजांसम मलिन तारे क्षणभरें
दिव्यांची, नि स्वांच्या
गुणसमचि शोभा जगिं नुरे ॥ १४ ॥

गद्यार्थ—

(अभिनव उपमांनीं नटलेलें पहाटेचें वर्णन) पूर्व दिशा ही सोनें खाल्लेल्या पाऱ्याप्रमाणें भुरकट दिसूं लागली खेडवळाच्या घरीं विद्वान्, तसा चंद्र निष्प्रभ झाला निरुद्योगी राजाप्रमाणें तारे क्षणभरांत म्लान झाले, आणि दरिद्री नराच्या गुणाप्रमाणें दिव्यांचें तेज पडेनासें झालें.

———०———

हरिणी

विरलविरलीभूतास्तारा: कलौ सुजना इव
व्यपसरति च ध्वान्तं चित्तात्सतामिव दुर्जन:।
मन इव मुने: सर्वत्रापि प्रसन्नमभून्नभो
विगलति निशा क्षिप्रं लक्ष्मीरनुद्यमिनामिव ॥ १५ ॥

हरिणी

विरल बनले तारे जैसे कलीयुगिं सज्जन
गत तम जसें सुज्ञांच्याही मनातुन दुर्जन।
मुनिमन तसें सारें झालें प्रसन्न नभांतरीं
धन अकृतिचें तैशी लोपे क्षणांतचि शर्वरी ॥ १५ ॥

गद्यार्थ—

कलियुगात जसे सज्जन तसे तारे विरल झाले सज्जनांच्या मनांतून दुर्जनाचे विचार दूर जातात तसा अंधार दूर जात चालला. मुनिजनांच्या मनाप्रमाणें आकाश सर्वबाजूंनीं प्रसन्न होत चालले निरुद्योगी माणसाच्या लक्ष्मीप्रमाणें, रात्र गळून जात आहे

———०———

अनुष्टुभ्

पश्यात्र नलिनीपत्रे बलाका परिदृश्यते।
हरिन्मणिमये पात्रे शुक्तिकेव प्रतिष्ठिता ॥ १६ ॥

अनुष्टुभ्

बगळा नलिनीपत्रीं बसतां दृश्य तें दिसे।
पांचूच्या जणुं कीं पात्रीं शिंप ती ठेवली असे ॥ १६ ॥

गद्यार्थ—

कमळाच्या हिरव्यागार पानावर बगळा बसला म्हणजे पाचूच्या पात्रावर जणूं काय, शिंपे ठेवल्यासारखें वाटतें।

———०———

पुष्पिताग्रा

परिपतति पयोनिधौ पतङ्ग-
सरसिरुहामुदरेषु मत्तभृंग:।
उपवनतरुकोटरे विहङ्ग-
स्तरुणिजनेषु शनै: शनैरनङ्ग: ॥ १७ ॥

पुष्पिताग्रा

बघ रवि उदधीमधें बुडे तो
जणुं कमलोदरिं मत्त भृंग येतो ॥
तरुवरि खग येइ कोटरांत
मदन हळूं तरुणींचिया मनांत ॥ १७ ॥

गद्यार्थ—

(सूर्यास्ताचें वर्णन दंतकथा असी कीं, भोजराजानें पहिली ओळ रचून, बाण, महेश्वर व कालिदास या शेजारी बसलेल्या कवींना हेंच वर्णन निरनिराळ्या दृष्टीनें देऊन करण्यास सांगितलें बाणानें दुसरी ओळ, महेश्वरानें तिसरी ओळ व कालिदासानें चौथी ओळ रचिली कालिदासाचा रंगेलपणा उघडच आहे) भोज–(पहा) सूर्य समुद्रांत बुडत आहे बाण–भ्रांत भुंगा कमलांच्या पोटांत शिरत आहे. महेश्वर–झाडावर पक्षी घरट्यांत येत आहे कालिदास–तरुणींच्या हृदयांत हळूंच मदन शिरत आहे

———०———

वसन्ततिलका

स्याता वयं समधुपा मधुकोशवत्य-
श्चन्द्र: प्रसारितकरो द्विजराज एष:।
अस्तमनागमच्छोऽस्य पुनर्द्विनीयो
मा मूलकष्टु इति संकुचिता नलिन्य: ॥ १८ ॥

वसन्ततिलका

हा भृंग आंत, मरला मंरही अमूप
येई करा पसरुनी द्विज चंद्रनृप।
"सन्संगमें मज उद्यो न पुन्हां …
मानें अगाच नलिनी …

गद्यार्थ—

(संध्यासमय नलिनी कां मिटते यावर कविकल्पना) नलिनीच्या मुखानें जणुं वेश्या बोलत आहे (प्रसारितकर=किरणें पसरीत किंवा हात पसरून) द्विजराज=चंद्र किंवा ब्राह्मणश्रेष्ठ मधु, मधुप, द्वितीय कलंक ..सारेंच द्व्यर्थी वापरलें आहे नलिनी म्हणते सर्वांना माहीतच आहे कीं आमच्याजवळ मध आहे। आणि मध चाखणारा आधींच शांत येऊन निजला आहे. इकडे चांगला ब्राह्मण (चंद्र) हात पसरून येत आहे आधींच त्याच्यावर एकदां कलंक जडलेला आहे आमच्या समागमानें त्याला दुसऱ्यादा कलंक न लागो या सदिच्छेनें नलिनीनें स्वत ला मिटवून घेतलें—(वेश्येनें आपलें दार लावून घेतलें)

---

वसंततिलका

अस्तोदयाचलविलम्बिरवीन्दुबिम्ब-
व्याजात्क्षणं श्रवणयोर्निहितारविन्दा ।
ताराच्छलेन कुसुमानि समुत्क्षिपन्ती
संध्येयमागतवती प्रमदेव काचित् ॥१९॥

वसंततिलका

अस्ताचलीं रवि, शशी उदयाचलीं हीं
कर्णद्वयीं क्षण धरी कमलें जणुं ही ।
संध्या कुणी गमतसे तरुणीच येत
तारामिषेंच उधळीत फुलें नभांत ॥ १९ ॥

गद्यार्थ—

संध्या ही जणुं एखाद्या तरुणीप्रमाणें, अस्ताचलीं असलेला सूर्य हें रक्तकमल व उदयाचलीं असलेला चंद्र हें श्वेत कमल अशीं दोन कानांवर दोन कमलें क्षणभर ठेवून तारकारूपी फुलें उधळीत येत आहे.

---

अनुष्टुभ्

परिष्यति कलानाथः कुतुकीकरमम्बरे ।
इति निर्वापयामास रविदीपं निशाङ्गना ॥ २० ॥

अनुष्टुभ्

घालील कर औत्सुक्यें अंबरीं चंद्र, या भयें ।
मालवी रविदीपातें निशा ही रमणी स्वयें ॥ २० ॥

गद्यार्थ—

रात्र रमणीनें, चंद्र हा औत्सुक्यानें अंबरीं (आकाशांत किंवा वस्त्रांत) कर (किरणें किंवा हात) घालील या भीतीनें सूर्यरूपी दिवा मालवून टाकला.

---

रथोद्धता

अङ्गुलीभिरिव केशसंचयं
संनिगृह्य तिमिरं मरीचिभिः ।
कुड्मलीकृतसरोजलोचनं
चुम्बतीव रजनीमुखं शशी ॥ २१ ॥

रथोद्धता

अंगुली किरणरूप योजुनी
केशरूप तम दूर सारुनी ।
पद्मरूप फुलवून लोचन
चुंबितो जणुं शशी निशानन ॥ २१ ॥

गद्यार्थ—

आपल्या किरणरूपी अंगुलींनीं निशारमणीचे अंधाररूपी केस बाजूला सारून, पद्मरूपी नेत्र फुलवून, चंद्र निशारमणीचें मुख चुंबीत आहे

---

शिखरिणी

रवेरस्तं तेजः समुदयति खद्योतपटली
मरालाली मूका कलकलमुलूका विदधते ।
इदं कष्टं द्रष्टुं शुचिरसहमानाम्बुजवती
मिलद्भृङ्गव्याजात्कवलयति हालाहलमहो ॥ २२ ॥

आर्या

जातां रवि अस्ताला, चमकत सर्वत्र काजवे आले।
विरतां कल हंसांचा घुवडांना कंठही पुन्हां फुटले।
वाटुन असह्य हें तिज पूतकमलिनी विपण्ण बहु झाल
मुखिं शिरल्या भ्रमरांच्या रूपें जणुं विषचि पीत ह
यसल

गद्यार्थ—

(कमलिनी संध्याकाळीं म्लान होतात व त्यांत भुंगे शिरता यावर कविकल्पना—) सूर्य अस्ताला गेला (एक प्र कमलिनीचा तो पतीच) (क्षुद्र) काजवे चमकूं लागले हंसांच कलरव बंद पडला व घुबडांचे घूत्कार कानीं येऊं लागले सर्व त्या पतिव्रता (विधवा) नलिनीला असह्य झाल्यानें, ह खिन्न झाली, व कमलमुखांत शिरणाऱ्या भुंग्यांच्या रूपानें त्र हालाहल (भुंगा काळा, विषहि काळें) पीत बसली!

---

शार्दूलविक्रीडित

यातस्यास्तमनन्तरं दिनकृतो वेषेण रागान्वितः
स्वैरं शीतकरः करं कमलिनीमालिंगितुं योजयन् ।
शीतस्पर्शमुपेत्य संप्रति तया रूद्धे मुखाम्भोरुहे
हासेनेव कुमुद्वतीवनितया वैलक्ष्यपाण्डूकृतः ॥ २३ ॥

आर्या

अस्तंगतरविवेषें संध्यारागेंच रंगुनी चंद्र
जधिं कमलिनीस पाहे आलिंगाया पुढें करुन कर।
शीतस्पर्शे त्याच्या निज मुखकमळा मिटून ती घेई
हंसतां कुमुद्वती स्त्री, शरमेनें चंद्र हा फिका होई ॥२३

गद्यार्थ—

(सूर्यविकासी कमलिनी संध्याकाळीं मिटते ती सूर्यपत्नी. कुमुद्वती उमलते ती चंद्रपत्नी. चंद्र संध्याकाळीं थोडावेळ तांबुस दिसतो व मग पांढरा होतो, या घटनावर कवीचा कल्पना विलास.) सूर्य अस्ताला गेला, तेव्हां त्यानें (काढून टेवलेला) तांबुस रंगाचा वेश (कमलिनीला फसविण्यासाठीं,) चंद्रानें आपल्या अंगावर चढविला, व आपले कर (किरणें, हात) पसरून कमलिनीस आलिंगन देण्यास आला. सूर्याचा उबदार हात तिच्या ओळखीचा, चंद्राच्या शीतकरांच्या स्पर्शानें (बिचकून) तिनें आपलें कमल मुख मिटून घेतलें व (परस्त्रीशीं लगट करतांना फजीत पावलेल्या) चंद्राला (त्याची स्त्री) कुमुद्वती हंसूं लागली (उमलली) व त्यामुळें लाजेनें चंद्र पांढरा फट पडला.

---

शिखरिणी

कपोले मार्जारः पय इति करॉल्लेढि शशिन-
स्तरुच्छिद्रप्रोतान् बिसमिति करी संकलयति ।
रतान्ते तल्पस्थान्हरति वनिताप्यंशुकमिति
प्रभामत्तश्चंद्रो जगदिदमहो विप्लवयति ॥ २४ ॥

शिखरिणी

पहा बोका गालीं पय म्हणुनि चाटी शशिकर
शिरे झाडांतूनी, बिस म्हणुनि भक्षी गजवर ।
रतान्तीं स्त्री शय्येवरनि हरिते वस्त्र म्हणुनी
प्रभेच्या उन्मादें शशि जगत टाकी भ्रमवुनी ॥ २४ ॥

गद्यार्थ—

(रात्रीं चंद्रप्रकाश केव्हां केव्हां मोठे विलक्षण आभास उत्पन्न करतो.) मांजराच्या गालावर पडलेलें चांदणें, तो दूध समजून चाटूं पाहतो. झाडाच्या फांटीतून आलेल्या चंद्रकिरणांस कमलांकूर समजून हत्ती खाऊं बघतो रत क्रीडेच्या वर शिरलेल्या वरचें चांदणें हें जणूं आपलें वस्त्र समजून, स्त्री तें ओढून नेऊं पाहते. चंद्राला स्वत ला आपल्या प्रभेचा उन्माद आलेला म्हणून तो सार्‍या जगाला भ्रमात पाडीत आहे.

---

शार्दूलविक्रीडित

अङ्कं केऽपि शशङ्किरे जलनिधेः पङ्कं परे मेनिरे
सारङ्गं कतिचिच्च संजगदिरे भूच्छायमैच्छन्परे ।
इन्दौ यद्दलितेन्द्रनीलशकलश्यामं दरीदृश्यते
तत्सान्द्रं निशि पीतमन्धतमसं
कुक्षिस्थमाचक्ष्महे ॥ २५ ॥

शार्दूलविक्रीडित

वाटे डाग कुणास; अब्धिमथला
कोणी म्हणे पंक तें
कोणी त्या मृग मानिती; धरणिची
छाया कुणा भासतें ।
जें चंद्रावर इन्द्रनीलशकला—
ऐसेंच काळें दिसे
प्याला तो तम जें निशीं थिजुनि तें
कुक्षींत त्याच्या वसे ॥ २५ ॥

गद्यार्थ—

इंद्रनीलमण्याच्या तुकड्यासारखें काळें जें काय चंद्रावर दिसतें त्याला कोणी डाग म्हणतात, (समुद्रांतून चंद्र निघाला त्या वेळचा) कोणी म्हणतात समुद्रातला तो चिखल आहे. कोणी म्हणतात तो मृग (हरिण) आहे. कोणी म्हणतात ती पृथ्वीची छाया आहे आम्ही म्हणतों–त्यानें रात्रीं जो अंधार प्राशन केला, तो, थिजून जाड होऊन त्याच्या कुशींत लपलेला दिसत आहे.

---

अनुष्टुभ्

लिम्पतीव तमोऽङ्गानि वर्षतीवाञ्जनं नभः ।
असत्पुरुषसेवेव दृष्टिर्निष्फलतां गता ॥ २६ ॥

अनुष्टुभ्

तम मारे जणूं अंगां वर्षी आकाश काजळ ॥
दुष्टसेवेपरी झाली दृष्टि संपूर्ण निष्फळ ॥ २६

गद्यार्थ—

अंधकार जणूं काय (वस्तुरूप होऊन) साऱ्या अवयवांना लिंपून काढीत आहे आकाश जणूं काजळीचा वर्षाव करीत आहे. दुष्टाची केलेली सेवा जशी सपूर्ण निष्फल होते, तशी दृष्टि झाली आहे. (अत्यंत गाढ अंधाराचें वर्णन)

—•—

वसंततिलका

दष्टे जगद्वपुषि कालभुजङ्गमेन
तत्रान्धकारमिषमाविरभूद्विषं यत् ।
सञ्जातलक्ष्मणि तदिन्दुमणौ निपीय
ज्योत्स्नामये पयसि तं क्षिपति स्म धाता ॥२७

वसंततिलका

चावे जगत्तनुस कालभुजङ्ग तेणें
अंधाररूप निपजे विष, तें पिण्यानें ॥
लागे कलंक शशिला, म्हणुनी विधी तो
ज्योत्स्नादुधांत बुडवून तयास धूतो ॥ २७ ॥

गद्यार्थ—

पृथ्वीरूप देहाला कालसर्प चावला; तेव्हां अंधकाररूपी जें विष उत्पन्न झालें, तें प्याल्यामुळें, चंद्राच्या अंगावर डाग उठले म्हणून ब्रह्मदेवानें त्याला ज्योत्स्नारूपी दुधात धुवून काढलें.

—•—

वसंततिलका

तप्ता मही विरहिणामिव चित्तवृत्ति—
स्तृष्णाऽध्वगेषु कृपणेष्विव वृद्धिमेति ।
सूर्यः करैर्दहति दुर्वचनैः खलो नु
च्छाया सतीव न विमुञ्चति पादमूलम् ॥ २८ ॥

शार्दूलविक्रीडित

गेली तापुनि ही मही, विरहि जे,
त्यांच्या मनांच्या परी
पांथां वाढतसे तृषा, कृपण जे
त्यांच्या जशी अंतरीं ।
शब्दांनीं खल, तेवि चंडकिरणीं
हा सूर्यही जाळित
छाया सोडितसे न पायचि, सती
स्वीच्यापरी संतत ॥ २८ ॥

गद्यार्थ—

(उन्हाळ्याचें वर्णन.) विरही जनांच्या चित्तवृत्ति तापतात तशी भूमि तापली आहे. कृपणाची वाढते तशी पांथस्थांची तृष्णा वाढत आहे दुष्ट मनुष्य दुष्ट शब्दांनीं, जसा ऐकणाराला भाजून काढतो, तसा सूर्य, आपल्या किरणांनीं भाजीत आहे पतिव्रता जशी (पतीचे) पाय सोडीत नाहीं तशी सावलीहि पाय सोडीत नाहीं. (सूर्य अगदीं बरोबर डोक्यावर असल्यानें पायापलीकडे सावलीच पडत नाहीं!)

—•—

रथोद्धता

तानि तानि कमलानि तज्जलं
तानि षट्पदकुलानि ते खगाः ।
सर्वमेकसमये तु विच्युतं
पंकशेषमचिरादभूत्सरः ॥ २९ ॥

उपजाति

तीं अनेक कमलें ! जल तेंची
तीचि भृंगततिही खग तेची ।
सर्व एकसमयींचि लोपुनी
पंक मात्र उरला तळ्यांतुनी ॥ २९ ॥

गद्यार्थ—

(उन्हामुळें) तीं नाना तऱ्हेचीं कमळें, तें पाणी, ते भुंग्यांचे व पक्ष्यांचे थवे—सारे एकाच वेळीं नष्ट झाले आणि तळ्यांत नुसता चिखल उरला आहे.

—•—

शिखरिणी

द्रुमाः पाण्डुप्राया घृतनिविडगर्भाः स्त्रिय इव
प्रफुल्लास्ते कुन्दा नृपतिकृतमाना इव जनाः ।
पिको मन्दं मन्दं हृदि मदननामानि जपति
प्रभोरग्रे पूर्वापरिचितसभाकः कविरिव ॥ ३० ॥

शार्दूलविक्रीडित

नारी गर्भवती, तसे पिकुदले हे भासती वृक्षही
लाभोनी नृपमान्यता नर, तसे उत्फुल्ल हे कुंदही ।
भामे कोकिल मंद मंद जपतो नाम स्मराचें मनीं
जाणे राजसभा न, तो कवि जसा राजापुढें येउनी ॥३०

गद्यार्थ—

गर्भवती स्त्रियाप्रमाणें कुंभ पिकुटलेले आहेत. नृपानें सन्मान केलेल्या माणसाप्रमाणें कुंद प्रफुल्ल झालेले आहेत. राजसभा पूर्वी कधीं न पाहिल्यानें पहिल्या खेपेस, राजाचे पुढें, नवखा कवि जसा (गांगरल्यानें) तोंडान्त्या तोंडात बोलतो, तसा कोकिल हा मंद मंद मदनाचीं नावें जपत आहे.

———

मालिनी

पवनचपलवेगः स्थूलधाराशरौघः

स्तनितपटहनादः स्पष्टविद्युत्पताकः ।

हरति करसमूहं खे शशांकस्य मेघो

नृप इव पुरमध्ये मन्दवीर्यस्य शत्रोः ॥ ३१ ॥

आर्या

गति पवनशीघ्र ज्याप्रति,
जलधारांचे शरौघ फेकीत ।
रणवाद्यनाद गर्जित,
ज्याचा ध्वज वीजरूप फडफडत ॥
हरितो मेघ शशीचे कर,
नभिच्या या विशाल राज्यांत ।
चाले विजयी नृपसा,
अचल रिपूच्या पुरांत पेटींत ॥ ३१ ॥

गद्यार्थ—

वाऱ्याप्रमाणें भरधाव गतीनें, जलधारांच्या रूपानें बाणाची वृष्टि करीत, गडगडाट हीं रणवाद्यें वाजवीत, विजेचे ध्वज फडफडवीत, आकाशरूपी चंद्राच्या राज्यात कर घेत (त्याचीं किरणें अडवीत) दुर्बल शत्रूच्या राजधानीत विजयी राजा जसा ऐटींत जातो तसा मेघ जात आहे.

———

शिखरिणी

चरन्तीनां सौधे नृपतिरमणीनां तनुरुचो

गवाक्षान्तर्वान्ताः कतिचन गृहीत्वा जलमुचः ।

क्षणे गोपायन्ति क्षणरुचिमिषेण क्षणमहो

विवृण्वन्ति स्वर्णं करगतमिवाकिञ्चनजनः ॥ ३२ ॥

आर्या

राजस्त्रिया महालीं, फिरतां, त्यांच्या शरीरतेजातें ।
सेचुनि खिडकीमधुनी, घन हा मिरवीतसे स्वदेहीं तें
कमनी वीज तयातें क्षणिं लपवी तो क्षणांत दाखवितो
हातांमधलें सोनें, अधन जसा लपवितो नि दाखवितो

गद्यार्थ—

(मेघांनीं वीज आपली कोठून व ती अशी चोरल्यासारखी ते लपवीत का असतात ?) आपल्या प्रासादांत राजस्त्रिया या फिरत असतां मेघ हे खिडकीवाटे आत शिरून त्यांची (सुंदर कनकवर्ण) अंगकांति थोडीशी चोरून घेतात. आणि तीच वीजरूपानें, क्षणात दाखवितात, क्षणात लपवितात, (कारण हा चोरीचा माल.) ज्याप्रमाणें निर्धन आपल्या मुठींतलें (चोरीचें) सोनें क्षणभर दाखवितात व लगेच लपवितात.

———

शिखरिणी

क्षपां क्षामीकृत्य, प्रसभमपहृत्याम्बु सरितां

प्रताप्योर्वीं सर्वां तरुगहनमुच्छोष्य सकलम् ।

क्व सम्प्रत्युष्णांशुर्गत इति तदालोकनपरा-

स्तडिद्दीपा लोके दिशि दिशि चरन्तीव जलदाः ॥३३॥

आर्या

संकोचुनि निशेला,
हरुनि नद्यांचें बळें बळें पाणी ।
अखिल जगा तापवुनी,
तरुकुंजांनाहि पूर्ण सुकवोनी ॥
गेला कोठें रवि तो ?
हें शोधाया दिशांदिशांतुनि ते ।
सर्वत्र मेघ फिरती,
दीप विजेचेच घेउनी हातें ॥ ३३ ॥

गद्यार्थ—

(उन्हाळ्यात रात्र लहान असते.) रात्ररूपी (बिचाऱ्या) स्त्रीची गळचेपी करून, नद्यांचें पाणी बलात्कारानें हिरावून घेऊन, पृथ्वीला ताप देऊन, लतावृक्षांना सुकवून...... असें सर्वांना विशेषत स्त्रियांना छळणारा तो सूर्य आतां कोठें गेला हें जणूं काय (पारिपत्यार्थ) शोधण्यासाठीं हे मेघ हातीं विजेचे दिवे घेऊन चारी दिशात जगभर फिरत आहेत.

———

अनुष्टुभ्

लतां पुष्पवतीं स्पृष्ट्वा स्नातो विमलवारिणा ।

पुनः संपर्कशंकीव मन्दं चरति मारुतः ॥ ३४ ॥

उपजाति

स्पर्शोनियां पुष्पवती लता तो
नाहोनियां स्वच्छ जलांत, येतो ।
तिच्या पुनः स्पर्शभयें जणूं तो
जपून वारा बहु मंद जातो ॥ ३४ ॥

गद्यार्थ—

(पहाटे वारा मंद का, याचें कारण) पुष्पवती लतेला (पुष्पवती=मासिक ऋतुमती) स्पर्श करून, वारा (देहशुद्धीसाठी) स्वच्छ पाण्यांत स्नान करून येतो, पण त्या लतेच्या बाजूनें जातांना तिचा पुनः स्पर्श न व्हावा, यासाठी जपून हळू हळू वाहतो

---

तोटक

शशिना च निशा निशया च शशी
शशिना निशया च विभाति नभः ।
पयसा कमलं कमलेन पयः
पयसा कमलेन च भाति सरः ॥ ३५ ॥

तोटक

शशि जेंवि निशेस, निशा शशिला,
द्वय तेंच नभा किति शोभवितें ॥
जलही कमलां, कमलें हि जला,
द्वय फार तळ्यासहि भूषवितें ॥ ३५ ॥

गद्यार्थ—

चंद्रानें रात्रीला, रात्रीनें चंद्राला व त्या दोघांमुळें आकाशाला शोभा येते. तसेंच पाण्यानें कमळाला, कमळानें पाण्याला व त्या दोघांमुळें तळ्याला शोभा येते

---

शिखरिणी

चिरश्रान्तो दूरादहमुपगतो हन्त मलया-
त्तदेकं त्वद्गेहे तरुणि परिणेष्यामि दिवसम् ।
समीरेणैवोक्ते नवकुसुमिता चूतलतिका
धुनाना मूर्धानं नहि नहि नहीत्येव वदति ॥ ३६ ॥

आल्यानें फार दिवसांचा दमलेला मी, हे तरुणि! तुझ्या घरीं एक दिवस राहूं इच्छितों!" असें मलयसमीरणानें म्हटलेलें ऐकून नुकताच मोहर फुटलेली (नवकुसुमिता=नुकतीच ऋतुमती झालेली, असा दुसरा अर्थ) आंब्याची फांदी डोकें हलवून जणूं काय त्याला नाहीं नाहीं असें म्हणते.

---

शार्दूलविक्रीडित

दिक्चक्रं मृगतृष्णया कवलितं व्योमापि भास्वत्कर-
च्छायाभिः क्षुरितं तुषानलकणप्रायाश्च भूरेणवः ॥
पांथाः पल्लवसंकुलद्रुमलताकुञ्जे मुहुः शेरते
मज्जत्कुञ्जरतालुलोलितजलाः क्षुभ्यन्ति तोयाशयाः ॥

शार्दूलविक्रीडित

व्याली सर्व दिशांस हीं मृगजळें,
आकाश हें फाडिलें
सूर्याच्या किरणीं, नि धूळिकण हे
अग्नीपरी तापले ॥
सारे पांथहि पल्लवावृत लता-
कुंजांतुनी झोंपले
हत्ती डुंबति त्यामुळें उसळुनी
पाणी तळ्यांचें हले ॥ ३७ ॥

गद्यार्थ—

(भयंकर उन्हाळ्याचें वर्णन)—सर्वत्र मृगजळें दिसत असून जणूं दाही दिशांना गिळून टाकीत आहेत, आकाश जणूं काय सूर्याच्या किरणरूपी शस्त्रांनी फाडून टाकलें आहे, सर्वत्र धूळ इतकी तापली आहे, की, ती जणूं अग्निच (तुषाग्नि) ठिणग्यांसारखी दिसत आहे आतां पांथस्थ हे लतांच्या सावलीसाठी व झोंपण्यासाठी झोंपले आहेत तळ्यांतून हत्ती डुंबत आहेत त्यामुळें पाण्यांत सदा उसळ्या आहेत!

शार्दूलविक्रीडित

चोरी गंध सुवर्णपद्मनगरीं जेव्हां वसन्तानिल
तेथें जे जणुं द्वारपाल, करिती ते भृंग कोलाहल ॥
धांवे धाइंत, हाहि, केरलवधूवक्षस्थ जें चंदन
त्याच्या पंकिं रुतून पंगु बनतां जातोच मंदावुन ॥३८॥

गद्यार्थ—

(दक्षिणेकडील) सुवर्णपद्माच्या नगरींत वसन्तवायूनें सुगंधाची चोरी केली त्याबरोबर तेथील द्वारपाल (काळे डगलेवाले) जे भुंगे त्यांनीं ओरडाओरड केली. त्यामुळें त्या वाऱ्याला तेथून धाइनें काढता पाय घ्यावा लागला—पण दुर्दैवानें तो, केरळ स्त्रियांच्या स्तनांवरील दाट चंदनाच्या उटीच्या चिखलांत अडकून लंगडा झाल्यानें त्याची पुढें जाण्याची गति मंदावली.

———०———

रथोद्धता

भानुबिम्बमिदमस्तगामि च
प्रोद्यतं कुमुदबन्धुमंडलम् ।
दृश्यते रतिपतेः प्रवासिनां
क्रोधरक्तमिव लोचनद्वयम् ॥ ३९ ॥

वसंततिलका

अस्ताचलीं बुडत लालचि सूर्यबिंब
पाहोनि लाल उदयाचलिं चंद्रबिंब ॥
वाटे प्रवास करत्यास, जणूं स्मराचें
ते क्रोधरक्त नयनद्वय काय साचें ॥ ३९ ॥

गद्यार्थ—

*अस्ताचलावरील लाल सूर्यबिंब*, व, उदयाचलावरील लाल चंद्रबिंब, हे पाहून, प्रवाशाला भास होतो, कीं, जणूं काय मदन रागावून लाल डोळे करूनच आपणाकडे पाहात आहे. (प्रवासी आपल्या कांतेला सोडून प्रवासांत असल्यानें त्या उभयांनीं मदनाचे सर्व विलास बंद केल्याबद्दल मदनाचा राग!)

———०———

शार्दूलविक्रीडित

उत्सिक्तः कुसुमासवैः कुमुदिनीं राजप्रियां पुष्पिणी—
मालिङ्ग्य निशि निर्भयं परिचयं कुर्वन्पुनः पल्वलैः ।
यावत्पङ्कजसौरभत्वमखिलं गृह्णँल्लघुप्रस्थित—
स्तावत्कल्य उपस्थिते मरुदयं विप्लवभयाद्धावति ॥४०॥

आर्या

गर्वित पुष्पमधूनें,
राजप्रिय पुष्पिता कुमुदिनीमीं ।
कवळुनि रात्रीं, निर्भय,
लगट करी तो पुनश्च पल्वलिशीं ॥
जोंवर पंकजसौरभ
घेउनि सगळा हळूंच जड निघतो ।
तोंवरि पहांट होतां
सैरांवैरां भयें पवन पळतो ॥ ४० ॥

गद्यार्थ—

(वारा रात्रीं कां पडला, व पहांटे कां वेगानें वाहूं लागला? यावर रूपक) पुष्पांनलें मद्य पिऊन बताल्लेला वारा, (राजवाड्याच्या पुष्करिणींत शिरून) राजाला प्रिय असलेल्या पुष्पिता (फुललेल्या, ऋतुमती) कुमुदिनीला (कोणी पाहात नाहीं हें पाहून) रात्रीं निर्भयपणें आलिंगिता झाला तेवढ्यानें तृप्त न होऊन उत्तर रात्रीं पल्वली (कोवळ्या पोरी) शीं लगट करूं लागला आणि सध्याकाळभर गोळा केलेलें कमलांतल्या सुगंधाचें ओझें घेऊन जड होऊन जरा पुढें चालूं लागतो, तों पहांट झाल्याचें पाहून (रात्रींचीं कृत्यें आतां उघडकीस येणार या) भीतीनें सैरावैरा धांवत सुटला

———०———

मालिनी

मधुरमिव वदन्ति स्वागतं भृङ्गशब्दै-
र्नतिमिव फलनम्रैः कुर्वतेऽमी शिरोभिः ।
ननु ददत इवार्घ्यं पुष्पवृष्टिं किरन्तः
कथमतिथिसपर्यां शिक्षिताः शाखिनोऽपि ॥ ४१ ॥

शार्दूलविक्रीडित

येथें आश्रमवृक्ष गोड करिती
गुंजारवें स्वागत
जाणों आदर दाविती फलभरें
होवोनियां ते नत ॥
वाटे, अर्घ्यचि, पुष्पवृष्टि करुनी
देतात कीं काय ते
हें आतिथ्यहि वृक्ष केविं
शिकले आश्चर्य हें वाटतें ॥ ४१ ॥

गद्यार्थ—

येथील हे वृक्ष-भृंगांच्या गुंजारवाच्या रूपानें जणूं स्वागताचे मधुर शब्द उच्चारीत आहेत फळांनीं वांकलेल्या आपल्या मस्तकांनीं जणूं काय ते नमनच करीत आहेत आणि पुष्पवृष्टि करीत ते जणूं काय अर्घ्यदानच करीत आहेत अतिथीची सेवा पूजा करण्याचें कार्य वृक्षांनीं कुठें शिकून घेतलें हें केवढें आश्चर्य!

# प्रकरण २४ वें

राजा, राजनीति, राजधर्म, प्रजापालन, अराजक, लोकहित, राजसेवक, मंत्री, शत्रु, "शठं प्रति शाठ्यम् ।" तह, युद्ध, भेदनीति, क्षात्रधर्म, मुत्सद्दीपणा, वर्तनकलाकुशलता.

वसंततिलका

सत्यानृता च परुषा प्रियवादिनी च
हिंस्रा दयालुरपि चार्थपरा वदान्या ॥
नित्यव्यया प्रचुरनित्यधनागमा च
वेश्याङ्गनेव नृपनीतिरनेकरूपा ॥ १ ॥

वसंततिलका

खोटें, खरें वदत, कर्कश गोड भारी
लोभी, उदार, सदया कधिं घातकारी ॥
संपत्ति नित्य मिळवी, उधळी सदा ती
वेश्येपरी विविधरूपचि राजनीति ॥ १ ॥

गद्यार्थ—

कधीं खरें बोलेल तर कधीं खोटें; कधीं कर्कश बोलेल तर कधीं गोड; कधीं क्रूर घातकारी तर कधीं दयार्द्र, कधीं लोभी असेल तर कधीं उदार, कधीं खूप उधळपट्टी करील, कधीं खूप संपत्ति मिळवीलहि । राजनीति ही वेश्येसारखी क्षणाक्षणाला रूपें पालटणारी आहे.

---

वसंततिलका

राजन्! दुधुक्षसि यदि क्षितिधेनुमेनां
तेनाद्य वत्समिव लोकममुं पुषाण ॥
तस्मिंश्च सम्यगनिशं परिपुष्यमाणे
नानाफलैः फलति कल्पलतेव भूमिः ॥२॥

वसंततिलका

भूधेनुनें जरि अपेक्षिसि दूध द्यावें
वत्सापरीच जन पोषित तूं रहावें ॥
राजा! प्रजा सतत तुष्ट जधीं सुखानें
भू देइ सर्व फल कल्पलतेप्रमाणें ॥ २ ॥

गद्यार्थ—

हे राजा, या भूधेनूनें तुला दूध द्यावें असें वाटत असेल तर, तिच्या वासराप्रमाणें असलेल्या प्रजेला, तूं नीट पोशीत जा. आणि तीं वासरूं म्हणजे प्रजा, जर नेहमीं संतुष्ट असली, तर, भूधेनु ही कल्पलतेप्रमाणें नाना फळें देते.

---

अनुष्टुभ्

यथा गौर्दुह्यते काले पाल्यते च, तथा प्रजा ।
सिच्यते चीयते चैव लता पुष्पफलप्रदा ॥ ३ ॥

अनुष्टुभ्

वेळीं दुहावी, पोसावी, गाय जैशी, प्रजा तशी ।
शिंपुनी, वेचतां, देई, फल पुष्प लता जशी ॥ ३ ॥

गद्यार्थ—

वेळ आली म्हणजे दूध काढावें, वेळीं चारापाणी घालून तिचें पोषण करावें हें जसें गाईविषयीं तसेंच प्रजेविषयीं लता वेली जशी, पाणी शिंपले, म्हणजे फुलें फळें देते, तद्वत

---

अनुष्टुभ्

शनैः शनैश्च यो राज्यमुपभुङ्क्ते यथाबलम् ।
रसायनमिव, प्राज्ञः स पुष्टिं परमां व्रजेत् ॥ ४ ॥

अनुष्टुभ्

हळूंहळूंच जो राज्य यथाशक्तिच भोगतो ।
( किंवा चोखतो )
रसायनापरी; सुज्ञ पुष्टि मोठीच पावतो ॥ ४ ॥

गद्यार्थ—

( आयुर्वेदांतील ) रसायनं ( हीं फार जलाल असल्यानें हीं ) फार जपून यथाशक्ति घ्यावयाचीं असतात, ( अन्यथा हीं अपायकारक होतात, ) तद्वत् जो सुज्ञ राजा, हळूंहळूं, यथाशक्ति राज्य भोगतो, त्याला चांगली पुष्टि प्राप्त होते.

---

अनुष्टुभ्

राजा बन्धुरबन्धूनां राजा चक्षुरचक्षुषाम् ।
राजा पिता च माता च सर्वेषां न्यायवर्तिनाम् ॥५॥

आर्या

बंधु न ज्यां, बंधु तयां, राजा हा नयन नयनहीनांतें ।
आई बापहि राजा, न्यायें चालति अशाच सकलांतें

गद्यार्थ—

ज्यांना बंधु नसेल त्यांचा बंधु राजा; ज्यांना डोळे नसतील त्यांचा डोळा राजा; न्यायानें चालणाऱ्या सर्वांचा बाप आणि आई राजाच. (असें राजानें वागलें पाहिजे)

अनुष्टुभ्

प्रजानां विनयाधानाद्रक्षणाद्भरणादपि ।
स पिता; पितरस्तासां केवलं जन्महेतवः ॥ ६ ॥

अनुष्टुभ्

**राजा, प्रजांस देण्यानें विद्या, रक्षण पोषण ।**
**खरा पिता; पिते त्यांचे मात्र जन्मास कारण ॥ ६ ॥**

गद्यार्थ—

प्रजांना शिक्षण दिल्यामुळें, रक्षिल्यामुळें, पोषिल्यामुळें, राजाच यथार्थपणें त्यांचा पिता असतो व त्यांचे पिते केवळ जन्मदाते. (हा श्लोक रघुराजाविषयीं आहे म्हणून मूळ श्लोकांत स पिता असें आहे.)

अनुष्टुभ्

नृपदीपो धनस्नेहं प्रजाभ्यः संहरन्नपि ।
अंतरस्थगुणैः शुभ्रैर्लक्ष्यते नैव केनचित् ॥ ७ ॥

अनुष्टुभ्

**नृपदीप, धनस्नेह प्रजांचें खेचितो जरी ।**
**गुणांनीं शुभ्र अंतःस्थ, कुणा तें न दिसे परी ॥ ७ ॥**

गद्यार्थ—

दिवा जसा अंतःस्थ, शुभ्रगुणांनीं (आतल्या पांढऱ्या वातीनें) तेल शोषितो, तरी, तें शोषणें दिसून पडत नाहीं, तसें, राजारूपी दिवा, धनरूपी तेल, प्रजांपासून शोषीत असतो, तरी तें, त्यांच्या अंतःस्थ चांगल्या सद्गुणामुळें कोणाच्या डोळ्यांवर येत नाहीं. (अंतःस्थ, गुण, या शब्दांवर कोटि.)

अनुष्टुभ्

किं तस्य तपसा राज्ञः किं च तस्याध्वरैरपि ।
सुपालितप्रजो यः स्यात् सर्वधर्मविदेव सः ॥ ८ ॥

अनुष्टुभ्

**कशास तप त्या राजा? कशाला त्यास अध्वर?।**
**नीट पाळी प्रजा जो, तो धर्मवेत्ता खरोखर ॥ ८ ॥**

गद्यार्थ—

प्रजेचें जो उत्तम प्रतिपालन करतो तो राजा सर्व धर्मांचा वेत्ताच म्हटलें पाहिजे त्याला तप कशाला आणि यज्ञ तरी कशाला?

अनुष्टुभ्

धर्मे तिष्ठन्ति भूतानि, धर्मो राजनि तिष्ठति ।
तं राजा साधु यः शास्ति स राजा पृथिवीपतिः ॥९॥

अनुष्टुभ्

**धर्मांत राहती प्राणी धर्म राजांत राहतो ।**
**त्या धर्मा नीट जो पाळी राजा पृथ्वीपतीच तो ॥ ९ ॥**

गद्यार्थ—

सर्व प्राणी धर्मांत राहातात म्हणजे त्यांना त्यांना त्यांचें त्यांचें कर्तव्य कर्म आहे आणि धर्म राजांत राहतो; (सर्वांचें सर्वांनीं मोठें कर्तव्यकर्म राजाचें) म्हणून त्या धर्माला जो योग्य रीतीनें पाळतो तोच खरा पृथ्वीपति!

शार्दूलविक्रीडित

सस्यानि स्वयमत्ति चेद्वसुमती, माता सुतं हन्ति चेद्
वेलामम्बुनिधिर्विलङ्घयति चेद्भूमिं दहेत्पावकः ॥
आकाशं जनमस्तके पतति चेदन्नं विषं चेद्भवे-
दन्यायं कुरुते यदि क्षितिपतिः कस्तं निरोद्धुं क्षमः ॥१०॥

शार्दूलविक्रीडित

**खाई भूमि स्वयेंच धान्य; वधिते आईच पुत्रा जर**
**ओलांडी पुलिना समुद्र; जगता अग्नीच जाळी जर ॥**
**लोकांच्या शिरिं कोसळे नभ, जरी हें अन्न होई विष**
**अन्याया नृपची करी, तर तया रोधी कसा माणुस?**

गद्यार्थ—

स्वतः पृथ्वीच जर धान्य खाऊं लागली, आईच पुत्रास मारूं लागली, समुद्र किनारा ओलांडूं लागला, अग्नि पृथ्वीला जाळूं लागला, लोकांच्या डोक्यावर जर आकाश कोसळलें, अन्नच जर विष झालें आणि राजाच जर अन्याय करूं लागला तर त्याला विरोध करण्यास कोण समर्थ आहे?

अनुष्टुभ्

यथा देशस्तथा भाषा यथा राजा तथा प्रजा ।
यथा भूमिस्तथा तोयं यथा बीजं तथाङ्कुरः ॥ ११ ॥

अनुष्टुभ्

जसा देश तशी भाषा प्रजा राजापरी असे ।
जशी भूमि तसें पाणी कोंब बीजापरी असे ॥ ११ ॥

गद्यार्थ—

जसा देश, तशी भाषा, जसा राजा तशी प्रजा, जशी भूमि तसें पाणी, जसें बीं तसा अंकुर.

———०———

अनुष्टुभ्

यौवनं धनसंपत्तिः प्रभुत्वमविवेकिता ।
एकैकमप्यनर्थाय किमु यत्र चतुष्टयम् ? ॥ १२ ॥

इन्द्रवज्रा

तारुण्य अंगीं, धन संपदा ती
सत्ताहि मोठी, अविवेक चित्तीं ॥
एकेक हीं घोर अनर्थदायी
एकत्र चारी तिथ काय होई ? ॥ १२ ॥

गद्यार्थ—

तारुण्य, संपत्ति, सत्ता, अविचारीपणा हीं एक एक सुद्धां अनर्थकारक आहेत. मग हीं चारहि ज्या मनुष्यांत एकत्र असतील तेथें काय विचारावें?

———०———

उपजाति

एकातपत्रं जगतः प्रभुत्वं
नवं वयः कान्तमिदं वपुश्च ॥
अल्पस्य हेतोर्बहु हातुमिच्छन्
विचारमूढः प्रतिभासि मे त्वम् ॥१३॥

इन्द्रवज्रा

ही एकछत्री प्रभुता जगाची
तारुण्य अन् सुंदरता तनूची ॥
थोड्याचिसाठीं बहु सोडणारा
तूं मूर्खची भाससि हे नृपाळा ॥ १३ ॥

गद्यार्थ—

( मूळ श्लोक निराळ्या संदर्भांत दिलीपासंबंधीं आहे. पण थोड्या लाभासाठीं बहु सोडूं नये या राजनीतितत्त्वासाठीं हा घेतला आहे. ) हे राजा, साऱ्या जगाचें एकछत्री राज्य, तारुण्य आणि हा सुंदर देह, हीं एवढीं सर्व, अल्पशा लाभासाठीं सोडणारा तूं, मला अविचारी दिसतोस.

———०———

अनुष्टुभ्

जानन्ति पशवो गन्धाच्छ्रुताज्जानन्ति पंडिताः ।
चाराज्जानन्ति राजानश्चक्षुर्भ्यामितरे जनाः ॥ १४ ॥

अनुष्टुभ्

जाणती पशु वासानें सुज्ञ जाणे श्रुतींतुन ।
हेरांनीं जाणती राजे डोळ्यांनीं इतरे जन ॥ १४ ॥

गद्यार्थ—

पशूंना इतर वस्तूंचें ज्ञान हुंगून होतें, विद्वानांना वेदांतून, राजांना हेराच्या द्वारां, इतरांना डोळ्यांनीं होतें.

———०———

आर्या

अबला यत्र प्रबला
बालो राजा निरक्षरो मन्त्री ।
नहि नहि तत्र धनाशा
जीवितुमाशापि दुर्लभा भवति ॥ १५ ॥

आर्या

स्त्रीचें प्राबल्य जिथें,
मंत्री अज्ञान बाल नृप जेथें ।
लवहि तिथें न धनाशा
जीवित आशाहि कोठली तेथें ? ॥ १५ ॥

गद्यार्थ—

जेथें स्त्रीचें प्राबल्य, मंत्री अज्ञ, राजा बालवयाचा तेथें धन मिळण्याची आशा नाहींच पण जगण्याची सुद्धां नाहीं.

———०———

अनुष्टुभ्

यथा ह्यनुदका नद्यो यथा वाप्यतृणं वनम् ।
अगोपाला यथा गावस्तथा राष्ट्रमराजकम् ॥ १६ ॥

अनुष्टुभ्

नद्या जशा जळावीण, तृणावीण जसें वन ।
गोपावीण जशा गाई तसें राष्ट्र नृपाविण ॥ १६ ॥

गद्यार्थ—

राष्ट्राला राजा नसणें म्हणजे नद्या जलविहीन असणें, गवताशिवाय रान असणें व गोपालावांचून गाई असणें.

———०———

अनुष्टुभ्

नाराजके जनपदे स्वकं भवति कस्यचित् ।
मत्स्या इव जना नित्यं भक्षयन्ति परस्परम् ॥ १७ ॥

अनुष्टुभ्

अराजक न राष्ट्रांत स्वीय कोणी कुणाप्रति ।
नित्य मत्स्यापरी लोक एकामेकांस भक्षिती ॥ १७ ॥

गद्यार्थ—

अराजक राष्ट्रांत कोणाला कोणी स्वकीय असें मानीत नाहीं. सारे लोक नेहमीं मत्स्यांप्रमाणें एकामेकास खातात.

---

इन्द्रवज्रा

भानुः सकृद्युक्ततुरङ्ग एव
रात्रिंदिवं गन्धवहः प्रयाति ॥
शेषः सदैवाहितभूमिभारः
षष्ठांशवृत्तेरपि धर्म एषः ॥ १८ ॥

उपजाति

रवी सदा जोडुनि अश्व, सिद्ध
वारेहि रात्रंदिन वाहतात ॥
धरी सदा शेषहि भूमिभार
नृपांसही धर्म असाच थोर ॥ १८ ॥

गद्यार्थ—

रवि कायमचाच घोडे जोडून सिद्ध असतो; वारा रात्रंदिवस वाहत असतो, शेष पृथ्वीचा भार डोक्यावर नेहमींच धरून राहतो, तसेंच राज्यांतील प्रजेच्या उत्पन्नाचा षष्ठांश घेणाऱ्या राजाला हेंच कर्तव्य, (त्यानें सतत, प्रजापालनात खंड पडूं देतां कामा नये.)

---

रथोद्धता

सुप्रसन्नवदनस्य भूपतेः
यत्र यत्र विलसन्ति दृष्टयः ॥
तत्र तत्र शुचिता कुलीनता
दक्षता सुभगता च गच्छति ॥ १९ ॥

रथोद्धता

सुप्रसन्न वदनेंचि भूपति
जेथ जेथ निजदृष्टि टाकिती ॥
तेथ तेथ शुचिता कुलीनता
जातसे सुभगता नि दक्षता ॥ १९ ॥

गद्यार्थ—

जेथें जेथें सुप्रसन्नवदन राजाची दृष्टि पडेल तेथें तेथें पावित्र्य, कुलीनता, सौभाग्य व दक्षता जात असते.

---

वंशस्थ

स किंसखा साधु न शास्ति योऽधिपं
हिताञ्च यः संशृणुते स किंप्रभुः ।
सदानुकूलेषु हि कुर्वते रतिं
नृपेष्वमात्येषु च सर्वसंपदः ॥ २० ॥

वंशस्थ

कुमित्र तो, युक्त नृपा न जो वदे
कुभूप तो, जो न हितास कान दे ॥
मिळून राजे नि अमात्य जे सदा
रहाति, त्यां भेटति सर्व संपदा ॥ २० ॥

गद्यार्थ—

राजाला योग्य सल्ला देत नाहीं तो वाईट मित्र, व हिताचें सांगणाराचें जो ऐकत नाहीं तो वाईट राजा! एकामेकाला अनुकूल होऊन सदा राहणाऱ्या नृपांना व अमात्यांना सर्व संपदा भेटतात.

---

अनुष्टुभ्

सुलभाः पुरुषा राजन् ! सततं प्रियवादिनः ।
अप्रियस्य च पथ्यस्य वक्ता श्रोता च दुर्लभः ॥२१॥

अनुष्टुभ्

नित्य प्रिय वदे, ऐसे सुकाळाचे नृपा नर ।
पथ्य अप्रिय शब्दांचा वक्ता श्रोताहि दुर्मिळ ॥ २१ ॥

गद्यार्थ—

हे राजा! नेहमीं तुला आवडेल तेंच बोलणारे, पुष्कळ भेटतील. पण, कडू पण हिताचें बोलणारा, व ऐकणारा, दोन्ही दुर्मिळ.

---

मालिनी

नरपतिहितकर्ता द्वेष्यतां याति लोके
जनपदहितकर्ता त्यज्यते पार्थिवेन ॥
इति महति विरोधे वर्तमाने समाने
नृपतिजनपदानां दुर्लभः कार्यकर्ता ॥२२॥

मालिनी

नृपहित बघतो तो द्वेष्य वाटे जनांस
जनहित करतो तो त्याज्य होतो नृपास ॥
उलटसुलट कार्यें होति ऐशीं म्हणून
नृप,जन,उभयांचा कार्यकर्ता कठीण ॥ २२ ॥

गद्यार्थ—

राजाचें हित करणाऱ्याचा लोक द्वेष करतात, उलट लोकांचें हित करणाऱ्याचा, राजा त्याग करतो, अशा तऱ्हेनें उभय हितसंबधांत मोठाच विरोध असल्यानें राजा व प्रजा दोघांचेंहि एकसमयावच्छेदेंकरून हित करणारा सांपडणें कठीण।

———०———

वसततिलका

आसन्नमेव नृपतिर्भजते मनुष्य
विद्याविहीनमकुलीनमसस्कृतं वा ॥
प्रायेण भूमिपतयः प्रमदा लताश्च
यः पार्श्वतो भवति तं परिवेष्टयन्ति ॥२३॥

वसततिलका

मैत्री करी नृप, समीप असेल त्याशीं
कोण्या अविद्य, अकुलीन, असंस्कृतासी ॥
प्रायें स्त्रिया, नृप, लता, अवघ्या जगांत
जें सापडे जवळि त्यासचि वेष्टितात ॥ २३ ॥

गद्यार्थ—

साधारण, नेहमी, जवळ जो कोणी असेल, मग तो अविद्य, अकुलीन, किंवा, असंस्कृत, कसा का असेना, त्याला राजे आपला मित्र करतात (पण हा क्रम केवळ राजांपुरता मर्यादित नाहीं तर), प्राय स्त्रिया, तरुणी, व वेली, या, जवळ असेल त्यालाच, विळखा घालतात

———०———

अनुष्टुभ्

अविद्वानपि भूपालो विद्यावृद्धोपसेवया ।
परां श्रियमवाप्नोति जलासन्नतरुर्यथा ॥ २४ ॥

अनुष्टुभ्

ज्ञानवृद्धास सेवोनी अविद्वान हि भूपति ।
नदीकाठीं जसे वृक्ष, पावतात महोन्नति ॥ २४ ॥

गद्यार्थ—

मूळचे अविद्वान राजे, नदीकाठचीं झाडें ज्याप्रमाणें पुष्कळ फोफावतात त्याप्रमाणें विद्यावृद्ध, ज्ञानवृद्ध, अशाच्या सहवासानें चांगले उन्नत होतात

———०———

अनुष्टुभ्

परोऽपि हितवान्बन्धुर्बन्धुरप्यहितः परः ।
अहितो देहजो व्याधिर्हितमारण्यमौषधम् ॥ २५ ॥

वसततिलका

बंधू परास म्हण, जो हित आचरीतो
ना बंधु, तो परचि, जो अहिता करी तो ॥
देहांतले म्हणुनि रोग न ते हिताचे
रानांतले असुनि औषध हो हिताचें ॥ २५ ॥

गद्यार्थ—

परकाहि, जर तुझें हित करील, तर त्यास बधु कर, उलट तुझा बधुहि जर अहित करील असेल, तर त्याला परका मानणेंच इष्ट आहे आपल्या स्वत ःच्या देहांत जन्मला म्हणून रोग आपला हितकर्ता नव्हे, उलट औषध रानांत जन्मलें म्हणून काय झालें? तें जर आपलें हित करते, तर त्यालाच स्वकीय मानणें इष्ट व रोगांना परके

———०———

अनुष्टुभ्

न कश्चिच्चण्डकोपानामात्मीयो नाम भूभुजाम् ।
होतारमपि जुह्वानं स्पृष्टो दहति पावकः ॥ २६ ॥

अनुष्टुभ्

कोणी रागीट राजाला आपुला न म्हणतो ।
दे आहुती तरी होत्या अग्नि स्पर्शेंच पोळतो ॥ २६ ॥

गद्यार्थ —

रागीट राजाला स्वकीय असें कोणी वाटत नाहीं आहुति देणाऱ्या होत्याला, हात लागतांच अग्नि भाजण्याचें सोडीत नाहीं त्याला कांहीं आत्मीय समजत नाहीं

———०———

अनुष्टुभ्

यमाश्रित्य न विश्रामं क्षुधार्ता यान्ति सेवकाः ।
सोऽर्कवन्नृपतिस्त्याज्यः सदा पुष्पफलोऽपि सन् ॥२७॥

अनुष्टुभ्

ज्या सेवितां न विश्रांति भुकेल्या सेवकां मिळे ।
रुईपरी नृप त्याज्य सदा जरि फुलें फळें ॥ २७ ॥

गद्यार्थ—

ज्या राजाची सेवा करितांना भुकेल्या सेवकांना विश्रांति सुद्धां मिळत नाहीं तो सदा फुलें फळें असलेल्या रुईच्या झाडाप्रमाणें त्याज्यच !

———०———

अनुष्टुभ्

यः कृत्वा सुकृतं राज्ञो दुष्करं हितमुत्तमम् ।
लज्जया वक्ति नो किंचित्तेन राजा सहायवान् ॥२८॥

आर्या

दुष्कर थोर हिताचें राजाचें कार्य जो करोनीही ।
लाजुनि योलेन मुळीं, सहायवान् नृपति त्यामुळें होई

गद्यार्थ—

जो नोकर म्हणा, मित्र म्हणा, राजाचें कांहीं अवघड हिताच करून सुद्धां, लाजेनें, कांहीं बोलत नाहीं, त्यामुळें राजाला आपला साहाय्यकर्ता भेटल्यासारखें होतें.

———०———

उपजाति

नियुक्तहस्तार्पितराज्यभारा—
तिष्ठन्ति ये सौधविहारसाराः ॥
बिडालवृन्दार्पितदुग्धपूराः
स्वपन्ति ते मूढधियः क्षितीन्द्राः ॥ २९ ॥

इन्द्रवज्रा

भृत्यांकरीं देउनि राज्यभार
गच्चीवरी जे करिती विहार ॥
दुग्धा बिडालांवर सोंपवून
ते मूर्ख राजे असती निजून ॥ २९ ॥

गद्यार्थ—

नोकरांवर सर्व राज्याचीं कामें सोंपवून जे राजे सुखोपभोग घेत गच्चीवर विहार करतात, ते, जणूं काय, मांजरांच्या टोळक्यावर दूध ( मांमाळवयाचें धाम ) सोंपवून झोपलेल्या माणसासारखे मूर्ख होत.

———०———

शार्दूलविक्रीडित

एकं भूमिपतिः करोति सचिवं राज्ये प्रमाणं यदा
तं मोहाच्छ्रयते मदः स च मदालस्येन निर्भिद्यते ॥
निर्भिन्नस्य पदं करोति हृदये तस्य स्वतंत्रस्पृहा
स्वातंत्र्यस्पृहया ततः स नृपतेः प्राणान्तिकं द्रुह्यति ॥ ३० ॥

शार्दूलविक्रीडित

मंत्र्या एक गणी प्रमाण अपुल्या राज्यांत राजा जधीं
मोहें त्या मद येतसे, मग मदालस्यें चळे मंदधी ॥
मागोनी हृदयांत त्या हळुंहळूं स्वातंत्र्य इच्छा शिरे
स्वातंत्र्येच्छु करी पुढें नृपतिशीं प्राणांतिक द्रोह रे ३०

गद्यार्थ—

राजा जेव्हां, ( आपल्या राज्यांतल्या इतर सर्व सल्लागारांना सोडून, ) एकाद्या एकट्याच मंत्र्याला, प्रत्येक बाबतींत, प्रमाण मानूं लागतो, तेव्हां त्या मंत्र्याला, आधीं मोह, मग मद, उत्पन्न होऊन, त्याची बुद्धि चळते, राजनिष्ठा भंगते व तशा स्थितींत, त्याच्या मनांत ( राजाला बाजूला सारून ) आपणच स्वतंत्र व्हावें, अशी लालसा उत्पन्न होते.....व स्वातंत्र्येच्छा झाली कीं तो राजाचा प्राणांतिक द्रोह करूं लागतो.

———०———

वंशस्थ

नराधिपा नीचजनानुवर्तिनो
बुधोपदिष्टेन न यान्ति ये पथा ॥
विशन्त्यतो दुर्गममार्गनिर्गमं
समस्तसंबाधमनर्थपंजरम् ॥ ३१ ॥

उपजाति

नीचानुगामी नृप सज्जनांचें-
न ऐकतांना कुपथेंच साचे ॥
जाती महासंकटपंजरांत
जा ये महादुष्कर होइ ज्यांत ॥ ३१ ॥

गद्यार्थ—

नीचांच्या ओंजळीनें पाणी पिणारे राजे, सज्जनांनीं उपदेशिलेल्या मार्गानें न जातां, वाईट मार्गानें जाऊन, शेवटीं, अशा भयंकर संकटांच्या पिंजऱ्यांत जाऊन पडतात, कीं, त्यांत जाणें किंवा बाहेर पडणें कठीण !

———०———

शिखरिणी

नृपः कामासक्तो गणयति न कार्यं न च हितं
यथेच्छं स्वच्छन्दश्चरति किल मत्तो गज इव ॥
ततो मानाध्मातः पतति तु यदा शोकगहने
तदा भृत्ये दोषान् क्षिपति न निजं वेत्त्यविनयम् ॥३२

शिखरिणी

हिता, कार्या, नाहीं गणित नृप, कामान्ध जधिं तो
मदाच्या धुंदीनें गजसम अनिर्बंध फिरतो।
फुगोनी गर्वानें मग जधिं महापत्तिस भजे
म्हणे भृत्यां दोषी परि न निज औद्धत्य उमजे ॥ ३२ ॥

गद्यार्थ—

राजा कामान्ध झाला, कीं, तो, कर्तव्य काय, हिताचें काय, याचा विचारच करीत नाहीं, तर, मदोन्मत्त हत्तीसारखा उच्छृंखलपणें संचार करतो. मग जेव्हा गर्वानें फुगून महासंकटात सांपडतो, तेव्हां, तो या सर्वांचा दोष नोकरावर टाकून, मोकळा होतो. पण, स्वत च्या औद्धत्यामुळें हें सर्व ओढवलें, ही गोष्ट उमजत नाहीं ॥

—०—

शिखरिणी

अवज्ञानात्प्राज्ञो भवति मतिहीनः परिजन–
स्ततस्तत्प्रामाण्याद्भवति न समीपे बुधजनः ।
बुधैस्त्यक्ते राज्ये न हि भवति नीतिर्गुणवती
विपन्नायां नीतौ सकलमवशं सीदति जगत् ॥ ३३ ॥

शिखरिणी

अवज्ञेनें, वेडा करिति जधिं सुज्ञा परिजना
वघोनी तें, येई बुध कुणिहि राजांजवळ ना।
बुधत्यागें, राज्यीं गुणचि नयनीतीप्रति नसे
अशा नीतिभ्रंशीं अगति जग सारें बुडतसे ॥ ३३ ॥

गद्यार्थ—

राजानें प्रथम, एखाद्या शहाण्या नोकराचा अपमान करून त्याला गाढव ठरविलें, कीं, त्या उदाहरणानें कानाला खडा लावून घेऊन, कोणीहि सुज्ञ, राजाच्या जवळ फिरकेनासा होतो. शहाण्यांनीं राज्यकारभारांतून मन काढून घेतलें, कीं, राज्यांत नीतीला किंमत रहात नाहीं, व नीतिभ्रष्टता आली, कीं अगतिकपणें सारें राज्य ( जगच ) नष्ट होतें.

—०—

उपजाति

सद्वंशजातं गुणकोटियुक्तं
धनुः कथं पार्थिव ! वामहस्ते ? ।
शरः परप्राणविहारदक्षः
सपक्षपातोऽप्यधमो गरीयान् ! ॥ ३४॥

वसंततिलका

सद्वंशजात धनु कोटिगुणेंहि युक्त
राजा ! कसें धरिसि वामचि तें करांत ?॥
जो अन्यघात करितो नि सपक्षपात
तो बाण नीच, धरिसी उजव्या करांत ! ॥ ३४ ॥

गद्यार्थ—

( राजानें तारतम्य न दाखवितां नीचाला मोठें पद व सुपात्र माणसाला हलकें पद दिल्याबद्दल रूपकानें त्याची कान उघाडणी मंत्री करीत आहे. ) यांत संस्कृतमधल्या चिरपरिचित कोट्या आहेत—सद्वंशजात=चांगल्या वेळूचें केलेलें, दुसरा अर्थ चांगल्या कुळांत जन्मलेला. गुणकोटियुक्त=दोरी आणि ( धनुष्याचें ) टोंक असलेलें, दुसरा अर्थ कोट्यवधि गुणांनीं युक्त, सपक्षपात— ( बाणाला पिसें लावतात त्या ) पिसांनीं युक्त, दुसरा अर्थ वर्तनानें पक्षपाती. हे राजा तू गुणकोटियुक्त सद्वंशजात असें धनुष्य ( असा सत्पात्र माणूस ) डाव्या हातांत धरतोस ( हलक्या स्थानीं नेमतोस ) हें कसें काय योग्य ? आणि जो नीच बाण परक्याचा प्राणघाती व सपक्षपात ( क्रूर व पक्षपाती माणूस ) त्याला तूं उजव्या हातांत घेतोस ( उच्च पदीं नेमतोस ) हें आणखी एक अनुचित कर्म नव्हे काय?

—०—

अनुष्टुभ्

सकृज्जल्पन्ति राजानः सकृज्जल्पन्ति पंडिताः ।
सकृत्कन्याः प्रदीयन्ते त्रीण्येतानि सकृत् सकृत् ॥३५।

अनुष्टुभ्

एकदां बोलती राजे वदती सुज्ञ एकदां ।
एकदां दान कन्येचें-हीं तिन्हीं एकएकदां ॥ ३५ ॥

गद्यार्थ—

राजे एकदा बोलतात; पंडित एकदा बोलतात व कन्यादान एकदा करतात. या तिन्ही गोष्टी एकएकदा घडतात. ( "राजे दुसऱ्यांदा बोलत नसतो" अशा अर्थीं हें वचन नसून राजे हेकेखोर असतात; एकदां बोलले ते बोलले ! इतकाच अर्थ. )

—०—

अनुष्टुभ्

राज्ये न हि सुखं, दुःखं संधिविग्रहचिन्तया ।
पुत्रादपि भयं यत्र, तत्र सौख्यं हि कीदृशम् ? ॥३६॥

आर्या

तह, युद्ध चिंतिल्यानें
दुःखचि, सुख नैच राज्य करण्यांत ।
भय जिथ पुत्राकडुनिहि,
नृपास सुख कोणतें अशा स्थितित ? ॥ ३६ ॥

गद्यार्थ—

राज्य करण्यात सुख नाहींच, तह युद्ध यांच्या चिंतेनें सारखें दुःख जेथें पुत्रापासूनसुद्धा भय उत्पन्न होण्याचा संभव तेथ सुख कसलें असणार?

———०———

अनुष्टुभ्

न कश्चित्कस्यचिन्मित्रं न कश्चित्कस्यचिद्रिपुः ।
कारणेन हि जायन्ते मित्राणि रिपवस्तथा ॥ ३७ ॥

अनुष्टुभ्

मित्र कोणी न कोणाचा, शत्रु वा न च सर्वदा ।
कारणांनीच होतात मित्र वा शत्रु ते सदा ॥ ३७ ॥

गद्यार्थ—

कोणीहि कोणाचाहि ( नित्याचा ) मित्र नाहीं, कोणी कोणाचा ( नित्य ) शत्रु नाहीं शत्रु काय, मित्र काय, दोन्ही कारणा कारणांनीं होत असतात

———०———

अनुष्टुभ्

वैरिणा न हि संदध्यात्सुश्लिष्टेनापि संधिना ।
सुतप्तमपि पानीयं शमयत्येव पावकम् ॥ ३८ ॥

अनुष्टुभ्

न संग धर शत्रूशीं संधिनें बांधला जरी ।
विझवी अग्निला पाणी, कितीही तापले तरी ॥ ३८ ॥

गद्यार्थ—

तहाच्या अटींनीं दृढबद्ध असला तरी शत्रूशीं फार जवळीक करू नको ( तू अग्नि तर तो पाणी, ) पाणी कितीहि तापवलं तरी अग्नीला विझविल्याशिवाय राहील काय?

———०———

अनुष्टुभ्

विपक्षमखिलीकृत्य प्रतिष्ठा खलु दुर्लभा ।
अनीत्वा पङ्कतां धूलिमुदकं नावतिष्ठते ॥ ३९ ॥

अनुष्टुभ्

खिळखिळी न रिपूला, त्या अशक्य चढणे वर ।
धुळीला पंक ना केलें, ठरे न जळ तोंवर ॥ ३९ ॥

गद्यार्थ—

शत्रूला तुडवून नीट जमिनीला खिळून ठेवलं नाहीं, तोवर, कोणालाहि, मोठ्या पदाला चढता येत नाहीं धुळीचा चिखल करून टाकल्याशिवाय, पाण्याला मातीवर स्थिरता येत नाहीं ।

———०———

अनुष्टुभ्

विधाय वैरं सामर्षे नरोऽरौ य उदासते ।
गृहीत्वोदर्चिषं कक्षे शेरते तेऽभिमारुतम् ॥ ४० ॥

अनुष्टुभ्

सुनशी शत्रुशीं वैर धरोनी स्वास्थ्य जो भजे ।
कुशींत अग्नि घेवोनी वाऱ्यासन्मुख तो निजे ॥ ४० ॥

गद्यार्थ—

सुनशी शत्रूशीं वैर धरून, स्वस्थपण राहणें म्हणजे कुशींत विस्तव घेऊन, वाऱ्यासमोर निजण्यासारखें आहे

———०———

आर्या

ऋणशेषश्चाग्निशेषः शत्रुशेषस्तथैव च ।
पुनः पुनः प्रवर्धन्ते तस्माच्छेषं न रक्षयेत् ॥ ४१ ॥

आर्या

उरलेलें ऋण, विस्तव,
उरला सुरला तसाच रिपुही या ।
वाढति पुन पुन्हां हे
याचा लेशहि कधीं न उरवाचा ॥ ४१ ॥

गद्यार्थ—

( कर्ज बहुतेक फेडून झालें आहे, ) थोडें उरलें आहे, ते फेडू सावकाश, म्हणून उरू दिलें, कीं ते वाढलेंच म्हणून समजा ( विस्तव विझविला आहे, ) थोडीशी ठिणगी राहिली आहे,-विझेल आपोआप,-म्हणून हयगय केली, का, त्या ठिणगीचा पुन्हां विस्तव होऊन बसतो तसेंच शत्रूचहि ( शत्रूला तुडवला

———०———

आहे, ) आता, अगदीं नि पात जरी केला नाहीं, तरी तो पुन्हां कमचा उठतो? म्हणून सोडून दिला, की, तोच पुन्हा बलवान् होतो ( हा अनुभव पृथ्वीराज चव्हाणाला आलाच ! ) म्हणून ऋण, विस्तव व शत्रू याचे शेष उरू देऊ नयेत

———०———

उपजाति

न तत्तरेद्यस्य न पारमुत्तरे-
न्न तद्धरेद्यत्पुनराहरेत्पुरः ।
न तत्खनेद्यस्य न मूलमुद्धरे-
न्न तद् वध्याद्यस्य शिरो न पातयेत् ॥४२॥

शार्दूलविक्रीडित

ज्यान्या पार न आवया वळ तुला
तूं त्यांत पोहूं नये
राहे दत्त पुनश्च येउनि पुढे—
त्यातें हरूं तूं नये ।
मूळापासुनि जें नसे उपटणें
त्यातें खणूं तूं नको
ज्याचें ना शिर तोडणें तुज रुचे
त्या घाव घालूं नको ॥ ४२ ॥

गद्यार्थ—

( ज्या पाण्यात ) ज्यात पलीकडच्या तीराला तू जाऊ शकत नगशील, त्यांत पहू नको ! ज्याच हरण केल, तरी, पुनश्च दत्त म्हणून जे उभें राहणारच, त्याच हरण करीत बमू नको ! मूळागवर जं खणावयाचें नसेल ते खणूं नको ज्याचें मस्तक तोडावयाचें नसेल त्यावर प्रहार करू नका

———०———

अनुष्टुभ्

नात्यन्तं सरलैर्भाव्यं गत्वा पश्य वनस्थलीम् ।
छिद्यन्ते सरलास्तत्र कुब्जास्तिष्ठन्ति पादपाः ॥ ४३ ॥

अनुष्टुभ्

व्हावें सरल ना फार, पहा हृदयें वनांत तीं ।
तोडिती मात्र सरलां वक्र झाडेचि वांचतीं ॥ ४३ ॥

गद्यार्थ—

फार क गरळ होऊं नये. याचा दृष्टांत रानांत जाऊन पहा सरळ झाडें तेवढी तोडिली जातात वाकडी तेवढी स्थिर राहतात

———०———

वंशस्थ

व्रजन्ति ते मूढधियः पराभवं
भवन्ति मायाविषु ये न मायिनः ।
प्रविश्य हि घ्नन्ति शठास्तथाविधा-
नसंवृताङ्गान्निशिता इवेषवः ॥ ४४ ॥

इंद्रवंशा

जातीच हो मूढ पराभवास ते
शठांसि जे शाठ्य न दावितीच ते ॥
तीक्ष्णेषु अंगीं उघड्या, जसा घुसे
भोळ्यां जनां दुष्टहि मारिती तसे ॥ ४४ ॥

गद्यार्थ—

जे कोणी शठास शठ होऊन वागत नाहींत ते मूर्ख पराभवाप्रत जातात अरक्षित उघड्या अंगांत ( शठं प्रति शाठ्यं हें चिलखत नस यान ) तीक्ष्ण बाण जसे घुसतात, तसे भोळ्या जनाच्या पोटात शिरून शठ त्याना मारीत असतात!

———०———

उपजाति

उपेक्षितः क्षीणबलोऽपि शत्रुः
प्रमाददोषात्पुरुषैर्मदान्धैः ।
साध्योऽपि भूत्वा प्रथमं ततोऽसा-
वसाध्यतां व्याधिरिव प्रयाति ॥ ४५ ॥

उपजाति

प्रमाददोषें मनुजे मदान्धें
उपेक्षितां दुर्बल शत्रुही तो ।
सुसाध्य आधीं असुनीहि अंतीं
रोगापरी पूर्ण असाध्य होतो ॥ ४५ ॥

गद्यार्थ —

दुर्बळ असा शत्रु, माणसान आपल्या ढिलेपणान, किंवा, मदान्ध झान, उपेक्षिला तर, आधी, साध्य असूनदेखील रोगाप्रमाणें तो पुढ असाध्य होतो

———०———

अनुष्टुभ्

यद्देदमित्रं स्कंधेन यावत्कालविपर्ययः ।
अथैनमागते काले भिन्द्याद्घटमिवाश्मनि ॥ ४६ ॥

अनुष्टुभ्

घ्यावा खांद्यावरी शत्रु पडता काळ जोंवरी।
संधि येतांचि फोडावा घडा जैसा शिळेवरी ॥ ४६ ॥

गद्यार्थ—

आपला पडता काळ असेल, तोंवर, नम्र तर, शत्रूला खांद्यावर घ्यावा, पण योग्य वेळ येतांच मातीचा घडा जसा शिळेवर फोडावा, तसा ठार मारावा

———०———

अनुष्टुभ्

कौर्मं संकोचमास्थाय प्रहारानपि मर्षयेत् ।
प्राप्ते काले च मतिमानुत्तिष्ठेत्क्रूरसर्पवत् ॥ ४७ ॥

अनुष्टुभ्

आत्मसारें जणू कूर्म, सोसावे घावही उरीं ॥
उठावें योग्य काळानें सुखें कृष्णोरगापरी ॥ ४७ ॥

गद्यार्थ—

पडता काळ असेतोंवर, कांसवासारखें अंग आखडून, वर घावहि सोसून घ्यावे आणि, योग्य संधि आली, कीं, महाण्यान, काळ्या सापासारखे (फणा काढून) उठावें

———०———

अनुष्टुभ्

भूमिर्मित्रं हिरण्यं वा विग्रहस्य फलत्रयम् ।
नास्त्येकमपि यद्येषां न तत्कुर्यात्कथं च न ॥ ४८ ॥

अनुष्टुभ्

फळें तीनचि युद्धाचीं, भूमि वा मित्र वा धन ।
ज्यानें न एकही लाभे करावें तें कधींच न ॥ ४८ ॥

गद्यार्थ—

नवीन प्रांत मिळविणें, नवे मित्र (किंवा पराजित शत्रूच मित्र) होणें, किंवा संपत्ति मिळविणें, हीं तीन युद्धाचीं फळें असतात यांपैकी एकहि लाभ उत्पन्न होत नसेल तर तें युद्ध कधीच करूं नये

———०———

अनुष्टुभ्

उपकारगृहीतेन शत्रुणा शत्रुमुद्धरेत् ।
पादलग्नं करस्थेन कण्टकेनेव कण्टकम् ॥ ४९ ॥

आर्या

उपकारें वश केल्या रिपुकडुनी अन्य शत्रु मारावा।
कण्टक पदस्थ जैसा करांत कण्टक धरूनि काढावा ॥ ४९ ॥

गद्यार्थ—

एका शत्रूस उपकारास मारावें व त्याच्या हातून दुसऱ्या शत्रूस मारावें. हातांत कांटा घेऊन त्या पायांतील कांटा आपण काढतो ना? तसें

———

अनुष्टुभ्

यत्रात्मीयो जनो नास्ति भेदस्तत्र न विद्यते ।
कुठारैर्दण्डनिर्मुक्तैर्छिद्यन्ते तरवः कथम् ? ॥ ५० ॥

अनुष्टुभ्

घरभेद्या नसे जेथें । फूट होईच ना तिथें ॥
दाड्याविना कुऱ्हाडीनें । वृक्ष ते केवि तोडणे ? ॥ ५० ॥

गद्यार्थ—

शत्रूच्या राज्यांत जर 'आपला माणूस' म्हणजे घरभेद्या नसेल तर तेथ फूट पाडणें किंवा गुप्त बातमी मिळणें शक्य नाहीं. जर कुऱ्हाडीस (लांकडी) दांडा नसेल, तर झाडें कशीं तोडतां येतील ? (झाडांच्या लांकडाचा, कुऱ्हाडीचा लाकडी दांडा तोडण्यास कारणीभूत होतो यावरूनच 'कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ' अशी म्हण पडली आहे )

———

अनुष्टुभ्

क्षत्रियस्योरसि क्षत्रं पृष्ठे ब्रह्म व्यवस्थितम् ।
तेन पृष्ठं न दातव्यं पृष्ठदो ब्रह्महा भवेत् ॥ ५१ ॥

अनुष्टुभ्

क्षत्रियाच्या उरीं क्षत्र, पृष्ठीं ब्रह्म वसे सर्वी—
रणीं पृष्ठ न दावावें, दावी तो ब्राह्मणा वधी ॥ ५१ ॥

गद्यार्थ—

क्षत्रियाच्या छातींत क्षात्र तेज व पाठींत ब्राह्मतेज वसलेलें असतें म्हणून क्षत्रियानें रणांत पाठ दाखवूं नये जो दाखवील त्याला अर्थातच ब्रह्महत्येचें पातक लागेल

———०———

शालिनी

आज्ञा कीर्तिः पालनं ब्राह्मणानां
दानं भोगो मित्रसंरक्षणं च ।
येषामेते षड्गुणा न प्रवृत्ताः
कोऽर्थस्तेषां पार्थिवोपाश्रयेण ? ॥ ५२ ॥

शालिनी

आज्ञा, कीर्ती, रक्षिणें विप्र मित्र
भोगोनीही दान देतां उदार।
साही हे ना साधती, ते कशास
सांगा जाती व्यर्थ राजाश्रयास ? ॥ ५२ ॥

गद्यार्थ—

राजाच्या आश्रयानें माणसानें सहा गोष्टी साधावयाच्या असतात लोकांकडून आपली आज्ञा पाळविणें, कीर्ति मिळविणें, ब्राह्मणाचें पालन करविणें, दान देण्याइतकी संपत्ति मिळविणें, उपभोग घेणें, मित्राचें संरक्षण करणें, हीं सहा ज्याला साधत नाहींत त्यानें राजाश्रय घेतल्याचा उपयोग काय?

———•———

शार्दूलविक्रीडित

दौर्मन्त्र्यान्नृपतिर्विनश्यति यतिः
सङ्गात्सुतो लालनाद्
विप्रोऽनध्ययनात्कुलं कुतनया-
च्छीलं खलोपासनात्।
ह्रीर्मद्यादनवेक्षणादपि कृषिः
स्नेहः प्रवासाश्रया-
न्मैत्री चाप्रणयात्समृद्धिरनयना-
त्त्यागात्प्रमादाद्धनम् ॥ ५३ ॥

शार्दूलविक्रीडित

दुर्मन्त्री नृप नष्ट होइ, यति हा संगें, नि लाडे सुत
स्वाध्यायाविण विप्र, वंश कुसुतें, सच्छील दुष्टां नत।
मद्यें लाज, न पाहतां कृपि, दुरी जातां टिके स्नेह न
मैत्री प्रीतिविना, समृद्धि अनयें, त्यागें प्रमादें धन ॥५३॥

गद्यार्थ—

वाईट मंत्री मिळाल्यानें राजा नष्ट होतो, संन्यासी, *(विषयांशी) संग ठेवल्यानें, मुलगा, लाड केल्यानें, ब्राह्मण,* अध्ययन न करण्यानें, कुल, वाईट पुत्रानें, सच्छील, दुष्टांसी नम्र राहण्यानें, लाज, दारु पिण्यानें, शेती, देखरेख न ठेवण्यानें, स्नेह, दूर जाण्यानें, मैत्री, प्रेम नसल्यानें, समृद्धि, अनीतीनें, आणि दान देण्यानें व गूर्खपणें वागल्यानें, धन नष्ट होतें

———•———

शिखरिणी

बहिः सर्वाकारप्रगुणरमणीयं व्यवहरन्
पराभ्यूहस्थानान्यपि तनुतराणि स्थगयति।
जनं विद्वानेकः सकलमनुसंधाय कपटै-
स्तटस्थः स्वानर्थान्घटयति च मौनं च भजते ॥ ५४ ॥

आर्या

बाहेरुनि गुणिजनवत्
सर्वांशीं गोड वृत्ति ठेवोनी।
वादामधें दुजाचे
लवही मुद्दे निरुत्तरचि करुनी ॥
कपटें सकल जनाला
सुज्ञपणें हा नियंत्रणीं धरितो।
राहुनि तटस्थ, साधी
स्वार्थ, पुन्हां वरुनि मौन हा भजतो ॥ ५४ ॥

गद्यार्थ—

( हें धूर्त मुत्सद्याचें वर्णन राजाला अनुकरणीय ) बाहेरुन सर्वांशीं, गुणांनीं मोहक, अशी वृत्ति ठेवतो, वादात दुसऱ्याचे बारीक सारीक मुद्देहि, समर्पक प्रत्युत्तरें देऊन, गप्प करुन टाकतो हा हुषारपणें, कपटानीं, सर्व जनाला नियंत्रणात ठेवून, तटस्थ राहून नीट आपलें उद्दिष्ट साध्य करुन, पुन्हा, वरुन आपलें मौन धारण करतो

———•———

शार्दूलविक्रीडित

दाक्षिण्यं स्वजने, दया परिजने, शाठ्यं सदा दुर्जने
प्रीतिः साधुजने, नयो नृपजने, विद्वज्जनेष्वार्जवम्।
शौर्यं शत्रुजने, क्षमा गुरुजने, नारीजने धूर्तता
ये चैवं पुरुषाः कलासु कुशलास्तेष्वेव लोकस्थितिः ॥ ५५ ॥

आर्या

आप्तां सौजन्य, दया
भृत्यांशीं, दुर्जनांसि दुष्टत्व।
साधूंशीं प्रीति, नृपां
नीति, नि विद्वज्जनांसि सरलत्व ॥
रिपुशीं शौर्य, गुरुजनीं
क्षमा, स्त्रियांशीं सुधूर्तता पुरती।
वृत्ति-कला कुशल असे
जे त्यांनीं स्थैर्य या वसे जगतीं ॥ ५५ ॥

गद्यार्थ—

आप्तांसी सौजन्य, नोकरांशीं मायाळूपणा, शठाशीं शठ्य, सज्जनांशी प्रेम, राजाशीं न्यायनीति, विद्वानांशीं निष्कपटीपणा, शत्रूशीं शौर्य, वडीलधाऱ्यांशी (त्यांचें कांहीं चुकलें तरी न चिडता) क्षमावृत्ति, स्त्रियांशी धूर्तपणा याप्रमाणें ज्याच्याशीं जसें वागावयास हवें, तसें उचित वागणारे वर्तनकलाकुशल असे जे कांहीं थोडे लोक असतात, त्यांच्यामुळें, या जगास स्थिरता येत असतें

———•———

# प्रकरण २५ वें

## राजस्तुति—शौर्य, सच्छील, विद्या, लक्ष्मी, कीर्ति, प्रजापालन, औदार्य, दातृत्व, गुणग्राहकता इत्यादि गुणांबद्दल.

संस्कृत कवितेमध्यें, हें एक अतिशय बहारदार प्रकरण आहे. शृंगाररसात्मक, किंवा अन्योक्तिपर कवितेच्या बरोबरीनें संस्कृत कवींनीं, राजस्तुतिपर कवितांतून, आपला सुंदर कल्पनाविलास, उत्प्रेक्षा, उपमा, अलंकार, शब्दचमत्कार, कोटि, श्लेष इत्यादि व्यक्त केलेले आहेत. विशेषेंकरून राजाश्रय, पुरस्कार इत्यादि मिळविण्यासाठीं, राजदरबारांतून, म्हणून दाखविण्यासाठीं, या रचिच्या अमग्याचा समव असल्यानें, या कविनांतून सफाई, व कौशल्य, विशेष स्वरूपात प्रकट झालेलें दिसेल. तुसऱ्या, समाजांतील विद्वान् किंवा रसिक यांच्या आधारावर, कवींना जगणें त्या कालांत अशक्य होतें–राजाश्रय हाच एकमेव आधार होता व म्हणूनच राजस्तुतीला एवढा फुलोरा आलेला दिसत आहे.

वाईट एवढेंच वाटतें कीं, या एवढ्या शब्दसामर्थ्याचा उपयोग, बऱ्याच प्रसंगीं, खोट्या अवास्तव स्तुतीसाठीं–व याचनेसाठीं केला जातो!

अनुष्टुभ्

सर्वदा सर्वदोऽसीति मिथ्या त्वं कथ्यसे बुधैः ।
नारयो लेभिरे पृष्ठं; न वक्षः परयोषितः ॥ १ ॥

अनुष्टुभ्

सर्वदा सर्व देशी तूं मिथ्या ही स्तुति कानिं ये ।
न देशी पाठ शत्रूंना आणि वक्ष परस्त्रिये ॥ १ ॥

गद्यार्थ—

(दोष दाखविण्याचा आभास उत्पन्न करीत गुणवर्णन करणें.) हे राजा! तूं सर्वकाळ सर्व कांहीं देतोस, अशी (दातृत्वाची) तुझी कीर्ति गाइली जाते, ती खोटी आहे (निदान दोन वस्तु तरी, तू कधींच देत नाहींस.) तू आपली पाठ कधीं शत्रूंना देत नाहींस; व, वक्षस्थळ, कधीं परस्त्रीला देत नाहींस. (तू शूर व सच्छील आहेस)

———०———

अनुष्टुभ्

सरस्वती स्थिता कण्ठे; लक्ष्मीः करसरोरुहे ।
कीर्तिः किं कुपिता राजन् येन देशान्तरं गता ? ॥२॥

अनुष्टुभ्

सरस्वती वसे कंठीं, लक्ष्मी करसरोरुहीं ।
कीर्ति कां कोपुनी राजा गेली देशान्तरास ही ? ॥२॥

गद्यार्थ—

हे राजा! तुझ्या कंठांत सरस्वती, व करकमळीं, लक्ष्मी रहात असल्यानें (त्याचा सवतीमत्सर वाटून किंवा स्वतःला योग्य स्थळीं राजानें न ठेवल्यामुळें) रागावून तुझी कीर्ति देशांतरास गेली कीं काय? (तू विद्वान् आहेस, धनवान् आहेस व तुझी कीर्ति देशोदेशीं गेली आहे)

———०———

इन्द्रवज्रा

कामं नृपाः सन्तु सहस्रशोऽन्ये
'राजन्वती' माहुरनेन भूमिम् ।
नक्षत्रताराग्रहसंकुलापि
ज्योतिष्मती चंद्रमसैव रात्रिः ॥ ३ ॥

इंद्रवज्रा

राजे सहस्रों जरि अन्य कोणी
'राजन्वती' भूमि तुझ्यामुळेंचि ।
नक्षत्रतारे कितिही असोनी
ज्योतिष्मती रात्रि शशीमुळेंचि ॥ ३ ॥

गद्यार्थ—

इतर सहस्रों राजे असले, तरी, 'राजन्वती' ही पदवी पृथ्वीला, या राजामुळेंच प्राप्त झाली आहे ("सुराज्ञि देशे राजन्वान् स्यात्ततोऽन्यत्र राजवान्" असें अमरकोश सांगतो म्हणजे नुसता राजा असलेल्या राज्यास, राजवान् म्हणतात. पण चांगला राजा असेल, त्या देशास राजन्वान् म्हणतात) म्हणजे सर्व भूतलावर या राजालाच काय तें चांगला राजा म्हणता येईल. ज्याप्रमाणें नक्षत्र, तारे, ग्रह यांनीं भरलेली असून सुद्धां रात्र ज्योतिष्मती (प्रकाशित) म्हणावयास चंद्र असणें आवश्यक चंद्रामुळेंच तिला ज्योतिष्मती म्हणतां येतें.

———०———

अनुष्टुभ्

राजंस्त्वत्कीर्तिचंद्रेण तिथयः पूर्णिमाः कृताः ।
मद्गेहान्न बहिर्याति तिथिरेकादशी भयात् ॥ ४ ॥

अनुष्टुभ्

कीर्तिचन्द्रें तुझ्या, राजा ! पूर्णिमा सगळ्या तिथी ।
भयें एकादशी, माझ्या घरा सोडी, कधीं न ती ॥४॥

गद्यार्थ—

हे राजा तुझ्या कीर्तिचन्द्रानें (त्याला कधी क्षय नसल्यानें तो नित्याचा पूर्णचंद्र असल्यानें) आमच्या पंचांगातल्या सर्वच तिथि पूर्णिमा करून टाकल्या आहेत त्यामुळें माझ्या घरातली एकादशी (खायला प्यायला नाहीं अशी अवस्था) भयानें घराबाहेरच पडत नाहीं (कारण गावांत सर्वत्र पूर्णिमा असल्यानें आज एकादशी असें म्हटलें तर मला लोक वेड्यांत काढतील) (म्हणजेच माझी दरिद्री अवस्था तू ध्यानांत घे कारण तुझी (दातृत्व) कीर्ति अविच्छिन्न आहे)

———०———

उपजाति

आकर्ण्य भूपाल यशस्त्वदीयं
विधूनयन्तीह न के शिरांसि ? ।
विश्वंभराभङ्गभयेन धात्रा
नार्पितौ कर्णौ भुजगेश्वरस्य ॥ ५ ॥

उपजाति

राजा ! तुझी ऐकुनि कीर्ति, शीर्षा
न हालवी, कोण असेल ऐसा ? ।
शेषावरोनी जग हें पडो न
नेदी विधी यास्तव त्यासि कान ॥ ५ ॥

गद्यार्थ—

हे राजा ! तुझी कीर्ति ऐकून (समाधानानें) डोकें हालवणार नाहीं असा कोण आहे ? तुझी कीर्ति ऐकून शेष हि डोकें हालवील व जग खालीं पडेल तसें होऊं नये म्हणून ब्रह्मदेवानें त्याला कान दिलेच नाहीत. (सर्पाला कर्णेन्द्रिय नाहीं हे प्रसिद्ध आहे)

———०———

अनुष्टुभ्

तव चेतसि हे राजन् द्वंद्वं तृणकणायते ।
क्रोधे विरोधिनां सैन्यं, प्रसादे कनकाचलः ॥६॥

अनुष्टुभ्

वस्तुद्वय तुझ्या लेखीं राजा, तृण अणूच तें ॥
क्रोधांत सैन्य शत्रूचें, स्वर्णराशी खुपीमधें ॥ ६ ॥

गद्यार्थ—

(मूल्यामूल्यविवेक तुला नसेल, असें कसें म्हणावें ? तर पण) हे राजा ! तुझ्या लेखीं, दोन वस्तु, तृणवत् व कणवत् आहेत तू रागावलास, म्हणजे, शत्रुसैन्याला तृणवत् (तुच्छ समजतोस व प्रसन्न झालास, म्हणजे, तू (याचकांना) खुशा सोन्याचा डोंगर देतोस आणि त्याला कणवत् (सूक्ष्म, क्षुद्र मानतोस (म्हणजे तू शूर व उदार आहेस)

———०———

मन्दाक्रान्ता

लज्जा कीर्तिर्जनकतनया शैवकोदण्डभङ्गे
तिस्रः कन्या निरुपमतया भेजिरे रामचंद्रम् ।
अन्त्या पाणिग्रहणसमये, ज्यायसी जातकोपा
भूपैः सार्धं खलु गतवती; मध्यमासौ दिगन्तान् ॥७॥

शार्दूलविक्रीडित

रामानें शिवचापभंग करितां
अत्यंत त्या मोहुनी
लज्जा कीर्ति नि जानकी हि
सजल्या त्यातें वराया तिन्ही ।
सीता-राम-विवाह तेथ घडतां,
लज्जा नृपांच्या सवें
कोपें जाय पळून; कीर्तिहि तशी
धांवे दिगन्तीं जवें ॥ ७ ॥

गद्यार्थ—

(जो न देखे रवि तो देखे कवि ! सीतास्वयंवराचे वेळीं रामाला वरण्यास, एकटी सीता उभी होती, असें जगा दिसलें, पण, कवीला दिसलें, कीं, त्यावेळीं तीन मुली उभ्या होत्या ) थोरली लज्जा, मधली कीर्ति, व धाकटी सीता धाक टीचें पाणिग्रहण झालें तेव्हां थोरली लज्जा रागावून (तेथे जमलेल्या अन्य ) राजांच्या बरोबर निघून गेली. कीर्ति (अजूनी एकटीच उरून) दिगन्तरांत नाचती झाली (शिवचाप करतां न आल्यानें इतर राजे लज्जित झाले व रामाची कीर्ति दिगन्तरांत पसरली.)

मन्दाक्रान्ता

किं वृत्तान्तैः परगृहगतैः किन्तु नाहं समर्थ-
स्तूष्णीं स्थातुं प्रकृतिमुखरो दाक्षिणात्यस्वभावः ।
देशे देशे विपणिषु तथा चत्वरे पानगोष्ठ्या-
मुन्मत्तेव भ्रमति भवतो वल्लभा देव ! कीर्तिः ॥ ८ ॥

मन्दाक्रान्ता

"बोलावी ना परकुलकथा;
मौन, वाटे, धरावें,
साधेना तें, अति बडबड्या
दक्षिणी मी स्वभावें ।
देशोदेशीं, विपणि नि चव्हा-
ट्यांत गुत्त्यांतुनी ती
राजा ! मत्तासम भटकते
त्वत्प्रिया" ! "कोण ?" "कीर्ति" ॥ ८ ॥

गद्यार्थ—

"हे राजा ! उगाच, कोणी झालें, तरी, परक्याच्या कुळ-कथा कशाला सांगाव्या ? म्हणून, एखवेळ वाटतें गप्प बसावें, पण, तें काहीं जमत नाहीं. कारण मी दक्षिणी (जगन्नाथ पंडित ?) व म्हणून स्वभावानेच बडबड्या ! (तेव्हां बोलून टाकतों झालें) हे राजा ! तुझी प्रिया, देशादेशांतून, बाजार-पेठांतून, चौकाचौकांतून आणि, दारूच्या गुत्त्यांतून उन्मत्ता-सारखी भटकत आहे" ! (हें ऐकून राजा खचकून विचारीत असेल—"कोण ! चुन्हा बोल" ! तेव्हां कवि आश्चर्याचा धक्का देत म्हणतो–) (नाहीं, दुसरें कोणी नाहीं) "तुझी कीर्ति !" (मराठींत धक्कागीत म्हणून म्हणतात तो पूर्वाचार होतोच)

मन्दाक्रान्ता

हस्ती वन्यः स्फटिकघटिते भित्तिभागे स्वबिम्बं
दृष्ट्वा, मत्वा प्रतिगज इति त्वद्द्विषां मन्दिरेषु ।
दन्ताघातादलितदशनस्तं पुनर्वीक्ष्य सद्यो
मन्दं मन्दं स्पृशति करिणीशङ्कया विक्रमार्क ! ॥ ९ ॥

आर्या

भिंतींत स्फटिकांच्या,
तव शत्रूंच्या सुमंदिरांतून ।
वाटे "अन्यचि गज हा"
वन्य गजाला स्वबिंब पाहून ॥
हे विक्रम ! धडकुनि तिथ
घेई गज तो स्वदंत भंगून; ।
बघुनि पुन्हां, करिणी ती
भासुनि गोंजारितो तिला जपुन ॥ ९ ॥

गद्यार्थ—

(राजाच्या शत्रूंची दुरवस्था वर्णन, राजाची महती गाण्याचा प्रकार.) हे विक्रमसूर्या ! तुझ्या शत्रूंच्या राजमंदिरातील स्फटिकांच्या भिंतीत, स्व तर्चें प्रतिबिंब पाहून, रानटी हत्तीस, तो दुसरा हत्ती वाटून, त्याने त्यावर धडक मारली, म्हणूनच त्यामुळें त्याचे दात मोडले, व त्या मोडक्या दातांचें आरंभ प्रतिबिंब पाहून, त्याला ती हत्तीण वाटली (हत्तिणीचे दांत हत्तीएवढे नसतात) व मग तोच तिला हळू हळू गोंजारू लागला (स्फटिकाचीं मंदिरें वाभवदर्शक वैभवशाली होतें शत्रु होते व त्यांचाहि तू पराभव केलास ! व आता त्या शत्रूंच्या राजधान्या ओसाड झाल्या असून, तेथें, आता जंगली हत्ती फिरत आहेत कारण, तुझ्या शत्रूंनीच त्या वेळ त्यांच्या प्रजे-नींहि एवढी तुझी दहशत घेतली आहे कीं ते राज्य सोडून नाहींसे झाले एवढा अर्थ !)

शार्दूलविक्रीडित

भ्रान्त्वा दिग्वलयं, दशास्यदमन !
त्वत्कीर्तिहंसी दिवं
याता ब्रह्ममरालसङ्गमवशात्
तत्रैव गर्भिण्यभूत् ।
पश्य स्वर्गतरंगिणीपरिसरे
कुन्दावदातं तया
मुक्तं भाति विशालमण्डमिदं
शीतत्विषो मंडलम् ॥ १० ॥

शार्दूलविक्रीडित

हे रामा ! तव कीर्तिहंसि उडतां
स्वर्गी, दिशा हिंडुनी,
झाली ब्रह्ममरालसंग घडुनी
तेथेंचि ती गर्भिणी ।
मोठें स्वर्णदिच्या समीपचि तिनें
अंडेंचि जें टाकिलें
चंद्राचें, जणुं कुंदशुभ्रचि असें,
तें बिंब रे जाहलें ॥ १० ॥

गद्यार्थ—

हे रावणान्तका ! तुझी कीर्तिहंसी दिशान्त हिंडून पुढें स्वर्गी आली, तिचा ब्रह्मदेवाच्या हंसाशीं समागम घडला, आणि तेथेंच तिला गर्भ राहिला; आणि तेथे स्वर्गनदीच्या (गंगेच्या)

जवळच कुंदफुलासारखें (स्वच्छ शुभ्र) अडें टाकलें तेंच हें मोठें चंद्राचें मंडळ झालें असावें !

———

आर्या

गुरुरेकः कविरेकः सदसि मघोनः कलाधरोऽप्येकः ।
अद्भुतमत्र सभायां गुरवः कवयः कलाधराः सर्वे ११

आर्या

इद्रसभेंतहि गुरु, कवि
कलाधरहि एक एक हो जेथें ।
अद्भुत सभेंत या की,
सारे गुरु कवि कलाधरचि येथें ॥ ११ ॥

गद्यार्थ—

प्रत्यक्ष इद्रसभेंतसुद्धा गुरु (बृहस्पति) कवि (बुध) व कलाधर (चद्र) हे एक एकच आहेत परंतु या राजाच्या सभेंत मात्र सारेच गुरु कवि व कलावत आहेत

(कदाचित् ही स्तुति नसून वक्रोक्तीनें निंदाहि असेल)

———

शार्दूलविक्रीडित

संग्रामाङ्गणमागतेन भवता चापे समारोपिते
देवाकर्णय केन केन समरे किं किं समासादितम् ।
कोदण्डेन शराः शरैररिशिरस्तेनापि भूमंडलं
तेन त्वं, भवता च कीर्तिरतुला कीर्त्या च लोकत्रयम् १२

शार्दूलविक्रीडित

राजा ! सज्ज धनुष्यबाण करिशी
युद्धांगणीं तूं यदा
ऐकें ! संगरिं काय काय मिळलें
कोणाकुणाला तदा ।
चापाला शर, त्या शरां रिपुशिरें,
त्यांनाहि भूमी मिळे
तीतें तू, तुजला सुकीर्ति, तिजला
त्रैलोक्य रे लाभलें ॥ १२ ॥

गद्यार्थ—

हे राजा ! रणागणीं येऊन तू धनुष्याला बाण लावताच कोणाला काय काय मिळतें तें ऐक धनुष्याला बाण, त्या बाणाना शत्रूंचीं मस्तकें, त्याना भूमि, भूमीला तू, तुला सुकीर्ति व कीर्तीला त्रैलोक्य ! (थोडक्यांत तुझ्या बाणांनीं शत्रूचें शिर तुटून जमिनीवर पडतें तुला राज्य मिळतें व तुझी कीर्ति तिन्ही लोकात पोंचते )

———

पृथ्वी

अमन्थि मुरवैरिणा पुनरमायि मर्यादया-
प्यहावि मुनिना मुखे वशमनायि लङ्कारिणा ।
अलङ्घि कपिनाप्यसौ सुखमतारि शाखामृगैः
क नाम वसुधापते तव यशोनिधिः क्वाम्बुधिः ? ॥१३॥

पृथ्वी

हरी घुसळितो, निबद्ध करितो किनारा जया,
अगस्त्यहि पितो मुखें, शरण राम आणी जया ॥
उडे वरुनि वायुपुत्र, तरती सुखें वानर
कुठें नृप ! तुझा यशोनिधि, नि तो कुठे सागर ! ॥ १३ ॥

गद्यार्थ—

हे पृथ्वीपते ! (तुझ्या यशोनिधीला उदधीची उपमा देणें कमीच पडेल ) समुद्राला विष्णूनें घुसळिलें, किनाऱ्यानें मर्यादा घातली, अगस्तीनें प्राशन केलें रामानें सेतु बाधला वरून, मारुती उडून गेला, व वानर सुद्धा सहजीं पोहून गेले, कुठें असला हा उदधि अणि कुठें तुझा यशोनिधि !

———

माल्यभारा

करवालकरालवारिधारा
यमुना दिव्यतरङ्गिणी च कीर्तिः ।
तव कामद तीर्थराज ! दूरा-
दनुबध्नाति सरस्वती कवीनाम् ॥ १४ ॥

माल्यभारा

यमुना तरवारची तुझी ती,
जणुं गंगा, नृपते ! तुझी सुकीर्ति ।
दिसतां दुरुनी (प्रयाग) तूंची
मिळण्या येइ सरस्वती कवींची ॥ १४ ॥

गद्यार्थ—

हे इप्सितदाता ! तुझी (काळी) तल्वार, ही जणू काय, यमुना,-आणि (धवल) कीर्ति ही सुरनदी गंगाच तेंव्हा या जेथें एकत्र मिळतात, तो तू, म्हणजे प्रयाग क्षेत्रच, म्हणूनच

दुरून कवींची सरस्वती तुला भेटावयास येते. (प्रयागांत या तिन्ही नद्यांचा संगम आहे.)

---

अनुष्टुभ्

**अपूर्वेयं धनुर्विद्या भवता शिक्षिता कुतः ? ।**
**मार्गणौघः समभ्येति गुणो याति दिगन्तरम् ॥ १५ ॥**

अनुष्टुभ्

**अपूर्व ही धनुर्विद्या घेसी शिकुनि कोठुन ? ।**
**येती मार्गण माघारीं दिगंतीं जातसे गुण ! ॥ १५ ॥**

गद्यार्थ—

मार्गण-बाण; किंवा याचक.) (गुण=धनुष्याची दोरी; किंवा सद्गुण म्हणजेच गुणाची कीर्ति.) धनुर्धरानें बाण सोडला, कीं, बाण दूर जातो, व धनुष्याची दोरी जागच्या जागींच राहते. पण हे राजा ! ही अपूर्व धनुर्विद्या तू कोठून शिकलास, कीं, ज्यांत बाण माघारीं येतात व दोरी दूर दिगंतात जाते ! खरा अर्थ-तुझ्या दानृत्वाचा लक्ष्यवेध असा, कीं, याचक सारखे पुन्हां पुन्हां तुजकडे येतात व तुझे गुण (गुणकीर्ति) दिगंतरांत जातात.

---

अनुष्टुभ्

**श्रीवर्धनकरो राजा मन्त्री तु पटवर्धनः ।**
**तथापि श्रीः पटो नास्ति वाग्वर्धनकरस्य मे ॥ १६ ॥**

आर्या

**श्रीवर्धनकर राजा;**
**पटवर्धन सचिव त्यासि लाभोनी।**
**न श्री, पट, हीं मजला**
**वाग्वर्धनकर कवीहि मी असुनी ॥ १६ ॥**

गद्यार्थ—

(पेशव्यांच्या दरबारीं येऊन कवि तक्रार करतो) एवढा श्रीवर्धनकर (म्हणजे श्री वाढवणारा; पेशवे हे मूळ श्रीवर्धन या गांवचे म्हणून श्रीवर्धनकर) राजा, आणि, त्यास मंत्री (परशुरामभाऊ) पटवर्धन (आडनावाचा; पट=वस्त्र, वाढविणारा) लाभला असतांना, मज वाग्वर्धनकराला (कवीला; वाणीचा विलास वाढविणाराला) श्री (संपत्ति) किंवा पट (वस्त्र) कांहींच मिळूं नये ? (हें या राजा व मंत्री याना शोभतें काय ?)

---

उपजाति

**श्रुत्वा सुदूराद्भवदीयकीर्तिं**
**कर्णौ न तृप्तौ न च चक्षुषी मे ।**
**तयोर्विवादं परिहर्तुकामः**
**समागतोऽहं भवतः समीपम् ॥ १७ ॥**

उपजाति

**दुरुनि ऐकूनि तुझी सुकीर्ति**
**न कान डोळे मम तृप्त होती ॥**
**तंटा तयांचा मिटवावयातें**
**आलों नृपा ! मी तव दर्शनातें ॥ १७ ॥**

गद्यार्थ—

हे राजा ! मी दुरून तुझी कीर्ति ऐकली पण त्यानें कान किंवा नेत्र दुणीच तृप्त झाले नाहींत ! (तुझ्या दानृत्वाच्या अपूर्व कथा नुसत्या ऐकल्या. कान डोळे यांत दोन बोटाचें अंतर ! म्हणून डोळे त्यावर विश्वास ठेवीनात) व त्यामुळें कान व डोळे यांच्यांत वाद झाला (कान म्हणतात तितकें औदार्य असणेंच कुठें शक्य नाहीं, असें डोळे म्हणतात) तो वाद मिटविण्या-साठीं (तुझें औदार्य, डोळ्यांना प्रत्यक्ष दाखवून, डोळ्यांची खात्री, पटविण्यासाठीं) मी तुझ्या जवळ आलों आहें (कीर्ति खरी करण्यासाठीं मला हि तूं अपूर्व औदार्य दाखव.)

---

आर्या

**स्तनयुगमश्रुस्नातं समीपतरवर्ति हृदयशोकाग्नेः ।**
**चरति विमुक्ताहारं व्रतमिव भवतो रिपुस्त्रीणाम् ॥ १८ ॥**

आर्या

**त्वद्रिपुवनिताकुचयुग**
**तप जणुं अश्रूंत नाहुनी करितें ।**
**बनुनि विमुक्ताहारचि**
**हृच्छोकाग्नीसमीप नित वसतें ॥ १८ ॥**

गद्यार्थ—

(वि-मुक्ताहार=विमुक्त आहे आहार ज्यांनीं=उपवास करीत. दुसरा अर्थ मुक्ताहार म्हणजे मोत्यांचा हार गळ्यांत नसलेल्या. शोकामुळें, किंवा भिकेला लागल्यामुळे) हे राजा ! तुझ्या शत्रूंच्या स्त्रियांचें स्तनयुग विमुक्ताहार बनून, अश्रूंचें स्नान करीत जवळच्याच हृदयांतल्या शोकाग्नीजवळ बसून, कांहीं व्रतसाधना करीत असावें. (आहार सोडून, स्नान करून

अग्निसाधन हा व्रताचा प्रकार ) ( तू शत्रूंचा नि पात केल्यानें त्यांच्या स्त्रिया सतत शोक करीत आहेत )

---

वसततिलका

त्वत्कीर्तिमौक्तिकफलानि गुणैस्त्वदीयैः
संदर्भितुं विबुधवामदृशः प्रवृत्ताः ।
नान्तो गुणेषु न च कीर्तिषु रन्ध्रलेशो
हारो न जात इति ताश्च मिथो हसन्ति ॥ १९ ॥

वसततिलका

राजा ! गुणांत तुझिया, तव कीर्ति मोतीं
ओवावया सुरवधू जधिं सज्ज होती ।
कीर्तीस छिद्र न, दिसे, न गुणांस अंत
होणे न हार ! म्हणुनी वध हांसतात ॥
किंवा दुसरी ओळ :—
कीर्तीस भोंक न, दिसे, न गुणांसि टोंक
होणें न हार म्हणुनी हंसती विलोक ॥ १९ ॥

गद्यार्थ—

हे राजा ! तुझ्या गुणरूपी दोऱ्यात, तुझे कीर्तिरूपी मोती ओवून, त्याची माळ करावयास देवांगना बसल्या ! पण त्याची गोड फसगत झाली ! त्या कीर्तिरूप मोत्याना, बघतात तों, भोंकच नाहीं व गुणरूप दोऱ्याला बघतात तों टोकच नाहीं ! यास्तव माळ होणें, शक्य नाहीं, म्हणून त्या एकमेकांत हंसतात ( तुझ्या कीर्तीस कसलीहि यत्किंचित सुद्धां खोड नाहीं व गुणाना अंत नाहीं )

---

वसततिलका

मार्तंडमण्डलनिभं भवतः प्रतापं
ये वर्णयन्ति न हि ते कवयः प्रवीणाः ।
अम्भोनिधौ विलयमेति परं पतङ्गः
पारं प्रयाति जलधेश्च तव प्रतापः ॥ २० ॥

वसततिलका

राजा ! "प्रताप तव सूर्यसमान आहे"
ते अज्ञ सर्व कवि, वर्णिति जे असें हें ।
अर्घ्यींत ज्या रवि बुडूनचि नष्ट होतो
त्यातें प्रताप तव लंघुनि पार जातो ॥ २० ॥

गद्यार्थ—

हे राजा ! जे कवि "तुझी कीर्ति सूर्यासारखी आहे" असें वर्णन करतात, ते कांहीं हुषार नसावेत. कारण ज्या समुद्रात बुडून सूर्य नाहींसा होतो, त्या समुद्राला सुद्धा, तुझी कीर्ति, ओलांडून पार जाते !

---

आर्या

उद्दण्डे भुजदण्डे तव कोदण्डे प्रभो ! परिस्फुरति ।
अरिमण्डल-रविमण्डल-रम्भाकुचमण्डलानि वेपन्ते २१

आर्या

राजन् ! प्रबलभुजांनी,
*जधिं तूं करितोस सज्ज शरचाप !*
अरिमंडळ रविमंडळ,
रंभाकुचमण्डलांत थरकांप ॥ २१ ॥

गद्यार्थ—

हे राजन्, तुझ्या प्रबल भुजानीं, तू जेव्हां धनुष्य बाण सज्ज करतोस तेव्हा तीन मंडळाचा थरकाप होतो. एक अरिमंडळांत ( कारण आता त्यांचा नि पात होणार. ) रविमंडळात ( कारण तुझी कीर्ति रविमंडळ भेदून जाणार ! ) रंभेच्या स्तनमंडळांत ( कारण तूं स्वर्ग जिंकून इंद्रपद मिळविणार. मग त्या रंभादि अप्सराचे काय होणार ? कारण तू सच्छील, त्यामुळें अप्सरा तुला वर्ज्य ! )

---

अनुष्टुभ्

अकर्णमकरोच्छेषं विधिर्ब्रह्माण्डभङ्गधीः ।
श्रुत्वा रामकथां रम्यां शिरः कस्य न कंपते ? ॥२२॥

अनुष्टुभ्

ब्रह्मांडभंगभीतीनें विधि शेषा न कान दे ।
श्रीरामाच्या कथेनें न कोणाचें शिर हालतें ? ॥२२॥

गद्यार्थ—

श्रीरामाचें रम्य चरित्र ऐकून कोणाचें शिर हालत नाहीं ? शेषाला तें ऐकूं गेलें असतें तर त्यानें मान डोलावली असती व त्याच्या डोक्यावरचें ब्रह्मांड खालीं पडून फुटलें असतें. तसें होऊ नये, म्हणूनच, ब्रह्मदेवानें शेषाला कर्णेंद्रियच दिलें नाहीं. ( ५ व्या श्लोकातलीच कल्पना )

---

द्रुतविलंबित

कमलभूतनया वदनाम्बुजे
वसतु ते कमला करपल्लवे ।
वपुषि ते रमतां कमलात्मजः
प्रतिदिनं हृदये कमलापतिः ॥ २३ ॥

आर्या

राजा! तव मुखकमलीं
कमलोद्भवकन्यका सदैव वसो ।
करपल्लवांत तुझिया
कमलेचाही सदैव वास असो ॥
कमलात्मजही तुझिया
करो सदाचा विहार देहांत ।
कमलापतिही प्रतिदिन
वसति करो या तुझ्याचि हृदयांत ॥ २३ ॥

गद्यार्थ—

(कवीन सर्व श्लोकच कमलमय करून सोडला आहे) हे राजा! तुझ्या मुखकमलीं कमलोद्भवकन्यका=कमलांत जन्मलेल्या ब्रह्मदेवाची कन्या सरस्वती वसो! तुझ्या करपल्लवांत कमलेचा म्हणजे लक्ष्मीचा वास असो तुझ्या देहांत कमलेच्या पुत्राचा म्हणजे मदनाचा वास असो आणि हृदयांत नित्य कमलापति विष्णूचा वास असो

---

अनुष्टुभ्

चित्रं तपति राजेन्द्र! प्रतापतपनस्तव ।
अनातपत्रमुत्सृज्य सातपत्रं द्विषद्गणम् ॥ २४ ॥

उपजाति

तुझा पहा शौर्यरवी नृपाळा
रव्या रवीहूनि किती निराळा ।
छत्रीविहीनासि न होरपाळी
सच्छत्र शत्रूसचि मात्र जाळी ॥ २४ ॥

गद्यार्थ—

हे राजा! तुझा प्रतापरवि, हा, नभस्थ रवीहून, कांहीं निराळ्याच त हेनें वागतो, कारण—छत्रचामरधारी तुझ्या शत्रुराजांना, मात्र, तू भाजून काढतोस, आणि, छत्री नसलेल्यांना मात्र ताप देत नाहींस (तू शूर आहेस व त्याबरोबर गरीबांचा कनवाळू आहेस)

---

अनुष्टुभ्

बलिः पातालनिलयोऽधःकृतश्चित्रमत्र किम्?।
अधःकृतो दिवस्थोऽपि चित्रं कल्पद्रुमस्त्वया ॥ २५ ॥

इंद्रवज्रा

पातालिंच्या तू करिशी बळीतें,
दानांत खालीं न विशेष रे ते ।
स्वर्गस्थ कल्पद्रुम आणितोस
तूं खालतीं, हेंचि गमे विशेष ॥ २५ ॥

गद्यार्थ—

दानामध्यें, तू पाताळांतल्या (आधींच खालीं असलेल्या) बळीला खालीं आणतोस (म्हणजे दानृत्वांत हटवतोस) यांत काय नवल? पण स्वर्गांत (म्हणजे वर) असलेल्या कल्पवृक्षालाहि खालीं आणतोस हें करणें विलक्षण! अध:कृत शब्दांत वाटि (तू बळी व कल्पवृक्ष दोघांपेक्षांहि उदार दाता आहेस, इत्यर्थ!)

---

शिखरिणी

यदेतच्चन्द्रान्तर्जलदलवलीला वितनुते
तदाचष्टे लोकः शशक इति, नो मा प्रति तथा ।
अहं त्विन्दुं मन्ये त्वदरिविरहाक्रान्ततरुणी-
कटाक्षोल्कापातव्रणकिणकलङ्काङ्कितनुम् ॥ २६ ॥

शिखरिणी

वरी चंद्राच्या जे मलिन लव मेघापरि दिसे
ससा त्यातें कोणी म्हणति, मज ना वाटत तसें ।
स्त्रिया त्वच्छत्रूंच्या, विरहिं चिडुनी त्या प्रहरिती
कटाक्षोल्का, त्यांनीं व्रणित शशिची खास तनु ती ॥२६

गद्यार्थ—

हे राजा! चंद्रावर, ल्हानशा मेघखंडासारखा, जो कलंक दिसतो, त्याला कोणी कोणी, ससा असें म्हणतात, पण, मला तसें वाटत नाहीं तुझ्या शत्रूच्या स्त्रिया प्रियतमविरहानें संतापून चंद्रावर ज्या कटाक्षरूपी उल्का फेकतात, त्यांच्या आघातांचे जे व्रण राहिले, त्यामुळें, तो डाग चंद्रावर दिसत आहे, असें माझें मत आहे.

---

शार्दूलविक्रीडित

विद्वद्राजशिखामणे ! तुलयितुं धाता त्वदीयं यशः
कैलासस्य निरीक्ष्य तत्र लघुतां निक्षिप्तवान् पूर्तये ।
उक्षाणं तदुपर्युमासहचरं तन्मूर्ध्नि गङ्गाजलं
तस्याग्रे फणिपुङ्गवं तदुपरि स्फारं सुधादीधितिम् २७

शार्दूलविक्रीडित

विद्वच्छ्रेष्ठ नृपा ! तुझें यश जधीं
पाहे विधी तोलुनी,
त्या कैलास पडे कमी, म्हणुनि तो
पाहे भरी घालुनी ।—
नंदीला; वरतीं शिवास, नि शिरीं
त्याच्याहि गंगाजल
तेथें सर्प, नि शेवटीं तदुपरी
तो चंद्रही उज्ज्वल ॥ २७ ॥

गद्यार्थ—

हे राजा ! तुझा यशोभार किती वजनदार आहे, हें ब्रह्मदेव तराजूंत घालून बघू लागला, तेव्हा पाहतो, तों, कैलास दुसऱ्या पारड्यांत घालूनहि भागेना, म्हणून त्यानें भरीला शंकराचा नंदी, त्याच्याहि भरीला शंकर, त्याच्यावर गंगाजल त्याच्यावर शंकराच्या गळ्यातला नाग व आणि सर्वांच्या भरीला तो तेजस्वी चंद्रहि घातला (आणि, इतकेहि करून तुझ्या यशाचे तोलाचें झालें कीं नाहीं, तें कवीनें अनुक्त ठेवून दिलें, व यशाची अमेयता सूचित केली )

———०———

पृथ्वी

सहस्रकरपूरणान्निखिलजन्तुवक्त्राम्बुज-
प्रकाशकरणादथ प्रबलवैरितेजोवधात् ।
दरिद्रतिमिरोद्धतेरखिलभूपचूडामणि-
र्जगन्मणिरहर्मणिर्जगदिदं च धत्तः समम् ॥२८॥

आर्या

पुरविति सहस्रकर जे;
मुख, कमलें, निखिलजीवजातांचीं ।
उमलविती, अन् करिती
तेजोहानिहि बलिष्ठ शत्रूंची ॥
हरिती दरिद्रतम जे,
दोघे चूडामणीचि भूपांचे ।
दिनमणि आणि जगन्मणि
समान करितात्ति राज्य जगताचें ॥ २८ ॥

गद्यार्थ—

सूर्य हा दिवसाचें रत्न, व या श्लोकाचा विषयभूत राजा, हा जगाचें रत्न ! हे दोघे या जगताचें राज्य, जणूं समान अधिकारानें करतात कारण—दोघेहि सहस्र कराचें पूरण करतात. ( सूर्य सहस्र किरणें पुरवितो; राजा याचकाचे सहस्र हात भरून देतो ) सूर्य अखिल जगतातील कमलें उमलवितो, राजा मुखकमलें उमलवितो ( सुराज्यानें प्रजेला संतुष्ट करून ); दोघेही बलिष्ठ शत्रूचे ( सूर्य इतर सर्व ग्रह ताऱ्यांचें; ) तेजोहरण करतात, राजा दारिद्र्यतमाचा नाश करतो, तर सूर्य अंधाराचा; आणि दोघेहि भूपचूडामणि. ( सूर्य हा डोंगराच्या शिखरावरील मण्याप्रमाणें, राजा, इतर राजाचा प्रमुख. )

———०———

शार्दूलविक्रीडित

देव ! त्वत्करनीरदे दिशि दिशि प्रारब्धपुण्योन्नते
चंचत्कांचनरत्नराजितडिति स्वर्णामृतं वर्षति ।
स्फीता कीर्तितरंगिणी समभवत्तृप्ता गुणिग्रामभूः
पूर्णं चार्थिसरः शशाम विदुषां दारिद्र्यदावानलः २९

आर्या

राजन् ! तव पुण्योन्नत
कर हे मेघचि जधीं दिगन्तांत ।
रत्नें कांचन-विद्युत्
झळकवुनी स्वर्णवृष्टि करतात ॥
तधि फुगते कीर्तिनदी,
गुणिजनभू जाइ तृप्त होऊन ।
विद्वद्दारिद्र्यदवानल
विझुनी अर्थिसर भरे पूर्ण ॥ २९ ॥

गद्यार्थ—

हे राजन् ! प्रारब्धपुण्यांनीं उन्नत झालेला ( दान देण्यास उंच उचललेला, मेघहि उचावर असलेला ) तुझा हात जणू काय मेघ, जेव्हा ( दान देण्यासाठीं हातीं घेतलेलीं ) रत्नें, सोनें, याची झळक हीच जणूं वीज चमकवीत, सुवर्णामृताची वृष्टि करतो, तेव्हा कीर्तिरूपी नदी दुथडी भरून वाहूं लागते, गुणिजनरूपी भूमि तृप्त होते, याचकरूपी तळें भरून जातें व विद्वानांच्या दारिद्र्याचा वणवा विझून शांत होतो.

———०———

शार्दूलविक्रीडित

ः पृष्ठं युधि दर्शयत्यरिभटश्रेणीषु, यो वक्रता-
ास्निग्धेव बिभर्ति यश्च कुरुते क्रूरध्वनिं निष्ठुरः ।
ोषं तस्य तथाविधस्य भजतश्चापस्य गृह्णन्गुणं
वेख्यातः परमेष एव नृपतिः सीमा गुणग्राहिणाम् ३०

शार्दूलविक्रीडित

दावी पाठ रणीं रिपूंसि, तरिही
जो वक्रता दावितो
स्वस्वामीसिचि; आणि निष्ठुरपणें
क्रूरध्वनी काढितो ।
त्या चापांत असेहि दोष असुनी
जो तद्गुणा स्वीकरी
ऐसा ख्यातचि एक हा नृप, गुण-
ग्राह्यांत सीमेपरी ॥ ३० ॥

गद्यार्थ—

जें धनुष्य रणांत शत्रूला पाठ दाखवितें, व स्वत च्या धन्या-
शच वक्रता दाखवितें, व क्रूरध्वनि काढून (कागावा करतें)
अशा त्या धनुष्यांत, असे दोष असूनहि, त्याच्या गुणाचें
(दोरीचें) हा राजा ग्रहण करतो. या वरून (इतर गुणग्राहक
गुणी जनाचे गुण घेतात; दोषपूर्णांचे नव्हे.) हा राजा गुण-
ग्राहकत्व या गुणाची परिसीमा गांठणारा आहे असें
म्हटलें पाहिजे.

---

शार्दूलविक्रीडित

नालिङ्गन्ति कुचद्वयं भरदिभप्रोत्तुंगकुम्भद्वय-
त्रासाद्वेणिलतासु नैव दधति प्रीतिं तवासिभ्रमात् ।
भ्रूभङ्गान्भवदीयदुर्धरधनुर्भ्रान्त्या भजन्ते न ते
वैरिक्षोणिभुजो निजाम्बुजदृशां भूमण्डलाखण्डल ३१

शार्दूलविक्रीडित

राजा ! त्वद्गजकुम्भभीत रिपु ना
घेती स्तनालिंगन
वेणीही, तव खड्ग भासुनि, निज-
स्त्रीची करीं घेति न ।
त्यांच्या त्या कमलेक्षणा जधि कधीं
भ्रूभंग त्यां दाविती,
राजेन्द्रा ! तव चाप वाटुनि तया
त्यच्छत्रुराजे भिती ॥ ३१ ॥

गद्यार्थ—

हे भूमंडलींच्या इंद्रा ! (हत्तींची गंडस्थळें, स्त्रियांच्या
पुष्टस्तनांसारखीं दिसतात.) तुझ्या हत्तींच्या गंडस्थळांची
तुझ्या शत्रुराजांनीं इतकी दहशत घेतली आहे ते आपल्या
कमलेक्षणा स्त्रियांचें स्तनालिंगन करीत नाहींत. जणूं काय ती
तुझी काळी तलवारच असें भासून आपल्या स्त्रियांच्या वेणीशीं
खेळ करण्याचें त्यांनीं सोडून दिलें आहे. जेव्हां कधीं रमण्यानें
त्यांच्या स्त्रिया त्यांना भ्रूभंग दाखवितात तेव्हां तें तुझें धनुष्य
असें वाटून त्यांच्या पोटात धस्स होतें.

---

पृथ्वी

वनेषु वनदेवता दिवि दिवौकसां वल्लभा
भुजङ्गकुलकन्यका भुजगलोकलीलावने ।
यशः समरसंचितं नरमृगेन्द्र गायन्ति ते
प्रभाविजितकौमुदीकुमुदपाण्डुताडम्बरम् ॥ ३२ ॥

पृथ्वी

वनांत वनदेवता, सुरपुरींत देवांगना
भुजंगनगरींतल्या उपवनीं भुजंगांगना ।
हरी कुमुदकौमुदीमदहि शुभ्रतेजेंचि जी
रणार्जित सुकीर्ति ती, नरमृगेंद्र ! गाती तुझी ॥३२॥

गद्यार्थ—

हे नरसिंहा ! रणांगणात तू जी कीर्ति मिळविलीस व जी
इतकी धवल आहे कीं चंद्र व श्वेतकमलें यांचा शुभ्रतेचा गर्व
आपल्या स्वच्छतेनें हरण करते…ती तुझी सत्कीर्ति वनांत
वनदेवता, स्वर्गांत देवांगना, व नागलोकांतल्या उपवनांत
भुजंगांच्या कुलकन्यका गात आहेत !

---

शिखरिणी

महाराज ! श्रीमज्जगति यशसा ते धवलिते
पयःपारावारं परमपुरुषोऽयं मृगयते ।
कपर्दी कैलासं सुरपतिरपि स्वं करिवरं
कलानाथं राहुः कमलभवनो हंसमधुना ॥ ३३ ॥

शिखरिणी

महाराजा ! होतां धवल जग सारें तव यशें
हरि क्षीराब्धीतें बघ चहुंकडे धुंडित बसे ।
त्रिशूली कैलासा, सुरपतिहि ऐरावत वचे
घे राहू चंद्रा, गगनिं निजहंसा विधि वचे ॥ ३३ ॥

गद्यार्थ—

हे महाराजा ! तुझें यश इतकें धवल, कीं, त्यानें सारें विश्वच शुभ्र धवल करून सोडलें (सर्व शुभ्रवस्तु इतक्या एकरूप होऊन गेल्या, कीं कोणतीच शुभ्र वस्तु पृथक्त्वानें दिसेनाशी झाली) त्यामुळें विष्णु, आपला क्षीरसागर सापडत नाहीं, म्हणून धुडाळू लागला आहे, शंकर कैलास धुंडीत आहे, इंद्र आपला ऐरावत शोधीत आहे, राहु चंद्राला (खाण्यासाठीं) शोधीत आहे, व ब्रह्मदेव आपला श्वेत हंस कुठें दिसतो का, म्हणून पहात आहे !

———०———

वसंततिलका

पृथ्वीपते शुभमते भवतो भवस्य
ब्रूमो वयं सुयशसां कियदन्तरं वा ।
गौरीं चकार गिरिशो निजमर्धमङ्गं
गौरीकृतं च भवता भुवनं समस्तम् ॥ ३४ ॥

वसंततिलका

हे भूपते ! तव यशांत नि शंकरांत
अत्यल्प अंतर, असें गमतें मनांत ।
गौरीस अर्धचि निजांग करी महेश
गौरीकृत प्रभु तुवां अवघ्या जगास ॥ ३४ ॥

गद्यार्थ—

मूळ संस्कृत श्लोकाच्या दुसऱ्या ओळींत गौरीं चकार व गौरीकृत या शब्दांत खुबी आहे. गौरीं चकार=गौरीला केलें, गौरीकृत=गौर केलें ) हे पृथ्वीपते ! तुझ्या यशामुळें तुझ्यांत व शंकरांत किती अल्प (गौरीं चकार व गौरीकृत या शब्दाच्या अक्षरां इतपतच) अंतर आहे तें पहा—गौरीस (पार्वतीस) केलें शंकरानें फक्त अर्धांग पण तुझ्या यशानें गौरीकृत (शुभ्र केलेलें) आहे सारें जग !

———०———

पृथ्वी

अनुक्षणमनुक्षणं क्षितिप रक्ष्यमाणा त्वया
प्रयाति विदिशा दश प्रबलकीर्तिरेकाकिनी ।
इयं नियतमर्थिषु प्रतिदिनं वितीर्णा रमा
जहाति न तवान्तिकं द्वितयमेतदत्यद्भुतम् ॥३५॥

पृथ्वी

क्षण क्षण जिला नृपा ! जपुनि तूंच संरक्षिली
फिरे प्रबल कीर्ति ती दशदिशीं तुझी एकली ॥
जिला सतत याचकां वितरितोसि, लक्ष्मी, मुळीं
त्यजी न तुज तीच ! दुकल तुझी जगावेगळी ॥३५॥

गद्यार्थ—

हे राजा ! तुझ्या संग्रहीं मोठ्या विचित्र वर्तनाची एक दुकल आहे ! त्यातली पहिली कीर्ति ! तू तिला अगदीं क्षणाक्षणाला जपून रक्षण करीत असतोस, तीच डोईजड होऊन, खुशाल आपली, एकटी, दशदिशात भटकत असते ! दुसरी ती लक्ष्मी तू तिला, सतत, अगदीं आल्यागेल्या याचकाला, देत राहतोस तरी, ती काहीं तुझा पिच्छा सोडीत नाहीं !

———०———

उपजाति

अन्तःसरन्तीमपि देहगर्भे
त्कीर्तिं परेषामसतीं वदन्ति ।
स्वयं चरन्तीमपि च त्रिलोक्यां
त्वत्कीर्तिमाहुः कवयः सतीं तु ॥ ३६

वसंततिलका

अंतःपुरा त्यजिनसे न च जी तनूच्या
कीर्तीसि त्याहि 'असती' म्हणती दुजांच्या ।
स्वच्छंद कीर्ति तव जी भटके त्रिलोकीं
तीतें 'सती'चि म्हणती कवि तेचि लोकीं ॥३६॥

गद्यार्थ—

(कवि हे शब्द सृष्टीचे ईश्वर म्हणतात ! पण हे राजा, तुझ्या सारख्यांचा प्रभाव असा प्रबल, कीं, 'असती' व 'सती' या शब्दाचे अर्थ कविजनाना, उलटें करणें भाग पडलें !) दुसऱ्या राजाची कीर्ति त्याच्या देहरूपी अंतःपुराला सोडून बाहेर जात नाहीं, तरी, तिला 'असती' (अपतिव्रता–वाईट शीलाची) असें म्हणतात आणि, तुझी कीर्ति (एकाद्या गांव भवानीसारखी) स्वच्छंद तिन्हीं लोकांत फिरते, तर, तिला तेच कवि 'सती' (सावित्री सारखी) म्हणतात !

———०———

अनुष्टुभ्

अहो विशालं भूपाल भुवनत्रितयोदरम् ।
माति मातुमशक्योऽपि यशोराशिर्यदत्र ते ॥ ३७ ॥

अनुष्टुभ्

कियती विशाल भूपाला त्रैलोक्योदर भासतें।
तुझी अमेय कीर्तीही ज्यर अर्थी त्यांत मावते ॥ ३७ ॥

गद्यार्थ—

(दोन्ही वस्तु मूळ मोठ्याच असल्या तरी त्यातल्यालाही एकीला मोठी म्हणून दुसरीची महती गाणें याला 'अधिकालंकार' म्हणतात) हे राजा! ह्या त्रैलोक्याचें पोट केवढें विशाल असलें पाहिजे, की, ज्यात, न मापण्याजोगी तुझी कीर्ति मावत्ये शकते! (म्हणजे तुझी कीर्ति समावण्यास त्रैलोक्याएवढा विस्तारच हवा!)

———

आर्या

त्वत्कीर्तिराजहंस्या वैरिवधूवदनभाजनस्थमपि।
पीतं हासक्षीरं व्यक्तीकृतमश्रुनीरं च ॥ ३८ ॥

आर्या

तवरिपुवधुमुखपात्रा-
मधुनी तव कीर्तिरूप जी हंसी।
अश्रूंचि नीर उरवुनि,
हास्याचें क्षीर मात्र ती प्राशी ॥ ३८ ॥

गद्यार्थ—

हे राजा! तुझी कीर्तिरूपी राजहंसी, तुझ्या शत्रूंच्या स्त्रियांच्या मुखरूपी पात्रातून हास्यरूपी क्षीर तेवढं काढून पेते, व अश्रुरूपी नीर तेवढें शिल्लक ठेवते. (कीर्ति शुभ्र तशी हंसी शुभ्र. हास्य शुभ्र तसें क्षीर शुभ्र) (बिचाऱ्या शत्रुस्त्रियांच्या कपाळीं तू घेतेल्या पराभवानें फक्त रडणें उरलें व हास्य निमालें तें कायमचेंच.)

———

शार्दूलविक्रीडित

अत्युक्तौ यदि न प्रकुप्यसि, मृषावादं न चेन्मन्यसे
तद् ब्रूमोऽद्भुतदर्शनेन रसना केषां न कण्डूयते?॥
देव! त्वत्तरुणप्रतापतपनज्वालावलीशोषिताः
सर्वे वारिधयस्त्वदरिवनितानेत्राम्बुभिः पूरिताः॥३९॥

शार्दूलविक्रीडित

अत्युक्तीस न कोपसी जरि न वा
खोटेंचि हें मानिसी,
सांगे मी तर, अद्भुतास बघतां
खाजे न जिव्हा कशी?।
राजा! अब्धि तुझ्या प्रतापरविनें
जे शुष्क केले जवें,
गेले ते भरुनी, तवारिवनिता-
नेत्रांतल्या आंसवें ॥ ३९ ॥

गद्यार्थ—

हे राजा! मी अतिशयोक्ति करतों म्हणून रागावणार नसशील किंवा मी सांगतों तें खोटें म्हणून झिडकारणार नसशील तर सांगतों! कांहीं अद्भुत पाहिलें, तें वर्णून दुसऱ्याला सांगण्याची कंड कोणाच्या जिभेला सुटणार नाहीं? राजा! तुझ्या पराक्रमरूपी प्रखर सूर्यानें, मोठे समुद्र शुष्क करून सोडले खरे, पण तुझ्या शत्रूंच्या स्त्रियांच्या डोळ्यांतल्या अश्रूंनीं ते पुनश्च भरून टाकले!

———

अनुष्टुभ्

विचरन्ति विलासिन्यो यत्र श्रोणीभरालसाः।
वृकफाकशिवास्तत्र धावन्त्यरिपुरे तव ॥ ४० ॥

आर्या

श्रोणीभारें गजगति
डुलत चालल्या विलासिनी जेथें।
वृक काक आणि कोल्हे
धांवति तव रिपुपुरांमधें तेथें ॥ ४० ॥

गद्यार्थ—

राजा! तुझ्या शत्रूच्या नगरींतल्या राजमार्गावरून जेथें सुंदर तरुण विलासिनी स्त्रिया 'श्रोणीभारानें अलसगमना' डुलत डुलत चालत होत्या, तेथें आता कावळे, कोल्हे, लांडगे, आदि यांचा अनिर्बंध संचार चालू आहे. (तुझ्या पराक्रमाची नुसती तुझ्या शत्रुराजांनीच नव्हे तर त्यांच्या प्रजाजनांनीं सुद्धां हाय खाऊन, सर्व नगरीच सोडून गेल्यानें ती निर्जन झाली आहे)

———

मालिनी

प्रतिनगरमटन्ती प्रत्यगारं व्रजन्ती
प्रतिनरपतिवक्षःकण्ठपीठे लुठन्ती ।
गिरिगरिमनितम्बाच्छादनेऽसावधाना
तदपि च तव कीर्तिर्निर्मलैवेति चित्रम् ॥ ४१ ॥

आर्या

नगरांनगरांमधुनी, घरांघरांतूनि राहते जात ।
प्रत्येक नरपतीच्या वक्षीं कंठींहि राहते रुळत ॥
निजपृथु नितंब गिरिसम
झांकायाची असे न शुद्ध जिला ।
आश्चर्य न कां, म्हणती
निर्मळ त्या तव तशाहि कीर्तीला ? ॥ ४१ ॥

गद्यार्थ—

हे राजा ! जी तुझी कीर्ति, नगरानगरातून, व घरांघरातून, भटकते, आणि, प्रत्येक राजाच्या छातीवर व कंठात रुळत राहते, पुष्टि, विस्तार, व डौल, ह जसे स्त्रीश्रोणींचें वैशिष्ट्य, तसेंच, वैशिष्ट्य असलेली ही कीर्ति, आपली गिरिसम श्रोणी झाकण्याची सुद्धा काळजी घेत नाहीं असल्या या तुझ्या कीर्तीला, 'निर्मल' असें नांव दिलें जातें ह केवढें आश्चर्य !

हरिणी

कुरवक ! कुचाघातक्रीडासुखेन वियुज्यसे
बकुलविटपिन् ! स्मर्तव्यं ते मुखासवसेवनम् ।
चरणघटनावन्ध्यो यास्यस्यशोक ! सशोकता-
मिति निजपुरत्यागे राजन् द्विषां जगदुः स्त्रियः ॥४२॥

शिखरिणी

"कुचाघातक्रीडासुख कुरवका ! तें तव तुटे !
मुखींच्या मद्याचें प्रिय बकुल ! ठेव स्मरण रे ! ।
अशोका ! मत्पादाहति न; तुज, शोकान्तचि असे"
वदे त्वच्छत्रुस्त्री त्यजुनि निज जातां पुर, असें ॥२४॥

गद्यार्थ—

हे राजा ! तू पराभव केल्यामुळें तुझे शत्रु व त्यांच्या स्त्रिया नगर सोडून गेल्या त्यांपैकीं कोणी एक स्त्री आपल्या घराचा निरोप घेताना म्हणाली—(कुरवकाच्या झाडाला स्त्रीनें स्तनांनीं ताडन केल्यानें बकुलाला, तोंडात दारू घेऊन त्याची चूळ टाकल्यानें, व अशोकाला पायानें लाथ मारल्यान, त्यांचे डोहाळे पुरविले जाऊन, त्याची उत्तम वाढ होते, असा कविसंकेत ) हे कुरवका ! आतां, यापुढें, मी कुचाघात केले त्याचें क्रीडासुख तुझें हरपल ! बकुला ! मी टाकलेल्या, मुखांतील मद्याचें, तू स्मरण ठेव, आणि अशोका ! माझ्या पादताडनाला तू आंचवलास–आतां तुला ( अ-शोक नव्हे ) शोक करण्यांतच अन व्हावयाचा आहे

आर्या

पालयति त्वयि वसुधा
विविधाध्वरधूमशालिनीः ककुभाः ।
पश्यन्तो दूयन्ते
घनसमयाशङ्किनो हंसाः ॥ ४३ ॥

आर्या

तू पालितां जगा, दिग्मंडल यज्ञोत्थधूमधूसरित ।
बघतां, वर्षाऋतु ये या शंकेनेंच हंस भयभीत ॥४३॥

गद्यार्थ—

हे राजा ! तू पृथ्वीचे राज्य करीत असतां सर्वत्र इतके विविध यज्ञ चालू झाले कीं त्यांतून निघणाऱ्या धुरान, दिग्मंडळ धूसर झाल्यान, ते टग पाहून, पावसाळाच आला की काय या शंकेनें हंसांना मनांत भय वाटलें ( कारण पावसाळा आला की आपला विहार संपणार म्हणून )

# प्रकरण २६ वें

आशा, इच्छा, वांछा, तृष्णा, लोभ, हाव, विषयतृष्णा.

अनुष्टुभ्

आशा नाम मनुष्याणां काचिदाश्चर्यशृंखला ।
यया बद्धाः प्रधावन्ति मुक्तास्तिष्ठन्ति पङ्गुवत् ॥ १ ॥

अनुष्टुभ्

विचित्र शृंखला कोणी आशा नामक हो नरा ।
जिनें बद्धचि धांवेल, मुक्त तो पांगळा खरा ॥ १ ॥

गद्यार्थ—

आशा या नावाची मनुष्याला एक विचित्र शृंखला दिलेली आहे जिनें, बांधला गेलेला, माणूस धांवत सुटतो, पण तिनें न बांधलेला (मुक्त), हा पांगळा होऊन पडतो! काय चमत्कार!

———o———

शिखरिणी

खलोल्लापाः सोढाः कथमपि तदाराधनपरै-
र्निगृह्यान्तर्बाष्पं हसितमपि शून्येन मनसा ।
कृतश्चित्तस्तम्भः प्रतिहतधियामञ्जलिरपि
त्वमाशे मोघाशे किमु परमितो नर्तयसि माम् ? ॥२॥

शिखरिणी

खलांचें सोसावें कटुवचन त्यां तुष्ट करुनी
हंसावें खोटेंची, वरुनि, मनिंचे अश्रु गिळुनी ।
नाला दाबावें, कितिक मतिहीनांसि नमुनी
री आशे! कां गे मज फिरविसी व्यर्थ अजुनी ? ॥२॥

र्थ—

दुष्टांची आराधना करण्याच्या करून, वर, त्यांचे टोमणे सहन रावेत, मनांतले अश्रु गिळून वरून खोटें हंसावें; कित्येक तिहीनांना नमस्कार करतांना, (लाज वाटली तरी) मनाला धून धरावें, (असें माझें जीवन चाललें असतां) हे आशे! र्थ मला अजून कां नाचवीत आहेस ?

———o———

उपजाति

न भूतपूर्वो न च केन दृष्टो
हेम्नः कुरंगो; न कदापि वार्ता ।
तथापि तृष्णा रघुनंदनस्य
विनाशकाले विपरीतबुद्धिः ॥ ३ ॥

इन्द्रवज्रा

पूर्वी न झालाचि; न पाहिलाची
वार्ता न सौवर्ण अशा मृगाची ।
तृष्णा तरी राममनांत आली
बुद्धी फिरे खास विनाशकाळीं ॥ ३ ॥

गद्यार्थ—

पूर्वी कधीं झाला नाहीं, कोणी पाहिलाहि नाहीं; सोन्याच्या हरिणाची कधीं गोष्ट हि कुणी ऐकलेली नाहीं, तरी रामाच्या मनांत (असा हरिण पकडावा अशी) तृष्णा उत्पन्न झालीच! विनाशकाळ आला, कीं, माणसाची बुद्धि फिरते!

———o———

शार्दूलविक्रीडित

उत्खातं निधिशङ्कया क्षितितलं ध्माता गिरेर्धातवो
निस्तीर्णः सरितां पतिर्नृपतयो यत्नेन संतोषिताः ।
मन्त्राराधनतत्परेण मनसा नीताः श्मशाने निशाः
प्राप्तः काणवराटकोऽपि न मया, तृष्णेऽधुना मुञ्च माम् ४

शार्दूलविक्रीडित

ठेव्याचेस्तव मी मही उकरिली,
अब्धीहि ओलांडिले
धातू आटविल्या गिरिस्थ, झटुनी
राजांसि आराधिलें ।
मंत्रांच्या जपसाधनीं कितितरी
गेल्या स्मशानीं निशा
हातीं ये फुटकी न एक कवडी,
आतां पुरे ही तृषा ! ॥ ४ ॥

———o———

गद्यार्थ—

भूमिगत संपत्ति सांपडेल या आशेनें ठिकठिकाणीं जगभर मी उकरीत गेलों; डोंगरांतील खनिजें भट्टीत घालून आटवून पाहिलीं; समुद्र ओलांडला, राजांना तुष्ट करण्याचे कष्ट केले, मंत्र साध्य होण्यासाठीं रात्र रात्र स्मशानांत राहिलों—तरी फुटक्या एका कवडीचीहि प्राप्ति झाली नाहीं. तृष्णे ! आतां तरी मला सोड.

———०———

अनुष्टुभ्

देहपादपसंस्थस्य हृदयालय-गामिनः ।
तृष्णा चित्तखगस्येयं वागुरा परिकल्पिता ॥ ५ ॥

अनुष्टुभ्

*मनःपक्ष्यास, जो राही*
देहवृक्षांत, हृद्गृहीं ।
घालण्या बंधनीं, तृष्णा,
जाळें जणुं नियुक्त ही ॥ ५ ॥

गद्यार्थ—

देहरूपी झाडावर, हृदयरूपी घरट्यांत जाणाऱ्या मनरूपी पक्ष्याला, अडकवण्यासाठीं, तृष्णारूपी जाळें ( विधीनें ) नियुक्त केलें आहे.

———०———

आर्या

आशाया ये दासास्ते दासाः सर्वलोकस्य ।
आशा येषां दासी तेषां दासायते लोकः ॥ ६ ॥

आर्या

( धन )तृष्णेचे दास नि
जे नर, ते दास सर्व लोकांचे ।
दासी जे तिज करती,
लोकचि होतात दास परि त्यांचे ॥ ६ ॥

गद्यार्थ—

आशेचे जे कोणी दास असतात, ते सर्वांचेच दास होतात. आशाच ज्यांची दासी, त्यांचें, सर्व जग दास होतें.

———०———

वसंततिलका

भिक्षाशनं तदपि नीरसमेकवारं
शय्या च भूः परिजनो निजदेहमात्रम् ।
वस्त्रं सुजीर्णशतखण्डमयी च कन्था
हा ! हा ! तथापि विषयान्न जहाति चेतः ॥ ७ ॥

वसंततिलका

भिक्षान्न ! तेंहि कधिं नीरस एकवार
भूमीवरी शयन, चाकर देह मात्र ।
वस्त्रें जुनींच, शत जोडुनि चिंधड्या तीं
हा ! हा ! तरी विषय हे न मना त्यजीती ॥ ७ ॥

गद्यार्थ—

खायला भिकेचें अन्न, तेंहि नीरस व एकच वेळीं मिळावयाचें; भूमीवर निजायचें; स्वतःचा देह हाच चाकर; शंभर चिंध्यांची गोधडी हेंच वस्त्र ( इतक्या स्थितीला माणूस पोंचला, ) तरी मनाला विषयतृष्णा कांहीं सोडीत नाहीं. हाय ! हाय !

———०———

शार्दूलविक्रीडित

*भ्रान्तं देशमनेकदुर्गविषमं प्राप्तं न किञ्चित्फलं*
त्यक्त्वा जातिकुलाभिमानमुचितं सेवा कृता निष्फला ।
भुक्तं मानविवर्जितं परगृहे साशंकितं काकवत्
तृष्णे ! जृम्भसि पापकर्म-निरते नाद्यापि संतुष्यसि ? ८

शार्दूलविक्रीडित

हिंडोनी किति देश दुर्गम, मला
लाभे न कांहीं फळ
केली, योग्य कुलाभिमान त्यजुनी,
सेवाहि मी निष्फळ ।
खालें, शंकित, मानहीन, परकें
मी अन्न काकापरी
तृष्णे ! पापिणि ! वाढसी, अजुनि कां
तृप्ती नसे जाहली ? ॥ ८ ॥

गद्यार्थ—

मी अनेक दुर्गम देशांतून भटकलों, पण कांहीं फळ मिळालें नाहीं; आणि कुळाचा योग्य अभिमान सोडून, चाकरी केली ती निष्फळ झाली ! कावळ्याप्रमाणें, परक्याच्या घरीं ओशाळलेलें अन्न खाल्लें ! तरी अजून हे तृष्णे ! तू वाढतेच आहेस. तुझी तृप्ति अजूनहि कशी होत नाहीं ?

———०———

शार्दूलविक्रीडित

ब्रह्मज्ञानविवेकनिर्मलधियः कुर्वन्त्यहो दुष्करं
यन्मुञ्चन्त्युपभोगभाज्यपि धनं ह्येकान्ततो निःस्पृहाः ।
संप्राप्तं न पुरा, न संप्रति, न च प्राप्तौ दृढप्रत्ययो
वाञ्छामात्रपरिग्रहं, स्वतु, वयं त्यक्तुं न वित्तं क्षमाः ९

शार्दूलविक्रीडित

ब्रह्मज्ञानविशुद्धधी नर करी सत्कर्म दुष्कार्यसें
मारी नि स्पृह तो त्यजी धन, सुख प्रत्यक्ष जें देतसे।
झालें प्राप्त न जें, न आज, न पुढें होईल ही निश्चिति
आम्ही केवळ कल्पनेंत मिळल्या सोडूं न वित्ताप्रति। ९

गद्यार्थ—

ब्रह्मज्ञानानें निर्मल झालेल्या बुद्धीचे नर, एक मोठे दुष्कर कार्य करून दाखवितात;-तें म्हणजे प्रत्यक्ष ज्याचा या क्षणीं उपभोग मिळणें शक्य तें धनहि ते अत्यंत नि स्पृहपणें सोडतात (पण आमच्या हावरट तृष्णेची धांव काय सांगावी?) जें पूर्वी मिळालें नाहीं, आज हातीं आलेलें नाहीं, पुढें मिळेल याची शाश्वती नाहीं, अशा, केवळ इच्छा केली म्हणजे मिळालेंच, अशा (काल्पनिक) द्रव्याला सुद्धां आम्ही सोडूं शकत नाहीं।

———०———

अनुष्टुभ्

लोभेन बुद्धिश्चलति लोभो जनयते तृषाम्।
तृषार्तो दुःखमाप्नोति जन्तुर्जगति मोहितः॥ १०॥

अनुष्टुभ्

लोभानें चळते बुद्धि, लोभ तृष्णेसि जन्म दे।
मोह, तृष्णा, जयाला, त्या, जगीं दुःखचि लाभतें १०

गद्यार्थ—

लोभानें बुद्धि चळते, लोभ तृष्णा उत्पन्न करतो. तृष्णार्त प्राणी ह्या मोहानें शेवटीं दु खच मिळवितो

———०———

अनुष्टुभ्

लोभाविष्टो नरो वित्तं वीक्षते नैव चापदम्।
दुग्धं पश्यति मार्जारो यथा न लगुडाहतिम्॥ ११॥

अनुष्टुभ्

लोभी वित्त पघे, त्याचीं संकटें नच पाहतो।
जसा दूध पघे बोका, वडगा न कधींचि तो॥ ११॥

गद्यार्थ—

लोभी माणूस केवळ वित्त पाहतो पण (त्याच्या प्राप्तींतरीं) संकटें पहात नाहीं. जसें, बोका दूध तेवढें पाहतो—वडगा त्याला दिसत नाहीं.

———०———

अनुष्टुभ्

तावन्नयति संकोचं तृष्णा वै मानसाम्बुजम्।
यावद्विवेकसूर्यस्य नोदिता विमला प्रभा॥ १२॥

अनुष्टुभ्

मिटवी नरपद्मांना तृष्णा ही (रात्र) तोंवर।
फांके विवेकसूर्याची प्रभा स्वच्छ न जोंवर॥ १२॥

गद्यार्थ—

मनुष्यरूपी (सूर्यविकासी) कमलाचा (व त्यांच्या सद्‌सत्प्रवृत्तींचा) तृष्णा (ही जणूं रात्र) ही, तोंवरच संकोच करूं शकते, जोंवर, विवेकसूर्याचा स्वच्छ प्रकाश हृदयांत फांकला नाहीं.

———०———

आर्या

त्वामुदर! साधु मन्ये
शाकैरपि यदसि लब्धपरितोषम्।
हतहृदयं ह्यधिकाधिक-
वाञ्छाशतदुर्भरं न पुनः॥ १३॥

आर्या

उदर! वरें तूंची मज;
भाजीनेंही मिळेच तृप्ति तुला।
जळलें मन! अधिकाधिक
इच्छांनीं तृप्ति ये न कधिं त्याला॥ १३॥

गद्यार्थ—

हे उदरा! मी तुलाच (मनापेक्षा) वरें समजतों कारण, शाकाहारानें सुद्धां तुझी तृप्ति होते जळो तें मन! उत्तरोत्तर अधिकाधिक इच्छाशतामुळें त्याची तृप्ति कधींच होणारी नव्हे!

———०———

अनुष्टुभ्

अहंकारघने शान्ते तृष्णा नवतडिल्लता।
शांतदीपशिखावृत्त्या कापि यात्यतिमत्वरम्॥ १४॥

भुजङ्गप्रयात

अहंकार हा मेघ होतांचि शांत
जणूं वीज तृष्णास्वरूपी, क्षणांत।
जशी ज्योत ही, दीपका मालवीतां
निलोपे कुठेंशी पहातां पहातां॥ १४॥

गद्यार्थ—

अहंकाररूपी मेघ शांत झाला, कीं, तृष्णारूपी वीज, दिवा मालवल्याबरोबर जशी ज्योति, तशी, क्षणाभरात कोठेतरी लुप्त होते

———०———

वसंततिलका

अर्था न सन्ति, न च मुञ्चति मां दुराशा
त्यागे रतिं वहति दुर्ललितं मनो मे ।
याच्ञा च लाघवकरी; स्ववधे च पापं
प्राणाः स्वयं व्रजत; किं परिदेवितेन ? ॥ १५ ॥

वसंततिलका

आशा त्यजी न मज, मी जरि वित्तहीन
लाडावलें मन रमे करण्यांत दान ! ।
भिक्षेंत लाघव, नि पापचि आत्मघात
जावें स्वयें मम जिवा ! इथ शोक व्यर्थ ॥१५॥

गद्यार्थ—

( आधीं श्रीमती व दातृत्व असलेल्या पण सध्या धनहीन झालेल्या माणसाचे उद्गार )—मजपाशीं संपत्ति नाहीं पण, ( ती मिळावयाची ) दुष्ट आशा मला सोडीत नाहीं इकडे मन लाडावलेलें ( पूर्वक्रमाप्रमाणें ) दान देण्याचें प्रेम धरून बसले आहे भीक मागणें हलकटपणाचें, आत्महत्या हें तर पाप होईल. तेव्हां हे माझ्या प्राणांनों ! तुम्ही आपण होऊनच मला सोडून जा ! मग या शोकाची आवश्यकता उरणार नाहीं. ( मला आत्महत्या करावयाला नको )

———०———

अनुष्टुभ्

च्युता दन्ताः सिताः केशा वाग्निरोधः पदे पदे ।
पातसज्जमिमं देहं तृष्णा साध्वी न मुञ्चति ॥ १६ ॥

पादाकुलक

दांत गळाले, केंसहि पिकले
पदोपदीं ही जीभ अडखळे ।
पडण्या सज्जचि असला जरि हा
तृष्णा साध्वी त्यजी न देहा ॥ १६ ॥

गद्यार्थ—

दांत गळाले, केस पिकले, जीभ पदोपदीं अडखळूं लागली देह हा पतनाला सज्ज झाला तरी तृष्णा त्याला सोडीत नाहीं कारण ती साध्वी पतिव्रता आहे ( जन्मभर तिनें याच देहाशीं संसार केला. आतां या देहाला संकटकाळीं ती कशी सोडील ? )

———०———

शार्दूलविक्रीडित

यद्दुर्गामटवीमटन्ति, विकटं क्रामन्ति देशांतरं
गाहन्ते गहनं समुद्रमथनक्लेशं, कृषिं कुर्वते ।
सेवन्ते कृपणं पतिं गजघटासंघट्टदुःसंचरं
सर्पन्ति प्रधनं धनान्धितधियस्तल्लोभविस्फूर्जितम् ॥१७॥

आर्या

भटकति निबिडारण्यीं,
दुर्गम देशांतरांत फिरतात ।
बुडती गहन समुद्रीं,
कष्टें शेती खपूनि करतात ॥
सेविति कृपण धन्यातें,
जाति रणीं हस्तिभाउगर्दीत ।
बनुनि धनाशान्ध, असे
हा लोभाचाचि खेळ जगतांत ॥ १७ ॥

गद्यार्थ—

लोक घोर अरण्यात काय भटकतात, दुर्गम देशान्तरात काय जातात, खोल समुद्रांत काय बुड्या मारतात, हत्तींच्या गर्दीतून वाट काढीत लढाया काय खेळतात हा केवळ धनाच्या आशेनें आंधळ्या झालेल्या माणसाकडून लोभानें करविलेला प्रचंड खेळ आहे.

———०———

अनुष्टुभ्

तृष्णे ! त्वमपि तृष्णान्धा त्रिपु स्थानेपु वर्तसे ।
व्याधितेष्वनपत्येपु जरापरिणतेपु च ॥ १८ ॥

आर्या

तृष्णान्ध तूहि तृष्णे !
स्वयेंच ! तीन स्थळांत जातेस ।
रोगी अपत्यहीन नि
वृद्ध अशांच्या हृदीं रहाण्यास ॥ १८ ॥

गद्यार्थ—

तृष्णे ! तूं स्वतःच तृष्णान्ध दिसतेस. कारण रोगी अपत्यहीन व म्हातारे ( यांच्यापासून तुला कांहींहि मिळावयाचें नाहीं, तरी ) यांच्या पाशीं तू रहातेस. ( इतरांच्या मानानें या विषांत तृष्णा जास्त दिसते असा अर्थ. )

———०———

अनुष्टुभ्

गिरिर्महान्गिरेरब्धिर्महानब्धेर्नभो महत् ।
नभसोऽपि महद्ब्रह्म ततोऽप्याशा गरीयसी ॥ १९ ॥

आर्या

गिरि थोर; उदधि त्याहुनि;
थोरचि दोघांहुनीहि आकाश।
मोठें ब्रह्म तिघांहुनि,
आशा चौघांत थोर अति खास ॥ १९ ॥

गद्यार्थ—

पर्वत मोठे, पण समुद्र त्याहून मोठा, दोघांहून आकाश मोठें; यां तिघांहून ब्रह्म मोठें, पण या चौघांहूनहि आशा फारच मोठी आहे (तिला मर्यादाच नाहीं)

———

अनुष्टुभ्

यच्च कामसुखं लोके, यच्च दिव्यं महत्सुखम्।
तृष्णाक्षयसुखस्यैते नार्हतः षोडशीं कलाम् ॥ २० ॥

आर्या

मोठें रतिसुख लोकीं;
मोठें स्वर्गीय सौख्य त्याहून।
तृष्णाक्षयसौख्याची
सर दोघां षोडशांश येई न ॥ २० ॥

गद्यार्थ—

जगांत रतिसुख सर्वांत मोठें समजतात. आणि, स्वर्गसुख हेंहि असेंच मोठें समजतात परंतु तृष्णा नष्ट केल्यानें जें सुख लाभतें, त्याच्या सोळाव्या अंशाचीसुद्धां सर, या पूर्वोक्त दोन्ही सुखांना नाहीं.

———

शार्दूलविक्रीडित

निःस्वोऽप्येकशतं, शती दशशतं, लक्षं सहस्रीहते
लक्षेशः क्षितिराजतां, क्षितिपतिश्चक्रेशतां वाञ्छति।
चक्रेशः सुरराजतां, सुरपतिर्ब्रह्मास्पदं वाञ्छति
ब्रह्मा विष्णुपदं, हरिः शिवपदं, तृष्णावधिं को गतः? २१

आर्या

इच्छी निर्धन शंभर;
सहस्र शतवान; तोहि लक्षास।
लक्षी नृपपद, राजा
एकछत्रता तसेंचि चक्रेश ॥—
इन्द्रत्व, आणि इंद्र
ब्रह्मपदा, ब्रह्म विष्णुपदवीतें
इच्छी विष्णुहि शिवपद…
सांगा तृष्णेसि अंत कां कोठें? ॥ २१ ॥

गद्यार्थ—

ज्यान्यापाशीं शून्य (रुपये वगैरे) असतात, त्याला हांव वाटते, कीं, मला शंभर केव्हां मिळतील? शंभर असलेल्याला सहस्र, सहस्रवाल्याला लक्ष, लक्षवाल्याला राज्यपद, राजाला एकछत्रपद, चक्रेशाला इन्द्रपद; इंद्राला ब्रह्मपद; ब्रह्मदेवाला विष्णुपद; विष्णूला शिवपद, मिळविण्याची हांव असते; तेव्हां तृष्णेचा अंत कोणी पाहिला आहे का?

———

अनुष्टुभ्

यौवनं जरया ग्रस्तमारोग्यं व्याधिभिर्हतम्।
जीवितं मृत्युरभ्येति तृष्णैका निरुपद्रवा ॥ २२ ॥

अनुष्टुभ्

रोगांनीं ग्रस्त आरोग्य वार्धक्यें ग्रस्त यौवन।
जीवन ग्रस्त मृत्यूनें ग्रस्त तृष्णाचि एक, न ॥ २२ ॥

गद्यार्थ—

आरोग्य रोगांनीं पछाडलेलें आहे तारुण्य वार्धक्यानें व जीवन मृत्यूनें पछाडलेलें असतें. जिला कोणापासून उपद्रव पोंचत नाहीं अशी तृष्णा ही एकैवाद्वितीया!

———

शिखरिणी

समारम्भा भग्नाः कति न कतिवारांस्तव पशो
पिपासोस्तुच्छेऽस्मिन्द्रविणमृगतृष्णार्णवजले।
तथापि प्रत्याशा विरमति न तेऽद्यापि शतधा
न दीर्णं यच्चेतो नियतमशनिग्रावघटितम् ॥ २३ ॥

शार्दूलविक्रीडित

झाले भग्न किती उपक्रम पशो!
कित्येक वेळां तुझे
प्याया तुच्छधनाचिया मृगजळीं
तूं यत्न केलेसि जे।
आशा कां न सरे अजूनि शतधा
भंगोनियां नाकळे
झालें चित्त न दीर्ण यास्तव गमे
वज्रेंचि तें निर्मिलें ॥ २३ ॥

गद्यार्थ—

हे नरपशो! या तुच्छ धनरूपी मृगजळाचे पाणी पिण्यासाठीं, तू किती उपक्रम केलेस? आणि, ते कितीवेळां ढासळून पडले? (हे अनुभव लक्षांत घेऊन तुझे डोळे उघडूं देत.) तुझी ती धनाशा अजून कशी मरत नाहीं हें मोठें आश्चर्य आहे; आणि, तुझें चित्त, ज्या अर्थी, अजून शेंकडों तुकडे होऊन फुटून जात नाहीं, त्या अर्थी, तें वज्राच्या किंवा दगडाचें केलेलें आहे खास

———

# प्रकरण २७ वें

## जगन्मोहिनी—स्त्री

शिखरिणी

द्रुतं यस्यालोकाद्विरहिजनशोकापनयनं
यदङ्के सानन्दं नयनमरविन्दं विहरति ।
न यस्यापैति श्रीः कचनिचयराहोरपि पुनः
स मे खेदं रामावदनहिमधामा शमयतु ! ॥ १ ॥

शिखरिणी

क्षणीं, पाहातां, जो विरहिजनशोका हरितसे
यदङ्कीं आनंदें, नयन जणु हें पद्म विलसे ।
न लुप्त श्री ज्याची कचनिचयराहूहि करितो
हरो माझ्या तापा, रमणिमुखरूपी शशिच तो ॥ १ ॥

गद्यार्थ—

ज्यांचें दर्शन घडलें असतां, त्वरितच, विरही पुरुषाचें विरहजनित दुःख नाहींसें होतें, ज्याच्या मांडीवर (म्हणजे नुसतें ज्यावर) नेत्ररूपी कमल आनंदानें विहार करीत असतें, ज्याचें सौंदर्य, केशकलापरूपी राहु (दोघेहि काळे) सुद्धा, लोपवूं शकत नाहीं, असा, तो रमणीचा मुखचंद्र माझे मनस्ताप हरण करो

—०—

शार्दूलविक्रीडित

द्रष्टव्येषु किमुत्तम ? मृगदृशा
प्रेमप्रसन्नं मुखं !
घ्रातव्येष्वपि किं ? तदास्यपवनः !
श्राव्येषु किं ? तद्वचः ।
किं स्वाद्येषु ? तदोष्ठपल्लवरसः !
स्पृश्येषु किं ? तत्तनु–
र्ध्येयं किं ? नवयौवनं सहृदयैः
सर्वत्र तद्विभ्रमः ॥ २ ॥

शार्दूलविक्रीडित

प्रेमानें फुलल्या मुखास बघणें
हा श्रेष्ठ नेत्रोत्सव
हुंगावा मुखगंध, संतत पडो
कानीं मुखींचा रव ।
चाखावें मधु ओष्ठपल्लवरसा,
घ्यावा तनुस्पर्श तो
*स्त्रीच्या यौवनविभ्रमीं सहृदयें*
घ्यावा निदिध्यास तो ॥ २ ॥
(मूळातील प्रश्नोत्तर स्वरूप कायम ठेवण्यासाठीं)

आर्या

दृश्यांत काय उत्तम ?
फुलतां प्रेमें मृगेक्षणावदन ।
घ्रातव्यांत ? तदानन—
गंध, श्राव्यांत काय ? तद्वचन ! ॥
स्वाद्यांत काय ? तदधर—
सुधा, नि स्पृश्यांत काय ? तनु मृदुला !
ध्यानें काय सहृदयें ?
नवयुवतीच्याच सकल, मधुर लीला ॥

गद्यार्थ—

प्रेक्षणीय वस्तूंत उत्तम कोणती ? मृगनयनेचें प्रेमानें फुललेलें मुख उत्कृष्ट सुगंध कोणता ? युवतीचा मुखगंध, अत्यंत सुश्राव्य काय ? स्त्रीचें बोलणें सर्वांत गोड रुचि कशाची ? सुंदरीच्या अधररसाची, सर्वांत सुखस्पर्श काय ? तरुणीची मृदुल तनु, सहृदय मनुष्यानं निदिध्यास घेण्याजोगी सर्वोत्कृष्ट वस्तु कोणती ? नवयुवतीच्या लीला ~

—०—

शिखरिणी

स्मितं किंचिद्वक्त्रे सरलतरलो दृष्टिविभवः
परिस्पन्दो वाचामभिनवविलासोक्तिसरसः ।
गतीनामारम्भः किसलयितलीलापरिकरः
स्पृशन्त्यास्तारुण्यं किमिव नहि रम्यं मृगदृशः ? ॥३॥

शिखरिणी

मुखीं हांसू थोडें; ऋजु तरल हे भाव नयनीं
विलासोक्ती आणी मधुरचि नवा कंप वचनीं ।
गती शोभे, कीं, तें किसलय जणूं रम्य डुलतें,
वयीं येतां स्त्रीचें सुभग न जगीं काय दिसतें ? ॥३॥

गद्यार्थ—

मुखामध्यें नाजुकसें स्मित, नेत्रांत सरल व तरल असे भावदर्शन, विलासोक्तीमुळें वाणीला एक अभिनव मधुर कंप आलेला; वेलीवरचे कोमल पल्लव हलावेत अशी ललित गति; किशोरावस्थेंतून तारुण्याला स्पर्श करणाऱ्या मृगनयनेचें काय रम्य दिसत नाहीं ?

———

शिखरिणी

अनाघ्रातं पुष्पं किसलयमलूनं कररुहै-
रनाविद्धं रत्नं मधु नवमनास्वादितरसम् ।
अखण्डं पुण्यानां फलमिव च तद्रूपमनघं
न जाने भोक्तारं कमिह समुपस्थास्यति विधिः ? ॥ ४

सुमंदारमाला

न जें हुंगिलें पुष्प कोणी, असें; वा
नखें तोडिलें ना, असें पल्लव !
न जें विंधिलें रत्न, तें; वा कुणीही,
नसे चाखिलें ज्या, मधू तो नव ॥
महापुण्ययोगें च धन्यास लाभे
प्रयासें, असें रूप हें निर्मल
न जाणे कुण्या भाग्यवंतास भोगा-
वया भाग्य ऐसें विधी देइल ? ॥ ४ ॥

गद्यार्थ—

( दुष्यंत शकुंतलेस पाहून म्हणतो—आजवर कोणी ज्याचा वास घेतलेला नाहीं असें हें पुष्प ! झाडावरून नख लावून कोणी तोडलेली नाहीं अशी ही रसरशीत जिवंत लुसलुशीत पालवी, ज्याला अजून विंधून वेज पाडिलें नाहीं, असें कोरें हें मौक्तिक ! ज्याचा अजून कोणी स्वाद घेतला नाहीं असा हा ताजा मध ! हें सुंदर निष्पाप रूप, महापुण्ययोगानेंच प्राप्त होणारें, कोण जाणे, कुण्या भाग्यवंतास भोगण्यास ब्रह्मदेव सोपवणार आहे !

———

शार्दूलविक्रीडित

अस्याः सर्गविधौ प्रजापतिरभूच्चन्द्रो नु कान्तिप्रदः ?
शृंगारैकरसः स्वयं नु मदनो ? मासो नु पुष्पाकरः ? ।
वेदाभ्यासजडः कथं नु विषयव्यावृत्तकौतूहलो
निर्मातुं प्रभवेन्मनोहरमिदं रूपं पुराणो मुनिः ? ॥५॥

शार्दूलविक्रीडित

देण्या कांतिस, चंद्र काय बनला
ब्रह्मा हिला निर्मितां ?
झाला काय वसंत वा मदन तो
शृंगारराजा स्वतां ? ।
वेदाभ्यासजडत्व ज्यासि, विषयीं
ज्यातें नुरे आवडी
निर्मू केविं शके पुराण मुनि तो
रम्याकृती एवढी ? ॥ ५ ॥

गद्यार्थ—

ही (चंद्रमुखी) निर्माण करतेवेळीं, ब्रह्मदेव, हिला (चंद्राची) कांति देण्यासाठीं, स्वतःच चंद्र तर नसेल ना झाला ? किंवा, तो शृंगारराज मदन, किंवा वसंतऋतु तर झाला नसेल ? ( ही सुंदरी, मुनिकन्या असेल, हें खरें वाटत नाहीं. ) विषयापासून परावृत्त झालेला, व वेदाभ्यासानें रुक्ष झालेला, तो जरठ मुनि, एवढें मनोहर सौंदर्य, कसें निर्माण करूं शकेल ?

———

शार्दूलविक्रीडित

निर्मित्सुः सुदतीमजो विरचिते
वक्त्रे, शशिभ्रान्तितः
कोशीभूतनिजाम्बुजासनमथि-
ष्ठातुं न शक्तो विधिः ।
मध्यं विस्मृतवान्; कुचौ तु कठिनौ,
पीनौ नितम्बौ, कचान्
वक्रान्निर्मितवान्; मतिः स्फुरति हि
स्वस्थे नृणां चेतसि ॥ ६ ॥

शार्दूलविक्रीडित

निर्मी स्त्री विधि तो, वदन, मुख करी;
तें चंद्रसें मानुनी
त्याचें पद्म मिटे; नि आसन नुरे,
तेणेंचि भांबावुनी ।
मध्याला विसरे; कुचां कठिनसे,
जाडी नितंबां, तसे
केसां वक्र करी; स्फुरे मति नव
जों स्वास्थ्य देहीं वसे ॥ ६ ॥

गद्यार्थ—

ब्रह्मदेव, ( आपल्या कमलासनावर बसून, ) स्त्रीची मूर्ति करू लागला प्रथम त्यान तिचें मुख तयार केलें तें इतकें ततोतत चद्रासारखें झालें, कीं, त्यामुळें, त्याच्या बैठकीचें ते कमल मिटलें अशा तऱ्हेनें, काम करताना, स्थिरसुख आसन नष्ट झाल्यानें, गोंधळून, स्त्रीचा मध्य भाग करण्यास तो विसरला ( म्हणून स्त्रीची कटि इतकी बारीक ) स्तनाचे जागीं त्यानें काहीं कठिन पदार्थ कोंबला, जाडजूड गोळा नितंबाच्या जागीं बसवला, व हात स्थिर न राहिल्यानें केंस वक्र (कुरळे) करून बसला ! कुणाहि कलावंताला, नीट बसायला आसन सुद्धा नसलें, म्हणजे काम करण्यास, स्वस्थता कशी वाटावी ? आणि, स्वस्थताच नाहीं तर स्फूर्ति तरी कशी यावी ?

---

शिखरिणी

अनाकाशे चन्द्रः सरसिजदलद्वन्द्वसहितो
गृहीतः पश्चार्धे कुटिलकुटिलैः सोऽपि तिमिरैः ।
सुधां मुञ्चत्युच्चैरनिशमथ समोहजननीं
किमुत्पातालीय वदत जगतः कर्तुरुदिता ! ॥ ७ ॥

शार्दूलविक्रीडित

आकाशाविण चंद्र ! दोन रचिलीं
त्याच्यांत नीलोत्पलें !
अर्धे मागुनि, वक्र गाढ तिमिरें
चंद्रासि त्या माखिलें ।
वर्षी नित्य सुधा—जगास अवघ्या
संमोह जी देतसे !
एकामागुनि एक काय विधि हें
उत्पात निर्मीतसे ॥ ७ ॥

गद्यार्थ—

ब्रह्मदेवानें स्त्री निर्माण केली असें म्हणण्यापेक्षां एकाहून एक, वरचढ, असे, उत्पाती चमत्कारच निर्माण केले, असें म्हणणें जास्त योग्य ! आकाशावाचून चद्र उत्पन्न केला ! (मुख) त्या चद्रावर दोन कमळें बसविलीं ( नेत्र ) त्या चद्राचा पाठी मागचा भाग ( केंस ) वक्र, दाट अशा अंधारानें माखून ठेवला ! तो चद्र अमृतवृष्टि करतो ( अधर सुधा ) पण हें अमृतहि जगा वेगळेंच ! खरें अमृत तृप्ति, शांति, देतें, तर, हें अमृत माणसाची शुद्ध बुद्ध नाहींशी करणारा समोह देतें !

---

शार्दूलविक्रीडित

केशाः संयमिनः श्रुतेरपि परं पारं गते लोचने
अंतर्वक्त्रमपि स्वभावशुचिभिः कीर्णं द्विजानां गणैः ।
मुक्तानां सतताधिवासरुचिरं वक्षोजकुम्भद्वयं
इत्थं तन्वि वपुः प्रशान्तमपि ते क्षोभं करोत्येव नः

शार्दूलविक्रीडित

गेले ते श्रुतिपार लोचन तुझे
ते संयमी केशही
जन्मानेंच विशुद्धसे द्विज तुझ्या
होती मुखाचे गृहीं ॥
मुक्तांचा नित वास हे सखि ! तुझ्या
वक्षोजकुम्भांवरी
पेशी शांत तुझी असूनि तनु, कां
प्रक्षोभ आम्हां करी ? ॥ ८ ॥

गद्यार्थ—

हे सुदरि ! तुझे केश सयमी ( बांधून ठेवलेले ) आहेत ! तुझे नेत्र श्रुतिपार गेलेले आहेत ( श्रुति=कान, श्रुतिपार-आकर्ण नेत्र. दुसरा अर्थ श्रुति=वेद, श्रुतिपार=वेदपारंगत ) तुझ्या मुखरूपी गृहामध्यें निसर्गत शुद्ध ( पांढरे ) अशा द्विजांची ( दातांची, ब्राह्मणाची ) नेहमीं गर्दी असते, तुझ्या स्तनकुंभावर नेहमीं मुक्तांची (मोत्यांची, दुसरा अर्थ मुक्तावस्थेंत पोंचलेल्यांची ) वसति असल्यान ते शोभत आहेत—असें सर्व तुझ्या देहावर शांत वातावरण असता, आम्हांला मात्र तें मनात प्रक्षुब्ध कां बरें करतें ?

---

उपजाति

सर्वोपमाद्रव्यसमुच्चयेन यथाप्रदेशं विनिवेशितेन ।
सा निर्मिता विश्वसृजा प्रयत्नादेकस्थसौंदर्यदिदृक्षयेव ९

इन्द्रवज्रा

ठेवूनि वस्तू उपमानभूत
त्या योग्य ठायीं सगळ्या तनूंत ।
निर्मी विधी यत्न करूनि हीतें
एकत्र सौंदर्य पहावयातें ॥ ९ ॥

गद्यार्थ—

( उपमान म्हणजे ज्याची उपमा द्यावयाची तें, उदा० मुख चद्रासारखें, यांत, चद्र हें उपमान ) ब्रह्मदेवानें हिला (पार्वतीला) उत्पन्न करतांना सर्व उपमानभूत द्रव्यें आणून, हिच्या देहात

योग्य जागीं तीं, मोठ्या प्रयत्नानें बसवून, ( उदा० मुख करताना प्रत्यक्ष चंद्रच तेथें बसविला, गाल करतांना प्रत्यक्ष गुलाबच तेथें ठेवले वगैरे ) ही निर्माण केली, ते जणूं काय, विश्वांतलें सर्व सौंदर्य, एकच ठायीं एकत्रित झालेलें, पाहण्याची, इच्छा त्याला झाली, म्हणून असावें

———०———

शिखरिणी

किमिन्दुः किं पद्मं किमु मुकुरबिम्बं किमु मुखं ?
किमब्जे किं मीनौ, किमु मदनबाणौ किमु दृशौ ? ।
खगौ वा गुच्छौ वा, कनककलशौ वा किमु कुचौ ?
तडिद्वा तारा वा कनकलतिका वा किमबला ? ॥१०॥

आर्या

हा चंद्र, पद्म किंवा
दर्पण किंवा असेल हें वदन ? ।
कमलें, मीनहि अथवा
सरदार कां असति दोन हे नयन ? ॥
पक्षिद्वय, कां गुच्छचि,
कनककुम्भ कां असें स्तनद्वय हें ?
ही वीज, तारका वा,
कनकलता, स्त्रीच काय ही आहे ? ॥ १० ॥

गद्यार्थ—

( सुंदरीच्या अवयवांस पाहून त्या त्या अवयवाचें मूळ उपमानभूत द्रव्यच ( श्लोक ९ पहा ) त्या जागीं आहे की काय, असा भ्रम पडतो )–हा काय चंद्र आहे ? कीं कमल आहे ? कीं आरसा आहे कीं सुंदरीचें मुख आहे ? ही काय कुमुदें, कीं, मासे, कीं मदनाचे बाण, की सुंदरीचे नयन ? ही काय पाखरांची जोडी, कीं गुच्छ, की सुवर्ण कलश, की सुंदरीचे स्तन ? ही काय वीज, कीं तारका, कीं सोन्याची वेली, की स्त्री ?

———०———

उपजाति

मात्सर्यमुत्सार्य विचार्य कार्य-
मार्याः समर्यादमिदं वदन्तु ।
सेव्या नितम्बाः किमु भूधराणा-
मुत स्मरस्मेरविलासिनीनाम् ? ॥ ११ ॥



उपजाति

मात्सर्य सोडूनि विचारवन्तें
खरें खरें हें वदणें अम्हांनें ॥
कुशींत जावें गिरिकन्दरांच्या
कीं यौवनें मत्त विलासिनींच्या ? ॥ ११ ॥

गद्यार्थ—

विचारवन्तांनी सरळ सरळ, मत्सर सोडून, सांगावें की, डोंगरांच्या कुशींत जावें, की, यौवनमत्त विलासिनींच्या ? ( संन्यास घ्यावा की, शृंगारसुख भोगावें ? )

———०———

शार्दूलविक्रीडित

विश्वामित्रपराशरप्रभृतयो वाताम्बुपर्णाशना-
स्तेऽपि स्त्रीमुखपङ्कजं सुललितं दृष्ट्वैव मोहं गताः ।
शाल्यन्नं सघृतं पयोदधियुतं भुंजन्ति ये मानवा-
स्तेषामिन्द्रियनिग्रहो यदि भवेद्विन्ध्यस्तरेत्सागरम् १२

शार्दूलविक्रीडित

विश्वामित्रपराशरादि जगले,
पर्णें, जलें, वायुनें
तेही स्त्रीमुखपद्म गोड बघुनी
मोहूनि गेले क्षणें ।
खाई जो नर दूध तूप असले
सुग्रास, तो निग्रही–
स्त्रीशीं राहुं शके कधीं तर, तरे
अब्धीवरी विन्ध्यही ॥ १२ ॥

गद्यार्थ—

वायु, पाणी, पानें असा भक्ष, तापसी आहारावर राहिलेले, विश्वामित्र, पराशर, इत्यादि महान् तपस्वी सुद्धां, स्त्रीचें सुंदर मुखकमल पाहतांक्षणींच मोहित झाले, मग साधारण मानव जे दहीं, दूध, तूप, असें सुग्रास अन्न खातात, ते, स्त्रीशीं, कसचा इंद्रियनिग्रह करणार ? जर कदाचित ते करूं शकले, तर विंध्य पर्वतहि समुद्रावर तरूं शकेल !

———०———

वसंततिलका

नूनं हि ते कविवरा विपरीतबोधा
ये नित्यमाहुरबला इति कामिनीस्ताः ।
याभिर्विलोलतरतारकदृष्टिपातैः
शक्रादयोऽपि विजितास्त्वबलाः कथं ताः ? ॥१३॥

वसंततिलका

वेडेचि येति कवि ते मजला दिसून
जे स्त्रीसि नित्य वदती 'अबला' म्हणून ॥
ताऱ्यांपरी नजर ती पडतां जियेची
इंद्रादि होति जित, ती अबला कशाची ? ॥ १३ ॥

गद्यार्थ—

जे थोर कवि कामिनीला, 'अबला' असें नित्य म्हणतात ते, मला तरी वेडेच वाटतात अहो ! जिची, ताऱ्यांप्रमाणें चंचल, अशी नुसती दृष्टि पडताच, इंद्रासारखे देवांचे राजे सुद्धा जिंकले जातात, ती स्त्री 'अबला' कशी म्हणावी ?

---

तोटक

उडुराजमुखी, मृगराजकटि-
गजराजविराजितमंदगतिः ।
यदि सा वनिता हृदये निहिता
क तपः ? क जपः ? क समाधिरतिः ? ॥ १४ ॥

तोटक

रमणी शशिसुंदर सिंहकटि
गजराजसमान सुमंदगति ।
हृदयीं घुसतां तप हो कुठलें ?
जप तेवि समाधि कुठूनि मिळे ? ॥ १४ ॥

गद्यार्थ—

चंद्रासमान मुख असलेली, सिंहासारखी कटि असलेली, गजराजासारखी डौलदार मंदगति असलेली, अशी सुंदरी, जर हृदयांत स्थान मिळवून बसलेली असेल, तर कुठलें तप, कुठला जप आणि कसली समाधि ?

---

शालिनी

भ्रूचातुर्याकुञ्चिताक्षाः कटाक्षाः
स्निग्धा वाचो लज्जिताश्चैव हासाः ।
लीलामन्दं प्रस्थितं च स्थितं च
स्त्रीणामेतद्भूषणं चायुधं च ॥ १५ ॥

शालिनी

भ्रूलीलेनें पाहणें लोचनांनीं
लज्जाहासें बोलणें गोड वाणी ।
लालित्यानें चालणें थांबणेंही
स्त्रीचीं सारीं भूषणें, आयुधें हीं ॥ १५ ॥

गद्यार्थ—

कौशल्यानें भ्रूलीला करून, नेत्र संकुचित करून कटाक्षानें पाहणें, गोड बोलणें, लाजत लाजत हंसणें, लीलेनें मंद चालणें व थांबणें, हीं सारीं जशीं स्त्रीचीं भूषणें आहेत तशींच आयुधेंहि आहेत.

---

आर्या

दग्धो विधिर्विधत्ते न सर्वगुणसुंदरं जनं कमपि ।
इत्यपवादभयादिव मुग्धाक्षी निर्मिता विधिना ॥१६॥

आर्या

"सर्वांगीं सुंदरता,
जळला विधि तो कुणास देईना" ।
टाळाया निंदा ही,
घडवी जणुं तोच ही कमलनयना ॥ १६ ॥

गद्यार्थ—

"तो जळला ब्रह्मदेव, सर्वांगीं सुंदरता कोणाहि माणसाला देत नाहीं," अशी ही निंदा टाळण्यासाठीं जणूं त्यानें ही सुंदरी ( सर्वांग सुंदर ) निर्मिली असावी.

---

आर्या

मीनवती नयनाभ्यां
चरणाभ्यां च प्रफुल्लकमलवती ।
शैवालिकी च केशैः
सुरसेयं सुंदरी सरसी ॥ १७ ॥

आर्या

मीनचि हे जणुं लोचन;
पदयुग उत्फुल्ल पंकजांपरि तें ।
शैवालासम केशहि,
सुरस सरोवरचि सुंदरी दिसते ॥ १७ ॥

गद्यार्थ—

हिचे नेत्र हे जणूं मासे, पदयुगल हीं जणूं फुललेलीं कमलें, केश हे जणूं शैवाल... मिळून विचार करतां, ही सुंदरी, जणूं सुरस सरोवरच आहे असा भास होतो.

---

आर्या

अमृत वदधरबिम्बे
वचनेप्यमृतं विलोकनेऽप्यमृतम् ।
अमृतमूर्तौ कुचकुम्भौ
सत्य सा सृष्टिरपरैव ॥ १८ ॥

आर्या

अधरोष्टात सुधा ती,
वचनांत सुधा, सुधाभरी दृष्टि ।
कुचकलशांत सुधा, स्त्री
खरेंच न्यारी सुधामयी सृष्टि ॥ १८ ॥

गद्यार्थ—

या सुदरीच्या अधरांत अमृत, वाणींत, दृष्टींत, अमृत, कुच-कलशांत हि अमृतच अमृतपूर्ण अशी ही खरोखर निराळीच सृष्टि आहेसें वाटतें

———o———

शार्दूलविक्रीडित

कर्णारुन्तुदमेव कोकिलरुतं तस्याः श्रुते भाषिते
चंद्रे लोकरुचिस्तदाननरुचेः प्रागेव सदर्शनात् ।
चक्षुर्मीलनमेव तन्नयनयोरग्रे मृगीणा वर
हैमी वल्ल्यपि तावदेव ललिता यावन्न सा लक्ष्यते ॥

शार्दूलविक्रीडित

वाणी ऐकुनिया हिची, कटु गमे
तें कोकिलाकूजन !
चद्रा पाहवतें, हिचें न दिसलें
लोकास, जों, आनन ।
नेत्राच्या पुढतीं हिच्या हरिणिनें
नेत्रा मिटावे वरें
सोन्याची लतिका गमे सुललिता,
जों ना हिला पाहिलें ॥ १९ ॥

गद्यार्थ—

ज्याच्या कानीं या सुदरीची वाणी एकदा पडली, त्याला मग, कोकिलकूजितसुद्धा कर्णकटु वाटतें हिचें मुख पाहिलें नाहीं, तोंवरच, लोकाना चद्राकडे पाहवतें हिच्या डोळ्याच्या पुढे, हरिणींनीं आपले डोळे मिटून घ्यावे हेंच बरें सुवर्णलतिका सौंदर्यनत्व ललित वाटत, जोंवर माणसानें या सुदरीची सुलतिका पाहिली नाहीं

———o———

अनुष्टुभ्

सा दृष्टा यैर्न वा दृष्टा मुषिताः सममेव ते ।
हृदय हृतमेतेषामन्येषा चक्षुषो· फलम् ॥ २० ॥

अनुष्टुभ्

पाहे स्त्री जो, न या, दोघां सारखें हानिकारक ।
जाई हृदय पहिल्याचें दुज्याचें दृष्टिचें सुख ॥ २० ॥

गद्यार्थ—

सुदर स्त्रीला जो पाहतो, किंवा जो पाहत नाहीं त्या दोघांची हि सारखीच हानि होते जो पाहतो त्या आपल हृदय गमावून बसतो, जो पहात नाहीं त्या आपल्या नेत्रांचें साफल्य गमावून बसतो

———o———

शार्दूलविक्रीडित

तन्वी सा यदि गायति श्रुतिकटुर्वीणाध्वनिर्जायते
यद्याविष्कुरुते स्मितानि मलिनैवालक्ष्यते चन्द्रिका ।
आस्ते म्लानमिवोत्पल नवमपि स्याच्चेत्पुरो नेत्रयो-
स्तस्याः श्रीरवलोक्यते यदि तडिद्वल्ली विरूपैव सा ॥

शार्दूलविक्रीडित

गाते ही रमणी, तदा कटु गमे
कर्णांसि वीणाध्वनि
दावी ही स्मित, त्यापुढे मलिनची
वाटे निशा चादणी ।
ताजें पद्म गमे मलूलचि हिच्या
नेत्रांपुढें ठेवता
भासे वीज फिकी कुणाहि, रुचिरा
कांती हिची पाहता ॥ २१ ॥

गद्यार्थ—

ही सुदरी गाते तेव्हां, त्या गायनापुढें, वीणावादन कर्णकटु लागतें, हिच्या स्मिताच्या प्रकाशापुढें चादणी रात्र सुद्धां मलिन वाटते, हिच्या प्रफुल्ल नेत्रांजवळ, ताजें टवटवीत कमल धरलें तर त्या कमलाचा ताजेपणा सुद्धां मलूल वाटतो हिची तेजस्वी शरीरकांति पाहिला, की, विजेची चमक सुद्धा फिकी वाटते

———o———

शार्दूलविक्रीडित

धन्या सा गृहदेहली स्पृशति या
तत्पादपद्मप्रभा
जाता सा सरसी सदा विशति सा
यस्यां विहारेच्छया ।
वन्यः कोऽपि स एव यः खलु तया
नेत्रेण संभाव्यते
धिग्धिग्वेधसमेषु मां यदनय-
न्नैकं कथंचित्कथम् ॥ २२ ॥

शार्दूलविक्रीडित

तोची उंबरठा सुधन्य ! पदही ज्यातें तिचे स्पर्शिती
होई सुंदर तें सरोवर सदा स्नाना जियें जाइ ती ।
तोची वंद्य ! पडे जयावर तिची दृष्टी कृपेची अहा !
केलें यांतुन एकही न मज त्या ब्रह्म्यास धिक्कार
हा ॥ २२ ॥

गद्यार्थ—

तो उंबरठा धन्य ! ज्याला त्या सुंदरीच्या पदकमलांचा, येता जाता, स्पर्श, घडतो ! जेथें ती नित्य स्नानाला जाते, (तें डबकें का असेना,) तें, सुंदर सरोवरच होऊन जातें ! तो मनुष्य धन्य, ज्याला त्या सुंदरीच्या दृष्टीची कृपा लाभते ! पण हाय ! हाय ! या तिन्हींपैकी, ज्या ब्रह्मदेवानें मला एकहि केलें नाहीं, त्याचा धिक्कार असो

———•———

पृथ्वी

त्वदीयमुखपङ्कजे यदि विचोरले वार्तया
तवाधरसुधा यदा भवति किं सुधा नो मुधा ।
त्वदङ्गपरिरम्भणं भण कृतं सुधागाहनै-
स्त्वदीयदगनुग्रहस्तदपि धिग्धिगेन्द्रं पदम् ॥ २३ ॥

पृथ्वी

तुझ्या वदनकांतिच्या पुढतिं चंद्र तो कायसा ?
तुझें अधरपान जिंकिल असें सुधेच्या रसा ।
सुधेंत बुडणेंहि फोल गमतें त्वदालिंगनें
सुरेंद्रपद धिक् गमेल तुझिया कृपादृष्टिनें ॥ २३ ॥

गद्यार्थ—

हे सुंदरि ! तुझ्या मुखचंद्राची प्रभा पाहिल्यानंतर, चंद्राची गोष्ट तरी कोण काढील ? तुझ्या अधरांतलें अमृत प्राशन केल्यावर, खरें अमृत सुद्धा व्यर्थ नाहीं का होणार ? तुझें आलिंगन मिळाल्यानंतर, प्रत्यक्ष सुधासागरात डुबणें सुद्धा काय गोड लागणार ? तुझ्या नुसत्या दृक्पाताची कृपा लाभल्यानंतर, इंद्रपदाला हि तुच्छ म्हटल्याशिवाय माणूस कसा राहील ?

———•———

वंशस्थ

स्मितेन भावेन च लज्जया भिया
पराङ्मुखैरर्धकटाक्षवीक्षणैः ।
वचोभिरीर्ष्याकलहेन लीलया
समस्तभावैः खलु बन्धनं स्त्रियः ॥ २४ ॥

उपजाति

स्मितें, भयें, लाजुनि भाव दावुनी
वळून अर्धेंच कटाक्ष सोडुनी ।
ईर्ष्याविवें भांडुनि आणि खेळुनी
स्त्री घालिते ( मूढ ) नरास बंधनीं ॥ २४ ॥

गद्यार्थ—

नाजूक हसून, भावप्रदर्शन करून, लाजून, भ्याल्यासारखें करून, वळून अर्धे कटाक्ष टाकून, रागावून भांडून, खेळकरपणा दाखवून, अशा सर्व प्रकारांनी, स्त्री ही पुरुषाला ( वेड लावून ) बंधनांत घालीत असते

———•———

अनुष्टुभ्

नामृतं न विषं किञ्चिदेकां मुक्त्वा नितंबिनीम् ।
सैवामृतलता रक्ता विरक्ता विषवल्लरी ॥ २५ ॥

अनुष्टुभ्

सुधा वा विष या लोकीं एकच्या स्त्रीविण नान्य तें ।
प्रेमीं वर्षी सुधा जी, ती जातां तें, विष वर्षिते ॥२५॥

गद्यार्थ—

एक स्त्री सोडली तर (तिच्या एवढें) विलक्षण अमृत हि कोठें नाहीं व (तिच्या एवढें) भयंकर विषहि दुसरें नाहीं ! ती प्रेम करते, तेव्हां अमृताचा वर्षाव करते, प्रेमभंग झाला की विषाचा !

———•———

अनुष्टुम्

तक्कुम्भसमा नारी तप्ताङ्गारसमो नरः ।
स्माद् घृतं च वह्निं च नैकत्र स्थापयेद्बुधः ॥ २६ ॥

अनुष्टुभ्

तकुम्भापरी नारी, जळता अग्नि हा नर ।
ता, अग्नीस बुध हा, ठेवी राखोनि अंतर ॥ २६ ॥

गद्यार्थ—

स्त्री ही तुपाचा कुंभ व पुरुष हा धगधगता विस्तव म्हणून, शहाण्या माणसान त्यांना एकत्र ठेवू नये

———०———

शार्दूलविक्रीडित

वक्त्रं चंद्रविडम्बि पङ्कजपरीहासक्षमे लोचने
वर्णः स्वर्णमपाकरिष्णुरलिनो जेता कचानां चयः ।
वक्षोजाविभकुम्भविभ्रमहरौ गुर्वी नितम्बस्थली
वाचा हारि च मार्दवं युवतिषु स्वाभाविकं मण्डनम् ॥

शार्दूलविक्रीडित

चंद्राला मुख हांसतें, नयनहीं पद्मा करी लज्जित
सोन्याला हटवील रंग, कच ते भुंग्यांसही जिंकित ।
डौलानें स्तन हस्तिमस्तकपरी, मोठी नितम्बस्थली
वाणी मोहक मंजु, हीं युवतिला लेणीं निसर्गे दिलीं ॥ २७ ॥

गद्यार्थ—

चंद्राला हसणारें मुख, कमलाना लाजविणारे डोळे, सोन्याला मागें टाकणारा वर्ण, भृगाला जिंकणारा काळाभोर केशकलाप, हत्तीच्या गडस्थलाचा डौल दाखवणारे स्तन, भरदार नितम्ब, मोहक मंजुळ वाणी हीं सर्व स्त्रांचीं निसर्गदत्त लेणींच आहेत

———०———

वैतालीय

मधु तिष्ठति वाचि योषितां हृदि हालाहलमेव केवलम् ।
अत एव निपीयतेऽधरो हृदयं मुष्टिभिरेव पीड्यते २८

वसंततिलका

राहे सुधा मधुर, त्या रमणीमुखांत
होई हलाहलचि केवळ अंतरांत ।
ओष्ठास यास्तव सदा जन हे पितात
हस्तें धरुन हृदया परि मर्दितात ॥ २८ ॥

गद्यार्थ—

तरुणीच्या मुखांत अमृत असतें, पण हृदयांत फक्त हलाहल, यासाठींच (की काय कोण जाणे !) अधराचें प्राशन केलं जातें, हृदयाचें मात्र मुष्टींनीं मर्दन केलं जातें

———०———

आर्या

अङ्गैः सुकुमारतरैः सा कुसुमानां श्रियं परां हरति ।
विकलयति कुसुमबाणो बाणालीभिर्मम प्राणान् ॥ २९ ॥

आर्या

मृदुतर अगांनीं ती
शोभा कुसुमांमधील सकल हरी ।
परि कुसुमबाण मम या
प्राणां बाणांमुळेंच विकल करी ॥ २९ ॥

गद्यार्थ—

एकीकडे पहावें तर ती सुंदरी, स्वत च्या अधिक मृदुल अगांनीं कुसुमांचा मृदुतागर्व हरण करते—आणि इकडे पहाव तों त्या कुसुमांचा बाण करून मदन माझे प्राण हैराण करीत आहे

———०———

वसंततिलका

स्वेदाम्बुसान्द्रकणशालिकपोलपाली
दोलायितश्रवणकुण्डलमण्डनीया ।
आनन्दमङ्कुरयति स्मरणेन कंचिद्—
रम्या दशा मनसि मे मदिरेक्षणाया. ३०

वसंततिलका

साचून घर्मकणमौक्तिक रम्य गालीं
शोभा डुलून मणिकुंडल गोड आली ।
तें कामिनीमधुररूप मनीं स्मरुन
दुर्वर्ण्य मोद अर्णि अंकुरतो नवीन ॥ ३० ॥

गद्यार्थ—

जमून जमून घमकण गालावर मौक्तिकासारखे चिकटले आहेत त्यांतच, कानांतले रत्नकुंडल डुलून शोभेंत भर पडली आहे, असें तें हरिणाक्षीचें सुदर रूप मनात आठवल म्हणजे, अवर्णनीय असा आनंद माझ्या मनांत अंकुरतो

———०———

आर्या

सेयं सीधुमयी या सुधामयी या हलाहलमयी वा ।
दृग्भ्यां निपीतमात्रा मदयति, मोदयति, मूर्छयति च

आर्या

स्त्री, मद्य, वा सुधा, वा
हलाहल हि, वा तिन्ही धरी खास ।
पिउनिहि केवळ नयनी,
देई उन्माद हर्ष, मूर्च्छेस ॥ ३१॥

गद्यार्थ—

कामिनी ही मद्यानें भरलेली, कीं, अमृतानें भरलेली, कीं, विषानें भरलेली आहे ? (मला वाटतें तिच्यांत हीं तिन्ही आहेत) कारण, (प्रत्यक्ष मुखानं नव्हे,) तर नुसतें नेत्रांनीं, तिचें प्राशन करतांक्षणींच, ती, (दारूप्रमाणें) धुंदी आणते, (अमृताप्रमाणें) आनंद देते, व त्याच वेळीं (विषाप्रमाणें) बेशुद्ध पाडते।

———

वसंततिलका

कल्याणि पाणिपतितानि विना विचार-
मेतानि मोक्तुमुचितानि न मौक्तिकानि ।
गुंजेति सञ्जनयते यदिह भ्रमं ते
हस्तारविन्दनयनोत्पलयोः प्रभैव ॥ ३२ ॥

आर्या

हे सुंदरी ! तुझ्या जीं पडलीं आहेत मौक्तिकें हातीं
अविचारानें कधिही न फेकणें युक्त तूं भुईवर तीं ।
भासति गुंजा तुज या, कारण, नेत्रोत्पलांतली काळी
छाया वरुनी, खालुनि करकमलांची मिळे तयां लाली ॥ ३२ ॥

गद्यार्थ—

(संस्कृत कवींनीं, अतिशयोक्तीचा एक नवीनच प्रकार कल्पिलेला, या श्लोकांतल्याप्रमाणेंच 'पातु व' या प्रकरणांतील श्लोकांत व अन्यत्र चमत्कृतिकाव्यप्रकरणांतील श्लोकांत दिसून येतो, तो असा, कीं, ह्यांचे नेत्र नीलकमलासारखे, किंवा, काजळानें किंवा, मूळचेच काळे, एवढें म्हणून ते थांबत नाहींत तर निळ्या किंवा काळ्या कांचेच्या दिव्यांतून जशी निळी किंवा काळी छाया इतर वस्तूंवर फेकली जाते तशी या श्लोकांत डोळ्यांतून काळी व हातांतून लाल छटा फेकली जाते असें कवि म्हणतो (पातु व श्लोक ५) यांत शंकराच्या निळ्या कंठ्यापासून निळीं किरणें काळीं किरणें पार्वतीच्या अंगावर पडल्याचें कवि म्हणतो, (तसेंच चमत्कृतिकाव्यांतील श्लोकांत डोळ्यांतील निळीं काळीं व ओठांतलीं लाल किरणें मोत्यांवर पडून मोतीं गुंजासारखीं दिसल्याची कल्पना आलेली आहे.) हे सुंदरि ! तुझ्या हातांत हीं जीं मोत्यें आहेत, तीं तूं अविचारानें फेंकून देणें योग्य होणार नाहीं तुला, हीं मोत्यें नसून गुंजा आहेत, असा जो भ्रम उत्पन्न होत आहे, त्याचें कारण त्यांच्यावर, वरून, तुझ्या नयनरूपी नीलकमलांचीं निळीं काळीं किरणें व खालच्या बाजून तुझ्या करकमलाचीं तांबडीं लाल किरणें पडलीं आहेत।

———

पृथ्वी

स्थिरत्वमचिरद्युतौ, तमसि कोऽपि बन्धमहो
विधौ किमपि सौरभं, मधुनि काऽपि वर्णोत्मता ॥
शिरीषनवदामनि स्फुरति कोऽपि शैलोदयो
वयोऽभिनववेधसस्तदिह मन्महे कौशलम् ॥ ३३ ॥

आर्या

केले विजेस सुस्थिर,
अधारहि बंधनांत ठेवियला !
चंद्रास गोड सौरभ,
मद्यासही रंग लाललाल दिला ! ॥
ताज्या शिरीष माले-
मधुनी गिरि दोन उंच वर आले !
नवयौवनविधिचे हो
वाटे कौशल्य रम्य हें सगळें ॥ ३३ ॥

गद्यार्थ—

नवयौवन हें जणू दुसरा ब्रह्मदेव आहे व त्याचें कौशल्यहि कांहीं आगळेंच आहे (जें ब्रह्मदेवाला साधलें नाहीं तें त्यानें करून दाखविलें आहे)—(ब्रह्मदेवाची) अस्थिर चंचल जी विद्युत, ती, यानें स्थिर करून (सुंदर युवतीच्या) अंगांत वसविली आहे (ब्रह्मदेवाचा दुर्धर असा) अंधार, यानें बंधनांत घालून (तरुणीच्या केशकलापांत आणून) ठेवला चंद्र सुगंधित (करून तो युवतीच्या मुखाचे ठायीं स्थापित) केला, मद्य (निर्गंध शुभ्र, पण तो) यानें लालबुंद रंगवून (कामिनीच्या अधरांत आणून) ठेवला (ब्रह्मदेवाचें) शिरीष पुष्प अत्यंत कोमल, पण त्याच्या हारांतून यानें (अत्यंत कठिन असे) दोन गिरि (स्तनांच्या रूपानें) उदयास आणले !

———

आर्या

साहजिकरूपरत्या भवति भवत्या विभूषणं भारः ।
सर्वांगसौरभिण्या दमनकनहयाः किमालि कुसुमेन ?॥

आर्या

जातीनें सुंदर तूं;
अलंकार तुजसि भारसम असती ।
सर्वांगगंधित अशा
दवण्याला काय गे कुसुममहती ? ॥ ३४ ॥

गद्यार्थ—

हे रमणि ! तूं जात्याच सुंदर आहेस, तुला अलंकाराची काय शोभा ? ते तुला भारच ! ज्याच्या सर्व अंगातच सुगंध भरलेला आहे अशा दवण्याला (कांहीं भागांतच सुगंध असलेल्या) फुलानें काय अधिक प्रतिष्ठा दावावी ?

—॰—

शिखरिणी

ललाटे कस्तूरीतिलकमबलाः कज्जलरुचिं
दृशोः, कर्णद्वन्द्वे विमलमणिताटङ्कयुगलम् ।
गले मुक्तामाला शुचिवसनमङ्गे च सततं
वशीकर्तुं विश्वं दधति खलु बाह्योपकरणम् ॥ ३५ ॥

शिखरिणी

कपाळीं कस्तूरीतिलक, नयनीं काजळ करी
सदा स्त्री ही कानीं मणियुत असें कुंडल धरी ।
गळां मुक्तामाला शुचिवसनही नित्य तनुस
धरी सामग्री ही वरुनि, करण्या विश्वचि वश ॥३५॥

गद्यार्थ—

कपाळीं कस्तूरीचा टिळा, डोळयांत काजळ, कानीं रत्न-कुंडलें, गळयांत मोत्यांची माळ, नित्य स्वच्छ वस्त्र ..इत्यादि हीं, तरुणी जीं धारण करतात तीं केवळ विश्व जिंकण्याचीं वरवरचीं बाह्य साधनें आहेत. (स्थूल अगभूत साधन या प्रकरणांतील बहुधा प्रत्येक श्लोकांत आहेत. पण खरीं प्रहारक व पुष्कळ प्राणांतक शस्त्रें आयुधें श्लोक १, १५ व २४ या श्लोकांत वर्णिलीं आहेत. अशा एकूण त्रिविध प्रहार कामिनी करीत असते.)

—॰—

शार्दूलविक्रीडित

स्निग्धेन्द्रोपलसुंदरः कचभरो
वक्त्रं सगोत्रं विधो-
र्वक्षोजौ मणिकुंभडम्बरमुषौ
मध्योऽस्ति वा नास्ति वा ।
श्रोणीमंडलमूरुदुर्वहमहो
शोणाब्जतुल्ये पदे
मन्ये मञ्जुगिरो मरालमहिला—
ध्येयो गतेर्विभ्रमः ॥ ३६ ॥

शार्दूलविक्रीडित

केसां रंग सुरेन्द्रनील; मुख ही
वाटे जणूं की शशी
रत्नांच्या कलशांपरी स्तन, कटी
आहे, कि, नाहीं अशी ।
मांड्यांना उचले नितंब न, पदें
पद्मापरी लाल तीं
वाणी मंजुल, डौलही गतिमधें
जो ध्येय हंसीप्रति ॥ ३६ ॥

गद्यार्थ—

या सुंदरीचे केस इन्द्रनील मण्याप्रमाणें सुंदर नील छट असलेले, मुख, जणूं चंद्राचें भाऊबंद; स्तन, रत्नकलशांची कांति चोरणारे, कटि, आहे कीं नाहीं हें न समजण्याइतकी बारीक, मांड्यांना उचलवत नाहींत असे भरदार नितंब, रक्त कमलाशीं तुल्य अशीं पाउलें, मंजुल अशी वाणी आणि गति अशी डौलदार कीं, हंसींनीं तिचा ध्यास घ्यावा

—॰—

शार्दूलविक्रीडित

वक्त्रं पूर्णशशी, सुधाऽधरलता, दंता मणिश्रेणयः
कान्तिः श्रीर्गमनं गजः, परिमलस्ते पारिजातद्रुमः ।
वाणी कामदुघा, कटाक्षलहरी तत्कालकूटं विषं
मन्ये सुंदरि ! हा ! श्रमाय मथितो मूढैः सुरैः सागरः ॥

आर्या

मुख पूर्णचंद्र, अधरीं
अमृत नि रत्नांपरी तुझे दांत ।
तेज श्री, गति गजसम,
पारिजातसम सुगंध अगांत ॥
वाणीच कामधेनू,
कटाक्ष हालाहल, गमे म्हणुनी ।
सुंदरि ! देव खुळे ते
उगाच दमले समुद्र मंथोनी ॥ ३७ ॥

गद्यार्थ—

हे सुंदरी ! तुझें मुख हें पूर्णचंद्र, अधरांत अमृत, तुझे दांत (कौस्तुभ) रत्नासमान, तुझी कांति ही लक्ष्मी, तुझी गति (ऐरावत) गजासारखी, तुझ्या अंगाचा गंध पारिजातासारखा, तुझी वाणी ही कामधेनु, तुझा कटाक्ष हालाहलासारखा, (अशा तऱ्हेनें समुद्रमंथनांतून निघालेल्या चौदा रत्नांपैकीं, आठ, तुझ्या एकटींत एकवटलेलीं असतां,) मूर्ख देवांनीं समुद्र मंथनाचे श्रम उगाच व्यर्थ केले असेंच वाटतें

———०———

(वरील श्लोकांतील कल्पना क्रमानं संपूर्ण चौदाहि रत्नांना लावून, त्यांहून प्रत्येक बाबतींत स्त्रीच श्रेष्ठ हे भाषान्तरकर्त्यांन पुढील स्व-रचित श्लोकांत दाखविलें आहे)

पहिले तीन श्लोक उपजाति व पुढील चार इंद्रवज्रा

पतिव्रता स्त्री असतां गृहान्तीं
लक्ष्मी कुणा चंचल कां रुचे ती ? ।
पवित्र जें तेज दिसे स्त्रियेंत
दिसेल कां तें कधि कौस्तुभांत ? ॥
हुंगील जो स्त्री-मुख-गंध-वात
रुचेल कां त्या मग पारिजात ? ।
स्त्रीयौवनाची मदिरा पिऊन
सुरा सुरांची मनुजा रुचे न ॥
प्रेमें हरी स्त्री पतिरोग सारा
धन्वंतरी औषधि दे बिचारा ।
स्त्रीच्या मुखींचा अकलंक चंद्र
बघोनि लाजे सकलंक चंद्र ॥
स्त्री ईप्सिताधिक्य सदैव देते
दे कामधुक् केवळ इच्छिलें तें ।
स्त्रीची बघोनी गति ती विलोल
ऐरावतीं काय उरेल डौल ? ॥
स्त्री एकनिष्ठा हृदयीं धरी तो
रंभेकडे ओढ कशास घेतो ? ।
स्त्रीप्रेमपंखा गति शीघ्र जैशी
उच्चैःश्रव्यालाहि असाध्य तैशी ॥
स्त्री प्रेमभंगें विष ओकिते तें
हालाहलाहून हि घोर वाटे ।
स्त्रीभ्रूधनुष्यें जित विश्व होतें
शार्ङ्गास अद्यापि न साधलें तें ॥
स्त्री कम्बुकण्ठी परि सुस्वनाही
शंखास शंखध्वनि मात्र येई ।
जो धन्य चाखी अधरामृतातें
गोडी न साक्षादमृतांत त्यातें ॥ ३८ ॥

गद्यार्थ—

(लक्ष्मी कौस्तुभपारिजातकसुरा धन्वन्तरिश्चन्द्रमा
गावः कामदुघा सुरेश्वरगजो रम्भादिदेवाङ्गना ॥
अश्वः सप्तमुखो विषं हरिधनुः शङ्खोऽमृतं चाम्बुधे ।
रत्नानीह चतुर्दश .
हा श्लोक प्रसिद्ध आहे)

पतिव्रता स्त्री घरात असतां, चंचल लक्ष्मी कशी रुचेल स्त्रीतलें पवित्र तेज, कौस्तुभांत कसें दिसेल ? स्त्रीमुखगंधापु पारिजातास कोण विचारतो ? स्त्रीयौवनमदिरा प्याल्यावर, सुरां सुरा कोणास आवडेल ? स्त्री केवळ प्रेमानें रोग बरे करं धन्वंतरि बिचारा औषधें देत बसणार ! नभस्थचंद्र, अकल स्त्रीमुखचंद्रास पाहून, लज्जित होतो, इच्छा करावी, तेवढ कामधेनु देणार, स्त्री मात्र ईप्सिताहून नेहमीं अधिकच दें कामिनींची गति पाहून, ऐरावताचा डौल कसा उरेल ? एक स्त्री हृदयीं धरणारा, रंभेकडे कशाला वळेल ? प्रीतिपंखा आरूढ झालेल्या स्त्रीची गति, उच्चैःश्रव्याल–(सप्तमुख अश्वा कशी साध्य होईल ? प्रेमभंग होतां, स्त्री जें विष ओकं त्याच्यापुढें हालाहल विष काय ही पत्ती ? स्त्री भ्रूधनुष्यानें सारें विश्व जिंकितें,—तें, विष्णूचें धनुष्य जें शा त्याला अजून साधलें नाहीं स्त्री कम्बुकण्ठी (शंखाप्रमाणें सु कंठाची) असली तरी सुस्वर गाते,–पण पांचजन्य शंखा त शंखाला शंखध्वनीशिवाय काय येणार ? स्त्रीचें अधरामृत पि त्याला, खऱ्या अमृताचीहि गोडी वाटत नाहीं म्हणून—

चौदाच रत्नें निघतीं समुद्रीं
अनंतरत्ना असुनी परी स्त्री ।
कळे कवींला न, मुग्धा सुरांनीं
कां मथिला अब्धि पुन्हा श्रमोनी ? ॥ ३९

———•———

# प्रकरण २८ वें

## जगन्मोहिनीचीं अंगप्रत्यङ्गें—म्हणजेच मोहनास्त्रें.

### ( १ ) वेणी—केशकलाप.

उपजाति

एणीदृशः पाणिपुटे निरुद्धा
वेणी विरेजे शयनोत्थितायाः ।
सरोजकोशादिव निष्पतन्ती
श्रेणी घनीभूय मधुव्रतानाम् ॥ १ ॥

उपजाति

निद्रेंतुनी स्त्री उठतां धरी जी
वेणी, दिसे सुंदरशा कराब्जीं ।
उठे धरी जी कमलांतुनी ती
थिजोनि गेली जणुं भृंगपंक्ति ॥ १ ॥

गद्यार्थ—

ही मृगनयना निद्रेतून उठल्यानंतर आपली वेणी जेव्हा आपल्या हातात धरते, तेव्हां एखाद्या कमलातून बाहेर उडून जातां जातां, भृंगांची पंक्तिच, थिजून गेल्याचा भास होतो

———

शार्दूलविक्रीडित

जानुभ्यामुपविश्य पार्ष्णिनिहितश्रोणीभरप्रोन्नम-
द्दोर्वल्ली नमदुन्नमत्कुचतटी, दीव्यन्नखाङ्कावलिः ।
पाणिभ्यामवधूय कङ्कणझणत्कारावतारोत्तरं
बाला नह्यति किं निजालकभरं किं वा मदीयं मनः ? ॥२॥

शार्दूलविक्रीडित

बैसे टेकुनि जानु, ठेवित हळूं
श्रोणींस टाचांवरी
तेजस्वी नखपङ्क्ति, बाहु, कुचही
होऊन खालीं वरी ।
हातांनीं झटकून कंकणरण-
त्कारासवें कामिनी
बांधी स्वीय कचांस कीं मम मना,
शंका असी ये मनीं ॥ २ ॥

गद्यार्थ—

( वेणी सोडून पुन्हां बांधतांना ) ही कामिनी, जेव्हां गुडघे टेकून बसते व टाचावर श्रोणींना आवरून, बाहु व कुचांना वरखालीं करीत, ( रंगविलेलीं ) नखें झळकवीत, करकंकणांच्या रणत्कारासह, आपल्या हातानीं झटकून, जें काय बांधते तें ती आपलें केस बांधते, कीं माझें हृदय आपल्या हातानीं झटकून घेऊन बांधते, हें कांहीं मी सांगू शकत नाहीं !

———

वैतालीय

कमलाक्षि विलम्ब्यतां क्षणं कमनीये कचभारबन्धने ।
दृढलग्नमिदं दृशोर्युगं शनकैरत्र समुद्धराम्यहम् ॥ ३ ॥

वैतालीय

क्षण थांब; करीं विलंबना
सखि ! तूं सुंदर केशबंधना ॥
दृढ नेत्रहि गुंतले तिथें
हळुं त्यां सोडवुनीच घेउं दे ॥ ३ ॥

गद्यार्थ—

हे कमलनयने ! हा जो तुझा सुंदर केशकलाप तूं बांधीत आहेस तो बांधण्याची घाई करूं नको. सावकाश बांध कारण माझें नेत्रद्वय त्यांत घट्ट अडकून पडलें आहे, त्यांना मी त्यांतून हळूंच सोडवून घेतों ( नाहीं तर तूं घाई केलीस म्हणजे ते त्यांत कायमचेच गुरफटून पडावयाचे ! )

———

वैतालीक

दयिते रदनत्विषां मिषा-
दयि तेऽमी विलसन्ति केसराः ।
अपि चालकवेषधारिणो
मकरन्दस्पृहयालवोऽलयः ॥ ४ ॥

शार्दूलविक्रीडित

कान्ते ! त्वन्मुखपंकजांत बनण्या
नाजूकसे केसर
त्यांचा घेउन वेष दंतकिरणें
आलीं इथें सुंदर।
झांकोनी निज मूळ रूप, धरुनी
त्वत्केशरूपप्रति
चाखाया मुखपंकजस्थ अमृता
भृंगे जणूं धांवती ॥ ४ ॥

गद्यार्थ—

हे प्रिये (तूं स्मित करताना अर्धोन्मीलित अशा तुझ्या मुखातून बाहेर येणारीं तुझ्या शुभ्र तेजस्वी दातांचीं किरणें हीं ) तुझ्या मुखकमलातील केसर बनण्याकरिता दंतकिरणांचा वेष घेऊन आलीं आहेत. आणि ( तुझ्या गालाजवळून खांद्यावर जाणारा वेणीचा शेपटा म्हणजे ) तुझ्या मुखकमलांतील मध चाखण्यासाठीं आलेले भुंगेच, जणूं, तुझ्या केसाच्या वेष घेऊन आलेले आहेत (असें वाटतें )

———०———

मन्दाक्रान्ता

मुक्तद्धारं चिकुरनिकरं बिभ्रती पाणिगर्भे
गात्राश्लिष्टस्तिमितवसनस्पष्टसर्वाङ्गशोभा ।
स्नानोत्तीर्णा कमलनयना तिर्यगावर्तितास्या
नो वा कस्यासमशरसमाक्रान्तमन्तः करोति ? ॥ ५ ॥

आर्या

सुटल्या निजकेसांचा
कलाप सुंदर धरून हातांत ।
ओलेतीची शोभा
सर्वांगीं स्पष्ट उठुनिया दिसत ॥
नाहुनि कमलाक्षी ही
तिरकें वळुनि मुखा, जधीं बघते ।
तत्क्षण हृदय कुणाचें
मदनशरें हत न सुंदरी करते ? ॥ ५ ॥

गद्यार्थ—

मोकळा सुटलेला आपला सुंदर केशकलाप हातांत धरून, ओलें वस्त्र अंगाला चिकटल्यामुळें प्रत्येक अवयवाचें सौंदर्य स्पष्ट उठून दिसत आहे, अशा अवस्थेंत नुकतेंच स्नान करून बाहेर आलेली ही कमलनयना जेव्हां तिरके वळून बघते, तेव्हां कोणाचें हृदय ती मदनाच्या बाणांनीं विद्ध करून टाकीत नाहीं ?

———०———

अनुष्टुभ्

वेणी श्यामा भुजङ्गीयं नितम्बान्मस्तकं गता ।
वक्त्रचन्द्रसुधां लेढुं सान्द्रसिन्दूरजिह्वया ॥ ६ ॥

उपजाति

वेणीच काळी जणुं नागिणी ही
शीर्षीं नितम्बाहुनि धांव घेई ।
( शेंदूर भांगांतिल जीभ जीस )
सुधा मुखेन्दूंतिल चाटण्यास ॥ ६ ॥

गद्यार्थ—

( भांगांत सिंदूर घातलेला व पाठीमागें नितंबापर्यंत पोंचणारी वेणी पाहून असें वाटतें, कीं, ) ही एक काळी नागीणच नितंबापासून ( पाठीवर चढून ) वर डोक्यावर बसून, ( भांगातल्या ) शेंदुराच्या रूपानें आपली लाल जीभ ( कपाळापर्यंत ) लांबवीत मुखचंद्राची सुधा चाटण्याचा यत्न करीत आहे !

———०———

## ( २ ) भ्रू—भुवया.

स्वागता

कामकार्मुकतया कथयन्ति
भ्रूलतां मम पुनर्मतमन्यत् ।
लोचनाम्बुरुहयोरुपरिस्थं
भृंगशावकततिद्वयमेतत् ॥ ७ ॥

स्वागता

भ्रू धनुष्य म्हणती मदनाचें
त्याहुनि मत विभिन्नचि माझें ।
नेत्रपंकजिं खरोखर दोन
भृंगपंक्ति वसतात वरून ॥ ७ ॥

गद्यार्थ—

भुवयाच्या कमानीला मदनाचें धनुष्य असें म्हणतात पण माझें मत निराळें आहे, कीं, नेत्रकमलांच्या वर बसलेल्या या दोन भृंगपंक्तिच आहेत

———

उपजाति

तस्याः शलाकाञ्जननिर्मितेव
कान्तिर्भ्रुवोरायतलेखयोर्या ।
तां वीक्ष्य लीलाचतुरामनङ्गः
स्वचापसौंदर्यमदं मुमोच ॥ ८ ॥

इंद्रवज्रा

केल्यापरी अंजन काजळाचें
त्या नाचत्या दीर्घच भ्रूलतांचें।
पाहून सौंदर्य, गळे सराचा
तो गर्वही कार्मुकचारुतेचा ॥ ८ ॥

गद्यार्थ—

काजळाच्या काडीनें काढल्यासारख्या, तिच्या प्रदीर्घ व नाचत्या भुवयाचें सौंदर्य पाहून, स्वत:चें धनुष्य फार सुंदर आहे असा मदनाला झालेला गर्व त्यानें सोडून दिला.

———०———

## ( ३ ) नेत्र, दृष्टि, कटाक्ष.

अनुष्टुभ्

नूनमाज्ञाकरस्तस्याः सुभ्रुवो मकरध्वजः।
यतस्तन्नेत्रसंचारसूचितेषु प्रवर्तते ॥ ९ ॥

उपजाति

स्त्रीदृष्टि ही तीक्ष्ण सुईच वाटे
छिद्रें करी टोंचुनि जीं मनातें।
हळूंच आज्ञांकित त्या सराचा
धागा शिरे त्यांतुनि ( रेशमाचा ) ॥ ९ ॥

गद्यार्थ—

या सुंदरीचा, मदन हा खरोखर अगदीं आज्ञाधारक सेवक आहेसें वाटतें. कारण, ती आपल्या नेत्ररूपी सुईनें पुरुषहृदयाला टोंसवून जीं छिद्रें पाडिते त्यांतून नेमका मदन आपला ( रेशमी ) धागा आंत घुसवितो !

———०———

उपजाति

इन्दीवरे लोचनयोस्तुलायै
निर्माय यत्नेन विधिः कदाचित्।
अतुल्यतां वीक्ष्य ततो रजांसि
निक्षिप्य चिक्षेप स पंकमध्ये ॥ १० ॥

उपजाति

नेत्रांस द्याया उपमा विधीनें
इंदीवरें निर्मियलीं प्रयत्नें।
अतुल्यता ती पहुनी, तयांत
घालोनि रेणू चिखलांत नेत्र ॥ १० ॥

गद्यार्थ—

ब्रह्मदेवानें, स्त्रीनेत्रांना उपमा देण्याजोगें कांहीं तरी असावें, म्हणून मोठ्या प्रयत्नांनीं नीलकमलें उत्पन्न केलीं खरीं, पण पहातो, तों स्त्रीनेत्रांशीं त्या कमलांची तुलना करणें इतकें हास्यास्पद दिसूं लागलें कीं ( चिडून ) त्यानें त्या कमलांत पराग ( रूपी धूळ ) कोंबून त्यांना चिखलांत फेंकून दिलें !

———०———

वसंततिलका

श्यामं सितं च सुदृशो न दृशोः स्वरूपं
किन्तु स्फुटं गरलमेतदथामृतं च।
नो चेत्कथं निपतनादनयोस्तदेव
मोहं मुदं च नितरां दधते युवानः ?॥ ११॥

वसंततिलका

काळे नि शुभ्र इतुकेच न नेत्र हीचे
आहे तिथें परि विषामृत मिश्र साचें।
तें ना तरी नजर ती पडनांच कां, तो
व्यामोह, मोद, तरुणांस सवेंच होतो ? ११

गद्यार्थ—

सुंदरीच्या नेत्रांचें, ( कांहीं भाग ) काळा व ( कांहीं भाग ) पांढरा, इतकेंच स्वरूप ( वर्णन करून भागणार ) नाहीं, तर स्पष्टपणें त्यांत ( काळें तें ) विष व ( शुभ्र तें ) अमृत मिश्ररूप आहेत असेंच म्हणणें भाग आहे. तसें नसतें तर त्या सुंदरीची दृष्टि पडताक्षणींच तरुणांना मूर्छा ( विषाचा गुण ) व आनंद ( अमृताचा गुण ) एकाच वेळीं उत्कटतेनें कसे प्राप्त होतात ?

———०———

वैतालीय

श्रुतिलङ्घनकृतप्रयासयोर्मलिनाभ्यन्तरयोरधीरयोः।
स्मृतिलोपपरत्वमेतयोरुचितं लोचनयोर्मृगीदृशः ॥१२॥

वसंततिलका

नित्य प्रयत्न करिती श्रुतिलंघनार्थ
अंतर्मलीन नि अधीरचि जे नितान्त।
ऐसे गुणी (!) नयन जे हरिणेक्षणांचे
त्यां योग्य हें स्मृतिविलोपनकर्म साचें ॥१२

गद्यार्थ—

(श्रुति=वेद वेदाज्ञा; किंवा कान; श्रुतिलंघन=उच्छृंखळ वागणें; किंवा कान ओलांडून जाणें–तेथपर्यंत पोंचणें–( नेत्र )

आकर्ण असणें ) अतर्मलीन=पोटांत पाप असलेले, आतून काळे असलेले ( नेत्र ), अधीर=उतावळ्या स्वभावाचे, स्थिर नसणारे, चचल ( नेत्र ) स्मृतिलोप=स्मृति (मनुस्मृति इ ) मध्यें सांगितलेलें अवमानणें, स्मृति=आठवण, ज्या तरुणावर स्त्रीची दृष्टि पडते त्यांना स्मृतिभ्रंश ( स्वत्व विसरणें ) घडतो इतके द्यर्थी शब्द ) ह्या सुंदरीचे नेत्र जे मूळचे अतर्मलीन व अधीर आहेत व ज्यांची श्रुति–लंघनार्थ सतत धडपड चालू असते त्यांनीं ( तरुणांची शुद्धबुद्ध हरणें ) हें स्मृति विलोपनकार्य करणें समुचितच आहे.

—०—

अनुष्टुभ्

अङ्गानि दत्त्वा हेमाङ्गि प्राणान् क्रीणासि चेन्नृणाम् ।
युक्तमेतन्न तु पुनः कोणं नयनपद्मयोः ॥ १३ ॥

वसततिलका

अंगें सु-वर्ण तव देउनि सर्व मातें
म-प्राण तूं विकत घेसि, सुयुक्त कीं तें ।
देऊन नेत्रकमलांतिल मात्र कोण
मत्प्राण घेसि तर मान्य करील कोण ? ॥१३

गद्यार्थ—

हे हेमांगि ! तूं आपले सुवर्ण ( सोन्यामोलाचे ) अवयव देऊन माझे प्राण विकत घेतलेस तर तें योग्य होईल ( प्राण घालवले पण त्याची योग्य किंमत मला मिळाली असें वाटेल ) पण तूं देतेस केवळ आपल्या नेत्रकमलाचा एक कोपरा ( एक कटाक्ष ) आणि तेवढ्यावर माझे प्राण विकत घेतेस हें कोण मान्य करील ? हा तुझ्या काळ्या डोळ्यांनीं केलेला 'काळा बाजारच' म्हणावयाचा !)

—०—

शिखरिणी

करे वेणीमेणीसदृशनयना स्नानविरतौ
दधाना, हर्म्याग्रे हरनयनतेजोहृतमपि ।
इयं मुग्धा दुग्धांबुधिबहलकल्लोलसदृशा
दृशा वारं वारं मनसिजतरुं पल्लवयति ॥ १४ ॥

आर्या

स्नानविधी उरकोनी,
एणीनयना करीं धरुनि वेणी ।
सौधीं मुग्धा, दुग्धांबुधि-
कल्लोलचि अशा स्वनेत्रांनीं ॥
शिंपुनि पुन्हां पुन्हां ही
मदनतरूला सुपल्लवित करिते ।
जरि शंकरनयनांच्या
तेजें पूर्वीच जाळिलें त्यातें ॥ १४ ॥

गद्यार्थ—

ही मृगनयना, स्नान उरकून, आपली वेणी हातांत धरून गच्चीवर येते; व ( तेथून जे जे पुरुष दृष्टीस पडतील त्यांच्या हृदयांतील ) मदनतरूला, जरी मदन शंकराच्या नेत्रांच्या तेजानें पूर्वीच जळून गेला असला तरी, क्षीराब्धींतल्या लाटांच्या इतक्या चंचल अशा आपल्या दृष्टीनें पुन्हा पुन्हा ( शिंपून ) नवी पालवी आणून टवटवीत करीत आहे

—०—

शार्दूलविक्रीडित

व्यादीर्घेण, चलेन, वक्रगतिना, तेजस्विना भोगिना
नीलाब्जद्युतिनाहिना वरमहं दष्टो न तच्चक्षुषा ।
दष्टे सन्ति चिकित्सका दिशि दिशि प्रायेण धर्मार्थिनो
मुग्धाक्षीक्षणवीक्षितस्य न हि मे मन्त्रो न चाप्यौषधम् ॥

शार्दूलविक्रीडित

भोगी, वक्रगती, सुदीर्घ, चमके,
नीलाब्जरंगी सदा
तो स्त्रीनेत्रभुजंग दंश न करो
मातें जगीं या कदा ।
सर्पें दष्ट तयास वैद्य मिळती
धर्मार्थ लक्षावधि
दृष्ट स्त्रीनयनें अशा मज दिसे
ना मंत्र ना औषधि ॥ १५ ॥

गद्यार्थ—

दीर्घ, वक्रगति, तेजस्वी, भोगी (नेत्र–भोगप्रधान ) (सर्प=फणा असलेला ) नीलकमलाच्या रंगाचा, स्त्रीनेत्ररूपी भुजंग मला न चावला तर फार बरें होईल सर्पदंशावर उपाय करणारे वैद्य–धर्मार्थ सुद्धा–सर्वत्र अनेक आहेत परंतु स्त्रीनेत्रसर्पानें क्षणैक दंश केलेल्या मला कोठें मत्रहि नाहीं, औषधहि नाहीं !

—०—

स्रग्धरा

सन्मार्गे तावदास्ते, प्रभवति पुरुषस्तावदेवेन्द्रियाणां
लज्जां तावद्विधत्ते, विनयमपि समालम्बते तावदेव ।
भ्रूचापाकृष्टमुक्ताः श्रवणपथजुषो नीलपक्ष्माण एते
यावल्लीलावतीनां हृदि न धृतिमुषो दृष्टिबाणाः पतन्ति ॥

स्रग्धरा

सन्मार्गा तों धरी तो
नर, अवयवही तोंवरी वश्य होत
लज्जाही तोंवरी ती
वसत, विनयही तोंवरी तो मनांत।
स्त्री सोडी नीलपंखी
सुललित, तिरपे, भ्रूधनुष्यामधून-
धैर्याचे नाशकर्ते,
हृदयिं न पडले जोंवरी दृष्टिबाण ॥ १६ ॥

गद्यार्थ—

जोंवर, कामिनीनें, भ्रूधनुष्य खेंचून, कानाला चाटून जाण्याइतके तिरपे, नीलपंखयुक्त, आणि पुरुषाच्या धैर्याचे नाशकर्ते, असे, लीलेनें सोडलेले कटाक्षबाण मनुष्याच्या हृदयावर पडले नाहींत तोंवरच काय तो मनुष्य सन्मार्गाला धरून चालूं शकतो, तोंवरच त्याचे अवयव त्याच्या स्वाधीन असतात, तोंवरच लज्जा किंवा विनय त्याच्या हृदयांत राहतात

---

आर्या

हत्वा लोचनविशिखै—
र्गत्वा कतिचित्पदानि पद्माक्षी।
जीवति युवा न वा किं
भूयो भूयो विलोकयति ॥ १७ ॥

आर्या

वेधुनि नेत्रशरें स्त्री,
थोडें चालून मागुतीं वघते।
"मेला की जगला तो
तरुण ?" वळोनी पुनः पुन्हां बघते ॥ १७ ॥

गद्यार्थ—

स्त्री, आपल्या नेत्रबाणांनीं, पुरुषाला विद्ध करून, थोडें पुढें चालत जाऊन, मग तो जखमी केलेला तरुण, अजून जिवंत आहे कीं नाहीं, हे पुन्हा पुन्हां वळून पाहते.

---

द्रुतविलंबित

तरुणि ! संहर संहर लोचने
तृणलवेषु कुठारपरिग्रहः।
मयि मनोभवमार्गणपीडिते
न हि सतामुचितं मृतमारणम् ॥ १८ ॥

द्रुतविलंबित

तरुणि ! आवर आवर लोचन
जणुं कुऱ्हाडचि कापविण्या तृण !।
स्मरशरें हत हें मम जीवन
उचित कां सुजनां मृतमारण ? ॥ १८ ॥

गद्यार्थ—

हे तरुणी ! आवर आवर आपले ते नेत्रकटाक्ष ! गवत कापावयास कुणी कुऱ्हाड का वापरीत असतात ? मला मदनशरांनीं आधींच बेजार करून मेल्यामारखा करून सोडला आहे सज्जनांना, मेलेल्यास मारणें शोभतें काय बरें ! १८

---

अनुष्टुभ्

कुतः कुवलयं कर्णे करोषि कलभाषिणि ?।
किमपाङ्गमपर्याप्तमस्मिन् कर्मणि मन्यसे ? ॥ १९ ॥

अनुष्टुभ्

कां पद्म ठेविशी कर्णीं
सांग तें मृदुभाषिणी ?।
कटाक्ष न पुरे येथें
असें कां तुज वाटतें ? ॥ १९ ॥

गद्यार्थ—

हे मृदुभाषिणी ! (तुमच्या कटाक्षानें पुरुषाला घायाळ करण्याचें सामर्थ्य तुझ्यांत असतां आणखी) हें कमळ तूं आपल्या कानावर कां बरें ठेविलें आहेस ? मला घायाळ करण्याला तुझा कटाक्ष पुरेसा नाहीं असें कां तुला वाटतें ?

---

पुष्पिताग्रा

तदवधि कुशली पुराणशास्त्र-
स्मृतिशतचारुविचारजो विवेकः।
यदवधि न पदं दधाति चित्ते
हरिणकिशोरदृशोर्दृशोर्विलासः ॥ २० ॥

पुष्पिताग्रा

तंवरचि टिकतो पुराणशास्त्र-
स्मृतिमननोदित सद्विवेक चित्तीं।
हृदिं घर करिते न जोंवरी तीं
मृगशिशुनेत्रयुता विलास दृष्टि ॥ २० ॥

गद्यार्थ—

पुराण, शास्त्र, स्मृति इत्यादींच्या मननानें, हृदयात उदित झालेला सुविवेक तोंवरच बिचारा टिकतो, जोंवर, एकाद्या मृगशिशुनेत्री कामिनीच्या विलासी कटाक्षानं, हृदयात घर केलें नाहीं

———०———

## ( ४ ) मुखकमल–मुखचंद्र.

अनुष्टुभ्

यदि स्यान्मण्डले सक्तमिन्दोरिन्दीवरद्वयम् ।
तदोपमीयते तस्या वदनं चारुलोचनम् ॥ २१ ॥

अनुष्टुभ्

चंद्रबिंबांत वाढावीं कुमुदें दोन सुंदर ।
सुलोचना मुखा स्त्रीच्या शोभे तदुपमा तर ॥ २१ ॥

गद्यार्थ—

( नुसत्या चंद्राची नव्हे ) तर चंद्रमंडळावर जर दोन नील-कमलें उगवलीं तरच सुलोचना स्त्रीच्या मुखाला चंद्रोपमा शोभेल

———०———

वसततिलका

लोके कलङ्कमपहातुमयं शशाङ्को
जातो यतस्तव मुखं तरलायताक्षि ।
तत्रापि कल्पयसि तन्वि कलङ्करेखा
नार्यः समाश्रितजनं हि कलङ्कयन्ति ॥२२॥

वसततिलका

टाळावया निजकलंक शशी स्वतां तो
हे कामिनी ! तव मुखावर जन्म घेतो ।
तेथेंहि तू करिशि कज्जलयुक्त त्यास !
नारी कलंकित करी निज आश्रितास ॥२२॥

गद्यार्थ—

हे कामिनी ! आपला कलंक टाळण्यासाठीं म्हणून बिचारा नभस्थ चंद्र तुझ्या मुखावर जन्म घेतो, (स्त्रीमुखचंद्र निष्कलंक !) पण तेथेंहि तू ( डोळ्यांत काजळ घातलेलें थोडेंतरी पसरतेंच ) त्यास काजळ फांसतेस ! हाय ! हाय ! आश्रयास आलेल्या माणसाला, कामिनी, केव्हां काळोखी फासील, याचा नेम नाहीं

———०———

उपजाति

प्रिये सदा पूर्णतरं मनोहरं
ते निष्कलङ्कं मुखचद्रमण्डलम् ।
विलोक्य सव्रीडतया निशापति-
र्गतः प्रतप्तो जलधेर्जलान्तरम् ॥ २३ ॥

उपजाति

प्रिये, सदा पूर्ण, सदा मनोहर
तुझा बघोनी मुखचंद्र निर्मल ।
लज्जेमुळें हा विधु तप्त अंतरीं
अब्धीचिया गे बुडतो जलान्तरीं ॥ २३ ॥

गद्यार्थ—

हे प्रिये, तुझा मुखचंद्र नेहमींच पूर्ण, नेहमींच मनोहर निष्कलंक असतो हें पाहून लज्जेनें तापून हा चंद्र समुद्रांत बुडी घेत आहे

———०———

अनुष्टुभ्

कमले कमलोत्पत्तिः श्रूयते न, न दृश्यते ।
बाले तव मुखाम्भोजे दृष्टमिन्दीवरद्वयम् ॥ २४ ॥

अनुष्टुभ्

उगवे पद्म पद्मीं हें ऐकिलें न, न पाहिलें ।
मुखपद्मीं तुझ्या नेत्रकुमुदद्वय पाहिलें ॥ २४ ॥

गद्यार्थ—

कमलातून कमल उगवतें असें कधीं ऐकलें नाहीं कीं कधीं पाहिलें नाहीं. परंतु हे बाले ! तुझ्या मुखकमलावर मात्र दोन नेत्रकुमुदें दिसतात खरीं !

———०———

आर्या

उचित गोपनमनयोः
कुचयोः कनकाद्रिकान्तितस्करयोः ।
अवधीरितविधुमंडल-
मुखमंडलगोपन किमिति ? ॥ २५ ॥

आर्या

हेमाद्रिकान्ति चोरिति
ते कुच तू लपविणेंच योग्य जरी ।
जिंकी विधुमंडल, ते
मुखमंडल झांकिसी कशास तरी ? ॥ २५ ॥

गद्यार्थ—

सुवर्णपर्वत जो मेरु, त्याच्या तेजाची चोरी करणारे तुझे स्तन, तू लपविलें हें जरी योग्य असलें, (चोरांना उजळ माथ्यानें कसें फिरता येईल?) तरी तुझें मुखमंडळ (हें चोर नव्हे, तर, उलट, आपल्या निष्कलंकत्वानें) चंद्रमंडळाला जिंकणारें (असें विजयी वीर) असतां, त्याला लपविण्याचें तुला काय कारण? (अवगुंठनवतीस किंवा लाजून हातानं मुख झांकणाऱ्या स्त्रीस उद्देशून)

---

उपजाति

अनेन रम्भोरु तवाननेन
तुषारभानोस्तुलया धृतस्य ।
ऊनस्य नूनं प्रतिपूरणाय
ताराः स्फुरन्ति प्रतिमानखण्डाः ॥ २६ ॥

उपजाति

प्रिये तुझ्या निर्मल या मुखाशीं
तारापतीला धरितां तुलेसी ।
कमी पडे तो म्हणुनी तयाला
तारे जणूं ते वजनें भरीला ॥ २६ ॥

गद्यार्थ—

प्रिये! तुझा हा निर्मल मुखचंद्र एका पारड्यात व तारापति चंद्र दुसऱ्या पारड्यात घालून वजन करूं पाहतां, चंद्र कमी भरला म्हणून त्याच्या भरीला छोटीं वजनें म्हणून जणूं काय हे तारे चमकत आहेत

---

उपजाति

तीरे तरुण्या वदनं सहासं
नीरे सरोजं च मिलद्विकासम् ।
आलोक्य धावत्युभयत्र मुग्धा
मरन्दलुब्धालिकिशोरमाला ॥ २७ ॥

वसंततिलका

तीरावरी युवतिचें मुख तें सहास
नीरामधें विकसल्या सरसीरुहास ।
पाहून धांवति असें उभयत्र मुग्ध
हे भृंगबालक धनूव मरन्दलुब्ध ॥ २७ ॥

गद्यार्थ—

तीरावर असलेल्या सुंदरीचें हास्यानें फुललेलें मुख, व पाण्यामध्यें फुललेलें कमल, पाहून, मध पिण्यास हपापलेले मुग्ध बालभ्रमर दोन्हीकडे धांवपळ करीत आहेत. (पाण्यांतल्या कमळांतला मध प्यावा की तीरावरच्या कमलांतला प्यावा या विचारानें गोंधळतात)

---

वैतालीय

अनिशं नयनाभिरामया
रमया संमितिनो मुखस्य ते ।
निशि निःसरदिन्दिरं कथं
तुलयामः कलयाऽपि पङ्कजम् ? ॥ २८ ॥

वसंततिलका

शोभा सदैव नयनांप्रति मोदकारी
ती ज्या मुखीं तव फुले दिवसां नि रात्रीं ।
अल्पांश तुल्य तरि त्या कधिं पद्म कां तें ?
रात्रीस चारपण ज्यांतिल नष्ट होतें ॥ २८ ॥

गद्यार्थ—

डोळ्यांना सतत आनंददायक असें सौंदर्य ज्या तुझ्या मुखावर रात्रंदिवस फुललेलेंच राहतें त्याच्या अल्पांशाची तरी तुलना, ज्याचें सौंदर्य रात्रीं नष्ट होत अशा कमलाशीं कशी करतां येईल?

---

वसंततिलका

कस्तूरिकातिलकमालि विधाय सायं
स्मेरानना सपदि शीलय सौधमौलिम् ।
प्रौढिं भजन्तु कुमुदानि मुदामुदारा-
मुल्लासयन्तु परितो हरितो मुखानि ॥ २९ ॥

वसंततिलका

कस्तूरि लावुनि धरी स्मित गोड गालीं
सौधीं अशी बसशि तूं जर सांजवेळीं ।
मोदें अतीव, कुमुदें फुलतील तेणें
चौफेर दिङ्मुखहि तें उजळे प्रभेनें ॥ २९ ॥

गद्यार्थ—

हे सुंदरी! संध्याकाळच्या वेळीं कस्तूरीतिलक लावून सस्मित मुखानें तूं गच्चीवर बैस; कीं जेणें अत्यंत आनंदानें कुमुदें फुलतील आणि चौफेर सर्व दिशांचीं मुखें प्रकाशानें उजळतील.

———

रथोद्धता

तारयामि यमुनाप्रवाहत-
स्त्वां वरोरु तरपण्यमंतरा ।
द्रागपाकुरु दुकूलमानना-
दाविरस्तु मम नावि चन्द्रमाः ॥ ३० ॥

वसंततिलका

नेईन पार तरनी यमुनेस तूतें
मागे न मी तुजसि सुंदरि आतरातें ।
काढी मुखावरुनि हें झणिं वस्त्र दूर
नौकेंत या अवतरो परिपूर्ण चंद्र ! ॥ ३० ॥

गद्यार्थ—

(नावाडी, नौकेंतून जाऊं इच्छिणाऱ्या अवगुंठनवतीस म्हणतो–) हे सुंदरी, मी तुला या नौकेंतून यमुना उतरून परतीराला अवश्य नेईन आणि आतर (नौकाभाडें) हि तुझ्याकडून घेणार नाहीं माझी मागणी इतकीच कीं, तुझ्या मुखावरचें हें वस्त्र लौकर दूर कर आणि या माझ्या नौकेंत पूर्णचंद्राचा उदय होवो.

———

उपजाति

सुधामयोऽपि क्षयरोगशान्त्यै
नासाग्रमुक्ताफलकच्छलेन ।
अनङ्गसंजीवनदृष्टशक्ति-
र्मुखामृतं ते पिबतीव चंद्रः ॥ ३१ ॥

उपजाति

कामाग्नि जो वाडविण्या समर्थ
सुधा असोनी क्षयनाशनार्थ ।
शशी नथींतील बनून मोती
पितो सखे ! त्वन्मुखिची सुधा ती ॥ ३१ ॥

गद्यार्थ—

जो चंद्र, कामाग्नि वाढविण्याचें सामर्थ्य जवळ बाळगतो आणि ज्याच्या स्वत जवळ अमृताचा साठा आहे (तरी स्वतःच्या क्षयरोग त्यानें शांत न झाल्यानें) हे सुंदरी, तुझ्या नथेंतल्या मोत्याचें रूप घेऊन, तोच चंद्र स्वतःचा क्षय घालविण्यासाठीं तुझ्या मुखातील अमृत जणूं काय पीत आहे

———

## (५) कपोल, दांत, स्मित, भाषण.

अनुष्टुभ्

द्विधा विधाय शीतांशुं कपोलौ कृतवान् विधिः ।
तन्व्यास्तद्रसनिष्पत्तिबिन्दवो रदनावलिः ॥ ३२ ॥

अनुष्टुभ्

चंद्रा दुभंगुनी केले, विधीनें स्त्रीकपोल ते ।
थिजोनी तत्सुधाबिंदु, जाहले दांत वाटतें ॥ ३२ ॥

गद्यार्थ—

ब्रह्मदेवानें चंद्राचे दोन तुकडे करून स्त्रीचे दोन गाल केले आणि तें करतांना त्यातील अमृताचे जे बिंदु टपटप खालीं पडतांना थिजले त्यातून सुंदर शुभ्र दंतपंक्ति तयार झाली!

———

उपजाति

पुष्पं प्रवालोपहितं यदि स्या-
न्मुक्ताफलं वा स्फुटविद्रुमस्थम् ।
ततोऽनुकुर्याद्विशदस्य तस्या-
स्ताम्रौष्ठपर्यस्तरुचेः स्मितस्य ॥ ३३ ॥

उपजाति

फुलें फुलावीं जणु पालवींत
मोतीं जडावे स्फुट पोंवळ्यांत ।
स्मितें दिसे सुंदरिची तशी ती
त्या लाल ओठांतुनि दंतपंक्ति ॥ ३३ ॥

गद्यार्थ—

लाल कोंवळ्या पालवीमध्यें शुभ्र फुलें फुलावीं, किंवा उमललेल्या पोंवळ्यांत मोती जडावे त्याप्रमाणें, ही सुंदरी जेव्हां स्मित करते त्यावेळीं लाल ओठांतून झळकणाऱ्या दंतपंक्तींची शोभा दिसते

———

वसंततिलका

आलोक्य सुंदरि मुखं तव मन्दहासं
नन्दन्त्यमन्दमरविन्दधिया मिलिन्दाः ।
किं चासिताक्षि ! मृगलाञ्छनसंभ्रमेण
चञ्चूपुटं चटुलयन्ति चिरं चकोराः ॥३४॥

वसंततिलका

पाहून सुंदरि तुझें मुख मन्दहास
आनन्दती भ्रमर भासुनि पद्म त्यांस ।
त्वन्तरुण्णनेत्र करितांच मृगांकभास
मारी किनीक मिटक्याच चकोर खास ॥३४

गद्यार्थ—

हे सुंदरि ! तुझें नाजूक हास्यानें फुललेलें मुख पाहून जणूं तें कमलच उमललें असें समजून भ्रमर अत्यंत आनंदित होतात. आणि मुखचंद्रावरचे हरिणासारखे काळे डोळे पाहून तो खराच चंद्र उगवल्याचा भास होऊन (भ्रमनिरास होईपर्यंत) कितीतरी वेळपर्यंत चकोर जिभेनें (चोचीनें) मिटक्या मारीत राहतात.

---

शिखरिणी

सुमध्ये वाग्भङ्गैर्वचनविधिमङ्गीकुरु न वा
स्मितज्योत्स्नाकान्तं कुरु वदनमेतन्मयि न वा ॥
त्रिलोकीमूर्धन्या यदि विविधपुण्याधिकतया
मया दृष्टासि त्वं तदिह सफलं मेऽजनि जनुः ॥३५॥

आर्या

वद मजसि हे सुमध्ये !
कुटिलवचांनींच, या, धरी मौन ।
स्मितरूप चांदण्यानें
मंडित कर या नको करूं वदन ॥
त्रैलोक्यसुंदरी मज,
तुजसम दिसली महार्ह पुण्यांनीं ।
केवळ या घटनेनें
गेला मम जन्म सार्थ होवोनी ॥ ३५ ॥

गद्यार्थ—

हे सुमध्ये ! तूं माझ्याशीं कुटिल वचनें बोलणार असशील तरी बोल किंवा मौन धरणार असशील तर खुशाल धर; स्मितरूपी चांदण्यानें मंडित करून स्वतःचें मुख तूं मला दर्शविणार असशील तर दाखव किंवा नसेल दाखवायाचें तर नको दाखवूं. (मला दोन्ही गोष्टींचें आतां सुखदुःख नाहीं. कारण) माझ्या गांठीं महापुण्याई असली पाहिजे व त्यामुळें तुझ्यासारखी त्रैलोक्यसुंदरी माझ्या दृष्टीस पडली, या केवळ एकाच घटनेनें सुद्धां माझ्या जन्माचें साफल्य मला प्राप्त होऊन गेलेलें आहे !

---

रथोद्धता

स्निग्धमालप सुरूक्षमेव वा
त्वत्कथैव सखि मे रसायनम् ।
शीतलं सलिलमुष्णमेव वा
पावकं हि शमयेदसंशयम् ॥ ३६ ॥

रथोद्धता

स्निग्ध, रुक्ष कसलेंहि भाषण
गे तुझेंच, मजला रसायन ।
शीत उष्ण जल हो कसेंहि तें
निश्चयें शमवितेंच अग्नितें ॥ ३६ ॥

गद्यार्थ—

हे सुंदरि ! तुझें भाषण, मग तें प्रेमळ असो की रुक्ष असो (माझ्या सर्व आधिव्याधींना) जणूं रसायनाप्रमाणें शांति देणारें असतें. पाणी मग तें उष्ण असो, थंड असो, अग्नीला निश्चित विझविणारच !

---

## (६) अधर

अनुष्टुभ्

आच्छादयसि किं मुग्धे वस्त्रेणाधरपल्लवम् ? ।
खण्डिता एव शोभन्ते वीराधरपयोधराः ॥ ३७ ॥

अनुष्टुभ्

मुग्धे ! निजाधरा वस्त्रें कां गे घेतेस झांकुन ? ।
शोभती जखमांनींच वीर, ओष्ठ तसे स्तन ॥ ३७ ॥

गद्यार्थ—

हे मुग्धे ! तूं आपला अधरोष्ठ, वस्त्रांनीं झांकून कां बरें बसली आहेस ? शूरवीर, अधरोष्ठ आणि स्तन यांना खरी शोभा जखमांमुळेंच येते; (वीरांना शस्त्रांच्या, अधरांना दंतव्रणाच्या व स्तनांना नखांच्या.)

अनुष्टुभ्

तवैष विद्रुमच्छायो मरुमार्ग इवाधरः ।
करोति कस्य नो बाले पिपासाकुलितं मनः ? ॥३८॥

आर्या

मुग्धे ! त्वदधर यारे मरुमार्गासमचि विद्रुमच्छाय ।
यास्तव मन कोणाचें तृष्णाकुल हा करील नच काय ?

गद्यार्थ—

( विद्रुमच्छाय या शब्दात कोटि, मरुमार्गाकडे विद्रुमच्छाय झाडाच्या छायेविरहित, अधराकडे-विद्रुम=पोवळीं त्यांच्या सारखी छाया म्हणजे रग असलेला. ) हे मुग्धे मारवाडातल्या वाळवटी रुक्ष मार्गाप्रमाणेंच, तुझा अधर हा विद्रुमच्छाय असल्यानें कोणाचं मन तृष्णाकुल करीत नाहीं ? ( तो इतका लाल व आकर्षक आहे-कीं त्याचे पान करण्याची इच्छा कोणालाहि व्हावी )

---

अनुष्टुभ्

पल्लवे नास्ति माधुर्यं सुधायां नास्ति शोणिमा ।
विद्रुमे नास्ति मृदुता तत् त्रयं दयिताधरे ॥ ३९ ॥

वसततिलका

गोडी कधीं दिसतसे मृदु पल्लवांत ?
लालीहि सुदर कुठें असते सुधेंत ? ।
कोठें मिळेल मृदुतालव पोंवळ्यांत ?
हीं तीनही परि सदा दयिताधरांत ॥ ३९ ॥

गद्यार्थ—

झाडांच्या कोवळ्या पालवींत, रगसौदर्य व मृदुता असते पण माधुर्य नसतें, सुधेंत माधुर्य आहे पण रंगसौंदर्य नाहीं, व मृदुताहि नाहीं, पोंवळ्यांत रगसौंदर्य आहे तर मृदुता नाहीं— माधुर्य तर नाहींच नाहीं परंतु या तिन्हींचा सगम स्त्रीच्या अधरांत आहे

---

आर्या

चित्रं कनकलतायाः पल्लव एवामृतं सदा सूते ।
कुसुमसमुद्गमसमये नो जाने किं पर भावि ॥ ४० ॥

आर्या

कनकलतापल्लवहीं-
आश्चर्य न कां ? स्रवेच अमृतास ।
पुष्पित होतां ती मग
काय घडे तें कळे न कोणास ॥ ४० ॥

गद्यार्थ—

स्त्रीरूपी सुवर्णवल्लरीची पालवी (अधर) सुद्धा अमृत स्रवते हें आश्चर्य नव्हे का ? मग तीच वल्लरी पुष्पित झाले (ऋतुमती) म्हणजे आणखी काय घडणार कोण जाणे !

---

## ( ७ ) बाहु, कण्ठ, हार, हृदय.

अनुष्टुभ्

दयिताबाहुपाशस्य कुतोऽयमपरो विधिः ।
जीवयत्यर्पितः कण्ठे मारयत्यपवर्जितः ॥ ४१ ॥

आर्या

स्त्रीबाहुपाश न्यारा
विचित्र हो इतर बंधनांहून !
वसतां गळ्यास जगवी,
सुटतां, टाकी नरास मारुन ॥ ४१ ॥

गद्यार्थ—

इतर सर्व बधनांहून स्त्रीच्या बाहुपाशाचा (म्हणजे फांसाचा) प्रकार किती निराळा आहे पहा-ज्याच्या गळ्यात तो वसतो त्याला तो जगवतो-नवजीवन देतो ! ज्याच्या गळ्यांतून तो सुटतो त्याला मेल्यासारखें करुन टाकतो !

---

माल्यभारा

मणिहारलता विभाति तन्व्याः
कुचसिंहासनसीम्नि तस्थिवांसम् ।
अभिषेक्तुमनङ्गदेवराजं
गलशंखाद्गलितेव दुग्धधारा ॥ ४२ ॥

आर्या

तरुणीस्तन सिंहासन
वरनी आरूढ मदन त्यावरतीं ।
राज्याभिषेक त्यातें
करण्या अवयव तिचे जधीं सजती ॥
शखासम कंठांतुनि
जणु दुग्धचि येइ दोन धारांनीं ।
हेंच गमे रमणीच्या
कंठीं मणिशुभ्रहार पाहोनी ॥ ४२ ॥

गद्यार्थ—

रमणीच्या गळ्यांतील शुभ्र मणिहार पाहून असें वाटतें, कीं, तिच्या स्तनसिंहासनावर आरूढ झालेल्या मदनराजाला अभिषेक करण्यासाठीं तिच्या कण्ठरूपी शंखांतून खालीं सोडलेल्या या दुधाच्या धाराच, कंठाच्या दोन्ही बाजूंनीं स्तनसिंहासनावर ओतल्या जात आहेत. (राज्याभिषेकांत शंखांत जल किंवा दुग्ध भरून त्याच्या धारा राजाच्या मस्तकावर धरावयाच्या असतात.)

---

अनुष्टुभ्

यदीयस्त्रायते हारो नाभिकूपे मृगीदृशः ।
संसेक्तुमिव लावण्यपयसा यौवनद्रुमम् ॥ ४३ ॥

अनुष्टुभ्

नाभिकूपावरी स्त्रीच्या, हाराचें जलयंत्र तें ।
सौंदर्यजल घेवोनी यौवनद्रुम शिंपितें ॥ ४३ ॥

गद्यार्थ—

सुंदरीच्या गळ्यांतील (नाभीपर्यंत खालीं लोंबणारा) हार, हा, जणूं काय, नाभीरूपी विहिरीवर, सौंदर्यजलानें, तारुण्यवृक्षाला शिंपण्यासाठीं बसविलेलें, जलयंत्र (रहाटगाडगें व त्याची माळ) च आहे.

---

अनुष्टुभ्

हारोऽयं हरिणाक्षीणां लुठति स्तनमण्डले ।
मुक्तानामप्यवस्थेयं के वयं स्मरकिंकराः ? ॥ ४४ ॥

आर्या

रुळते हरिणाक्षीच्या
स्तनांसभोंवार माळ मुक्तांची ।
मुक्तांची स्थिति ही तर
काय कथा मदनदाससम अमुची ? ॥ ४४ ॥

गद्यार्थ—

हरिणाक्षीच्या गळ्यांतली मुक्ताची माळ तिच्या स्तनांभोंवतीं लोळत आहे. मुक्तांची (मोत्यांची; दुसरा अर्थ-मुक्तावस्थेस पोंचलेल्यांची) ही स्थिति, तर, आम्ही सर्वसाधारण माणसें, मदनाचे दास, जे आहों ते तेथें कायमचे गुंगून पडलों तर काय आश्चर्य ?

---

वसंततिलका

इन्दीवरेण नयनं, मुखमम्बुजेन
कुन्देन दन्तमधरं नवपल्लवेन ।
अङ्गानि चंपकदलैः स विधाय वेधाः
कान्ते कथं घटितवानुपलेन चेतः ? ॥ ४५ ॥

वसंततिलका

नीलोत्पलांस नयनीं, मुखिं अंबुजास
दंतांत कुंद, अधरीं नवपल्लवांस ।
अंगांत चंपक भरुन तुझ्या, विधीनें
चित्तीं शिला कुठुनि गे भरली न जाणे ॥ ४५ ॥

गद्यार्थ—

(मनधरणी करूनहि वश न होणारीस उद्देशून किंवा चित्ताचें काठिन्य म्हणजे कुचांचें काठिन्य अशा अर्थानें हा श्लोक असावा.) हे कान्ते, ब्रह्मदेवानें तुला निर्माण करतांना, तुझ्या डोळ्यांत नीलकमलें, मुखांत कमलें, दांतांत कुन्द कळ्या, अधरांत कोंवळी पालवी, सर्वांगांत सोनचाफ्याच्या पाकळ्या भरल्या आणि हृदयांत (स्तनांत) तेवढी शिला कोठून भरली कोण जाणे ! (म्हणून तूं इतकी कठोरहृदया किंवा कठिनस्तनी झालीस !)

---

## (८) वक्षोज.

वंशस्थ

यथा यथाऽस्याः स्तनयोः समुन्नति-
स्तथा तथा लोचनमेति वक्रताम् ।
अहो सहन्ते बत नो परोदयं
निसर्गतोऽन्तर्मलिना ह्यसाधवः ॥ ४६ ॥

इंद्रवंशा

उंचावती तत्स्तन हो जसे जसे
नेत्रांस वक्रत्वचि ये तसें तसें ।
जे आंतुनी कृष्ण असेच जन्मती
दुष्टांस त्यां सह्य नसे परोन्नति ॥ ४६ ॥

गद्यार्थ—

ह्या सुंदरीच्या स्तनाची वाढ होऊन ते जसे जसे उन्नत होत जात आहेत तसे तसे हिचे नेत्रांत वक्रत्व येत चाललें आहे. (ही कटाक्षांनीं पाहूं लागली आहे.) (याचें कारण उघड

आहे, कीं,) जे जन्मताच आतून काळे, (ज्याच्या पोटातच पाप) अशा खलाना, दुसऱ्याचा उदय होऊन उन्नति होत असलेली सहनच होत नाहीं

अनुष्टुभ्

मुखेन्दुचन्द्रिकापूरप्लाव्यमानौ पुनः पुनः ।
शीतभीताविवान्योन्यं तस्याः पीडयतः स्तनौ ॥ ४७॥

अनुष्टुभ्

मुखचंद्रकरस्नानें गारठ्या
(किंवा थंडीला) भिउनी स्तन ।
उबेस बसती जाणों
एकमेकांस खेटुन ॥ ४७ ॥

गद्यार्थ—

वरून (हिमकर) मुखचंद्राच्या गार किरणांनीं पुन पुन स्नान घडल्यानें, जणूं काय, गारठा होईल या भीतीनें, (ऊब येण्यासाठीं) स्त्रीचे स्तन एकमेकांना अगदीं खेटून बसले आहेत

अनुष्टुभ्

स्वकीयं हृदयं भित्वा निर्गतौ यौ पयोधरौ ।
हृदयस्यान्यदीयस्य भेदने का कृपा तयोः ? ॥ ४८ ॥

अनुष्टुभ्

स्तन येती वरी जे स्व-हृदयालाहि भेदुन ।
भेदतां अन्य हृदयां दया ये त्यांस कोठुन? ॥ ४८ ॥

गद्यार्थ—

जे पयोधर, स्वतःच्या हृदयालाच भेदून वर उठतात, त्यांना, दुसऱ्यांचा हृदयभग करतांना, किंवा, दुसऱ्याच्या हृदयास भोसकतांना, दया कसली वाटणार ?

उपजाति

काठिन्यमङ्गैरखिलैर्निरस्तं
कुचौ युवत्याः शरणं जगाम ।
अधः पतिष्याव इतीव भीत्या
न शक्नुतस्तावपि हातुमेतत् ॥ ४९ ॥

उपजाति

काठिन्य सर्वांगिंहि टाकलें तें
कुचांत जाई जणुं आश्रयातें ।
"खालीं पडूं" याच भयें, न तेहि
सोडावया त्या धजती कधींहि ॥ ४९ ॥

गद्यार्थ—

स्त्री वयात येत चालली म्हणजे किशोरावस्थेंतला सर्वावयवातला दडसपणा काठिन्य, जाऊन एक नवीनच मार्दव उदयास येतें हें जें सर्व अवयवांनीं टाकून दिलेलें काठिन्य तें जणू काय तिच्या स्तनांत आश्रय घेतें. आणि "आपण स्वत (काठिन्य नसेल तर) खालीं पडूं" या भीतीनेंच जणूं काय स्तनहि त्या काठिन्याला सोडूं शकत नाहींत

रथोद्धता

आवृणोति यदि सा मृगीदृशी
स्वाञ्चलेन कुचकाञ्चनाचलम् ।
भूय एव बहिरेति गौरवा-
दुन्नतो न सहते तिरस्कृतिम् ॥ ५० ॥

वसंततिलका

झांकी जधीं पदर घेउनि ती मृगाक्षी
सोन्याचिया गिरिसमान निजस्तनांसी ।
डौलांत उंच तिथुनीहि पुनश्च येती
सोसून 'थोर' कधिं कां अपमान घेती ? ॥ ५० ॥

गद्यार्थ—

सु-वर्ण पर्वतासारखे आपले स्तन, ही मृगाक्षी, जेव्हा, पदर घेऊन झाकते, तेव्हां, त्यातूनहि ते उंच उठून येतातच, 'थोर,' 'उन्नत,' हे आपला अपमान कधीं सहन करतील काय ?

आर्या

पुष्पादनन्तरं स्यात्फलं लतायां प्रसिद्धमिति लोके ।
चित्रं कनकलताया पुष्पोद्गमतः फलद्वयं पूर्वम् ॥ ५१ ॥

आर्या

ललेस पुष्पांमागुनि
येति फळें हें प्रसिद्ध या जगतीं ।
कनकलतेस फलद्वय,
आश्चर्यचि, कीं, फुलांचिया आधीं ॥ ५१ ॥

गद्यार्थ—

कोणत्याहि वेलीला फळें येतात, तीं पुष्पांच्या नंतरच येतात, ही गोष्ट जगप्रसिद्धच आहे पण काय आश्चर्य पहा, कीं, (स्त्रीरूपी) सुवर्ण-वेलीला पुष्पोद्गम (ऋतुमती) होण्यापूर्वीच, दोन फळें (स्तन) दिसू लागतात!

———

आर्या

महतोः सुवृत्तयोःसरि
हृदयमहयोग्ययोः समुच्छ्रितयोः ।
सज्जनयोः स्तनयोरपि
निरन्तरं सङ्गतं भवति ॥ ५२ ॥

आर्या

मोठे, सुवृत्त, सरजये,
हृदिं घेण्यायोग्य आणि उन्नतसे ।
सज्जन तैसे स्तनही
यांची सगत सदैव राहतसे ॥ ५२ ॥

गद्यार्थ—

सज्जन आणि स्तन दोघेहि 'मोठे,' दोघेहि 'सुवृत्त,' (सज्जनांकडे चांगल्या वर्तनाचे, स्तनांकडे गोल बांध्याचे) दोघेहि हृदयाशीं घेण्याजोगे, व दोघेहि 'उन्नत' असतात त्यामुळें सज्जनांसज्जनांची सगत जशी निरंतर टिकते तशीच स्तनास्तनांची सगत टिकते (म्हणजे ते एकमेकांत 'अंतर' ठेवीत नाहींत! एकमेकांना खेटून राहतात)

———

अनुष्टुभ्

अविवेकात्पीडयतां स्थिरमन्योन्यमंडलम् ।
कुनृपाणां कुचाना च पतनाय समुच्छ्रयः ॥ ५३ ॥

अनुष्टुभ्

अन्योन्यमंडलाला जे अविचारेंच पीडिती ।
कुराजांची कुचांहीही पडण्यासचि उन्नति ॥ ५३ ॥

गद्यार्थ—

(शेजारशेजारचे) वाईट राजे, जसे एकमेकांच्या (मडलास) प्रदेशास उपद्रव देतात (व स्तन चा प्रदेश वाढवून तात्पुरते उन्नत झालेले दिसतात) तरी ही उन्नति त्यांच्या पतनालाच कारणीभूत होऊन दोघेहि गार्तीं कोसळतात-आणि ततोतंत, अशीच, स्त्रीस्तनांची स्थिति असते (अन्योन्यमंडल=एकमेकांचा गोलावा, प्रदेश, समुच्छ्रय=उच ठर्णे.)

———

मालभारा

मनसः परमाणुतां वदन्तः
कथमद्यापि न तार्किकास्त्रपन्ते ? ।
कनकाचलजित्वरस्तनीनां
युवतीनामपि यत्र सनिवेशः ॥ ५४ ॥

वसंततिलका

ज्या जिंकिती कनकपर्वतही स्तनांनीं
त्या कामिनी मनिं जियें वसती शिरोनी ।
जे सांगती 'मन असे अणुच्यापरी' तें
त्या तार्किकां अजुनि लाज कशी न वाटे? ५४

गद्यार्थ—

आपल्या स्तनांनीं ज्या सुवर्ण मेरूलाहि जिंकतात, अशा तरुणी ज्या मनांत ठाणें देऊन वसू शकतात, तें मन 'अणू-परमाणूप्रमाणें सूक्ष्म' आहे असें जे तर्कशास्त्र प्रतिपादन करतात त्यांना (एवढ्या उघड उघड तर्कदुष्टत्वाची) अजून, लाज कशी वाटत नाहीं, कोण जाणे!

———

आर्या

चञ्चत्काञ्चनशैला-
यस्या वक्षोरुही पुरं तन्व्याः ।
नो चेत्तारधिरूढा
कथमनिमिषतां भजेत मे दृष्टिः ? ॥५५॥

आर्या

तरुणी-स्तन हे हलते
सुवर्णमेरूच वाटती मजसी ।
नाहींतर चढुनि तिथें,
अनिमिष मम दृष्टि जाहली कैशी ? ॥ ५५ ॥

गद्यार्थ—

(संस्कृतामध्यें असा एक कविसंकेत दिसतो कीं, मेरुपर्वत दृष्टीस पडला कीं, आनदाश्चर्यातिशयानें, डोळे अनिमिष होतात निमिष=डोळ्याच्या पापण्यांची उघड-झाप अनिमिष=पापण्या

मिरणें अशक्य होणें ) तरुणीचे स्तन हे प्रत्यक्ष हलते दोन सुवर्णमेरूच असले पाहिजेत खास याला 'प्रत्यक्ष' पुरावा असा कीं, तसें नसतें तर त्या स्तनावर चढल्याबरोबर माझी दृष्टि ( केवळ मेरूवरच होते तशी ) अनिमिष कशी झाली?

शार्दूलविक्रीडित

उद्भिन्नं किमिदं मनोभवनृपक्रीडारविन्दद्वयं ?
सूते तत्कथमेकतः किल लसद्रोमावलीनालतः ? ।
चक्रद्वन्द्वमिदं ? क्षमं तदपि न स्थातुं मुखेन्दोः पुरो
लावण्याम्बुधिमग्नयौवनगजस्यावैमि कुम्भद्वयम् ॥५६॥

आर्या

स्मरनृप रमण्यास्तव हें
कमलद्वय काय उमललें ऐसें ? ।
परि एकचि रोमावलि-
नाळेंतुनि दोन जन्मती, कैसे ? ॥
चक्रद्वंद्व म्हणूं तर
मुखेन्दुपुढतीं कसें द्वयचि टिकलें ?
सौंदर्याब्धित नाहुनि
यौवनगजकुंभ खास वर उठले ॥ ५६ ॥

गद्यार्थ—

( सुंदरीच्या स्तनाचें वास्तवस्वरूप तरी काय असावें? ) मदन नृपतीच्या क्रीडेसाठीं उगवलेलें हें कमलयुगल असेल म्हणावें तर, एकाच रोमावलीरूपी नाळातून, एकाच वेळीं, दोन कमलें उगवणें कसें शक्य आहे? बरें हें चक्रवाक पक्ष्याचें जोडपें म्हणावें तर मुखचंद्रापुढें हें जोडपें टिकलें कसें? ( चंद्रोदया बरोबर चक्रवाकांना वियोग घडलाच पाहिजे ) तेव्हां ( या सर्व कल्पना बरोबर नसून ) तारुण्यरूपी हत्ती, सौंदर्यरूपी समुद्रांत बुडी मारून वर उठतांना, प्रथम वर आलेले त्याचे हे कुम्भच असले पाहिजेत असा निर्णय मी करीत आहें

आर्या

जाता लता हि शैले,
जातु लतायां न जायते शैलः ।
अधुना तद्विपरीतं
कनकलताया गिरिद्वय जातम् ॥ ५७ ॥

आर्या

उगवे लताच गिरिवर,
गिरि उगवेना कधीं लतेवरती ।
आतां उलटेंच घडे—
कनकलतेंतून दोन गिरि फुटती ॥ ५७ ॥

गद्यार्थ—

( नेहमीं आपण पाहतों कीं ) डोंगरावर वेली उगवतात, पण कधीं वेलीवर डोंगर उगवत नाहींत, पण आतां हें पहा कसें उलटें झालें तें ! या ( तरुणीरूपी ) सुवर्णवेलीवर एक नाहीं, चांगले दोन गिरि उगवले आहेत !

## ( ९ ) कटिः पायांतील नूपुर.

उपजाति

वयःप्रकर्षादुपचीयमान-
स्तनद्वयस्योद्वहनश्रमेण ।
अत्यन्तकार्श्यं जलजायताक्ष्या
मध्यो जगामेति ममैष तर्कः ॥ ५८ ॥

उपजाति

वाढे वयाच्यासह भार ज्यांचा
तो नित्य वाहून जणूं स्तनांचा ।
थकोनिया या कमलेक्षणेची
होई कटी ही कृश फार साची ॥ ५८ ॥

गद्यार्थ—

वाढत्या वयाबरोबर ज्यांचा भारहि वाढत जातो अशा दोन स्तनाचें ओझें, वाहून वाहून त्या श्रमानेच, मला वाटतें, या कमलाक्षीची कबर झिजून झिजून अगदीं बारीक झाली असली पाहिजे

उपजाति

परस्परासङ्गसुखान्नतभ्रुवः
पयोधरौ पीनतरौ बभूवतुः ।
तयोरमृष्यन्नयमुन्नतिं परा-
मावेद्मि मध्यस्तनिमानमेति ॥ ५९ ॥

उपजाति

परस्परासंगसुखें स्त्रियेचें
वक्षोज होती परिपुष्ट साचे।
त्यांची न ही उन्नति पाहवून
वाटे तिची कंबर होइ सान ॥ ५९ ॥

गद्यार्थ—

स्त्रीचे दोन स्तन एकमेकांच्या संगतीच्या सुखामुळें चांगलें पुष्ट व उन्नत (उच्च) होतात, परंतु, त्यांची ही उन्नति न पाहवल्यामुळें, (मत्सराधीन जळत जळत) हिची कंबर बारीक झाली असावी

आर्या

दत्त्वा दर्शनमेते मत्प्राणा वरतनु त्वया क्रीताः।
किन्त्वपहरसि मनो यद्दासि रणरणकमेतदसम॥६०॥

आर्या

देउनि दर्शन सुंदरि !
मत्प्राणां घेतलेंच तूं विकत।
परि मन हरसी देउन
नूपुररवमूल्य, काय हें उचित? ॥ ६० ॥

गद्यार्थ—

हे सुंदरि! तू आपलें दर्शन मला देऊन माझे प्राण विकत घेतलेस हें ठीक आहे पण नूपुरांचा रुणझुण रणत्कार हें मूल्य देऊन तू माझें मन हरण करतेस, हें उचित आहे का? (रुणझुण नूपुररव ऐकून मुग्ध झालेला तरुण म्हणतो)

---

## प्रकरण २९ वें

## रति, मदन व त्यांच्या लीला

### (१) रति, मदन यांचे प्रताप

वसंततिलका

देवी रतिर्विजयते मृगनाभिचित्र-
पत्रावली पृथुपयोधरसीम्नि यस्याः।
भाति त्रिलोकविजयोपनतस्वकान्त-
प्रक्रान्तसायकनिशाणनकालिकेव ॥ १ ॥

शार्दूलविक्रीडित

जिंकाया त्रिजगा निघे मदन, तें
बाणां सहाणेवरी-
घाशी त्यांतिल कालिमाचि, जणुं की,
ती शोभली कस्तुरी।
जीनें चित्रित पत्रपंक्ति जिचिया
वक्षोजकुंभांवरी
ऐशी ती रतिदेवता विजयिनी
राहो त्रिलोकावरी ॥ १ ॥

गद्यार्थ—

त्रैलोक्याला जिंकावयास निघतांना, मदनानें, आपले बाण तीक्ष्ण करण्याकरिता, घांसल्यानें, सहाणेवर उत्पन्न झालेला कालिमाच जणु, अशा कस्तूरीनें जिच्या वक्षोजकुंभांवर पानें फुलें चित्रिलेलीं आहेत, अशी रति देवता, विजयी असो!

---

मालिनी

कुसुमसुरभलाना केलिदीक्षाप्रदाने
परमसुहृदनङ्गो रोहिणीवल्लभस्य।
अपि कुसुमपृषत्कैर्देवदेवस्य जेता
जयतु सुरतलीलानाटिकासूत्रधारः ॥ २ ॥

मालिनी

गुरुपरि शिकवी जो कामलीला स्त्रियांस
परमसुहृद् झाला रोहिणीवल्लभास।
मदन सुमशरेंही जिंकितो जो सुरेंद्र
जयतु सुरतलीलानाटिका-सूत्रधार ॥ २ ॥

गद्यार्थ—

स्त्रियांना कामलीला शिकविणारा कुलगुरु, चंद्राचा महान् मित्र, कुसुमबाणांनींसुद्धां जो देवेंद्रासहि जिंकतो, असा तो सुरतलीला-नाटिकेंतील सूत्रधार मदन विजयी होवो.

---

वसंततिलका

शम्भुस्वयंभुहरयो हरिणेक्षणानां
येनाक्रियन्त सततं गृहकर्मदासाः ।
वाचामगोचरचरित्रविचित्रिताय
तस्मै नमो भगवते कुसुमायुधाय ॥ ३ ॥

वसंततिलका

ब्रह्मा हरी शिव, सदा मृगलोचनांचे
ज्यानें पदीं वसविले घरनोकरांचे ।
ज्याचीं विचित्र चरितें वचना अतीतें
पुष्पायुधासि भगवंत तया नमस्ते ॥ ३ ॥

गद्यार्थ—

ज्यानें, ब्रह्मा, विष्णु, शंकर अशा देवश्रेष्ठांना सुद्धां, हरिणाक्षी स्त्रियांचे घरगडी करून सोडलें, आणि ज्याची विचित्र लीला वर्णन करताना वाणी कुंठित होते अशा त्या भगवान् कुसुमायुध मदनाला नमस्ते !

---

वसंततिलका

ऊरुद्वयं मृगदृशः कदलस्य काण्डौ
मध्यं च वेदिरतुलं स्तनयुग्ममस्याः ।
लावण्यवारिपरिपूरितशातकुम्भ-
कुम्भौ मनोजनृपतेरभिषेचनाय ॥ ४ ॥

आर्या

अभिषेका मदनाच्या,
सामग्री सुंदरीचि पुरवीती ।
ऊरुद्वय तरुणीचे,
केळीचे खांब दोन जणुं होती ! ॥
पूरित लावण्यजलें
पीनस्तन कनककुम्भ जणुं गमती ।
तनुमध्य हीचि वेदी
करुनी ते कलश ठेविले वरतीं ॥ ४ ॥

गद्यार्थ—

मदनराजाच्या अभिषेकाची सामग्री सुंदर युवतीच्या अंग प्रत्यंगांतूनच येत असते—ऊरुद्वय ( मांड्या ) हेच जणूं का केळीचे दोन खांब, स्त्रीदेहाचा मध्यभाग ही जणूं वेदी, त्यावर पुष्टस्तन हेच जणूं सौंदर्यजलानें भरलेले सुवर्णकुं मांडून ठेवले आहेत.

---

वसंततिलका

किं कौमुदीः शशिकलाः सकला विचूर्ण्य
संयोज्य चामृतरसेन पुनः प्रयत्नात् ।
कामस्य घोरहरहुंकृतिदग्धमूर्तेः
संजीवनौषधिरियं विहिता विधात्रा ॥ ५ ॥

वसंततिलका

ज्योत्स्नेसवें सकल चंद्रकला कुटून
यत्नें सुधारसहि त्यांतचि कां खलून ।
जो जाळिला मदन कोपुनि शंकरानें
संजीवनीचि जणुं त्यासि दिली विधीनें ? ॥५॥

गद्यार्थ—

शंकराच्या भयंकर कोपानें दग्ध झालेल्या मदनाला पुनः जीवन देण्यासाठीं ब्रह्मदेवानें, शुभ्र चांदणें व चंद्राच्या सर्व कला कुटून, त्यांत प्रयत्नानें अमृतरस खलून औषधि सिद्ध केली की काय ?

---

अनुष्टुभ्

एकं वस्तु द्विधा कर्तुं बहवः सन्ति धन्विनः ।
जयत्येकः स्मरो धन्वी द्वैतमेकीकरोति यः ॥ ६ ॥

अनुष्टुभ्

करण्या दोन एकाचे बहु होती धनुर्धर ।
दोघां एक करी धन्वी धन्य एकचि तो स्मर ॥ ६ ॥

गद्यार्थ—

एकाला छेदून दोन करणारे धनुर्धर, जगभर पुष्कळ आहेत, पण, द्वैताचें अद्वैत करणारा एकच एक धनुर्धर जो मदन, तो विजयी होवो.

---

अनुष्टुभ्

अपूर्वेयं धनुर्विद्या मदनस्य महात्मनः ।
शरीरमक्षतं कृत्वा भिनत्यन्तर्गतं मनः ॥ ७ ॥

अनुष्टुभ्

महात्म्या मदनाची ह्रो धनुर्विद्या अपूर्व ही।
न देह छेदितां विंधी जी आंतील मनासही ॥ ७ ॥

गद्यार्थ—

महात्म्या मदनाची धनुर्विद्या खरोखर अपूर्वच म्हटली पाहिजे; कारण, ती देहाला जखम सुद्धां न करता थेट आंतल्या मनालाच परस्पर विद्ध करते !

पुष्पिताग्रा

परिमितविशिखो न चेन्मनोजो
यदि मृदुकुसुमेषुरेष न स्यात् ।
यदि च हरो न हरेत्तदीयमङ्ग-
मवनितले न किमाचरेत्तदानीम् ! ॥ ८ ॥

शार्दूलविक्रीडित

सारे बाणहि मोजकेहि नसते
त्या मन्मथाचे जर
पुष्पांचे सम वा मृदूचि नसते
ते बाण त्याचे जर ।
त्यातें जाळुनिया अनंग नसतें
केलें शिवानें, तर-
जाणे कोण किती अनर्थ करता
स्वच्छंद उर्वीं सो स्मर ! ॥ ८ ॥

गद्यार्थ—

मदनाचे बाण अवघे पांच, इतके मर्यादित, मोजके, नसते, ( इतर धनुर्धरांसारखे अनंत असते ) आणि ते बाणहि पुष्पासारख्या नाजुक वस्तूचे नसते, (इतरांसारखे पोलादाचे असते) आणि त्याला शंकरानें देहविरहित अनंग केलें नसतें, ( इतरांसारखा जर तो जिवंत पुरुष असता ) तर त्यानें जगभर काय धुमाकूळ घातला असता देव जाणे !

अनुष्टुभ्

कुलरीतिप्रियप्रीतिस्तम्भद्वयविलम्बिनि ।
तन्वीहृदयहिंदोले हन्त दोलायते स्मरः ॥ ९ ॥



वसंततिलका

रीती कुलांतिल, नि प्रेमहि वल्लभाचें
हे दोन खांबचि करी जणुं बांधण्याचे ।
दोला करी हृदयही जणुं कामिनीचें
झोके तिथें मदन घेत वसे सदाचे ॥ ९ ॥

गद्यार्थ—

( वाटेल तेव्हा वाटेल तें करता येत नाहीं ही ) कुलरीतीची मर्यादा हा एक खांब, व प्रियाकडे प्रेमानें ओढ घेणारें मन हा दुसरा खांब, यांना कामिनीचें हृदय हा हिंदोळा बांधून मदन झोके घेत असतो

शिखरिणी

न गम्यो मन्त्राणां न च भवति भैषज्यविषयो
न चापि प्रध्वंसं व्रजति विविधैः शांतिकशतैः ।
भ्रमावेगादङ्गे किमपि विदधद्भङ्गमसमं
स्मरापस्मारोऽयं भ्रमयति दृशं घूर्णयति च ॥ १० ॥

शिखरिणी

न जाई मंत्रांनीं, हटवुं न शके औषध जया
उपायां शांतीच्या करुनिहि न जो जात विलया ।
जयें अंगोपांगीं प्रबल झटके येति तनुतें
स्मरापस्मारें त्या नजर फिरुनी धुंद बनते ॥ १० ॥

गद्यार्थ—

मदनानें उत्पन्न केलेला अपस्मार ( फेंपरें ) असा भयंकर की त्याच्यावर मंत्रांचा प्रभाव चालत नाहीं, औषधांनीं तो हटत नाहीं, शांतीचे शेंकडों उपाय करून तो नष्ट होत नाहीं, त्यानें शरीराला भ्रम व प्रबल झटके येतात व माणसाची दृष्टि फिरून धुंद बनते.

वसंततिलका

हारो जलार्द्रवसनं नलिनीदलानि
प्रालेयशीकरमुचस्तुहिनांशुभासः ।
यस्येन्धनानि सरसानि च चन्दनानि
निर्वाणमेष्यति कथं स मनोभवाग्निः ? ॥ ११ ॥

वसंततिलका

वस्त्रें जलार्द्र, नलिनीदल पुष्पहार
वर्षी तुषार हिमशीत असाहि चंद्र।
अन् चंदनें सरस, इंधन होत ज्याचीं
त्या तृप्ति होय कुठुनी स्मरपावकाची? ॥११॥

गद्यार्थ—

(वरील १० व्या श्लोकांतील शांतीचे उपचार या श्लोकांत आहेत) पाण्यांत भिजलेलीं वस्त्रें, कमलाच्या पाकळ्या, पुष्पहार, अगदीं हिमासारखे शीतल असे चंद्रकिरण, सरस चंदन याच वस्तु जेथें मदनाग्नीच्या सर्पणासारख्या आहेत, तेथं तो अग्नि (या उपायांनीं) कसा शांत होईल? (उलट भडकेल मात्र)

———•———

## (२) उत्कंठा, प्रतीक्षा, संकेत, स्वागत

अनुष्टुभ

कदा नौ संगमो भावीत्याकीर्णे वक्तुमक्षमा।
अवेक्ष्य कान्तमबला लीलापद्मं न्यमीलयत् ॥ १२ ॥

उपजाति

'केव्हां पुन्हां संगमयोग आतां?"
चौघांत सांगूं शकली न कांता।
पतीस्मि, लीलाकमलें स्वहस्तें
इष्टार्थ दावी मिटवूनिया तें ॥ १२ ॥

गद्यार्थ—

'आपली भेट आता पुन्हा केव्हां होणार?" हें चार चौघांच्या देखत कान्ता आपल्या प्रियास सांगू शकली नाहीं, म्हणून (त्याला तेवढा इशारा समजावा व इतरांना समजू नये म्हणून तिनें युक्ति केली, की) आपल्या हातांतील लीलाकमल तेवढें तिनें मिटून घेतलें! (कमळ रात्रीं मिटतें तेव्हां आता रात्रीं!)

———•———

आर्या

"समये पयोधराणा-
मपतितया नैव शक्यते स्थातुम्।"
"उत्कंठिताऽसि बाले?"
"नहि नहि सखि पिच्छिलः पन्थाः ॥ १३ ॥

आर्या

"समयीं पयोधरांच्या
न अपतिता शक्य गे मला होत।"
"कां ओढ लागली गे?"
"तैसें न सखे! पथीं चिखल दाट" ॥१३॥

गद्यार्थ—

(पयोधर=एक अर्थ स्तन, दुसरा ढग, पयोधराणा समये= स्तनाची वाढ होत असता, दुसरा अर्थ-पावसाळ्यांत, अपतिता=पतिविरहित अवस्था, दुसरा अर्थ-पतित न होणें, घसरून न पडणें) प्रियामीलनाची ओढ श्यर्थी शब्द वापरून एक स्त्री सखीला सांगते—"पयोधराच्या समयीं अपतितावस्थेंत राहणें शक्य नाहीं!" सखी विचारते "कां ग फार ओढ लागली वाटत?" ती म्हणते "तसें नाहीं ग! पावसाळ्यानें रस्त्यांत चिखल फार, त्यामुळें घसरून पडल्याशिवाय राहणें शक्य नाहीं!"

———•———

हरिणी

वदनकमलं पाणौ कृत्वा निमीलितलोचना
यमभिलिखितप्रख्यैरङ्गैर्न मुञ्चसि चेतसा।
चटुलनयने शून्या दृष्टिः कृता खलु केन ते
क इह सुकृती द्रष्टव्यानामुवाह धुरं पराम्? ॥ १४ ॥

शार्दूलविक्रीडित

नेत्रांतें मिटुनी, मुखांबुज असें हस्तांबुजीं टेकुनी
चित्तानें त्यजिसी न ज्या, अचल तूं चित्रापरी बैसुनी॥
दृष्टी चंचल मूळची तव कुणी केली यदें शून्य ही!
प्रेक्ष्यश्रेष्ठ नि पुण्यवंत रुचला तो कोण तूतें मही?॥१४॥

गद्यार्थ—

हे सुंदरि! डोळे मिटून, हातांत आपलें मुख टेकून चित्रासारखी बसून, ज्याला तू मनांतून काढून टाकूं शकत नाहींस तो कोण बरें? तुझी मूळची चंचल दृष्टि, शून्य करणारा तो कोण बरें? प्रेक्षणीयांत सर्वोत्तम असा तुझ्या दृष्टीनें ठरलेला पुण्यवान् कोण बरें?

———•———

अनुष्टुभ

न जाने सम्मुखायाते प्रियाणि वदति प्रिये।
सर्वाण्यङ्गानि मे यान्ति नेत्रतां किमु कर्णताम् ॥१५॥

अनुष्टुभ्

समक्ष गोड बोले जँ, प्रेमी, तें मज ना कळे।
सर्वावयव हे माझे नेत्र कीं कर्ण जाहले ? ॥ १५ ॥

गद्यार्थ—

(नवपरिणीता आपल्या सखीस सांगते-) माझा प्रियकर जेव्हां प्रियमधुर असें माझ्या समक्ष बोलतो, तेव्हा, माझे सर्वच अवयव डोळे होतात, कीं, कान होतात, तें सांगता येत नाहीं. (सर्वावयवाची शक्ति, डोळ्यांत व कानांत एकवटून, त्याला किती पाहूं व त्याचे शब्द किती ऐकूं, असें होऊन जातें.)

———

हरिणी

स्मररसनदीपूरेणोढाः पुनर्गुरुसेतुभि-
यदपि विधृतास्तिष्ठन्त्यारादपूर्णमनोरथाः।
तदपि लिखितप्रख्यैरङ्गैः परस्परसंमुखा
नयननलिनीनालानीतं पिबन्ति रसं प्रियाः ॥ १६ ॥

आर्या

स्मररसपुरांत वाहत,
गुरुसेतूचाच आसरा धरुनी।
असतां नवपतिपत्नी
सर्व मनोरथ न पूर्ण होवोनी ॥
दिसतां परस्परां तीं
चित्रापरि पूर्ण अचल राहोनी
प्राशिति रतिरस (दिवसां,)
नयनांचे कमलनाल जणुं करुनी ॥ १६ ॥

गद्यार्थ—

मदनरसाच्या नदीच्या पुरानें वाहून जाणारे नवपरिणीत पतिपत्नी, वडीलधारीं माणसें हीं, जणूं त्या नदींतले जे सेतू त्यांचा आश्रय घेतात, व त्यामुळें तीं अधिक वाहवत जात नाहींत हें खरें; परंतु त्यामुळेंच त्यांचे सर्व मनोरथ कांहीं पूर्ण होऊं शकत नाहींत तेव्हां (त्यांतल्या त्यांत जेवढें मिळेल तेवढें सुख घेण्यासाठीं) केव्हांहि तीं एकमेकांच्या समोर आलीं कीं, चित्राप्रमाणें तटस्थ होतात व आपल्या डोळ्यांना कमलनाल (नळी) करून त्यांतून इकडून तिकडे व तिकडून इकडे प्रेमरस नेऊन तो पीत असतात।

———

शार्दूलविक्रीडित

शीतांशुर्मुखमुत्पले तव दृशौ पद्मानुकारौ करौ
रम्भागर्भनिभं तवोरुयुगलं बाहू मृणालोपमौ।
इत्याह्लादकराखिलाङ्गि ! रभसान्निःशंकमालिङ्ग मा-
मङ्गानि त्वमनङ्गतापविधुराण्येह्येहि निर्वापय ॥ १७ ॥

शार्दूलविक्रीडित

शीतांशू मुख, नेत्र नीलकमलें; हे हात पद्मांसम
केळीच्यापरि ऊरु कोमल तुझे बाहू मृणालोपम।
सर्वांगीं मृदु रीति, दे मज क्षणीं निःशंक आलिंगन
माझी ही स्मरतापदग्धतनु ये, ये, शांतवी येउन ॥ १७ ॥

गद्यार्थ—

हे वल्लभे ! तुझें मुख हिमकर चंद्र; नेत्र नीलकमलें, हात पद्मासमान, ऊरु (मांड्या) केळीच्या गाभ्याप्रमाणें, तुझे बाहू कमलतंतु प्रमाणें कोमल, अशी सर्वांगीं आल्हाददायक तूं मला लौकर निःशंक आलिंगन दे. ये, ये, आणि, मदनतापानें पोळलेले माझे सर्व अवयव शांत कर.

———

अनुष्टुभ्

मिलिते मौनमातिष्ठ वाणि ! प्राणसमे जने।
अंतर्गतरसाह्लादं न जानासि कदाचन ॥ १८ ॥

अनुष्टुभ्

वाणि ! मौन धरी, भेटे प्राणप्रिय जधीं जन।
अंतरींच्या रसानंदा जाणिशी तूं कधींच न ॥ १८ ॥

गद्यार्थ—

हे वाणि ! माझा प्राणप्रिय नाथ भेटेल तेव्हां तूं मौन धर. त्याचें दर्शन व भाषण यांनीं जो आंतरिक रसानंद प्राप्त होतो तो तुला कळायचा नाहीं. (तेव्हां मध्येंमध्यें बोलून त्यात व्यत्यय आणूं नकोस. मला एकाग्र होऊन तो रसानंद पिऊं दे.)

———

शिखरिणी

अकस्मादागारे रहसि मिलिताऽपि प्रियतमा
समाश्लिष्टा नागन्तुकपिशुनभीतेन मनसा।
अयैषा मामङ्गं, निपुणमथ सावज्ञमथ वा
न जाने किं मेने प्रतिपलमवज्ञाम्यति मनः ॥ १९ ॥

आर्या

येतां अचानक गृहीं,
प्रिया दिसूनहि, असूनि एकांत, ।
आलिंगिलें न तिज मी,
करील चुगली कुणी, म्हणुनि भीत ॥
न कळे अजाण अथवा
सुजाण, उद्धट म्हणेल वा मज ती ।
या शंकांनीं प्रतिपल
चुटपुट लागोनि राहिली चित्तीं ॥ १९ ॥

गद्यार्थ—

मी अचानकपणें घरीं आलों; प्रिया घरींच होती, घरांत एकांतहि होता, पण तरीहि, कुणी तरी पाहील व चुगली करील अशी भीति मनात उभी राहून मी कांहीं तिला आलिंगिलें नाहीं. पण तेव्हांपासून मनाला मात्र सतत चुटपुट लागून राहिली आहे कीं, ती मला (याला शृंगाराची संधि साधतां येत नाहीं म्हणून) अजाण समजूं लागली आहे कीं फार निपुण (तिची उत्सुकता वाढवणारा धूर्त) समजूं लागली आहे, कीं, (एकांतांत एवढ्या सौंदर्याला वश न होणें हा त्या स्वसौंदर्याचा अपमान मानून) ती मला उद्धट समजूं लागली आहे? (आतां याचा उलगडा व्हायला लौकर भेट झाली पाहिजे.)

———

शार्दूलविक्रीडित

गच्छेत्युन्नतया भ्रुवैव गदितं, मन्दं चलन्त्या तया
तेनाप्यञ्चितलोचनद्वयपुटेनाज्ञा गृहीता शनैः ।
संकेताय वलद्दृशा पिशुनिता ज्ञाता च दिक्प्रेयसा
गूढः संगमनिश्चयो गुरुपुरोऽप्येवं युवभ्यां कृतः ॥२०॥

शार्दूलविक्रीडित

भ्रूच्या उन्नतिनेंचि मंद वळतां
जा, हें प्रिया बोलली
डोळे मोडुनियां हळूं प्रियकरें
आज्ञा तिची मानिली ।
संकेतें चुगली, दिशाहि वळल्या
दृष्टींतुनी त्या कळे !
गूढार्थें गुरुदेखतांहि युवकें
संकेत हो बांधले ॥ २० ॥

गद्यार्थ—

(वडीलधाऱ्या माणसादेखत, प्रियकर अयुक्त करूं पाहतां,) प्रियेनें हळूंच दुसरीकडे वळत "जा तूं" असें भुवयांच्या उचलण्यानेंच जें म्हटलें तें, तिची आज्ञा म्हणून प्रियकरानें हळूंच दोन्ही डोळे वाकडे करीत मान्य केलें; कारण त्या संकेतातून त्याला 'चुगली होणार' हें व 'कोठें भेटायचें' ती दिशा हें तिच्या वळत्या दृष्टींतून त्याला कळलें! अशा रीतीनें वडील माणसांदेखत तरुण मंडळी गूढ रीतीनें संकेत बांधतात

———

उपजाति

आलीषु केलीरभसेन बाला
मुहुर्ममालापमुपालभन्ती ।
आरादुपाकर्ण्य गिरं मदीयां
सौदामिनीयां सुषमामयासीत् ॥ २१ ॥

उपजाति

खेळांत बाला स्वसखीजनांत
मद्भाषणांच्या नकला करीत ।
ऐके दुरी मद्वच जेधवां ती
आली विजेची तिज लख्ख कान्ति ॥ २१ ॥

गद्यार्थ—

माझी नूतन परिणीत पत्नी, खेळांत, आपल्या मैत्रिणींच्या मंडळांत, माझ्या बोलण्याच्या नकला करीत असतां, तिर दुरून माझें बोलणें कानीं पडून, जेव्हां, माझ्या येण्याची चाहूल लागली, तेव्हां, ती अशी कांहीं चमकली, कीं, जणूं काय वीजच

———

शार्दूलविक्रीडित

आघ्रातं कमलं प्रियेण, सुदृशा
स्मितयाऽपनीतं मुखं
दत्तं विभ्रमकन्दुके नखपदं,
सीत्कृत्य गूढौ स्तनौ ।
दत्ता चंपकमालिकोरसि, तया
प्रोद्भिन्नरोमाञ्चया
मीलल्लोचनया स्थितं, प्रणयिनो-
र्दूरेऽपि पूर्णो रमः ॥ २२ ॥

शार्दूलविक्रीडित

हुंगे पद्म पती, तदा फिरविते
स्त्री ती मुखा, हांसुन
चेंडूला नख लावितां, करुनि ती
सीत्कार, झांकी स्तन।
घेतां चंपकमाळ तो हृदिं, मिटे
ती नेत्र रोमांचुनी
प्रेमी हे दुरुनीहि पूर्ण रस हो
घेती असे चाखुनी ॥ २२ ॥

गद्यार्थ—

प्रियकरानें कमल हुंगलें, तें पाहतां, (चुंबनाची आठवण होऊन) प्रियेनें सस्मित (लाजून) मुख दुसरीकडे फिरविलें, हातांतल्या चेंडूला त्यानें नख लावलें तें पाहून (नखव्रणाची आठवण होऊन) तिनें सीत्कार काढून स्तन झांकून घेतले, त्यानें चंपकमाळ हृदयाशीं घेतली, तेव्हां (आलिंगनाची आठवण होऊन) रोमांचित होऊन ती डोळे मिटून (कल्पनेंत तें सुख घेत) राहिली. प्रेमीजन हे याप्रमाणें दूरदूर असून सुद्धां रतिरस चाखीत हौस पूर्ण करतात.

---

शार्दूलविक्रीडित

दीर्घा वन्दनमालिका विरचिता
दृष्टैव नेन्दीवरैः
पुष्पाणां प्रकरः स्मितेन रचितो
नो कुन्दजात्यादिभिः।
दत्तः स्वेदमुचा पयोधरभरे-
णार्घो न कुम्भाम्भसा
स्वैरेवावयवैः प्रियस्य विशत-
स्तन्व्या कृतं मङ्गलम् ॥ २३ ॥

शार्दूलविक्रीडित

केलें तोरण दीर्घसें स्वनयनीं,
ना नीलपद्में तिनें।
कुंदांचा न च पुष्पगुच्छ रचिला,
स्वीय स्मिताचा तिनें।
अर्घातें स्तनघर्मबिंदु दिधले-
कुंभांतलें ना जल
स्वांगांनींचि गृहागता स्वपतिला
केलें तिनें मंगल ॥ २३ ॥

गद्यार्थ—

(पुष्कळ दिवसांनीं घरीं आलेल्या पतीच्या स्वागतार्थ) तिनें, दीर्घ तोरण बांधावयाचें तें नीलकमळाचें न करतां, स्वत च्या नयनकुमुदाचेंच केलें; कुंद जाई मारत्या शुभ्र फुलांचा गुच्छ न करतां तिनें स्वस्मितांचा केला; अर्घजल अर्पण करावयाचें तें कुम्भांतल्या जलानें न करतां, स्वेदबिंदु पाझरणाऱ्या पयोधरकुंभांनीं केलें। अशा रीतीनें घरीं आलेल्या पतीचें मंगल स्वागत प्रियेनें आपल्या अंगांनींच केलें!

---

पुष्पिताग्रा

"गुरुजननयने पिधेहि निद्रे!
त्वरितमिहास्तमुपैहि पद्मबन्धो!"
इति वदति मनोभवाभितप्ता
चिरसमयागतवल्लभा मृगाक्षी ॥ २४ ॥

पुष्पिताग्रा

"गुरुजननयनांसि मीट निद्रे!
त्वरितचि मावळ पद्मबंधु तू रे!।"
नववधु वदते अनंगतप्ता
बहु दिवशीं प्रिय तो घरासि येतां ॥ २४ ॥

गद्यार्थ—

फार दिवसांनीं प्रियकर जिचा घरीं आलेला अशी अनंगतप्त नववधू निद्रेला म्हणते "तूं घरांतल्या वडील माणसांचे डोळे लौकर झाक". आणि पद्मबंधु सूर्याला म्हणते "तूं लौकर अस्तास जा". (आणि आमची भेट लौकर होऊं दे.)

---

## (३) मीलन; नवोढा (श्लोक २५ ते ३८)

आर्या

दूरादुत्कण्ठन्ते दयितानां सनिधौ तु लज्जन्ते।
ताम्यन्ति वेपमानाः शयने नवपरिणया वध्वः ॥२५॥

आर्या

दुरुनी आतुर होती,
पति येतां जवळि, जाति लाजोनी।
नवपरिणीत वधू या
कांपत तळमळत राहती शयनीं ॥ २५ ॥

गद्यार्थ—

नवीनच लग्न झालेल्या स्त्रिया, दूर असेपर्यंत पतिमीलनासाठीं आतुर असतात पण पतीच्या सान्निध्यांत मात्र लाजतात; आणि थरथर कांपत तळमळत शयनीं पडून राहतात.

———•———

अनुष्टुभ्

विद्वज्जनसभामध्ये नारीप्रथमसङ्गमे ।
रणे रिपुसमाकीर्णे को न कातरतां व्रजेत् ? ॥ २६ ॥

उपजाति

विद्वज्जनांच्या वसतां सभेंत
स्त्रीसंग जेव्हां पहिलाचि होत ।
शत्रूपुढें घोर रणांगणांत
न कोण हो घावरती मनांत ? ॥ २६ ॥

गद्यार्थ—

प्रथमच विद्वानांच्या सभेंत बसतांना, स्त्रीच्या प्रथम मीलनप्रसंगीं, आणि प्रबळ शत्रूच्या समोर युद्धांत, कोण मनांत बावरून जात नाहीं !

———•———

आर्या

भुजपञ्जरे गृहीता
नवपरिणीता वरेण रहसि वधूः ।
तत्कालजालपतिता
बालकुरङ्गीव वेपते नितराम् ॥ २७ ॥

आर्या

एकांतीं नववधुला
प्रियकर निजबाहुपंजरीं धरितां ।
कांपे ती बहु, जैशी
हरिणी जाळ्यांत तत्क्षणीं पडतां ॥ २७ ॥

गद्यार्थ—

बालहरिणी जाळ्यांत पडल्यावर, जशी भयंकर थरथर कांपत असते, अगदी तुबेहुब तीच स्थिती, एकांतीं प्रियकरानें आपल्या बाहुंच्या मिठीत घेतलेल्या नवपरिणीत बालेची असते

———•———

आर्या

औत्सुक्यात्परिमिलतां, त्रपया सङ्कोचमञ्चतां च मुहुः ।
नवसङ्गमयोर्यूनोर्नयनानामुत्सवो जयति ॥ २८ ॥

आर्या

उत्सुकतेनें भिडती,
परि कितिदां लाज वाटुनी मिटती ।
नवसंगत तरुणांचे
नयन असे ते सुधन्य या जगतीं ॥ २८ ॥

गद्यार्थ—

अत्यंत उत्सुकतेनें नवसंगत तरुणी–तरुणांचे जे नेत्र एकमेकांस भिडतात पण वारंवार लाज वाटून मिटतात, अशा त्या नेत्रांच्या आनंदाचा जय असो.

———•———

उपजाति

असंमुखालोकनमाभिमुख्यं
निषेध एवानुमतिप्रकारः ।
प्रत्युत्तरं मुद्रणमेव वाचो
नवाङ्गनानां नव एव पन्थाः ॥ २९ ॥

आर्या

दुसरीकडे पहाणें
याचा अर्थचि पतीकडे बघणें !
म्हणणें "नको नको," हा
प्रकार म्हणजेच संमती देणें ॥
बसणें मुख मिटवोनी,
प्रत्युत्तर हेंच मानणें चित्तीं
नवपरिणीत वधूच्या
नवलपरीच्या नव्या नव्या रीति ॥ २९ ॥

गद्यार्थ—

नवपरिणीत वधू ही दुसरीकडे पाहून असली म्हणजे स्वतःकडे ती पहात आहे असें पतीनें समजावयाचें असतें, तिचें 'नको नको' म्हणणें ही संमति समजावयाची असते, तिनें तोंड बंद करून बसणें यालाच पतीच्या प्रश्नाचें उत्तर मिळालें म्हणावयाचें असतें. अशा नववधूंच्या नवलपूर्ण नव्या नव्या रीति असतात

———•———

शिखरिणी

पटालग्ने पत्यौ नमयति मुखं जातविनया
हठाश्लेषं वाञ्छत्यपहरति गात्राणि निभृतम् ।
न शक्नोत्याख्यातुं स्मितमुखसखीदत्तनयना
ह्रिया ताम्यत्यन्तः प्रथमपरिहासे नववधूः ॥ ३० ॥

शिखरिणी

पती, वस्त्रें ओढी, तधिं विनत ती स्वानन करी
वळें आलिंगी तें अवयव हळूं चोरुनि धरी।
शके ना बोलूं ती-स्मितमुख सखींनाच बघते
नवोढा लज्जेनें प्रथममिलनीं फार कुढते ॥ ३० ॥

गद्यार्थ—

नववधू ही पहिल्या मीलनप्रसंगीं लज्जेनें आतल्या आत कुढत राहते. पतीनें वस्त्राला हात घातला, कीं, ती विनयानें मुख खालीं करून बसते. त्यानें बळें बळें मिठींत घेतलें कीं, ती हळूंच अंग चोरून घेते; पतीशीं कांहीं बोलूं शकत नाहीं, आणि हंसणाऱ्या आपल्या सखींकडेच बघत बसते !

---

मन्दाक्रान्ता

बाला तन्वी मृदुतनुरियं त्यज्यतामत्र शंका
दृष्टा कापि भ्रमरभरतो मञ्जरी भज्यमाना ? ।
तस्मादेषा रहसि भवता निर्दयं पीडनीया
मन्दाक्रान्ता विसृजति रसं नेक्षुयष्टिः समग्रम् ॥ ३१ ॥

मन्दाक्रान्ता

बाला, तन्वी, मृदुल असली सोडुनी द्या कुशंका
सांगा कोठें भ्रमर वसुनी मंजरी भंगली कां ? ।
एकांतीं वास्तवचि अदयें भोगणें कामिनीस
शैथिल्यानें पिळुनि रस कां सर्व देईल ऊंस ? ॥ ३१ ॥

गद्यार्थ—

( प्रियेची सखी प्रियकराला, प्रथम मीलनापूर्वी सूचना देते ) तुमची प्रिया ही बालवयाची, कृशतनु म्हणून फार कोमल आहे अशी कुशंका सोडून द्या ! सांगा पाहूं ! भ्रमर बहून बसल्यानें मंजरी कधीं भंगलेली दिसली आहे ? तेव्हां तुम्ही हिला एकांतांत अगदीं दया न दाखवतां भोगून घ्या. दुबळेपणानें पिळून, कधीं ऊंस आपला सर्व रस देतो काय ?

---

हरिणी

हरति रुचिरं गाढाश्लेषे यदङ्गकमाकुला
स्थगयति तथा यत्पाणिभ्यां मुखं परिचुम्बने ।
यदपि बहुशः पृष्टा किञ्चिद्ब्रवीत्यपरिस्फुटं
रमयतितरां तेनैवासौ मनोऽभिनवा वधूः ॥ ३२ ॥

शार्दूलविक्रीडित

चोरी सुंदर अंग, आकुलमनें, घेतां दृढालिंगनीं
रोधी चुंबन, हात दोन अपुले, तोंडावरी ठेवुनी ।
बोले अस्फुट मोजकेंच, कितिदां पृच्छा करावी तदा
तेणेंची रमवी विशेष, पतिला कांता नवोढा सदा ३२

गद्यार्थ—

गाढ आलिंगनात घेतांना, आपलें सुंदर अंग, आकुल मनानें चोरून घेते; चुंबन घ्यावयास जातां, दोन्ही हात तोंडावर ठेवून विरोध करते; अनेक वेळां विचारावें, तेव्हां, थोडेंसेंच, व तेंहि अस्पष्ट बोलते; या अशा कृतीनींच नववधू आपल्या प्रियकराच्या मनाला विशेष आनंद देते.

---

शार्दूलविक्रीडित

संदष्टाधरपल्लवा सचकितं हस्ताग्रमाधुन्वती
मा मा मुञ्च शठेति कोपवचनैरानर्तितभ्रूलता ॥
सीत्काराञ्चितलोचना सरभसं यैश्चुम्बिता मानिनी ॥
प्राप्तं तैरमृतं श्रमाय मथितो मूढैः सुरैः सागरः ॥ ३३ ॥

शार्दूलविक्रीडित

आश्चर्यें निजओष्ठ चावुनि करां
वारावया हालवी
"चोरा ! सोड ! नको नको, म्हणत जी
भ्रू कोपुनी नाचवी ।
सीत्कारा करिते अशी धरुनियां
जे मानिनी चुंबिती
लाभे त्यांस सुधा; खुळे सुर
फुका अब्धि श्रमें मंथिती ॥ ३३ ॥

गद्यार्थ—

आश्चर्यानें आपला अधर चावून, निवारण्यासाठीं जी आपले हात हालवीत आहे—"चोरा ! सोड, नको, नको," म्हणत रागावून जी आपल्या भुंवया नाचवीत आहे—तोंडानें सीत्कार करीत, डोळे आकुंचित करीत आहे अशी मानिनी जे भराभर बळें धरून चुंबितात त्यांना अमृत मिळतें; वेड्या देवांनीं समुद्र मंथून उगाचच आपली दमणूक करून घेतली

---

शिखरिणी

अहं तेनाहूता किमपि कथयामीति विजने
समीपे चासीना सरलहृदयत्वादवहिता ।
ततः कर्णोपान्ते किमपि वदताऽऽघ्राय वदनं
गृहीत्वा धम्मिल्ले मम सखि निपीतोऽधररसः ॥३४॥

शार्दूलविक्रीडित

"ये, कांहीं वदतों" म्हणून मज घे
एकांतिं बोलावुनी
भोळा भाव धरून त्याजवळ मी
गेलेंच विश्वासुनी ।
कानाशीं वदण्या मिषें, मुखचि गे
माझें तयें हुंगिलें
अंबाडा धरुनी सखे मग, रसा
ओष्ठांतल्या प्राशिलें ॥ ३४ ॥

गद्यार्थ—

"कांहीं सांगतों ये" म्हणून त्यानें मला एकांतीं बोलाविलें मीहि भोळ्या भावें, ध्यान देऊन त्याच्या जवळ बसलें; काना-जवळ कांहीं बोलण्याच्या मिषानें त्यानें माझें मुख हुंगलें आणि सखे, माझा अंबाडा धरून त्यानें माझा अधररस प्राशन केला !

—०—

शार्दूलविक्रीडित

सुप्तोऽयं सखि सुप्यतामिति गताः
सख्यस्ततोऽनन्तरं
प्रेमावेशितया मया सरलया
न्यस्तं मुखं तन्मुखे
ज्ञातेऽलीकनिमीलने नयनयो-
र्धूर्तस्य रोमाञ्चतो
लज्जाऽऽसीन्मम तेन साऽप्यपहृता
तत्कालयोग्यैः क्रमैः ॥ ३५ ॥

शार्दूलविक्रीडित

"झाला निद्रित हा; निजो" म्हणुनियां
गेल्या सख्या, तत्क्षणीं-
मी रत्यातुर होउनी प्रियमुखा
मोठ्या यत्नें चुंबुनी ।
रोमांचें परि नीज ढोंग ठरतां,
जी लाज ये चित्तिं या
तीही धूर्त हरी समग्र, करुनी
तत्कालयोग्य क्रिया ! ॥ ३५ ॥

गद्यार्थ—

( शयनागारापर्यंत मला पोंचवायला आलेल्या सख्यांनीं माझा प्रियकर झोंपलेला पाहून ) "हा झोंपला वाटतें ! बर झोपूं द्या !" असें म्हणून त्या निघून गेल्यावर मी प्रेमावेगानें, ( तो निजला हें खरेंच वाटून ) भोळ्या भावानें, त्याच्या मुखावर स्वतःचें मुख टेकून चुंबिलें। पण त्याला तात्काल रोमांच आल्यानें त्याची झोंप खोटी होती हें कळून येऊन मला जी लाज उत्पन्न झाली, ती सुद्धां त्यानें त्या प्रसंगीं योग्य त्या क्रिया करून हरण केली !

—०—

शार्दूलविक्रीडित

तैस्तैश्चाटुभिरज्ञया किल तया वृत्ते रतिव्यत्यये
लज्जामंथरया तया निवसिते भ्रान्त्या मदीयांशुके ।
*तत्पट्टांशुकमुद्वहन्नहमपि स्थित्वा यदुक्तोऽधुना–*
"वेषो युज्यत एष एव हि तवे"त्येतन्न विस्मर्यते ॥३६॥

शार्दूलविक्रीडित

चुचकारूनहि, अज्ञ ती, म्हणुनि जैं भंगे रतिक्रीडन
भ्रांतीनें मम वस्त्र नेसुनि वसे तेव्हां प्रिया लाजुन ।
मीही नेसुनि पैठणीच वसतां, ती जें वदे हांसुनी
कीं, "शोभे तुज हेंच वस्त्र" वच हे
जाती न चित्तांतुनी ॥ ३६ ॥

गद्यार्थ—

( मी प्रियेला रतिशास्त्रांतले पाठ ) चुचकारून नानाप्रकारें समजाविले पण ती अज्ञ ( नवखी ) म्हणून ते तिला जमेना, तेव्हां रतिक्रीडा थांबविणें भाग पडलें; तेव्हां भ्रांतीनें आणि लाजेनें ती, आपली घाईघाईंत माझेंच वस्त्र नेसून बसली, त्यामुळें अर्थात मला तिची पैठणी नेसून बसावें लागलें व तें ( माझें ध्यान ) पाहून ती जें हंसून म्हणाली कीं "तुला हेंच वस्त्र फार शोभतें"–ते शब्द कांहीं केल्या मी विसरूं शकत नाहीं !

—०—

शार्दूलविक्रीडित

अन्योन्यस्य निरीक्षणादपगता
नेत्रान्मुखे ह्रीः स्थिता
संलापाद्वदनं विहाय कुचयोः
सीमामुपेत्य स्थिता ।
गाढालिंगनतस्ततः कुचतटीं
संत्यज्य नीविं गता
भर्तुस्तत्र करे गते किमभव-
त्सा तत्र जानाम्यहम् ॥ ३७ ॥

शार्दूलविक्रीडित

अन्योन्यां वघतांच लाज नयनां सोडून ये आननीं
होतां भाषण, सोडुनी वदन ती ये आश्रयाला स्तनीं।
आलिंगी प्रिय तें, त्यजूनि कुच ती आलीच नीवीप्रत
नेतां हात पती तिथें- पळत ती कोठें न मी जाणित ॥

गद्यार्थ—

एकमेकांना (बरेच वेळां) पाहिल्यावर (त्या पूर्वी) माझ्या डोळ्यात जी लाज भरून राहिली होती, ती डोळ्यांना सोडून मुखामध्यें येऊन राहिली. पुढें (बरेच वेळां) संभाषणें झाल्यावर, मुखाला सोडून लाज खालीं उतरून स्तनांच्या आश्रयाला गेली. पुढें प्रियकरानें गाढ आलिंगन दिल्यामुळें स्तनांतून लाज निघून खालीं निऱ्यांत जाऊन दडली. शेवटीं तेथेंहि जेव्हां प्रियकराचा हात पोंचला तेव्हां मग ती लाज कोठें गेली तें मला माहीत नाहीं!

———०———

शिखरिणी

कृतान्तो वा कान्तः समजनि न भेदः प्रथमत—
स्ततो द्वित्रैर्मासैर्मनुज इति जग्राह हृदयम्।
ततोऽसौ मत्प्रेयानहमपि तदीया प्रियतमा
क्रमाद्वर्षे प्राप्ते प्रियतममयं जातमखिलम् ॥ ३८ ॥

शार्दूलविक्रीडित

"आहे कांत कृतान्त वा ?" प्रथम हें
न ज्ञात झालें मला
जातां मासहि दोन तीन, हृदया
तो मानवी वाटला।
मागोनी प्रिय तो, नि मी प्रियतमा
त्याची अहा! जाहलें!
जातां वर्ष चराचरां प्रियकरें
व्यापोनियां टाकिलें ॥ ३८ ॥

गद्यार्थ—

(प्रथम भेटीत पतीनें केलेल्या भयंकर निर्दय प्रकारामुळें) हा काय कांत आहे कीं कृतान्त (यम) आहे अशी मला शंका वाटत होती; पण, पुढें दोन तीन महिने गेल्यावर, हा यम नाहीं-मानवच आहे, याची हृदयाला खात्री पटली. आणखी काहीं दिवस गेल्यावर, तो माझा प्रियकर, आणि, मी त्याची प्रियतमा झालें! आणि, क्रमानें, वर्ष झाल्यावर, चराचर विश्वच मला प्रियकरमय होऊन गेलें

———०———

## (३ अ) प्रीतिरसज्ञा

शार्दूलविक्रीडित

आयाते दयिते मनोरथशतैर्नीत्वा कथञ्चिद्दिनं
वैदग्ध्यापगमाज्जडे परिजने दीर्घां कथां कुर्वति।
दष्टास्मीत्यभिधाय सत्वरपदं व्याधूय चीनांशुकं
तन्वङ्ग्या रतिकातरेण मनसा नीतः प्रदीपः शमम् ॥ ३९ ॥

आर्या

येतां पति, कष्टें दिन
कंठुनि ती शान करीत येत मनीं।
अचरट परी सख्यांनीं
विलंब करितां रटाळ वार्तांनीं ॥
"डसलें मज" हें विह्वळत
त्वरें रेशमी स्ववस्त्र झटकोनी
सुरतातुर अंतरिं ती
टाकी अपुला दिवाच विझवोनी! ॥ ३९ ॥

गद्यार्थ—

(फार दिवसांच्या विरहानंतर पति घरीं आला तेव्हां) (रात्रीच्या भेटीविषयीं) नाना तऱ्हेचे मनोरथ व बेत करीत तिनें दिवसाचा वेळ तर कसातरी कंठला. पण (शयनमंदिरांत पोंचवायला आलेल्या) अचरट सख्यांनीं कंटाळवाण्या कथांची जेव्हां लांबण लावून उशीर करावयास सुरवात केली, तेव्हां "मला कांहीं तरी डसलें ग बाई!" असें विह्वळत आपलें रेशमी वस्त्र झटकीत, सुरतातुर मनानें तिनें घाई घाईनें आपला दिवाच विझवून टाकला!

———०———

शार्दूलविक्रीडित

अंसाक्रष्टदुकूलया सरभसं गूढौ भुजाभ्यां स्तनौ
आकृष्टे जघनांशुके कृतमधः ससच्चमूरुद्वयम्।
नाभीमूलनिबद्धचक्षुषि तथा व्रीडानताङ्ग्या प्रिये
दीपः फूत्कृतिवातवेपितशिरः कर्णोत्पलेनाहतः ॥ ४० ॥

शार्दूलविक्रीडित

स्कंधींचें हरतां दुकूल पतिनें,
झांकी भुजांनीं स्तन
ओढी तो जघनांशुका तधिं करी
ऊरुद्वयाकुंचन।
नाभीमूल वघे जधीं निरपुर्नी,
लाजून खालीं वळे
ज्याची ज्योत हले फुंकून, विझवी
तो दीप कर्णोत्पलें ॥ ४० ॥

गद्यार्थ—

पतीनें खाटावरचें वस्त्र काढलें तेव्हां तिनें दोन्ही हातानीं घाईघाईंत स्तन झाकून घेतले कंबरेचें वस्त्र त्यानें ओढलें तेव्हां तिनें आपल्या मांड्या सकोचून घेतल्या, नाभि-मूलाकडे पति जेव्हां निरखून पाहूं लागला तेव्हां तिनें लाजून देह खालीं वाकविला व दिव्याला फुंकर घातला पण तेवढ्यानें त्याची ज्योत हलली (पण विझली नाहीं म्हणून) तीवर तिनें आपल्या कानावरचें कमल फेकून मारलें (व दिवा विझविला)

—०—

मदाक्रान्ता

श्लिष्टः कण्ठे किमिति न मया मूढया प्राणनाथः ?
चुम्बत्यस्मिन्वदनविनतिः किं कृता ? किं न दृष्टः ?।
नोक्तः कस्मादिति नववधूचेष्टितं चिन्तयन्ती
पश्चात्तापं वहति तरुणी प्रेम्णि जाता रसज्ञा ॥ ४१ ॥

शार्दूलविक्रीडित

"वेडी मी, प्रियनाथ घेउनि गळां,
त्या कां न आलिंगिलें ?
चुंबी तो तधिं कां मुखा नमविलें ?
कां त्या न मी पाहिले ? ।
कां नाहीं वदलें ?" कृती नववधू
होती तदा ज्या करी
चिंती प्रीतिरसज्ञ आज युवती
पस्तावुनी अंतरीं ॥ ४१ ॥

गद्यार्थ—

"किती मी मूर्ख! प्रियनाथाला गळ्याला मिठी मारून मी त्यावेळीं कां आलिंगिलें नाहीं? तो चुंबन घेई त्यावेळीं कां मुख खालीं केलें? कां नाहीं त्याला डोळे भरून पाहिलें? कां नाहीं त्याच्याशीं बोललें?" अशा रीतीचा पश्चात्ताप, आज प्रीतिरसज्ञ झालेली तरुणी, पूर्वी स्वत जेव्हां नवपरिणीत होती, तेव्हांचें आपलें चरित्र आठवून, करीत आहे

—०—

शार्दूलविक्रीडित

गाढाश्लेषविशीर्णचन्दनरजःपुञ्जप्रकर्पादियं
शय्या संप्रति कोमलाङ्गि परुषेत्यारोप्य मां वक्षसि ।
गाढौष्ठग्रहपूर्वमाकुलतया पादाग्रसंदंशके—
नाकृष्याम्बरमात्मनो यदुचितं धूर्तेन तत्प्रस्तुतम् ॥४२॥

शार्दूलविक्रीडित

"आश्लेषें झडली उटी, तुज खुपे-
शय्या वने बोचरी-
मृदंगी !" म्हणुनी मला उचलुनी
स्थापी स्ववक्षावरी ।
आवेगें दृढ चुंबुनी, पदनखें
सारून वस्त्रें दुरी
युक्तीने फसवून, धूर्त पुढतीं
जे युक्त तें आचरी ॥ ४२ ॥

गद्यार्थ—

"गाढ आलिंगनानें (तुझ्या माझ्या) अंगावरची चंदनाची उटी झडून, त्याच्या खपल्या सर्वत्र झाल्यानें, हे कोमलांगि! तुला आता शय्या बोचत खुपत असेल!" असें म्हणत त्यानें मला उचलून आपल्या वक्षावर स्थापन केली, आणि त्याचवेळीं त्यानें घट्ट चुंबन घेऊन रतिसुखाच्या ओढीनें आपल्या पायाच्या नखांच्या चिमट्यानें आपलें वस्त्र ओढून दूर करून तत्कालयोग्य तें केलें!

—०—

शार्दूलविक्रीडित

कान्ते तल्पमुपागते विगलिता
नीवी स्वयं बन्धना—
द्वासो विश्लथमेखलागुणधृतं
किञ्चिन्नितम्बे स्थितम् ।
एतावत्सखि वेद्मि साम्प्रतमहं
तस्याङ्गसङ्गे पुनः
कोऽयं, काऽसि, रतं नु वा कथमिति
स्वल्पापि मे न स्मृतिः ॥ ४३ ॥

स्रग्धरा

येतां भर्ता पलंगीं, स्वयमिव गळली
गांठ होऊन सैल
कांचीच्या सैल धाग्यावरचि लटकलें
तें नितंबीं दुकूल ।
जाणे हें एवढें मी- लगटुनि धनलें
अंग अंगांत लीन,
तो वा मी कोण ? झालें सुरत मग कसें ?
अल्पही तें स्मरे न ॥ ४३ ॥

गद्यार्थ—

प्रियकर पलंगावर येताक्षणीं, माझ्या निऱ्या गांठींतून आपण होऊनच गळल्या, आणि गळलेलें सैल वस्त्र मेखलेच्या दोऱ्याच्या आधारावर नितंबावर लटकत राहिलें। सखे! मला जाणीव आहे ती इतकीच कीं त्याचें व माझें अंग एकमेकांत लीन झालें। पण पुढें, तो कोण? मी कोण? सुरत कसें झालं? यापैकीं काहींसुद्धां मला आठवत नाहीं।

---

शार्दूलविक्रीडित

आश्लिष्टा रभसाद्विलीयत इवाक्रान्ताप्यनङ्गेन या
यस्याः कृत्रिमचण्डवस्तुकरणाकूतेषु खिन्नं मनः ।
कोऽयं काऽहमिति प्रवृत्तसुरता जानाति या नान्तरं
रन्तुः सा रमणी, स एव रमणः शेषौ तु जायापती ॥४४

शार्दूलविक्रीडित

जी तप्ता मदनज्वरेंहि विलगे,
घेतां दृढालिंगनीं
देखावे करण्यास कृत्रिम, कधीं,
जीतें रुचेना मनीं ।
कान्ता-वल्लभ हा न भेद सुरत-
क्रीडेंत जी जाणते
ती साची रमणी-खरा रमण तो-
पत्नीपती अन्य ते ॥ ४४ ॥

गद्यार्थ—

जी स्वयें मदनज्वरानें तापलेली असताहि (उकडत आहे ही तक्रार न सांगतां) प्रियकरानें घट्ट मिठींत घेतली असतां, त्याच्या वक्षीं पार विलीन होऊन जाते; जिला कृत्रिम देखावे करण्याचा, मनातून उबगच आहे; सुरतक्रीडेंत जी, कान्त कोण व कान्ता कोण हा भेद जाणीत नाहीं—ती खरी रमणी! आणि तो खरा रमण! इतर आपले पत्नीपति!

---

शार्दूलविक्रीडित

"सैवाहं प्रमदा, नृणामधिगतावेतौ च तौ नूपुरा-
वेषाऽस्माकमधृष्टिरेव; सहजव्रीडाधनः स्त्रीजनः ।"
इत्थं लज्जितया स्मृतेरुपगमे मत्या तनुं संभ्रमात्
पुंभावः प्रथमं, रतिव्यतिकरे मुक्तस्ततो वल्लभः ॥४५॥

शार्दूलविक्रीडित

"मी स्त्री तीच! जनमसिद्धचि पदीं
हे तेच ते पैंजण
ही स्त्रीयोग्य नसे क्रिया,-सहज जी
लज्जा, स्त्रियां ती धन।"
ये स्त्रीत्व-स्मृति-लाजुनी गडबडे-
देहास ती पाहुनी
रत्यन्तीं पुरुषत्व हें प्रथम, ती
नाथा त्यजी मागुनी ॥ ४५ ॥

गद्यार्थ—

" ही मी तीच स्त्री, लोकांना माहित असलेले माझ्या पायीं असलेले पैंजणहि तेच! खरें म्हणजे असें हें कर्म स्त्रियांना शोभत नाहीं कारण—सहज लज्जा, हेंच स्त्रीचें खरें धन!" असा तऱ्हेनें तिला हळूं हळू स्त्रीत्वाची स्मृति होऊन, स्वदेहाग पाहून-लाजून रतान्तीं प्रथम तिनें पुरुषत्व सोडलें व मगच आपल्या प्रियकराला सोडलें

---

आर्या

मुक्ताः पतन्ति भूमौ बालाः कलयन्ति केवलां मुक्तिम् ।
चुंबत्यंबरमवनिं विपरीते किं न विपरीतम् ? ॥ ४६ ॥

आर्या

मुक्ता भूमिस पडती,
केवल मुक्तीस बाल मिळवीती ।
अंबर चुंबी भूमिस,
विपरीत न काय होइ विपरीतीं ? ॥ ४६ ॥

हेंच मंदाक्रान्तेंत—

मुक्तांचेंही पतन घडतें हाय! भूमीवरी तें
बालांनाही नकळत अहा! केवला मुक्ति येते।
पृथ्वीलागीं वरनि गळुनी अंबर स्पर्शितें तें
कांता होतां उलट, उलटें काय सांगा न होतें? ॥४६

गद्यार्थ—

(मुक्ता म्हणजे मोतीं व दुसरा अर्थ मुक्ति पावलेले. बाल= केंस व ल्हान मूल, अंबर=वस्त्र व दुसरा अर्थ आकाश.) मुक्तांचें (सुद्धां) भूमीवर पतन घडतें, बालांना (सुद्धां) केवळ मुक्ति मिळते. अंबरसुद्धां वरून गळून पृथ्वीचें चुंबन घेतें, पतीच उलटली म्हणजे उलटें काय होत नाहीं?

---

## (४) शान्तिः शान्तिः शान्तिः ।

शार्दूलविक्रीडित

गाढालिङ्गनवामनीकृतकुच-
प्रोद्भूतरोमोद्गमा
सान्द्रस्नेहरसातिरेकविगल-
च्छ्रीमन्नितम्बाम्बरा ।
मा मा मानद माति मामलमिति
क्षामाक्षरोल्लापिनी
किं म्लाना, शयिता नु किं मनसि मे
लीना विलीना नु किम् ? ॥ ४७ ॥

शार्दूलविक्रीडित

ये रोमांच दबूनीयां स्तन, तिला,
गाढस्तनालिंगने
श्रोणीवस्त्र गळे रसोत्कट रतें
झाल्या श्रमाकारणें ।
बोले, "नाथ ! नको ! पुरे; अति नको"
ऐसें थकोनी यदा
झाली म्लान, विलीन, लीन न कळे
वा निद्रिता ती तदा ॥ ४७ ॥

गद्यार्थ—

गाढ आलिंगनामुळें स्तन दबून बारीक झाल्यानें जिच्या अंगावर रोमांच उठले आहेत, रसोत्कट रताच्या श्रमामुळें श्रोणीवस्त्र गळून गेलेलें आहे–व जी " नाथ ! नको, नको, अति नको, मला पुरे !" असे शब्द क्षीणपणें काढीत आहे अशी कान्ता पाहिली म्हणजे ती काय म्लान झाली आहे, की, झोंपली आहे, की माझ्या मनांत लीन झाली आहे कीं माझ्या देहांत विलीन झाली आहे, कांहीं कळत नाहीं.

---

हरिणी

सुरतविरतौ व्रीडावेशश्रमश्लथहस्तया
रहसि गलितं तन्व्या प्राप्तुं न पारितमंशुकम् ।
रतिरसजडैरङ्गैरङ्गं पिधातुमशक्तया
प्रियतमतनौ सर्वाङ्गीणं प्रविष्टमधृष्टया ॥ ४८ ॥

शार्दूलविक्रीडित

लज्जावेशपरिश्रमे कर लुले
झाले रतान्तीं यदा
एकान्तीं, गळलें स्ववस्त्र उचलूं
कान्ता शकेना तदा ।
अंगांनीं रतिमंद, ती निज जधीं
झांकूं शके लाज न
सर्वांगीं पतिच्या तनूंत शिरली
लज्जाच ती सोडुन ॥ ४८ ॥

गद्यार्थ—

सुरत संपल्यावर, लज्जा, आवेश, व परिश्रम यांनीं कांतेचे हात जेव्हां अगदीं लुले झाले तेव्हां, एकांतांत, गळलेलें वस्त्र सुद्धां ती उचलून (नेसूं) शकली नाहीं; आणि रतिरसानें अंगें जड झाल्यानें ती जेव्हां स्वलज्जा झाकूं शकली नाहीं, तेव्हां ती बेधडक लज्जा सोडून प्रियकराच्या अंगांत सर्वांगानीं शिरून बसली ( व अशा रीतीनें तिनें सर्व अंगें व लाज दोन्ही झांकून टाकलीं. )

---

मालिनी

श्रुतिशतमपि भूयः शीलितं भारतं वा
विरचयति तथा नो हन्त सन्तापशान्तिम् ।
अयि सपदि यथायं केलिविश्रान्तकान्ता-
वदनकमलवल्गत्तृप्तिसान्द्रो नकारः ॥ ४९ ॥

मालिनी

श्रुतिशत पठणे वा वाचणें भारतासी
कधिंहि मजसि देती शांति ना गोड तैशी ।
थकुनि सुरतयोगें, तृप्त होतां विकार
मृदुलतनुमुखींचा गोड जैसा नकार ॥ ४९ ॥

गद्यार्थ—

शंभरदां वेद वाचून किंवा भारतादि पुराणें पढून तद संतापशांति मला कधींहि लाभली नाहीं, जशी सुरतश्रमानें थकू सारे विकार तृप्त झालेल्या मृदुतनु कान्तेच्या तोंडून निघाले " आतां नको," असे उद्गार देतात ( वेदांच्या 'नेति' 'नेति' पेक्षां ही 'नेति' अधिक त्वरित शांतिदायी आहे )

---

हरिणी

करकिसलयं धूत्वा धूत्वा विमार्गति वाससी
क्षिपति सुमनोमालाशेषं प्रदीपशिखां प्रति ।
स्थगयति मुहुः पत्युर्नेत्रे विहस्य समाकुला
सुरतविरतौ रम्या तन्वी मुहुर्मुहुरीक्षते ॥ ५० ॥

आर्या

हलवी हलवी कोमल
कर दोनहि अंशुकांस शोधाया ।
सुममालाखंडां ती
फेकुनि पाहे दिव्यास विझवाया ॥
व्याकुल, हंसत, कितीदां
झांकी पतिनयन लाज वाटून ।
सरतां सुरतहि रमणी
घेई पतिमुख पुन्हां पुन्हां बघुन ॥ ५० ॥

गद्यार्थ—

सुरत सपल्यानंतर आपले कोमल हात हालवून हालवून ती ( खालचें व वरचें ) दोन्ही वस्त्रें शोधून बघते. ( पण ती न सांपडल्यानें, लज्जा रक्षण करण्यासाठीं अंधार तरी करावा म्हणून ) पुष्पमालाखंड दिव्याच्या ज्योतीवर फेकून ती विझवूं बघते. ( पण तेंहि न जमल्यानें ) व्याकुलपणें हंसत, पुन्हां पुन्हां ( आपलीं अंगें निरखून पाहाणाऱ्या ) पतीचे नेत्र झांकते. पण ( स्वतः मात्र ) पुन्हां पुन्हां ( अधाशासारखें ) आपल्या पतीचें मुख पाहते.

उपजाति

विधाय सा मद्वदनानुकूलं
कपोलमूलं हृदये शयाना ।
तन्वी तदानीमतुलां पुरारेः
साम्राज्यलक्ष्मीमधरीचकार ॥ ५१ ॥

वसंततिलका

माझ्या मुखा अभिमुखी; हृदयावरी ती
टेकून गाल निजली ( थकुनी रतांतीं । )
हें एक भाग्य, अवघें सुरभूपतीचें
साम्राज्यवैभव करी अतितुच्छ साचें ॥५१॥

गद्यार्थ—

( सुरत संपले ) तेव्हां, माझी प्रिया आपलें मुख माझ्या मुखाकडे करून माझ्या हृदयावर आपले गाल टेकून निजली; त्या माझ्या भाग्यापुढें, पुरांचा अरि म्हणजे शत्रु, जो इंद्र, त्याचें साम्राज्यवैभवसुद्धां मला तुच्छ वाटलें.

शार्दूलविक्रीडित

नेपथ्यादपि राजते हि नितरां व्यालुप्तभूपाननं
संभोगश्रममीलितं विजयते चक्षुः कटाक्षादपि ।
गाढालिङ्गनकौतुकादपि नवं दोर्वल्लिविस्रंसनं
प्रत्यालापरसादपि प्रियतरं मौनं कुरङ्गीदृशः ॥ ५२ ॥

स्रग्धरा

नेपथ्याहून शोभे
मुख अति, जरिही लुप्त भूषा तिथून !
शोभा, नेत्रीं, कटाक्षा-
हुनि, थकुनि रतें, तेच जातां मिटून ! ।
गाढाश्लेषाहुनी हें
अभिनव रुचतें बाहु जाणें गळून !
बोलांहून प्रियेच्या, मधुरतर गमे
हें तिचें गोड मौन ! ॥ ५२ ॥

गद्यार्थ—

( अगदीं ताज्या ) वेशभूषेनें युक्त अशा मुखापेक्षां ( सुरतानंतरचें ) भूषा लोपलेलें असें प्रियेचें मुख अतिशयच सुंदर दिसतें. संभोगाच्या श्रमानें ( तृप्त होऊन ) मिटलेले प्रियेचे नेत्र, हे तिच्या कटाक्षापेक्षांहि अधिक मोहक वाटतात. तिनें आपल्या बाहुलतांनीं प्रियकराला गाढ आलिंगन देण्यांतल्या कौतुकापेक्षां सुरतश्रमानें तिच्या गळून गेलेल्या बाहुवल्लरींत नवीनच आकर्षण भासमान होतें; आणि संभाषणप्रसंगीं प्रियेचें बोलणें ऐकण्यापेक्षां, सुरतश्रमामुळें तिला आलेलें मौन अधिकच प्रिय वाटतें.

शार्दूलविक्रीडित

शान्ते मन्मथसङ्गरे रणभृतां सत्कारमातन्वती
वासोऽदाज्जघनस्य, पीनकुचयोर्हारं, श्रुतेःकुण्डलम् ।
बिम्बौष्ठस्य च वीटिकां, सितमुखी पाण्यो रणत्कङ्कणे
पश्चाद्धम्मिनि केशपाशनिचये युक्तो हि यन्धक्रमः ॥५३॥

शार्दूलविक्रीडित

थांबे जैं रतियुद्ध, तुष्ट करिते
आहेर हे अर्पुन-
स्त्री योद्ध्यां अपुल्या; सुवस्त्र जघना;
हस्तां रणत्कंकण।
कर्णां कुण्डल; रत्नहारहि कुचां,
ओष्ठां विडा अर्पुन
मागें जे पडले रणीं, उचित त्या
केसां दिलें बंधन ॥ ५३ ॥

गद्यार्थ—

सुरतयुद्ध थांबल्यानंतर, (एका पक्षाची प्रमुख जी) स्त्री, तिनें आपल्या योद्ध्यांना (युद्धात उत्तम कामगिरी केल्याबद्दल) पुढीलप्रमाणें आहेर देऊन त्याचा सन्मान केला! नितम्बांना महावस्त्र दिलें; पुष्टस्तनांना रत्नहार दिला; कानांना कुंडलें दिलीं; ओठांना (मानाचा) विडा दिला, आणि हातांना सुवर्णकंकणें दिलीं पण या सर्व युद्धात जे 'मागें पडले' त्या केसांना बंधनांत ठेवलें हें अत्यंत उचितच झालें!

———०———

आर्या

कचित्ताम्बूलाक्तः कचिदगरुपङ्काङ्कमलिनः
कचिच्चूर्णोद्गारी कचिदपि च सालक्तकपदः।
वलीभङ्गाभोगैरलकपतितैः शीर्णकुसुमैः
स्त्रिया नानावस्थं प्रथयति रतं प्रच्छदपटः ॥ ५४ ॥

आर्या

कोठें तांबूलाचा,
डाग, कुठें अगरु-लेप लागून।
वास कुठें चूर्णाचा,
अळित्याचा रंग पाय उमटून ॥
पडति सुरकुत्या कोठें,
वेणीमधलें कुठें सुमन गळतें।
चादर अशा खुणांनीं,
स्त्रीरतिची विविधता जगा कथिते ॥ ५४ ॥

गद्यार्थ—

कुठें तांबूलाचा लाल डाग, कुठें अगरुलेपाचा काळसरपणा कुठें सुंगधी चूर्णाचा वास, कुठें अळित्याच्या रंगानें रंगविलेल्या पावलांचे ठसे, कुठें सुरकुत्या, कुठें केसांतून गळलेलीं फुलें, अशा नाना खुणांनीं शय्येवरील वस्त्र (चादर) ही स्त्रीरताची विविधता जगाला दर्शविते.

———०———

## (५) सजणे! पहांट झाली!

उपजाति

आश्लेषशेषा रतिरङ्गनाना-
मामोदशेषा कुचकुङ्कुमश्रीः।
तूणीरशेषः कुसुमायुधोऽपि
प्रभातशेषा रजनी बभूव ॥ ५५ ॥

शार्दूलविक्रीडित

स्त्रीच्या सर्व रतांमधून उरलें
हें मात्र आलिंगन!
राहे एक सुगंधची कुचतटीं
कस्तूरिलेपांतुन।
गेले संपुनि बाण अन् सरकरीं
भाता उरे पोकळ
राहे धूसरशी प्रभात-सरुनी
जातां निशेचें बळ ॥ ५५ ॥

गद्यार्थ—

स्त्रीच्या नानाविध रतिक्रीडाप्रकारांतून आतां केवळ आलिंगन शिल्लक राहिलें आहे. स्तनांवर केलेल्या केशर कस्तुरि आदि द्रव्याच्या विलेपनामधून (तें झडून) आतां केवळ सुंगध शिल्लक राहिला आहे रात्रभर शरसंधान करून करून मदनाचे बाण संपून गेले असून, त्याचा पोकळ भाता तेवढा उरला आहे रात्रीचें (तिच्या चांदण्याचें) सारें बळ संपून आतां केवळ भुरकट रंगाची पहाट उरली आहे.

———०———

शिखरिणी

प्रियायाः प्रत्यूषे गलितकबरीबन्धनविधा—
बुदञ्चद्दोर्वल्लीदरदलितचेलांचलमुरः।
घनाकूते पश्यत्यथ मयि समन्दाक्षिवलितं
नमन्त्या यद्रूपं न हि लिखितुमीशो मनसिजः ॥

आर्या

गळलेली जधिं वेणी,
पुनश्च बांधी प्रिया पहांटेस।
उंचावुनि भुजवल्ली,
डुलती कुच, हालवीत पदरास ॥
बघतां मी तें निरखुनि,
लाजुनि संकोचुनी नयन तीहि
नमते, तें चित्र तिचें
रेखाटाया समर्थ न स्मरहि ॥ ५६ ॥

गद्यार्थ—

( रात्रीच्या क्रीडेमुळें ) विसकटलेली वेणी, प्रिया पहाटेस जेव्हां पुन नीट बांधते त्यावेळीं ) मधून मधून भुजवल्ली उंचावल्यामुळें, स्तनांना हेलकावे बसून पदर हालतो! तें दृश्य बारीक नजरेनें मी निरखून पहातों हें ध्यानीं आल्यानें ती लाजून नेत्रसंकोच करुन वळून खालीं वांकते त्यावेळचें तिचें मनोहर चित्र काढण्यास प्रत्यक्ष मदनमुद्धा समर्थ होणार नाहीं.

---

शार्दूलविक्रीडित

दम्पत्योर्निशि जल्पतोर्गृहशुकेनाकर्णितं यद्वच-

स्तत्प्रातर्गुरुसन्निधौ निगदतस्तस्यातिमात्रं वधूः ।

कर्णालम्बितपद्मरागशकलं विन्यस्य चञ्चाः पुटे

व्रीडार्ता प्रकरोति दाडिमफलव्याजेन वाग्बन्धनम् ५७

शार्दूलविक्रीडित

रात्रीं दंपति जें वदे; गृहशुका
तें बोलतां, ऐकुनी-
मोठ्यांच्या पुढतीं प्रभातसमयीं,
जाई वधू लाजुनी ।
कानींचे मणि लाललाल भरवी .
डाळिंबदाण्यापरी
त्याच्या चोंचित; युक्तिनें मुख असें
ती बंद त्याचें करी ॥ ५७ ॥

गद्यार्थ—

रात्रीं पतिपत्नी एकान्तांत जें बोलले त्याची नकल घरच्या पोपटानें जेव्हां वडील माणसांच्या देखत सकाळीं अगदीं सविस्तर करुन दाखविण्यास सुरवात केली, तेव्हां नववधू बिचारी लाजेनं मेल्यासारखी झाली (पण तेवढ्यांत तिनं प्रसंगावधान टेवून) स्वत च्या कानांतल्या डुलांतले लाललाल खडे, डाळिंबाचे दाणे म्हणून त्या पोपटाच्या चोंचींत भरवले व युक्तीनं त्याचें तोंड बंद केलें।

---

शिखरिणी

प्रयच्छाहारं मे यदि तव रहोवृत्तमखिलं

मया वाच्यं नोचैरिति गृहशुके जल्पति शनैः ।

वधूर्वक्त्रं व्रीडाभरनमितमन्तर्विहसित

ह्रस्वर्धोन्मीलन्नलिनमनिलावर्जितमिव ॥ ५८ ॥

शिखरिणी

"मला दे खाण्या, मी जर न तव एकांतचरिता
वदावें मोठ्यानें," गृहशुक हळूं शब्द वदतां ।
मुख स्त्रीचें लज्जानमित, परि आंतून हंसत
खुलें अर्धें, शोभे कमल जणुं तें वायुनमित ॥ ५८ ॥

गद्यार्थ—

"( काल रात्रींचें ) तुझें एकांतांतलें संपूर्ण चरित्र, मी मोठ्यानं ओरडून ( जगाला ) न सांगावें असें तुला वाटत असेल, तर ( मुकाट्यानं ) मला खायला दे" असे हळूंच घरच्या पोपटानें बोलून दाखविलेले शब्द ऐकून, लज्जेनं खालीं वांकलेलें पण आंतून हंसरें असें नववधूचें मुख पाहून, वाऱ्यानें वाकविलेल्या अर्ध्या उमललेल्या कमलाची आठवण होते.

---

अनुष्टुम्

रतखिन्नतरां प्रातर्लज्जानतमुखीं वधूम् ।

स्मरन्तीं रात्रिचरितं दृष्ट्वाऽऽप्नोति न को मुदम् ? ५९

आर्या

सुरतश्रांत, सकाळीं
लज्जानतमुख, चरित्र रात्रींचें- ।
स्मरणारी बघुनि वधू
प्रमुदित होई न हृदय कोणाचें ? ॥ ५९ ॥

गद्यार्थ—

सुरतक्रीडेनें दमलेली, लज्जेनं खालीं तोंड केलेली, सकाळीं आपल्या गतरात्रीच्या चरिताच्या मधुरस्मृति मनात घोळवणारी नवपरिणीता पाहून कोण आनंदित होत नाहीं ?

---

आर्या

सखि दशनक्षतमधरे किं त्वं गोपायसे प्रयत्नेन ?

संप्रति रजनिरहस्यं नयनालस्यं निवेदयति ॥६०॥

आर्या

दंतव्रण अधरींचे
कां लपविसि गे सखे प्रयत्नांनीं ? ।
गुपित तुझें रात्रींचें
वदे जगा अलस तो तुझ्या नयनीं ॥ ६० ॥

गद्यार्थ—

हे सखे! तुझ्या अधरावरील दंतव्रण, प्रयत्नांनीं कां उगाच लपवीत आहेस ? (ते प्रयास व्यर्थ आहेत) कारण तुझें (काल्च्या) रात्रींचें गुपित, तुझ्या डोळ्यांतला तो आळस जगाला सांगत आहे—(त्याचें निराकरण तूं कसें करणार ? )

---

# प्रकरण ३० वें

## रतिरंगभूमीवरील संगीत मानापमान.

शृंगारान्तर्गत हें एक अतिरम्य प्रकरण आहे अन्नाला जशी तिखट-मीठ-मसाल्यांनी विशेष रुचि येते, तद्वतच, रतिक्रीडेला मान, कोप, रुसवा ( कधीं खरा, कधीं उसना ) यांच्या योगानें आगळीच रुचि येते कधीं कधीं, सरलहृदया नवोढेला, तिच्या सख्या, या नाट्याचे पाठ देत असत. सर्वस्वी वश अशा प्रियेपेक्षा, अनुनयोत्तर, मानिनी जें सुख देते (श्लोक ११ पहा) त्याची गोडी विशेष उमनें आणलेलें अवसान, कधीं कधीं आयत्या वेळीं कसा दगा देतें, याचें मधुर वर्णन यांत आहे कधीं कधीं पायां पडण्यापर्यंत, प्रियकराला, मानिनीची मनधरणी (श्लोक १९ व २२ ) करावी लागते. कधीं, तेवढ्यानेहि ती प्रसन्न न झाली, तर सखीमार्फत तो अनुनय करतो, व त्याहिपलीकडे तिचा हट्ट गेल्यास, सहनशीलतेचा अत होऊन, मग तोच स्वत अभिमान धरून बसतो, व तिलाच शरण आणतो इकडे मानिनीला, मग फार ताणल्याबद्दल पस्तावा होतो, पण तरीहि ती, स्वत अनुनय करायला जात नाहीं सखीला पाठविते, व प्रियकराला समजावताना, ती सखी सुद्धां काव्य करूं लागते ! कधीं कधीं अनुभवते सुद्धां ! आणि, ज्या सखीचें दूतत्व ती करते, तिचीच, ती सवती होऊन बसते, या तात्कालिक व दुसऱ्या खऱ्या सवती असतातच ! त्याच्याकडे जाऊन आलेल्या पतीच्या निर्भर्त्सनेनें, प्रकरणाचा शेवट झालेला आहे

शार्दूलविक्रीडित

आयातैव निशा मनो मृगदृशामुन्निद्रमातन्वती
मानो मे कथमेष संप्रति निरातङ्कं हृदि स्थास्यति ।
ऊहापोहमिमं सरोजनयना यावद्विधत्तेतरां
तावत्कामनृपातपत्रसुषमं बिम्बं बिभासे विधोः ॥ १ ॥

शार्दूलविक्रीडित

"निद्रानाशचि कामिनींस घडवी
ती हाय ! आली निशा !
आतां मान कसा टिकेल हृदयीं
संपूर्ण निर्वेधसा ? ॥"
ऐसे जोंवर हे विचार करिते
ती पद्मनेत्री मनी
कामाचें जणुं राजछत्र, उगवे
पूर्णेन्दु तों त्या क्षणीं ॥ १ ॥

गद्यार्थ—

"कामिनी, मानिनींच्या मनाला निद्रानाश घडविणारी रात्र जवळ आली ! ( दिवस तर, मन ताब्यांत ठेवून, प्रियकर भेटला तरी, मान टिकवून धरण्याच्या निश्चयांत, कसाबसा निघून गेला, आतां रात्रीं, कामाच्या ओढीपुढें ) मान नि शंकपणें, निर्वाधपणें, खात्रीनें, हृदयांत कसा टिकाव धरील ?" असे हे जे विचार ती कमलनयना पुन्हां पुन्हां मनांत करीत आहे, तेवढ्यांत, जणूं काय मदनाचें राजछत्रच असा पूर्णचन्द्र उदयास आला !

आर्या

भण मानमन्यथा मे,
मौनं भ्रूकुटिं विधातुमहमसहा ।
शक्नोमि तस्य पुरतः
सखि न खलु पराङ्मुखी भवितुम् ॥२॥

आर्या

मान कशी दावूं मी ?
भ्रुकुटि, अबोला धरूं न मी शकतें ।
मुख फिरविणेंहि त्याच्या-
पुढतिं सखे मजसि शक्य ना होतें ॥ २ ॥

गद्यार्थ—

सखे ( तूं सांगतेस खरी पण ) प्रियकर भेटल्यावर, मी नुसती मानानें भृकुटि चढविणें, किंवा मी अबोला धरणें सुद्धां, मला सहन होत नाहीं, तर मान धरण्याची गोष्टच सोड, त्याच्या पुढें, नुसतें, मुख दुसरीकडे फिरविणें सुद्धां, मला शक्य नाहीं

शार्दूलविक्रीडित

" मुग्धे ! मुग्धतयैव नेतुमखिलः
कालः किमारभ्यते ?
मानं धत्स्व, धृतिं बधान, ऋजुतां
दूरे कुरु प्रेयसि । "
सख्यैवं प्रतिबोधिता प्रतिवच—
स्तामाह भीतानना—
" नीचैः शंस, हृदि स्थितो हि ननु मे
प्राणेश्वरः श्रोष्यति ॥ ३ ॥ "

शार्दूलविक्रीडित

"मुग्धे! मुग्धपणें सदा स्वपतिशीं
जाणार कां वागत?
ठेवी मान, नि धैर्य, तूं ऋजुपणें
वागू नको साम्प्रत।"
ऐसें हें उपदेशित्या स्वसखिला
ती भीत ऐसें वदे–
"बोले शब्द हळू-हृदिस्थ मम हा
प्राणेश ऐकेल तें॥ ३॥"

गद्यार्थ—

(निचाऱ्या सरलहृदया मुग्धेला तिची सखी मानिनी व्हावयास शिकविते) "अग मुग्धे (आता तुझा मुग्धपणा पुरे कर) जन्मभर अशा मुग्धपणानच का आपल्या प्रियाशीं वागत जाणार आहेस? हात् वेडे, अग जरा मानिनी हो धीर धरून रहा (अधीर होऊ नको) आपल्या प्रियाशीं अशी ऋजुतेन वागत जाऊ नको"–सखीचा हा उपदेश ऐकून ती (खरी मुग्धाच) भीतभीत तिला म्हणते, "सखे, हळू बोल–माझ्या हृदयातल्या प्राणेश्वराला ऐकू जाईल!"

---

शार्दूलविक्रीडित

भ्रूभङ्गे रचितेऽपि दृष्टिरधिकं सोत्कण्ठमुद्वीक्षते
रुद्धायामपि वाचि सस्मितमिदं दग्धाननं जायते।
कार्कश्यं गमितेऽपि चेतसि तनू रोमाञ्चमालम्बते
दृष्टे निर्वहणं भविष्यति कथं मानस्य तस्मिञ्जने? ॥४॥

शार्दूलविक्रीडित

मी भ्रूभंग करीं, तरी अधिकची
दृष्टी बघे सोत्सुक
वाणी बंद करीं तरी स्मित धरी
चांडाळ माझें मुख।
केलें चित्त कठोर मी, तरि फुले
रोमाच अंगांवरी
कैसा मान टिकेल नाथ दिसता
ही घोर चिंता उरीं॥ ४॥

गद्यार्थ—

(रात्रीं काय काय करायचें याची रंगीत तालीम मी आधींच करून पहात) भ्रूभंग करून पहातें तर दृष्टि (प्रियमिलनास) अधिकच उत्सुकता दाखवित, बोलायचच नाहीं म्हणून वाणी बंद केली, तर, जळलं माझें तोंड स्मित धारण करत हृदय कठोर केलें, तरी सर्वांगावर रोमाच फुलून यतात (प्रियकर भेटण्यापूर्वी मुद्रा ही स्थिति) तर मग प्रत्यक्ष नाथ दृष्टीस पडल्यावर मान कसा टिकणार? ही चिंता लागली आहे!

---

शार्दूलविक्रीडित

उत्कम्पो हृदये स्खलन्ति वचनान्यावेगलोलं मनो
गात्रं सीदति चक्षुरश्रुकलुषं चिन्ता मुखं शुष्यति।
यस्यैषा सखि पूर्वरङ्गरचना मानः स मुक्तो मया
वन्द्या ता अपि योषितः क्षितितले यासामयं सम्मतः ५

शार्दूलविक्रीडित

मोठा कंप हृदीं, प्रमाद वचनीं,
प्रक्षुब्ध होई मन
चिन्तेनें मुखशोष, अश्रु नयनीं,
गात्रामधें त्राण न।
ज्याचा हा सखि पूर्वरंग असला,
तो सोडिला मान मी!
ज्यांना मान्य असेल मान जगतीं,
नारींस त्या मी नमीं॥ ५॥

गद्यार्थ—

हृदयात भारी कंप आलेला आहे, बोलण्यात चुका होत आहेत मन प्रक्षुब्ध झालें आहे, अंग गळून गेलेलं आहे, डोळ्यात पाणी भरत आहे, काळजीन तोंडाला कोरड पडलेली आहे (प्रत्यक्ष प्रियमीलनानतर माझें मानताटक कसें वठणार हा विचारच सोडा पण नुसता) पूर्व रंग ज्याचा एवढा भयंकर, तो मान, हे सखे! मी आत्तापासून सोडून दिला आहे! (आपल्याला काहीं केल्या तें जमणार नाही) जगात ज्या (धैर्यशालिनी) स्त्रियांना, हा असला मान, आपल्या प्रियाला दाखविणें मान्य असेल, त्यांना माझा हात जोडून नमस्कार!

---

स्रग्धरा

श्रुत्वा नामापि यस्य स्फुटघनपुलकं
जायतेऽङ्गं समन्ताद्
दृष्ट्वा यस्याननेन्दुं भवति वपुरिदं
चन्द्रकान्तानुकारि।
तस्मिन्नागत्य कण्ठग्रहनिकटपद–
स्थायिनि प्राणनाथे
भग्ना मानस्य चिन्ता, भवति मयि पुन–
र्वज्रमय्या कदाचित्॥ ६॥

स्रग्धरा

ऐकोनी नांव ज्याचें घन पुलक फुले
सर्व माझ्या शरीरीं
ज्याचा वक्रेन्दु नेत्रीं बघुनि तनु वने
चन्द्रकान्तानुकारी ।
ऐसा प्राणेश माझ्या अतिनिकट मिठी
मारण्यायोग्य येतां
संपे तो मान! राहे, जर कधिं मज ये
वज्रदेहीच होतां ॥ ६ ॥

गद्यार्थ—

ज्याचें नुसतें नांव कानीं पडलें, तरी, माझ्या सर्वांगावर दाट रोमाच फुलून येतात, ज्याचा मुखचंद्र पाहिला, की माझे सर्वांग चंद्रकांत मण्याप्रमाणें पाझरूं लागतें, असा माझा प्राणेश अगदीं मिठी मारण्याइतका जवळ आला म्हणजे मान धरण्याची कल्पनाच विरून जाते केवळ मी वज्रकठोर व्हायला शिकलें तरच मान धरणें शक्य होईल

———

शार्दूलविक्रीडित

भ्रूभङ्गो गुणितश्चिरं नयनयोरभ्यस्तमामीलनं
रोद्धुं शिक्षितमादरेण हसितं मौनेऽभियोगः कृतः ।
धैर्यं धर्तुमपि स्थिरीकृतमिदं चेतः कथंचिन्मया
बद्धो मानपरिग्रहे परिकरः सिद्धिस्तु दैवे स्थिता ॥७॥

शार्दूलविक्रीडित

भ्रूभंगा शिकलें चिरं; पढविलें
नेत्रांस आमीलन;
रोधूं आदरहास्य, मौन धरण्या
मी घेई अभ्यासुन ।
मी चित्तास कसें बसें शिकविलें
धैर्यें रहाया स्थिर
योजी मी जरि माननाटक— परी
तत्सिद्धि दैवावर ! ॥ ७ ॥

गद्यार्थ—

मी पुष्कळ काळ, भ्रूभंग करावयास शिकलें, डोळ्यांना अर्ध-वट मिटावयास पढवून ठेवलें, सादर-हास्य उमटूं नये व तोंडांतून शब्द निघू नयेत याचाहि अभ्यास केला, हृदयानें धीर धरून स्थिर रहावें हेंहि त्याला कसेंतरी शिकविलें, याप्रमाणें माननाटकाची तयारी तर मीं माझ्याकडून जय्यत केली आहे, परंतु—परंतु तें सिद्धीस जाणें दैवाच्या हातीं आहे !

———

शार्दूलविक्रीडित

तद्वक्त्राभिमुखं मुखं विनमितं
दृष्टिः कृता पादयो—
स्तस्यालापकुतूहलाकुलतरे
श्रोत्रे निरुद्धे मया ।
पाणिभ्यां च तिरस्कृतः सपुलकः
स्वेदोद्गमो गण्डयोः
सख्यः किं करवाणि यान्ति शतधा
यत्कञ्चुके संधयः ॥ ८ ॥

शार्दूलविक्रीडित

त्याच्या सन्मुख मी मुखा नमविलें—
नेली पदीं दृष्टि मी
तच्छब्दश्रवणास आतुर, सखे,
हे रोधिले कान मी ।
रोमांचांसह घर्मबिन्दु पुशिले
गालांवरोनी करें
चोळीची शतधा तुटे शिवण, त्या
कैसें करावें बरें ? ॥ ८ ॥

गद्यार्थ—

( प्रियाची समोरासमोर गांठ पडली तेव्हां माझें न ऐकतां त्याच्याशीं तें कदाचित् बोलेल म्हणून ) मी मुख खालीं केलें, ( नेत्र त्याच्याकडे पाहत राहतील ) म्हणून दृष्टि पायांकडे लावली, त्याचें भाषण ऐकण्यास आतुर झालेल्या कानांना मी आवरून धरलें, अंगावर रोमांच आले पण घाम पुसण्याच्या मिषानें हातांनीं त्यांना दडवून टाकलें—पण सख्यांनो ! चोळीच्या शिवणी शंभर ठिकाणीं तटातट तुटूं लागल्या, त्याला काय करावें बरें ?

———

शार्दूलविक्रीडित

जाता नोत्कलिका, स्तनौ न लुलितौ,
गात्रं न रोमाञ्चितं
वक्त्रं स्वेदकणान्वितं न सहसा
यावच्छठेनामुना ।
दृष्टेनैव मनो हृतं धृतिमुषा
प्राणेश्वरेणाद्य मे
तत्केनात्र निरूप्यमाणनिपुणो
मानः समाधीयताम् ? ॥ ९ ॥

शार्दूलविक्रीडित

उत्कंठा न; नच स्तनीं स्फुरण, ना
रोमांच अंगीं फुले
ना ये स्वेद मुखीं अचानकचि तों
मीं त्या शठा पाहिलें।
प्राणेशें मन दर्शनेंच हरिलें
धैर्यासवेंची जर
वर्णायासचि गोड, मान, वद गे,
कैसा टिकावा तर? ॥ ९ ॥

गद्यार्थ—

(प्रियाच्या भेटीची वेळ झालेली नव्हती त्यामुळें) मी उत्कंठित झालें नव्हतें; स्तनांना स्फुरण नव्हतें; अंगावर रोमांच उठलेले नव्हते, मुख स्वेदबिन्दूंनी युक्त नव्हतें; अशा स्थितींत, अगदीं अनपेक्षितपणें तो लबाड माझ्या दृष्टीस पडला। (मानाचें नाटक करावयाला वेळच नव्हता) आणि अशा रीतीनें प्राणेश्वरानें नुसत्या दर्शनानेंच माझ्या धैर्यासह माझें मन हरून नेलें—आतां सखे! तूंच सांग, केवळ उपदेशिण्यापुरता गोड असा तो मान टिकून रहावा तरी कसा?

——०——

शार्दूलविक्रीडित

सख्यस्तानि वचांसि यानि बहुशोऽ—
धीतानि युष्मन्मुखा—
द्वक्ष्येऽहं बहु शिक्षिता क्षणमिव
ध्यात्वाऽपि मौनं श्रिता।
धूर्तेनैत्य च मण्डलीकृतकुचं
गाढं परिष्वज्य मां
पीतान्येव सहाधरेण हसता
वक्षस्थितान्येव मे ॥ १० ॥

शार्दूलविक्रीडित

जे जे शब्द तुम्ही मला
शिकविले माझ्या सख्यांनो! सदा
ते त्यातें रुसुनी वदेन म्हणुनी
मी मौन सेवीं यदा—।
तों धूर्तें स्तन वेढुनी दृढ मला
आलिंगुनी चुंबिलें—
हांसोनी, वच मन्मुखस्थ, अधरा-
संगेंच गे प्राशिलें ॥ १० ॥

गद्यार्थ—

अग सख्यांनो! मानाचे म्हणून जे जे शब्द तुम्ही पुष्कळ वेळ मला शिकविले, ते चांगल्या नैपुण्यानें (हावभाव दाखवून) त्याच्यासमोर बोलून दाखविण्याची संधि पहात मी थोडी गप्प बसलें, एवढ्यांत त्या धूर्तानें येऊन, माझ्या स्तनांभोवती वेढा घालून, मला घट्ट मिठींत घेऊन, माझ्या अधरामृत, तोंडांतच राहिलेले ते शब्दहि हंसत हंसत प्राशन केले

——०——

शार्दूलविक्रीडित

आयस्ता कलहं पुरेव कुरुते
न स्रंसने वाससो
भ्रूभङ्गं रतिखण्ड्यमानमधरं
धत्ते न केशग्रहे।
अङ्गान्यर्पयति स्वयं, भवति नो
वामा हठालिङ्गने
तन्व्या शिक्षित एष सम्प्रति पुनः
कोपप्रकारोऽपरः ॥ ११ ॥

आर्या

आधींच, कुपित, झगडे
पूर्वीपरि वस्त्र सोडतांना न!
अधरां डसतांच करी
भ्रूभंगा, केश ओढतांना न॥
रोधी न हठालिंगन,
परि ती अर्पी स्वयेंच तनु अपुली
ही मानिनी नवीनचि
रुसण्याची रीत वाटतें शिकली ॥ ११ ॥

गद्यार्थ—

(पूर्वी स्त्रीसुलभ नैसर्गिकपणें ही वागत होती, त्याच्या उलट आतां वागूं लागली हा काय चमत्कार!) पूर्वी वस्त्र सोडतांना ही रागाचा भाव आणून भांडण करी. आतां, आधींच कांहीं-तरी कलह करते व मग वस्त्र निमूटपणें सोडूं देते पूर्वी केश-ग्रहणाला ही भृकुटी चढवी, पण आतां अधरदंश करतांनाच तें उरकते व मग केशग्रहण निमूटपणें! पूर्वी बळें आलिंगन देतांना ही नको नको म्हणे, पण आतां आपण होऊनच अंग अर्पिते! (त्या त्या वेळीं हिनें केलेला विरोध वा विरोधाभास पुरुषाला अत्यंत प्रिय व सुखकर वाटतो. तें [illegible]

अशा रीतीनं मला मिळून देण्याच्या मार्गानं) ही मानिनी आपला रुसवा प्रकट करण्याची नवीनच रीत शिकून आली असावी असें वाटतें.

———०———

मन्दाक्रान्ता

चन्द्र ! स्वैरं विहर गगने प्रेयसी नम्रवक्त्रा
नीलाम्भोज ! त्वमपि विकसामीलिताक्षी मृगाक्षी ।
उक्तिं मुक्तां कुरु पिक ! निजां मानिनी मौनिनीयं
युष्मद्भाग्यैः फलितमधुना यद् गृहीतोऽभिमानः ॥१२॥

शार्दूलविक्रीडित

चंद्रा ! स्वैर करीं विहार गगनीं जों मत्प्रिया वांकते
हे नीलोत्पल ! घेच तूं उमलुनी, जों ही स्वनेत्रां मिटे
मानी जों रर मानिनी, वद पिका ! तों तूंहि मुक्त स्वर
भाग्याला फळ येइ आज तुमच्या, जों रुष्ट ही तोंवर १२

गद्यार्थ—

माझ्या प्रियेनं जोंवर मुख खालीं वांकविलें आहे तोंवर हे चंद्रा ! तूं खुशाल आकाशांत विहार कर ! (तिनं मुख वर केलें कीं तूं निष्प्रभ ठरणार !), हे कुमुदा ! जोंवर या मृगाक्षीनें डोळे मिटले आहेत तोंवर तूं आपलें उमलून घे (तिच्या विकसित नेत्रांपुढें तुझें सौंदर्य टिकणार नाहीं !) हे कोकिळा ! जोंवर या मानिनीनं मौन धरलें आहे तोंवर मुक्तकंठानं तूं खुशाल आपला पंचमस्वर काढ ! (ती बोलू लागली तर तुझे स्वर कर्णकटु लागणार !) माझी ही प्रिया जोंवर अभिमान धरून फुरंगटून बसली आहे तोंवर आज तुमच्या सर्वांच्याच भाग्याला फळ आलेलें दिसत आहे !

———०———

शार्दूलविक्रीडित

यावन्त्येव पदान्यलीकवचनैः
    आलीजनैः पाठिता
तावन्त्येव कृतागसो द्रुततरं
    संलप्य पत्युः पुरः ।
प्रारेभे परतो यथा मनसिज-
    स्येच्छा तथा वर्तितुं
प्रेम्णो मौग्ध्यविभूषणस्य सहजः
    कोऽप्येष पान्थः क्रमः ॥ १३ ॥

शार्दूलविक्रीडित

मानाचे (कोपाचे) वच जेवढे पढविले
    लुच्च्या सख्यांनीं, तयां
दोषी त्या पतिच्या समक्ष सगळयां
    घाईत बोलोनियां ॥
वर्ते ती रतिनें अधीर बनुनी,
    प्रेरी स्मरेच्छा तसें
मुग्ध प्रेम करी मनोहर अहा !
    चाळे किती गोडसे ॥ १३ ॥

गद्यार्थ—

(मूळची ती सरलहृदया पण) तिच्या लबाड सख्यांनीं तिला मानाचे कोपाचे जे जे कांहीं शब्द पढविले होते, ते ते सर्व (पाठ केल्यासारखे) घाईघाईनें (तिच्या दृष्टीनें) दोषी पतीच्या समोर तिनें एकादांचे कसेतरी बोलून टाकले आणि मदनाच्या इच्छेनें जशी प्रेरणा दिली तसें वागण्यास तिनें सुरुवात केली ! अहाहा ! मुग्धत्वाचें भूषण लाभलेलें प्रेम, काय सहजसुंदर गोड चाळे करतें !

———०———

शार्दूलविक्रीडित

कृत्वा विग्रहमश्रुपातकलुषं शय्यासनादुत्थिता
क्रोधाच्चापि विहाय गर्भभवनं द्वारे रुषेव स्थिता ।
दृष्ट्वा चन्द्रमसं प्रभाविरहितं प्रत्यूषवाताहता
हा रात्रिस्त्वरिता गतेति पतिता कान्ता प्रियस्योरसि १४

शार्दूलविक्रीडित

भांडोनी, रडुनी, उठूनि शयना-
    पासोनि कोपान्वित
सोडी रंगगृहा परी थबकली
    जाऊन द्वाराप्रत ।
पाहे निष्प्रभ चंद्र, ती थरथरे
    वातें, पहांटे, वदे—
"गेली हाय ! निशा त्वरें" !
    परतुनी वक्षीं प्रियाच्या पडे ॥ १४ ॥

गद्यार्थ—

(रात्रभर कांहीतरी उगाच राग धरून) भांडत, रडून घालून ती मग शयनापासून उठली व रागारागांत रंगमहाल सोडून निघाली पण दाराशी जाऊन थबकली तेथून (सकाळ होत आल्यानं) निष्प्रभ झालेला चंद्र पाहून व पहांटेच्या गार

वाऱ्यानें थरथरत म्हणते-"हाय! किती लौकर रात्र सरून गेली!" (मान, रोष विसर्जन करण्यास दुसरें कारण न सांपडल्यानें, एवढेंच निमित्त करून) ती परतली व प्रियकराच्या छातीवर जाऊन कोसळली!

---

## पतिकृत मानिनीची आराधना—

पृथ्वी

कृशोदरि निशा कृशा तदपि ते न मानः कृशः
पुरो दिगनुरागिणी तदपि नानुरागोदयः।
प्रसन्नमिदमम्बरं तदपि न प्रसन्नं मनो
वदन्ति चरणायुधास्तदपि मौनमालम्बसे॥ १५॥

शार्दूलविक्रीडित

संपे रात्र तरी न मान तव हा
संपे कसा मानिनि?
येईना अनुराग कां तुज, जरी
प्राची दिशा रागिणी?।
झालें अंबर स्वच्छ स्वच्छ मन ना
होई तुझें गे कसें?
ये वाणी चरणायुधा, तरिहि तूं
कां मौन घेसी असें?॥ १५॥

गद्यार्थ—

हे मानिनि! (एवढी मोठी प्रदीर्घ) निशा संपली तरी तुझा मान कसा अजून संपत नाहीं? पूर्व दिशा अनुरागिणी (तांबुस झाली) झाली तरी तुझ्यांत अजून अनुरागाचा (प्रेमाचा) उदय कसा होत नाहीं? आकाश प्रसन्न झालें तरी तुझें मन कसें प्रसन्न होत नाहीं? कोंबडेसुद्धा आरवूं लागले तरीसुद्धा तूं अजून मौन कां धरून बसली आहेस?

---

शिखरिणी

प्रसादे वर्तस्व, प्रकटय मुदं संत्यज रुषं
प्रिये शुष्यन्त्यङ्गान्यमृतमिव ते सिञ्चतु वचः।
निधानं सौख्यानां क्षणमभिमुखं स्थापय मुखं
न मुग्धे प्रत्येतुं प्रभवति गतः कालहरिणः॥ १६॥

शार्दूलविक्रीडित

सोडीं कोप, सखे! प्रसन्न मनुनी
आनंदवृत्ती धरीं
वर्षीं तूं तव वाक्सुधेस सुकल्या
साऱ्या ममांगांवरी।
मातें सौख्यनिधानरूप वळवी
माझ्याकडे स्वानन
गेल्या कालमृगास गे परतुनी
येणें पुन्हां शक्य न॥ १६॥

गद्यार्थ—

प्रिये! अजून तरी राग सोडून, प्रसन्न होऊन तुझी नेहमींची आनंदी वृत्ति धारण कर; माझ्या या सुकून वाळलेल्या सर्व अवयवांवर तुझ्या वाणीचें अमृत शिंपड (आणि त्यांना नव-जीवन दे) मला सुखनिधान असलेलें तुझें मुख, क्षणभर तरी माझ्याकडे वळव! कालरूपी हरिण एकदां निघून गेला म्हणजे परतणें शक्य नाहीं

---

शिखरिणी

कपोले पत्राली करतलविरोधेन मृदिता
निपीतो निःश्वासैरयममृतहृद्योऽधररसः।
मुहुः कण्ठे रुद्धस्तरलयति बाष्पः स्तनतटं
प्रियो मन्युर्जातस्तव निरनुरोधे! न तु वयम्॥ १७॥

आर्या

पत्रावलि गालींची
कुस्करली मज विरोध करुनि करीं।
प्राशिति निःश्वासचि तव
अमृतापरि मधुर मधुर रस अधरीं॥
अटकुनि कंठीं किलिदां
तुझे हुंदके स्तनांस नाचविती।
झाला प्रिय कोपचि तुज
निराराधने! न मी असून पति॥ १७॥

गद्यार्थ—

हे निराराधने! (आराधनेला दाद न देणाऱ्या मानिनि!) (वास्तविक, मी चुंबनें घेऊन जी कुस्करली जावयाची) ती तुझ्या गालांवरची (रंगानीं काढलेली) पत्रावली, मला विरोध करून, तूं आपल्या हातानींच विस्कटून टाकली आहेस; (जो मीं प्राशन करावयाचा) तो तुझ्या अधरांतील अमृतोपम मधुररस तुझ्या

नि श्वासांनीं पिऊन टाकला आहे (मी तुला गळ्याशीं घेऊन स्तनालिंगन द्यावयाचें, त्याऐवजी) अनेक वेळां गळ्याशीं अटकलेले तुझे हुदके, स्तनांना चलित करीत आहेत अशा रीतीनें, मी तुझा प्रियकर असून, तुला आतां प्रिय राहिलों नसून, आतां चोर तुझा प्रियकर झाला आहे (कारण माझें सर्व कार्य तो करीत आहे)

———∘———

अनुष्टुभ्

मम प्रेम तवौदास्यं स्पर्धया वर्धते द्वयम् ।
जेतव्यमनयोः येन न जाने पङ्कजानने ॥ १८ ॥

वसंततिलका

बाले ! मम प्रणय आणि तुझी अनास्था
स्पर्धेमुळें उभय वाढत जाति आतां ।
दोघांतुनी जय पुणा मिळणार भर्ती
पद्मानने ! मज कधीं समजे न चित्तीं ॥१८॥

गद्यार्थ—

हे कमलनयने ! माझें तुझ्याविषयींचें प्रेम आणि तुझी ही माझ्याविषयींची उदासीन वृत्ति या दोन्ही एकमेकांशीं जणू स्पर्धा करीत वाढत जात आहेत या दोघांत जय कोणाला मिळणार हें कांहीं मला समजत नाहीं (तू आपल्या अनास्थेनें माझें प्रेम नष्ट करणार ? कीं, माझें प्रेम तुझ्या अनास्थेला जिंकून तुला माझी करणार हें पाहावयाचें आहे !)

———∘———

वसंततिलका

दासे कृतागसि भवत्युचितः प्रभूणां
पादप्रहार इति सुन्दरि ! लोकरीतिः ।
उत्तस्ठोरपुलकाङ्कुरकण्टकाग्रै-
र्यत्खिद्यते तव पदं ननु सा व्यथा मे ॥ १९ ॥

वसंततिलका

भृत्य प्रमाद करितो तधिं त्या, धन्यानें-
पादप्रहार करणें जग योग्य माने ।
मद्रोमकंटक खुपून तुझ्या पदातें
होईल त्रास तुज-हें मज दुःख होतें ॥१९॥

गद्यार्थ—

(प्रियेनें, रूप मारण्याची शिक्षा करून तरी, प्रसन्न व्हावें, [illegible], अनुनयाची मजल गेली !) नोकरानें अपराध केल्यावर त्याला, धन्यानें पादप्रहार करावा, ही गोष्ट उचित, म्हणून जगानें मान्य केलेली आहे (तेव्हां तूंहि मला पाद प्रहार कर !) पण तुझ्या पायाच्या तुसला स्पर्शानें माझ्या अंगाला तीक्ष्ण काट्यासारखे रोमांच उठणार ..आणि ते तुझ्या पायाला बोंचून दुखापत होईल, अशी मला भीति वाटते ! (तुझ्या पादप्रहारानेंहि माझें प्रेम जाणार नाहीं, व तूं इतकी कोमल आहेस ! या दोन गोष्टी सुचविल्या)

———∘———

शिखरिणी

गतप्राया रात्रिः शशिमुखि ! शशी शीर्यत इव
प्रदीपोऽयं निद्रावशमुपगतो घूर्णत इव ।
प्रणामान्तो मानस्तदपि न जहासि क्रुधमहो
कुचप्रत्यासत्त्या हृदयमपि ते चण्डि ! कठिनम् ॥२०॥

शिखरिणी

निशा गेली प्रायें, शशिमुखि ! शशी म्लानचि दिसे
दिव्याला ये निद्रा म्हणुनि जणुं हा घोरत असे ।
प्रणामें संपावा, तरि न निजमाना त्यजिसि या
स्तनांच्या सान्निध्यें तव कठिनता येइ हृदया ॥२०॥

गद्यार्थ—

हे चंद्रमुखि ! रात्र बहुतेक गेल्यासारखीच आहे चंद्र म्लान झाल्यासारखा आहे. दिव्याला झोंप आल्यानें तो जणू काय घोरत आहे मानिनीचा मान, प्रियकर पायां पडल्यावर, खरें म्हणजे संपला पाहिजे, पण, तू मात्र तो अजूनहि सोडीत नाहींस त्यामुळें, हे कोपिष्टे ! (कठिन) स्तनांच्या सान्निध्यानें तुझें हृदयसुद्धां, कठिन झालेलें आहे, हेंच खरें !

———∘———

हरिणी

यदि सुविहिता शून्या दृष्टिः, किमु स्थिरकौतुका ?
यदि विरचितो मौने यत्नः, किमु स्फुरितोऽधरः ? ।
यदि नियमितं ध्याने चेतः, कथं पुलकोद्गमः ?
कृतमभिनयैर्दृष्टो मानः, प्रसीद, विमुच्यताम् ॥२१॥

शार्दूलविक्रीडित

शून्या दृष्टि असेल इष्ट, तर कां
एकाग्र ती कौतुकें ?
मौनाचा जर यत्न हा, स्फुरति कां
हे ओठ ऐसे मुके ? ।
ध्यानाचा ल्य लावणें जर मना-
रोमांच कां हे तर ?
पेलें नाट्य पुरे, प्रसन्न बनुनी
हा मान गे आवर ! ॥ २१ ॥

गद्यार्थ—

(मानाचें ढोंग उघडकीस आलें !) हे मानिनि ! (मानें रागविण्यासाठीं म्हणून,) दृष्टि शून्य करणें तुला इष्ट असेल, तर (तें कांहीं तुला जमलेंसें दिसत नाहीं.) मग ती एवढी औत्सुक्यपूर्ण व एकाग्र अशी माझ्याकडे कां पहात आहे ? मौनाचा तर हा यत्न असेल, तर (तोहि फसला,) मग हे ओष्ठ का स्फुरत आहेत ? (वैराग्याचें सोंग घेऊन) ध्यान धरण्याचा तर तुझा यत्न असेल तर (अगदींच फजीती !) मग (माझ्या सान्निध्यानें) तुझ्या सर्वांगावर रोमांच कां फुलले ? पुरे ! पुरे, मानाचें नाटक केलेंस तें दिसलें; प्रसन्न हो आणि मान आवर.

---

वसंततिलका

कोपस्त्वया हृदि कृतो यदि पङ्कजाक्षि !
सोऽस्तु प्रियस्तव, किमत्र विधेयमन्यत् ? ।
आश्लेषमर्पय मदर्पितपूर्वमुच्चैर्-
मंक्षु समर्पय मदर्पितचुम्बनानि ॥ २२ ॥

वसंततिलका

तूं कोप घेसि हृदयीं-प्रिय तोच तूतें-
राहो !-उपाय दुसरा वद काय येथें ? ।
आलिंगनें परत दे, दृढ मीं दिलीं तीं
दे चुंबनें परत, मीं तुज अर्पिलीं तीं ॥२२॥

गद्यार्थ—

हे मानिनि ! तुझ्या हृदयांत (माझ्याऐवजीं) जर तूं कोपासच स्थान दिलें असशील, तर ठीक आहे; तोच तुझा प्रियकर होवो. याशिवाय दुसरें काय म्हणणार ? (तूं आतां माझी नाहींस त्याअर्थी) मी तुला पूर्वी दिलेलीं गाढालिंगनें व सर्व चुंबनें माझीं आपलीं मला परत दे !

---

तीच्या वतीनें मानिनीची सखी मार्फत समजावणी

शिखरिणी

असद्वृत्तो नायं नच वरगुणैरेष रहितः
प्रियो मुक्ताहारस्तव चरणमूले निपतितः ।
गृहाणैनं मुग्धे व्रजतु निजकण्ठप्रणयिता-
मुपायो नास्त्यन्यस्तव हृदयसंतापशमने ॥२३॥

शिखरिणी

असद्वृत्तीचा ना, गुणरहित या हा नच दिसे
असा मुक्ताहार प्रिय तव पदीं गे पडतसे ।
सखे ! स्वीकारीं या प्रणय करुनी घे तव गळां
हराया हृत्तापा तव न दुसरा मार्ग उरला ॥ २३ ॥

गद्यार्थ—

असद्वृत्ति, गुण, व मुक्ताहार, या शब्दांत कोटि. सद्वृत्त= चांगल्या बांध्याचा; गोळीबंद; (मोत्याकडे) असद्वृत्त=गोल नाहीं असा; सद्वृत्ति=चांगलें वर्तन असद्वृत्त=चांगल्या वर्तनाचा नसलेला; वाईट वर्तनाचा, (प्रियकराकडे) गुण=दोरा, वरगुण=चांगला बळकट दोरा (मोत्याच्या हाराचा.) वरगुणरहित=विशेष सद्गुण अंगीं नसलेला. (प्रियकराकडे) मुक्ताहार= मोत्याचा हार. दुसरा अर्थ मुक्त=सोडिला आहे आहार ज्यानें (तुझ्या विरहानें उपास काढीत असलेला प्रियकर.) मानिनीची सखी, प्रियकराच्या वतीनें, रागानें मानिनीनें पायदळीं टाकलेल्या मोत्यांच्या हाराचें निमित्त करून, खुबीनें, रदबदली करते—"अग हा प्रिय मुक्ताहार जो तुझ्या पायाशीं लोळत आहे तो चांगल्या गोळीबंद मोत्यांचा आहे व चांगल्या बळकट दोऱ्यात ओवलेला आहे. (तूं प्रियकराशीं भाडल्यानें) तुझ्या हृदयाला जो ताप झाला आहे, तो शांत करण्यास या मुक्ताहाराला पुन्हा प्रेमानें तुझ्या गळ्यात तूं घातलेंस याशिवाय दुसरा उपाय मला दिसत नाहीं. (मोती शीतल असल्यानें हृदयाचा ताप कमी करतील) पण खरा अर्थ असा कीं हे सखे, हा तुझा (प्रियकर) आहार सोडून बिचारा (तुझ्या मनधरणीसाठीं) पायीं पडला आहे. तो वाईट वर्तनाचा नाहीं किंवा सद्गुणरहितहि नाहीं. तेव्हां त्याला प्रेमानें पुन्हा स्वीकार करून त्याला तूं आपल्या गळ्यांत मिठी मारावयाला लावावीस. मला तरी, तुझ्या हृदयाचा ताप शांत करावयास हा एकच मार्ग दिसत आहे."

---

आर्या

पदशब्दलीनहृदयो
रूपालङ्कारभावनाचतुरः ।
कविरिव विनिद्रतनिद्र-
स्तरुणि ! तवार्थे स्थितस्तरुणः ॥ २४ ॥

आर्या

पदशब्दीं मन लावुनि,
रूपालंकारभावचतुर मनीं ।
उन्निद्र कविपरी तुज-
साठीं बघ तरुण हा उभा तरुणि ! ॥ २४ ॥

गद्यार्थ—

हे मानिनि ! हा तुझा तरुण प्रियकर, कवीप्रमाणें रूप, अलंकार भाव (सगळे शब्द द्व्यर्थी) हे सर्व चतुरपणें जाणणारा व कवीप्रमाणेंच (कवि स्फूर्तिसाठीं व हा तुजसाठीं) सारखी जागृती वाढीत असणारा, कवि जसा पद व शब्द (सुंदर सांपडावेत म्हणून) यांवर मन लावून बसतो, तसाच विचारा हाहि तुझ्या पदशब्दावर (तुझ्या पावलाच्या ध्वनीवर, तूं प्रसन्न होऊन त्याला भेटण्यास केव्हां येतेस यावर) मन लावून बसलेला आहे !

—०—

शिखरिणी

अनालोच्य प्रेम्णः परिणतिमनादृत्य सुहृद-
स्त्वयाऽकाण्डे मानः किमिति सरले संप्रति कृतः ? ।
समाकृष्टा ह्येते प्रलयदहनोद्भासुरशिखाः
स्वहस्तेनाङ्गारास्तदलमधुनाऽरण्यरुदितैः ॥ २५ ॥

शार्दूलविक्रीडित

प्रेमाचा परिणामही न बघतां,
ना मानतां स्नेहियां
कां गे दाविसि हा अचानक अतां,
तूं मान नाथास या ? ।
प्रालेयाग्निसमान दाहक असे,
अंगार हे ओढुनी
घेसी तूंच स्वयें ! अरण्यरुदितें
दे यापुढें सोडुनी ॥ २५ ॥

गद्यार्थ—

हे सखे, ! (तुम्ही एकमेकांस मानप्रिय झालां आहां) ही तुमच्या प्रेमाची परिणति ध्यानीं न घेतां, सर्व सखी सुहृदांनी (मानाचा अतिरेक करूं नको असें) नानापरींनी तुला सांगितलें, त्याचा अनादर करून, तूं आपल्या नाथाशीं, अचानकपणें सध्यां कां असा अभिमान धरून बसली आहेस ? असा तुझा हा कर्मानें, प्रलयाग्नीसारखे दाहक निखारेच तूं आपल्या हातानें आपल्या अंगावर ओढून घेतले आहेस. आतां हें अरण्यरुदन पुरे कर ! (कारण तें ऐकणार कोण ?)

—०—

## फार ओढून धरल्याबद्दल मानिनीचा पश्चात्ताप आणि सखीद्वारां तिनें केलेली प्रियकराची समजावणी.

शार्दूलविक्रीडित

निःश्वासा वदनं दहन्ति, हृदयं
निर्मूलमुन्मथ्यते
निद्रा नैति, न दृश्यते प्रियमुखं,
नक्तंदिवं रुद्यते ।
अङ्गं शोषमुपैति पादपतितः
प्रेयांस्तदोपेक्षितः
सख्यः कं गुणमाकलय्य दयिते
मानं वयं कारिताः ? ॥ २६ ॥

स्रग्धरा

निःश्वासें तोंड भाजे;
हृदय उपटिलें जाइ आमूल वाटे
ना ये निद्रा, दिसेना
प्रियमुख, दिवसां रात्रिं खिन्नत्व दाटे ।
अंगां ये शोष; पायीं
प्रियकर पडतां मी उपेक्षीं, प्रियाशीं—
दावाया मान, लाभास्तव
सखि ! कुठल्या, लाविलें मन्मनासि ? ॥२६॥

गद्यार्थ—

निःश्वास इतके उष्ण येताहेत कीं, त्यांनीं माझें तोंड भाजत आहे, असें वाटतें कीं हृदय मुळापासून उपटून जात आहे, झोंप येत नाहीं, प्रियकराचें मुख पाहण्यास मिळत नाहीं, रात्रंदिवस मनाला खेद होत आहे अंगांना कोरड पडत आहे प्रियकर चांगला माझ्या पायांशीं (श्लोक १९ व २२ पहा) आला असतांना मी त्याची उपेक्षा केली (आतां तोच उलट अभिमान धरून बसल्यानें, होणार तरी काय ?) हे सख्यांनो ! त्यापासून काय लाभ होणार होता म्हणून तुम्ही मला माझ्या प्रियकराशीं मान धरायला लावलांत ?

—०—

शिखरिणी

तथाऽभूदस्माकं प्रथममविभक्ता तनुरियं
ततोऽनु त्वं प्रेयानहमपि हताशा प्रियतमा ।
इदानीं नाथस्त्वं वयमपि कलत्रं, किमपरं
मयाप्तं प्राणानां कुलिशकठिनानां फलमिदम् ॥ २७ ॥

आर्या

मक्तचि
ोतें शरीर हें अपुलें।
शुभ तूं,
ाहि प्रिया तुझी झालें ॥
तूं, पत्नी
'एवढेच हें उरलें !
। मम या
फलचि हें मला सिळलें ॥ २७ ॥

प्रियकराशी कठोरपणें वागत आलें त्याची चालली आहे) प्रारभीं प्रियकर व मी ीव होते. नंतर तो माझा प्रियकर व मी ा, असें (अद्वैताचें द्वैत) झालें. नंतर त्याची पत्नी इतकें तुटक नातें आज उरलें माझ्या वज्रकठोर प्राणांचेंच फल हें असें (एकजीव असतानाच मी मेलें कां नाहीं !)

---

शिखरिणी

"इदं कृष्णं," "कृष्णं;"
"प्रियतम ! ननु श्वेत" "मथ किं ?"
"गमिष्यामो" "यामो"
"भवतु गमनेना" "थ भवतु" ।
पुरा येनैवं मे
चिरमनुसृता चित्तपदवी
स एवान्यो जातः
सखि ! परिचिताः कस्य पुरुषाः ? ॥२८॥

स्रग्धरा

"हें काळें !" "होय काळें"
"प्रिय ! चुकसि; असे शुभ्र !" "हो शुभ्रची हें"
"जाऊं या"; "जाउंया कीं";
"स्थगित कर"; म्हणे "थांबणें युक्त आहे" ।
साऱ्या छंदांस माझ्या
अनुसरत सदा वागला जो जपून—
तो आतां पालटे ! गे
सखि ! पुरुषमना ओळखी सांग कोण ? ॥२८॥

गद्यार्थ—

मीं म्हटलें, "हें काळें आहे;" की प्रियकरानें म्हणावें, "होय हें काळेंच." मीं म्हटलें, "प्रियकर तूं चुकलास, हें पांढरें आहे !" की लगेच त्यानें म्हणावें, "हें पांढरें यांत काय संशय ?" मीं म्हटलें, "चला जाऊं या" की, त्यानें म्हणावें, "चाललोंच !" मीं म्हटलें, "जाणें रहित करावें" कीं त्यानें म्हणावें "होय, तसेंच करूं." पूर्वी माझ्या बारीक-सारीक छंदाच्या तालावर नाचत, याप्रमाणें, जो वागला, तोच प्रियकर, आज पालटलेला आहे ! हाय ! हाय ! सखे ! पुरुषांच्या हृदयाची पारख कोणाला झाली आहे ?

---

शार्दूलविक्रीडित

मानव्याधिनिपीडिताहमधुना
शक्नोमि तस्यान्तिकं
नो गन्तुं, न सखीजनोऽस्ति चतुरो
यो मां बलान्नेष्यति ।
मानी सोऽपि जनो, न लाघवभया-
दभ्येति मां च स्वयं
कालो याति; चलं च जीवितमिदं
क्षुण्णं मनश्चिन्तया ॥ २९ ॥

शार्दूलविक्रीडित

जाऊंही शकतें प्रियाप्रत न मी,
या मानरोगामुळें
नाहीं एक सखी अशी चतुर, जी
नेईल मातें बळें ।
मानी तोहि—कमीपणास्तवचि ना
येईल माझ्याकडे !
जाई काळ; नि आयु चंचल,—मना
ही घोर चिंता जडे ॥ २९ ॥

गद्यार्थ—

(मी स्वत:च लावून घेतलेल्या) या मानरोगापायीं, मी, आतां प्रियकराकडे, स्वत: जाऊं शकत नाहीं; सखी एखादी, अशी चतुर कोणी नाहीं, कीं, जी मला बळानें ओढून प्रियाकडे घेऊन जाईल. प्रियकरहि आता मान धरून बसल्यानें, माझ्या-कडे येणें त्याला कमीपणाचें वाटणार, म्हणून तो होऊन येणार नाहीं ! काळ चालला आहे, जीवन चंचल आहे ! (पुनर्मीलन कसें व्हावयाचें याची) आतां मनाला घोर चिंता वाटत आहे.

---

शार्दूलविक्रीडित

रोलम्बो मधुपः पिकस्तु परभृद्रन्ध्रानुसारी मरु-
द्धंसाः केवलपक्षपातनिरताश्चन्द्रोऽपि दोषाकरः ।
चेतो नैति शुकस्त्विहैकपठिताख्यायी पयोदो जडः
कं वाऽहं प्रहिणोमि हन्त कठिनस्वान्ताय कान्ताय मे ?

आर्या

मधुकर मधु पी, कोकिल
परभृत्, रंध्रेंच वायु शोधितसे ।
हे हंस पक्षपाती;
दोषाकर चंद्र हा सदैव असे ।
मन येईना, शुकही
पठितचि वदतो; पयोदही जड ते ।
धाडूं कठोरहृदयी
नाथाप्रत, हाय ! मीहि कोणातें ? ॥ ३० ॥

गद्यार्थ—

माझ्या कठोरहृदयी नाथाला समजावण्यासाठीं कोणाला धाडावें ? म्हणून, विचार करतां, भुंगे केवळ मध पीत बसणार ! कोकिल दुसऱ्यानें पोसलेले, म्हणून, हलक्या कुळांतले ! वायु केवळ छिद्रें शोधणारा, हंस हे केवळ पक्षपाती, ( पंख फडफडवणारे ), चंद्र हा दोषाकर, ( दोषपूर्ण ) फक्त रात्रीं कार्यकारी, मन येऊं शक्त नाहीं, ( तें माझ्या जवळ नाहीं, त्यानेंच नेलें आहे ) पोपट केवळ सांगितलेला पाठ म्हणणारा, ढग पाण्यानें जड झालेला ! मला हवे तसे गुण असलेला दूत आणायचा कुठून ?

हरिणी

मलयमरुतां व्राता याता विकासितमल्लिका-
परिमलभरो भग्नो ग्रीष्मस्त्वमुत्सहसे यदि ।
घन ! घटयितुं तं निस्नेहं; य एव निवर्तने
प्रभवति गवां, किं नश्छिन्नं,-स एव धनंजयः ॥ ३१ ॥

शार्दूलविक्रीडित

गेले वाहुनि वायु ते मलयिंचे;
हा ग्रीष्महीं संपला
पूर्णोत्फुल्लसुमल्लिकापरिमला
घेऊन तो चालला ।
निःस्नेहा वळवावया जर असे
उत्साह, जा तूं घन !
गायी जो फिरवील, काय बिघडे ?
तोची मला अर्जुन ॥ ३१ ॥

गद्यार्थ—

( वसतातले, ) मलयावरून येणारे वारे वाहून गेले, फुललेल्या मल्लिकापुष्पांचा सुगंध व ग्रीष्म जोडीनें चालते झाले ( प्रियजन-सहवाससुखाला योग्य दिवस तर निघून गेले ! ) पण तरी ( हरकत नाहीं, ) हे मेघा ! तुला जर, माझ्या निःस्नेह प्रियकराला त्याचें मन वळवून माझ्याकडे परत आणण्याबाबत, उत्साह वाटत असेल, तर अवश्य तें कर–, मला काय जो कोणी गायी वळवून आणील, तोच अर्जुन ( अर्जुनानें अज्ञातवासांत विराटाच्या गायी वळविल्याची कथा आहे. ) ( "मेघालोके भवति सुखिनोऽप्यन्यथावृत्ति चेतः" याचा लाभ घेऊन जर हें काम मेघाकडून साधलें तर बरेंच झालें )

मन्दाक्रान्ता

वाच्यं तस्मै सहचरि ! "भवद्दूरविश्लेषवह्नौ
स्नेहैरिद्धे मम वपुरिदं कामहोता जुहोति ।
प्राणानस्मै तदहमुचितां दक्षिणां दातुमीहे
तत्रादेशो भवतु भवतो यत्त्वमेषामधीशः" ॥ ३२ ॥

आर्या

सखि ! सांग त्यास कीं "त्वत्—
स्नेहें विरहाग्नि येइ भडकून ।
मम तनुरूपचि आहुति
देई त्याच्यांत मदन यजमान ॥
वाटे अनुरूप तया
प्राणांची दक्षिणाच मीं द्यावी !
परि तूं त्यांचा स्वामी,
म्हणुनि अनुज्ञा तुझीच त्या व्हावी ॥ ३२ ॥"

गद्यार्थ—

हे सहचरि ! माझा निरोप म्हणून त्या माझ्या प्रियकराला सांग की, ' तुझ्या स्नेहामुळें ( तेलानें ) माझा विरहाग्नि अधिकच भडकत आहे आणि मदनरूपी यजमान त्या अग्नींत माझ्या देहाची ( रोज थोडथोडी ) आहुति देत आहे ( अर्थात हा यज्ञ संपला, की, ) त्याला अनुरूप अशी, माझ्या प्राणांची दक्षिणा देण्याचा, मी, मनाशीं संकल्प केला आहे, पण त्या प्राणांचा स्वामी, तूं असल्यानें, तुझी संमति या कामीं हवी आहे "

आर्या

तव विरहमसहमाना मा तु प्राणान्विमुक्तवती ।
किन्तु तथाविधमङ्गं न सुलभमिति ते न मुञ्चन्ति ॥ ३३

आर्या

न सहे विरह तुझा हा,
म्हणुनि सखी सिद्ध सोडण्या प्राण ।
सुंदर तनु ही दुर्मिळ
म्हणुनि तिला प्राण हेच सोडिति न ॥३३॥

गद्यार्थ—

(सखी प्रियकराला सांगते) माझ्या सखीला तुझा विरह सहन होत नाहीं म्हणून ती प्राण सोडूनच बसली आहे (सोडण्यास सिद्ध आहे.) पण इतका सुंदर देह आपल्याला कुठे मिळणार? या विचारानें तेच तिला सोडून जात नाहींत (यामुळे तिचा नाइलाज आहे)

---

हरिणी

विरहविषमः कामो वामस्तनूकुरुते तनुं
दिवसगणनादक्षश्चायं व्यपेतघृणो यमः ।
त्वमपि वशगो मानव्याधेर्विचिन्तय नाथ! हे
किसलयमृदुर्जीवेदेवं कथं प्रमदाजनः? ॥ ३४ ॥

आर्या

मूळचि कृशतनु, विरहें
सर रिपु कृशतर हिला करीत असे ।
निर्घृण यम गणनापटु
इकडे मोजीत हाय! दिवस वसे ॥
मानव्याधिग्रस्तचि
इकडे तूं हा! विचार कर नाथा!
पल्लवकोमल अबला
प्राणां जगवूं कशी शके आतां ॥ ३४ ॥

गद्यार्थ—

माझी सखी आधींच तन्वंगी! त्यात विरहाच्या शस्त्रानें मदन रिपु, तिला आणखीच कृश करीत आहे; आणि इकडे, यम क्रूर व गणनापटु असा, दिवस मोजीत बसला आहे. इकडे तूं मानरोगाला बळी पडला आहेस! तेव्हां आतां, हे माझ्या सखीच्या प्राणनाथा! विचार कर, अशा परिस्थितींत पल्लवकोमल सखीनें आपले प्राण कसे जगवावेत?

---

मन्दाक्रान्ता

यावद्यावद्भवति कलया पूर्णकामः शशाङ्क-
स्तावत्तावद् द्युतिमयवपुः क्षीयते सा मृगाक्षी ।
मन्ये धाता घटयति विधुं सारमादाय तस्या-
स्तस्मादायन्न भवति सखे! पूर्णिमा तावदेहि ॥ ३५ ॥

मन्दाक्रान्ता

जैसा जैसा, मिळवुनि कला, चंद्र तो पूर्ण होई
तैशी तैशी तनु झडतसे कांतिपूर्णा हिची ही ।
वाटे धाता द्युति जणुं हिची काढुनी त्याम देत
येई नाथा! म्हणुनि मिलना पौर्णिमेच्याच आंत! ३५

गद्यार्थ—

(सखीसाठीं रदबदली करताना सखीच करविती झालेली दिसते!) जसजसा, चंद्र, एकेक कला मिळवीत मिळवीत, पूर्ण होत जात आहे, तशी तशी, माझ्या सखीची कांतिमय तनु, कलाकलांनीं झडत जात आहे यावरून, असें वाटतें की, विधाता हिच्यांतलें तेज काढकाढून चंद्राची भरती करीत असावा. तेव्हा नाथा! माझ्या सखीला भेटायला यायचें तर पौर्णिमेच्या आंतच ये (नाहींतर पुढें ती कांहीं जागेवर दिसावयाची नाहीं.)

---

मन्दाक्रान्ता

हस्ताम्भोजे वदनमलकानायतान्बाहुमूले
द्वारे स्वैरं नयनमधरे तर्जनीं सन्निधाय ।
दीर्घोच्छ्वासं विरतविषयास्वादमुत्कण्ठितोष्णं
मुग्धाक्षी त्वां हृदि विदधती बाष्पमाविष्करोति ॥३६॥

आर्या

टेकुनि मुख करकमलीं
खांद्यावर केश लांब मोडोनी ।
अधरीं तर्जनि धरुनी,
उत्कंठित उष्ण दीर्घ निःश्वसुनी ॥
सोडुनि रुचि विषयांची,
मुग्धाक्षी, ही तुलाच आठवुनी ।
दारीं फिरवित दृष्टी,
काढी नयनांतुनी सदा पाणी ॥ ३६ ॥

गद्यार्थ—

हातांत मुख टेकून, लांबसडक केश खांद्यावर सोडून, पुढचें बोट खालच्या ओठावर टेकून, विषयसुखाविषयीं विरक्त होऊन, उष्ण दीर्घ श्वास सोडीत, दारावर भिरभिर दृष्टि फिरवीत, माझी मुग्धाक्षी सखी तुला आठवून सारखी डोळ्यांतून पाणी काढीत बसली आहे.

---

शार्दूलविक्रीडित

पत्रं न श्रवणेऽस्ति, बाष्पगुरुणोर्नो नेत्रयोः कज्जलं
रागः पूर्व इवाधरे न; पदयोस्तन्व्या न चालक्तकः।
वार्तोच्छित्तिषु निष्ठुरेति भवता मिथ्यैव संभाव्यते
सा लेखं लिखतु च्युतोपकरणा न्यायेन केनाधुना?

शार्दूलविक्रीडित

कर्णी पत्र धरी न; काजळ टिके
ना अश्रुपूर्णेक्षणीं
ना पायीं अळिता, न रंग अधरीं
पूर्वीपरी या क्षणीं।
मिथ्या निष्ठुर ती गमे तुज; लिही
वार्ता न ती वास्तव
कैशी पत्र लिहील साधनविना?
हा न्याय कां रे तव? ॥ ३७ ॥

गद्यार्थ—

(इतकी दशा होईपर्यंत, प्रियेनें, मग, मला पत्र कां पाठविलें नाहीं? असें प्रियकरानें विचारलें, त्याला सखीदूती उत्तर देते!) माझी सखी तुझ्या विरहानें इतकी विरक्त झाली आहे कीं, ती आजकाल कानांवर पानें वगैरे शृंगार करीत नाहीं, अश्रूंमुळें डोळ्यांत काजळ टिकत नाहीं; पूर्वीप्रमाणें ही अधराला रंग लावीत नाहीं, कीं, पायाला अळित्यानें रंगवीत नाहीं. वेळोवेळीं समाचार न कळविल्याचा निष्ठुरतेचा आरोप तूं तिच्यावर करतोस, पण, साधनेंच नसल्यावर (पान हा कागद व काजळ, अधररंग किंवा अळिता ही शाई) ती पत्र कसें लिहील! मग असा आरोप करणें हा काय न्याय झाला?

---

इंद्रवज्रा

हारावशेषा ननु कण्ठनाला
त्वन्नामशेषा रसना तदीया।
लावण्यशेषा तनुगात्रयष्टि-
स्त्वद्ध्यानशेषं परमं तदायुः ॥ ३८ ॥

वसंततिलका

कंठीं तिच्या अहह! केवळ एक हार
जिव्हेवरी उरतसे तव नाम मात्र।
सौंदर्य केवळ उरे तनु गात्र यांत
त्वद्ध्यान एक उरलें तिज जीवनांत ॥ ३८ ॥

गद्यार्थ—

हे माझ्या सखीच्या प्रियकरा! (तूं तिला घातलेला) केवळ एक हार तेवढा तिच्या गळ्यात असतो; (इतर सर्व अलंकार तिनें दूर केले आहेत.) तिच्या जिभेवर तुझें नाव मात्र उरलें आहे; (इतर कांहीं ती बोलतच नाहीं) तिच्या अंगप्रत्यंगात सौंदर्यच केवळ उरलें आहे; (सर्व तुष्टि-पुष्टि निघून गेली आहे;) तिच्या जीवनांत एक तुझें ध्यान हाच काय तो, आधार तिला उरला आहे. (इतर सर्व विषयांचा तिनें संन्यास घेतला आहे!)

---

## दूतत्व करतांकरतां सवती झालेली सखी!

शार्दूलविक्रीडित

निःशेषच्युतचन्दनं स्तनतटं
निर्मृष्टरागोऽधरो
नेत्रे दूरमनञ्जने पुलकिता
तन्वी तवेयं तनुः।
मिथ्यावादिनि! दूति! बान्धवजन-
स्याज्ञातपीडागमे!
वापीं स्नातुमितो गतासि न; पुन-
स्तस्याधमस्यान्तिकम् ॥ ३९ ॥

स्रग्धरा

वक्षींचें सर्व गेलें मलयज, अधरीं
राहिला रंग नाहीं;
गेलीं नेत्रांजनेंही पुसुनि, फुलुनि ये
उंच रोमांच देहीं।
दूती खोटारडी तूं! प्रियजनहृदिंच्या
जाणिशी न व्यथेस
स्नाना गेलीस वापीवरी न; हलकटा
त्या पुन्हां गांठिलेंस ॥ ३९ ॥

गद्यार्थ—

(स्वतःच्या पतीनें, स्वतःच्या प्रियकराला समजावून, परत स्वतांकडे आणण्यासाठीं दूती म्हणून जी सखी पाठविली, तीच त्याच्याशी रममाण झाली, व सवत होऊन बसली; व परत येऊन "विहिरीवर अंघोळीला गेलें होतें!" अशी बतावणी करते, तिच्यावर भडिमार!) तुझ्या स्तनांवरील चंदन संपूर्ण नष्ट झालें आहे; अधरावरील रंग पार पुसून गेला आहे. डोळ्यांतलें काजळ सर्वत्र पसरलें आहे, आणि तुझ्या सर्वांगावर रोमांच फुलून आला आहे. हे दूति! तूं मात्र खोटें बोलत आहेस! तुझ्या सखीच्या (माझ्या) यातना न कळल्यासारखी

तूं निर्घृण व स्वार्थी झाली आहेस ! मला बरोबर कळलें आहे-तू विहिरीवर स्नानाला गेली नव्हतीस तर त्या हल्कटाकडे पुन गेली होतीस ( व त्याच्याशीं रतून परत आली आहेस )

---

शार्दूलविक्रीडित -

"खिन्नं केन मुखं ?" "दिवाकरकरे"—
"रक्ते रागिणी लोचने ?"
"रोषात्तद्वचनोदिता" "व्रिलुलिता
नीलालका" ?—"वायुना ।"
"भ्रष्टं कुङ्कुम"—"मुत्तरीयकपणा"—
"क्लान्ताऽसि ?" "गत्यागते"—
"युक्तं तत्सकलं, किमत्र वद हे
दूति ! क्षतस्याधरे ?" ॥ ४० ॥

शार्दूलविक्रीडित

"कोमेजे मुख कां ?" "उन्हांत फिरुनी !"
"कां लाल ही लोचनें ?"
"तच्छब्दांवर कोपुनी !" "विखुरले
कां केश हे ?" "वायुनें;" ।
"कुंकूं भ्रष्ट ?" "ढळोनि हा पदर !" "कां
तूं श्रांत ?" "ये जा मुळें !"
"सारें युक्तचि, दूति !
हे क्षत वदे ओंठीं कसे जाहले ?" ॥ ४० ॥

गद्यार्थ—

(आपल्या प्रियकराशीं रतून आलेल्या सखीला मानिनी विचारते ) " कां ग, तुझें मुख असें कोमेजलें कशानें ? " दूती बतावणी करते, " उन्हानें ! " " तुझे डोळे लाल कां ? " " तुझ्या प्रियकराच्या शब्दाचा मला राग आला, त्यामुळें ! " " बरें, हे तुझे केश कां विखुरले कां ? " " वाऱ्यामुळें " " तुझें कुंकूं कां फरफटलें आहे ? " " पदर ओढून घेतल्यानें " " तू एवढी थकलीस कां ? " " सारखें ये, जा, ये जा, करण्यानें " " हे दूति ! हें सर्व तुझें म्हणणें योग्य मानू या क्षणभर, पण तुझ्या अधरावर हे दतव्रण कसे झाले तें सांग पाहू ! "

---

## इतर सवती

शार्दूलविक्रीडित

दृष्ट्वैकासनसंस्थिते प्रियतमे, पश्चादुपेत्यादरा-
देकस्या नयने पिधाय, विहितक्रीडानुबन्धच्छलः ।
ईषद्वक्रिमकन्धरः सपुलकां प्रेमोल्लसन्मानसा-
मन्तर्हासलसत्कपोलफलकां धूर्तोऽपरां चुम्बति ॥४१॥

शार्दूलविक्रीडित

एकत्रस्थित पत्नि दोन, बघुनी आला पती मागुनी
एकीच्या नयनां, विनोद करण्या झांकी करें झांकुनी ।
प्रेमोल्लासभरें दुजी सपुलका जेव्हां हंसूं लागली
धूर्तानें वळुनी हळूंच तधिं ती गालांवरी चुंबिली ॥४१॥

गद्यार्थ—

( दोघी सवती समजूतदार व प्रेमळ, व पती दोघींवर प्रेम करणारा असला तर हें शक्य ) दोघीहि प्रियतमा एकाच बैठकीवर बसलेल्या पाहून, पति हळूच मागून आला व विनोद करण्याकरितां, एकीचे डोळे त्यान झांकले. दुसरी प्रेमोत्साहान गालांतल्या गालांत हसू लागली, तेव्हां त्या धूर्तानें, रोमांच आलेल्या तिला, हळूच वांदे वळवून चुंबिलें ! ( आणि दोघींनाहि खुष केलें ! )

---

शार्दूलविक्रीडित

साहार्दं वचनं प्रयच्छसि न मे,
नो वाञ्छितं यच्छसि
प्रायः प्रोच्छ्वसिषि द्रुतं हुतवह-
ज्वालासमं रात्रिषु ।
कण्ठाश्लेषपरिग्रहे शिथिलता,
यन्नादराच्चुम्बसे
तत्ते धूर्त ! हृदि स्थिता प्रियतमा
काचिन्ममेवापरा ॥ ४२ ॥

शार्दूलविक्रीडित

आनंदें मज बोलसी न, नच वा देशी मला ईप्सित
उष्णोच्छ्वासचि शीघ्र देशि अनलज्वालांपरी रात्रित ।
कंठीं सैल मिठी, न चुंबनि तुला आस्थाहि पूर्वीपरी
धूर्ता ! त्वद्हृदिं मत्समा प्रिय दुजी राहेच कोणीतरी ४२

गद्यार्थ—

( आपल्या प्रियकराच्या वर्तनाचें, बारीक निरीक्षण करतां, प्रियेला संशय येत आहे, कीं त्याला दुसरी कोणीतरी प्रियतमा असावी ) आतांशा तू ( पूर्वीप्रमाणें ) माझ्याशीं आनंदान बोलत नाहींस, किंवा मी मागावें तें मला देत नाहींस, रात्रभर अग्निज्वालासारखे उष्ण असे निःश्वास भराभर सोडीत असतोस, गळ्याला मिठी मारावयाची तीहि घट्ट नाहीं, चुंबन घ्यायचें तर त्यात आस्था दिसत नाहीं......या सर्व खाणाखुणावरून, धूर्ता, माझ्यासारखी दुसरी कोणीतरी प्रियतमा तुझ्या हृदयांत घर करून बसली असली पाहिजे

---

मालभारा

परिपीय तदीयमोष्ठबिम्बं
वचनानि स्खलयन्नुपागतोऽसि ।
उचितं तदिदं मुकुन्द ! मन्ये
रसना बिम्बफलेन जाड्यमेति ॥ ४३ ॥

शार्दूलविक्रीडित

"राधेचें अधरोष्ठबिंबफल तूं
आलास रे प्राशुनी
सांगे शब्द तुझाच, जो अडखळे
येतां मुखाआंतुनी ।
कृष्णा ! योग्यचि हें" असें खिजवुनी
त्या सत्यभामा वदे—
"बाबा ! बिंबफलास भक्षुनि सदा
जिव्हेस ये जाड्य तें ॥ ४३ ॥"

गद्यार्थ—

(राधेकडे जाऊन आलेल्या कृष्णास सत्यभामा म्हणते-) तूं राधेचें अधररूप बिंबफल भक्षून, आतां, (त्या रतीच्या धुंदीमुळें) अडखळत बोलत माझ्याकडे आला आहेस ! हें तुझें अडखळत बोलणें अगदी योग्यच आहे; कारण, बिंबफलानें (तोंडली खाल्यानें) जिभेला जडपणा येतो, हें जगप्रसिद्धच आहे

—•—

द्रुतविलम्बित

स्फुरसि बाहुलते ! किमनर्थकं ?
त्वमपि लोचन वाम ! भव स्थिरम् ।
समहमागतमप्यपराधिनं
न परिरब्धुमलं न च वीक्षितुम् ॥ ४४ ॥

वसन्ततिलका

कां व्यर्थ तूं स्फुरसि बाहुलते ! कशास !
हे वामलोचन ! तसीं स्थिर तूंहि वस ।
आला पुनश्च जरि तो अपराधि येथें
आलिंगिण्या न, बघण्या न, दाखेन त्यातें ४४

शार्दूलविक्रीडित

"तस्याः सान्द्रविलेपनस्तनयुग-
प्रश्लेषमुद्राङ्कितं
किं वक्षश्चरणानतिव्यतिकर-
व्याजेन गोपाय्यते ?" ॥
इत्युक्ते "क्व तद्"इत्युदीर्य सहसा
तत्संप्रमार्ष्टुं मया
साऽऽश्लिष्टा रभसेन तत्सुखवशा-
त्तन्व्या च तद् विस्मृतम् ॥ ४५ ॥

शार्दूलविक्रीडित

"त्या स्त्रीच्या स्तनिंची उटी, तव उरीं
आली तदालिंगनीं;
मत्पादानतिच्या मिषें लपविण्या
ती इच्छिसी कां मनीं ?"
"कोठें ती ?" म्हणुनी तिला पुसटण्या,
घेई तिला मी त्वरें—
वक्षाशीं; मग त्या सुखांत बुडतां,
मागील ती विसरे ॥ ४५ ॥

गद्यार्थ—

( गवतीकडून आलेल्या प्रियावर रागावण्याचा निश्चय केला तरी अवयवच बंड करतात ( श्लोक ४४ ) त्यामुळें प्रत्यक्षांत तो निश्चय विरघळून कसा जातो तें या व पुढील श्लोकांत आहे ) पत्नी म्हणते, " त्या स्त्रीला आलिंगन दिल्यानें तिच्या स्तनावरील दाट चंदनलेप तुमच्या छातीवर लागला आहे. तो, ( माझ्या आराधनेसाठीं ) माझ्या पायां पडण्याची युक्ति करून, तुम्ही पांघरूण काय लपवतां ?" "आहे कुठें तो !" असें म्हणून तो लेप पुसटून टाकण्यासाठीं, प्रियेला मी घाईघाईनें छातीशीं धरलें ! आणि या गाढालिंगनसुखांत बुडून ती (स्त्री) आधीचें सर्व विसरून गेली.

—•—

शार्दूलविक्रीडित

कान्ते सागसि शापिते, प्रियसखीवेषं विधायागते
भ्रान्त्याऽऽलिङ्ग्य मया रहस्यमुदितं तत्सङ्गमाकाङ्क्षया
"मुग्धे ! दुष्करमेतद्"इत्यतितरां प्रोद्दामहासं तया
दाक्षिण्य [illegible] तेन स्मितेनाथ प्रदोषागमे॥४६॥

आर्या

धिग्धिक्कृत दोषी पति,
येइ सखीवेश धरुनि, त्या फसुनी ।
कवळुनि "पतिसंगातुर
मी" हें मम गुपित त्या वसे कथुनी ॥
"मुग्धे दुष्कर तें" हें
वदुनी उद्दाम हास्य करित वळें—
आलिंगुनि लुच्च्यानें
पहिल्या रात्रींच आज फसवीलें ॥ ४६ ॥

गद्यार्थ—

( सवतीकडे गेल्याच्या ) पापासाठीं मी माझ्या प्रियाचा धिक्कार केल्यानंतर ( तो निघून गेला; पण ) माझ्या प्रियसखीचा वेश घेऊन परत *आला; त्याला मी फसलें; आणि, ( ती माझी* सखीच समजून ) तिला मिठींत घेऊन " ( जरी मी प्रियकराला निर्भर्त्सना करून हाकललें, तरी ) मला त्याच्यावांचून राहवत नाहीं. मी त्याच्या संगास आतुर झालें आहें !" हें माझें गुपित मोठ्या विश्वासानें मी तिला ( त्याला ) सांगितलें. " ( तूं अपमान केलास, आतां ) त्याला परत आणणें मोठें कठीण !" असें म्हणत मोठ्यानें हंसून त्या लुच्च्यानें, पहिल्या रात्रींच, बळानें मला आलिंगन देऊन फसविलें !

———•———

रथोद्धता

सत्यमेव गदितं त्वया विभो !
जीव एक इति यत्पुरावयोः ।
अन्यदारनिहिता नखव्रणा-
स्तावके वपुषि पीडयन्ति माम् ॥ ४७ ॥

रथोद्धता

*नाथ ! सत्य वदलास तूं असें*
"जीव एक उभयांत कीं वसे" ।
हे नखव्रण दुजीच जे करी
त्वत्तनूस, मज पीडिती परी ॥ ४७ ॥

हेंच वसंततिलकेंत—

तूं बोललास सखया मज सत्यची हें
कीं "आपणांत वच एकच जीव आहे" ॥
तूतें नखव्रण करी दुसरी कुणी ती
ते सर्व पीडक परी मजलाच होती ॥ ४७ ॥

गद्यार्थ—

( वक्रोक्तीचें हें एक उत्कृष्ट उदाहरण आहे. सवतीकडे जाऊन आलेल्या पतीस पत्नी म्हणते ) हे नाथा ! तूं पूर्वी मला म्हणाला होतास कीं, " आपल्या दोन देहांत जीव एकच आहे." तें अगदी खरें आहे. ( पण त्याचा एक नवीनच पुरावा आज मला उपलब्ध झाला आहे तो असा कीं,) तूं सवतीशीं रममाण झाल्यावेळीं तिनें तुझ्या देहावर जे अनेक नखव्रण केले, त्यांनी पीडा माझ्या देहाला होत आहे ! ( आहेंत कीं नाहीं आपण एकजीव !)

———•———

रथोद्धता

वीक्ष्य वक्षसि विपक्षकामिनी-
हारलक्ष्म दयितस्य भामिनी ।
कण्ठदेशवलयीकृतां क्षणा-
दाचकर्ष निजबाहुवल्लरीम् ॥ ४८ ॥

शार्दूलविक्रीडित

आलिंगी स्वपतीस तैं, स्वसवती
जो हार वक्षीं धरी-
त्याची खूण पतीचिया जधि दिसे,
पत्नीस, वक्षावरी ।
वेढा जो पतिकंठिं बाहुलतिका
विस्तारुनी घातला
तो ( विंचू डसल्यापरी ) झणिं तिनें
काढोनियां घेतला ॥ ४८ ॥

गद्यार्थ—

पति सवतीकडे जाऊन आल्यावर, सवतीनें त्याला आलिंगन देतांना, जो हार तिच्या गळ्यांत होता, त्या हाराचे वण छाप, गुणा वगैरे पतीच्या छातीवर दिसतांच, पत्नीनें ( नेहमी-प्रमाणें तो आल्याबरोबर ) आपल्या बाहुवल्लींचा जो वेढा पतीच्या कंठाभोंवतीं घातला होता तो ( विंचू डसल्यासारखा ) झटदिशीं काढून घेतला.

———•———

शार्दूलविक्रीडित

लाक्षालक्ष्म ललाटपट्टमभितः केयूरमुद्रा गले
वक्त्रे कज्जलकालिमा, नयनयोस्ताम्बूलरागोऽपरः ।
दृष्ट्वा कोपविधायि मण्डनमिदं प्रातश्चिरं प्रेयसो
लीलातामरसोदरे मृगदृशः श्वासाः समाप्तिं गताः ॥ ४९

शार्दूलविक्रीडित

भाळीं लाल दिसे समोंवति; उठे
केयूरमुद्रा गळां
काळें काजळही मुखास; नयनीं
तांबूल तो रंगला ।
कोपा कारण सांग हें स्वपतिचें
पाहे प्रभातीं प्रिया
लीलेच्या कमलींच फुंकुनि तिचे
निःश्वास गेले लया ॥ ४९ ॥

# संस्कृत-मराठी-सुभाषित-कोश

## मूळ संस्कृत श्लोकांची अकारादि सूचि व प्राप्तिस्थान.

| आद्याक्षरें | प्राप्तिस्थान | प्रकरण | श्लोक |
|---|---|---|---|
| प्रायेण धनिनां | (शा प ४३४) | ९ | ८ |
| प्रायेण श्रीमता० | | १० | २४ |
| प्रावरणैरङ्गारै | (शा प ३९३७) | १० | २३ |
| प्रिया न्याय्या वृत्ति. | (भर्तृ नी ६१) | ४ | २० |
| प्रिया या प्रत्यूषे | (अमरु) | २९ | ५६ |
| प्रिये! सदा पूर्ण० | | २८ | २३ |
| प्रेम सत्य तयो० | | २१ | ३७ |
| प्रेमैव माऽस्तु | | २१ | ३५ |
| प्रेष्यश्च ते नानय० | (कै म. पा ओक) | १८ | २० |
| **फ** | | | |
| फल खेच्छालभ्य | (भोज २७०) (भर्तृ वै २६) | ११ | २ |
| फलमलमशा० | (भर्तृ वै. ५५) | ११ | ५ |
| **ब** | | | |
| बधिरयति कर्ण० | | ९ | ५ |
| बन्धनानि किल | (चाणक्य १५ १७) | २१ | २१ |
| बन्धोन्मुक्त्यै | (भामिनी शा. १५) जगन्नाथ | १७ | १४ |
| बलि पाताल० | (भोज २२१) | २५ | २५ |
| बहि सर्वाकारा० | (मालती १ १७) (भवभूति) | २४ | ५४ |
| बालत्व च मृता | | १८ | १३ |
| बालस्यापि रवे | (पंच १ ३५७) | १३ | १४ |
| बाला तन्वी मृदु० | (सु १४०१) विकटनितम्बा | २९ | ३१ |
| बाह्याङ्गमात्र० | | ३ | ७ |
| बुभुक्षितै०र्याक० | (भर्तृ स ६२१) | ९ | २ |
| बोधितोऽपि बहु | | ५ | ३३ |
| बोद्धारो मत्सर० | (भर्तृ वै २) | २ | ६ |
| ब्रह्मज्ञानविवेक० | भर्तृ वै १३) | २६ | ९ |
| ब्रह्मा येन कुला० | (भर्तृ नी ९५) (गरुड अ ११३) | १९ | २६ |
| **भ** | | | |
| भमारस्य कर० | (भर्तृ नी ९२) | १९ | ३० |
| भण मानमन्य० | (अमरु) | ३० | २ |
| भद्र कर्णेभि | (वैदिक) | १ | ३२ |
| भद्रे वाणि! ममा० | (सु ३१५४) | ११ | २६ |
| भवतु विदितं | (अमरु ३०) | ३० | ५२ |
| भवन्ति नम्रा | (अ शा ५) कालिदास (भर्तृ नी ६२) | ४ | ३१ |
| भवभूते संबं० | | २ | ५५ |
| भागीरथीनिर्झ० | (कुमार १ १७) कालिदास | २३ | १२ |
| भानु सकृद्युक्त० | (अ शा. ५) कालिदास | २४ | १८ |

| आद्याक्षरें | प्राप्तिस्थान | प्रकरण | श्लोक |
|---|---|---|---|
| भानुबिम्बमिद | | २३ | ३९ |
| भाषासु मुख्या | | २ | ७ |
| भिक्षाशन तद० | (भर्तृ वै १६) | २६ | ७ |
| भीतिर्नैव भुज० | | १ | २२ |
| भीम वन तस्य | (भर्तृ नी ९९) | ४ | ७५ |
| भुजपञ्जरे गृहीता | भामिनी शृ ३७) | २९ | २७ |
| भूतानि सन्ति | | ६ | १० |
| भूतिर्नीचगृहे० | (भामिनी शा २५) जगन्नाथ | १९ | १ |
| भूमिर्मित्र हिर० | (शा प १२९९) चाणक्य | २४ | ४८ |
| भूमौ स्खलित० | | १ | २५ |
| भो भाद्रपक्ष! | | ११ | १० |
| भो! भो! भीषण! | (कै म पा ओक) | १८ | २३ |
| भ्रान्त देशमने० | (भर्तृ वै ४) | २६ | ८ |
| भ्रान्त्वा दिग्वलय | | २५ | १० |
| भ्रूचातुर्या० | (भर्तृ शृ ३) | २७ | १५ |
| भ्रूभङ्गे रचिते | (अमरु २८) | ३० | ४ |
| भ्रूभङ्गो गुणित (रचित) | अमरु ९७ | ३० | ७ |
| **म** | | | |
| मज्जत्वम्भसि | (भर्तृ स ४८) | १९ | २७ |
| मणि शाणोल्लीढ | (भर्तृ स ११) (भर्तृ नी ४४) | १५ | १८ |
| मणिहारलता | | २८ | ४२ |
| मत्तेभकुम्भ० | (सु ६०३) | १३ | १७ |
| मदङ्गे जीर्णतां | (रामायण) | १६ | ११ |
| मदुक्तिश्चेदन्त० | (कु १३६) | २ | ५२ |
| मद्वाणि! मा कुरु | (भामिनी शां २८) | २ | ५१ |
| मधु तिष्ठति वा० | (सु ३३८०) कालिदास, माघ | २७ | २८ |
| मधुद्राक्षा साक्षा० | (भामिनी शां २९) | २ | ६० |
| मधुरमिव व० | | २३ | ४१ |
| मधुवाता ऋता० | (वैदिक) | १ | ३८ |
| मनस परमा० | | २८ | ५४ |
| मनसि वचसि | (भर्तृ स १९) (भर्तृ नी ७८) | ४ | ६० |
| मनसन्यद्वच० | (वृ चा २.६०) | ५ | ५४ |
| मनस्वी म्रियते | (हि १ १३३) | ४ | ४४ |
| मन्द निक्षिपते | | २ | २८ |
| मम प्रेम तवौ० | | ३० | १८ |
| मरणस्य मुने! | (योगवा) | १८ | ९ |
| मन्यमहता | (अमरु ३२) | ३० | ३१ |
| महतो सुवृत्त० | | २८ | ५२ |
| महदाश्रयस० | | ५ | २६ |

| आद्याक्षरें | प्रतिस्थान | प्रकरण | श्लोक |
|---|---|---|---|
| **श** | | | |
| शक्यो वारयितु | (भर्तृ स ७५९) (नी ११) | ८ | १ |
| शतेषु जायते | | १५ | १ |
| शनै शनैश्च | (पच १२३८) | २४ | ४ |
| शब्दशास्त्रमन० | | २ | ८६ |
| शमयति गजान् | (विक्रमो ५ १८) कालिदास | १३ | २२ |
| शम्भु श्वेतार्क० | | ४ | ५२ |
| शम्भु स्वयम्भु० | (भर्तृ शृ १) | २९ | २ |
| शशिना च निशा | | २३ | ३५ |
| शशी दिवस० | (भर्तृ स १०) (शा प १५३०) (नी ५६) | १९ | ४ |
| शस्त्रैर्हतास्तु | चाणक्य | ६ | ६ |
| शान्ते मन्मथस० | (भर्तृ स ७६२) (शा प ३७०३) | २९ | ५३ |
| शास्त्राण्यधीत्या० | (हि १ १७१) | ७ | १९ |
| शास्त्रोपस्कृत० | (भर्तृ० स १३) (नी १५) | ६ | २० |
| शिरसि निहितोऽपि | (शा प ३६९) | ५ | ३८ |
| शिला बाला जाता | | ४ | ४६ |
| शिशुर्वा शिष्या वा | भवभूति | ३ | ६ |
| शीतांशुर्मुख० | (रामा ३ ११) | २९ | १७ |
| शुद्ध स एव | (सु २७३) | ४ | ३५ |
| शुन पुच्छमिव | (वृ चा ७ १९) | ६ | १५ |
| शूरं त्यजामि | (सु ३४७८) | १२ | ३ |
| श्याम सित च | (भामिनी प्रा ७६) | २८ | ११ |
| श्रीवर्धनकरो | | २५ | १६ |
| श्रुतिमात्रेण शब्दा० | | २ | २१ |
| श्रुतिलङ्घकृत० | | २८ | १२ |
| श्रुतिशतमपि | (भामिनी शृं ३१) | २९ | ४९ |
| श्रुत्वा नामापि | (अमरु ५९) | ३० | ६ |
| श्रुत्वा सुदूरात् | | २५ | १७ |
| श्रेयश्च प्रेयश्च | | ८ | १७ |
| श्रोत्रं श्रुतेनैव | (भर्तृ सं ५४) भर्तृ नी ७१ | १६ | ३ |
| श्लिष्ट कण्ठे किमिति | (अमरु ५८) | २९ | ४१ |
| श्लोकस्तु श्लोकता | | २ | ८४ |
| श्लोका सुवृत्त० | (के डॉ श्रीखंडे) | २ | २३ |
| श्वशुरगृहनिवास | | १४ | ४ |
| **स** | | | |
| संवर्धितोऽपि पयसा | (स पाठो ४८) | ५ | ३६ |
| संसारकटुवृक्षस्य | (हि १ १५४) | २ | ९ |
| स एव धन्यो | | १३ | २६ |
| स किंसखा | (किरात १ ५) | २४ | २० |
| सकृज्जल्पन्ति | (वे ३४) | २४ | ३५ |
| सखि दशनक्षत० | | २९ | ६० |
| सखे साहजिक | | २१ | १३ |
| सख्यस्तानि वचांसि | (अमरु) | ३० | १० |
| सङ्ग्रामाङ्गण० | (सदुक्ति०) (शा प १२२५) मयूर | २५ | १२ |
| सङ्ग्रामे सुभटे० | (भो प्र १५१) | २ | ५० |
| सजीवित रोग० | (के म पां ओक) | १८ | २२ |
| सज्जनस्य हृदय | | ४ | ३० |
| सत्काव्यमास्वाद्य | (वि के छत्रे) | २ | ८८ |
| सत्पुरुष खलु | (भामिनी प्रा. ७३) | ४ | ३१ |
| सत्य सन्ति गृहे | (शृ ति १७) | २ | ४१ |
| सत्यमेव गदति | | ३० | ४७ |
| सत्यानृता च | (भर्तृ नी ४७) (हि २ १८३) | २४ | १ |
| सत्संगात् भवति | (शा प ३२८) (वृ चा १२ ७) | २१ | २८ |
| सद्गुणाऽपि | (नल च. १ ११) | २ | २ |
| सद्भिस्तु लीलया | | ५ | ३२ |
| सद्वंशजात | | २४ | ३४ |
| सन्त स्वयं प्रका० | | ४ | ७३ |
| सन्तप्तायसि | (भर्तृ स ३३) (शा प ३३०) | २१ | ९ |
| सन्तु नाम भुव० | | १ | २८ |
| सन्त्यन्येऽपि बृह० | (भर्तृ नी ३४) (भर्तृ स ५३) | १३ | ६ |
| सन्दष्टाऽधर० | (अमरु ३६) | २९ | ३३ |
| सन्मार्गे ताव० | (शा प ३३००) धर्मकीर्ति | २८ | १६ |
| सप्तर्षिहस्ताव० | (कुमार १ १६) | २३ | १३ |
| समये पयोधरा० | | २९ | १३ |
| समानी व आकूति | (वैदिक) | १ | ३४ |
| समारंभा भग्ना | (भर्तृ स ७८१) | २६ | २३ |
| सम्पत्सु महतां | (भर्तृ नी ६६) (भर्तृ स ३३५) | ४ | १८ |
| सम्पदा सुस्थित | (शिशु २ ३२) (शा प ४६१) | ९ | ३५ |
| सम्पदि यस्य न | (पच २ १८०) | १३ | २१ |
| सम्प्राप्तमवमान | (रामा) | १३ | २८ |
| सम्यगनिष्पन्न | | २ | १७ |
| सरलयो किल | | २१ | १२ |
| सरसाऽपि कवे० | | २ | ३२ |
| सरसा सालंकारा | | २ | ३५ |
| सरस्वतीमातु० | (सु १७०) मल्लक | २ | ८७ |
| सरस्वती स्थिता | (शा प १२१८) अमृतदत्त (सु २४४३) | २५ | २ |

---

## सूचीतल्या संक्षिप्त ग्रंथनांवाचे खुलासे व ग्रंथकर्त्यांचें नांव

अनर्घ रा = अनर्घराघवम् ( मुरारि - ९ वें शतक )
अमरु = अमरुशतकम् ( अमरुक - ८ वे शतक )
अरसी = अरसीठकुर ( अरिसिंह? १३ वें शतक )
अल कौ = अलकारकौस्तुभ ( विश्वेश्वरपडित - १८ वे शतक )
अल स = अलकारसर्वस्वम् ( राजानक इ स ११५० )
अ शा = अभिज्ञानशाकुतलम् (कालिदास) (१ लें ते ५ वें शतक)
अष्ट रत्न = अष्टरत्नम्
आनन्द ( देवीश )= देवीशतकम् ( आनन्दवर्धन ९वे शतक )
आसी प्र = आसीनगरप्राकारप्रशस्ति
उत्तर रा = उत्तररामचरितम् ( भवभूति ८ वे शतक )
औचित्य = औचित्यविचारचर्चा ( क्षेमेन्द्र ११ वे शतक )
कथार्ण = कथार्णव ( शिवदास )
कथास = कथासरित्सागर ( सोमदेव इ स १०२८–१०६३ )
कवि क = कविकण्ठाभरणम् ( क्षेमेन्द्र ) ( ११ वें शतक )
कविता = कवितामृतकूप
कवीन्द्र = कवीन्द्रकण्ठाभरणम् ( विश्वेश्वरपडित ) (१८ वें शतक)
का द = काव्यादर्श ( दण्डिन्–७ वें शतक )
का नीति = कामन्दकीयनीति ( इ स ७०० )
का प्र = काव्यप्रकाश ( मम्मट व अल्लट १०५० त ११०० )
काव्यप्र = काव्यप्रदीप ( गोविंदभट्ट १५ वें शतक )
काव्याल रु. = काव्यालकार ( रुद्रट इ स ८५० )
काव्याल = काव्यालकारसूत्राणि
( वामन इ स ७७९ ते ८१३ )
काशीख = काशीखड ( स्कदपुराणातून )
किरात = किरातार्जुनीयम् ( भारवि इ स ५५० )
कुट्टनीमत = कुट्टनीमतम् ( दामोदरगुप्त इ स ७७९ ते ८१२ )
कुमार = कुमारसभवम् ( कालिदास ) ( १ ले ५ वे शतक )
कुव = कुवल्यानन्द ( अप्पय्या दीक्षित ) ( १६ वें शतक )
कृष्ण कर्णा = कृष्णकर्णामृतम् ( लीलाशुक बिल्वमगल )
( ११ वें शतक )
खण्डप्र = खण्डप्रशस्तिकाव्यम् ( हनुमत्कवि )
गरुड = गरुडपुराणम्
गीत = गीतगोविन्दम् किंवा अष्टपदी
( जयदेवमिश्र १२ वें शतक )
गुण = गुणरत्नम् ( भवभूति ? )
गोभट्ट = गोभट्ट किंवा गोपभट्ट
घटख = घटखर्परकाव्यम् ( घटखर्पर )
चाणक्य = चाणक्यनीतिसार ( चाणक्य )
चातका = चातकाष्टकम्
चा नी = ( लघु ) चाणक्यशतकम् ( चाणक्य )
चोर प = चोरपचाशिका (बिह्लण इ स १०७६ ते ११२७)
छलित = छलितरामनाटकम्
ज्योतिस्तत्त्व ( रघुनदन भट्टाचार्य १५ वे शतक )
दपती = दपतीशिक्षा ( नीलरतनशर्मा इ स १८४३ )
दर्प द = दर्पदलनम् ( क्षेमेन्द्र ) ( ११ वें शतक )
दशरू = दशरूपकम् ( धनजय इ स ९७४ )
दशकु = दशकुमारचरितम् ( दण्डिन् )
दृ क श = दृष्टांतकलिकाशतम् ( कुसुमदेव ) ( १० वें शतक )
धनजय = धनजयविजयव्यायोग ( काञ्चन ) ( ४ थे शतक )

धर्मवि = धर्मविवेक (हलायुध इ स १००० ते ११००)
धूर्तस = धूर्तसमागम (ज्योतिरीश्वर १४ वें शतक)
ध्वन्या = ध्वन्यालोक (आनन्दवर्धन)
न र = नवरत्नस्तोत्रम्
नल च = नलचम्पू किंवा दमयन्तीकथा (त्रिविक्रमभट्ट)
नव साहसाङ्क = नवसाहसाङ्कचरितम् (पद्मगुप्त इ स १००५)
नागा = नागानन्दम् (हर्षवर्धन ७ वें शतक)
नीतित = नीतितरग (विश्वेश्वरदत्त)
नीतिस = नीतिसकल्प
नीतिप्र = नीतिप्रदीप (वेतालभट्ट)
नैष = नैषधीयचरितम् (श्रीहर्ष १२ वें शतक)
प रत्न = पचरत्नस्तोत्रम्
पच = पचतंत्र (विष्णुशर्मा)
पद्यवेणी (वेणीदत्त)
पद्यस = पद्यसग्रह (कविभट्ट)
पार्वती प = पार्वतीपरिणयम् (वामनभट्ट) (१५ वें शतक)
पुष्प मा = पुष्पमालाकाव्यम् (चद्रशेखर) (१४ वें शतक)
पूर्वचातश = पूर्वचातकाष्टकम्
प्रबो = प्रबोधचन्द्रोदयम् (कृष्णमिश्र ११ वें शतक)
प्र भ = प्रसगाभरणम्
प्र रा = प्रसन्नराघवम् (जयदेव) (१३ वें शतक)
बाल रा = बालरामायणम् (राजशेखर १० वें शतक)
बृह नी = बृहस्पतिनीतिसार (गरुडपुराण)
ब्रह्माण्ड = ब्रह्माण्डपुराणम्
भट्टि = भट्टिकाव्यम् (भट्टि - ७ वें शतक)
भर्तृ नी = भर्तृहरिनीतिशतकम्
भर्तृ वै = भर्तृहरिवैराग्यशतकम्
भर्तृ शृ = भर्तृहरिशृंगारशतकम्
भर्तृ स = भर्तृहरिसुभाषितसग्रह
} भर्तृहरि ८ वें शतक
भल्लट = भल्लटशतकम् (भल्लट इ स ८८३ ते ९०२)
भविष्य = भविष्यपुराणम्
भाग = भागवतपुराणम्
भामिनी = भामिनीविलास (जगन्नाथपडित १७ व शतक)
भाव = भावशतकम् (भावमिश्र)
भो प्र = भोजप्रबन्ध (बल्लाळ १६ वें शतक)
भ्रमरा = भ्रमराष्टकम्
मनु = मनुस्मृति (मनु)
म वी च = महावीरचरितम् (भवभूति) (७ वें शतक)
महा ना = महानाटकम् (हनुमत्कवि) (११ वें शतक)
महा भा = महाभारतम्
मालती = मालतीमाधव (भवभूति) (७ वें शतक)
मालवि = मालविकाग्निमित्रम् (कालिदास)
मुकुद = मुकुदमाला (कुलशेखर) (९ व शतक)
मुद्रा रा = मुद्राराक्षसम् (विशाखदत्त ९ वें शतक)
मृच्छ = मृच्छकटिकम् (शूद्रक)
मेघ = मेघदूतम् (कालिदास)
मोहमुद्र = मोहमुद्गरम् (शकराचार्य ?)
याज्ञ = याज्ञवल्क्यस्मृति (याज्ञवल्क्यमुनि)
योगयात्रा = (वराहमिहिर) (६ व शतक)
योग वा = योगवासिष्ठ
रघु = रघुवशम् (कालिदास)
रत्ना = रत्नावलि (हर्षवर्धन)
रामा = रामायणम् (वाल्मीकि)
रसग = रसगगाधर (जगन्नाथपडित १७ वें शतक)
रा त = राजतरगिणी (कल्हण) (१२ व शतक)
राघवि = राघवविलासकाव्यम् (विश्वनाथ कविराज)
रामरक्षा (वाल्मीकि)
वराह = वराहपुराण
वानरा = वानराष्टकम्
वानर्य = वानर्याष्टकम्
वायु पु = वायुपुराणम्
विक्रम = विक्रमचरितम् (लेखारभा)
विक्रम उ = विक्रमोर्वशीयम् (कालिदास)
विक्रमाङ्क = विक्रमाङ्कदेवचरितम् (बिल्हण)
विदग्ध मु = विदग्धमुखमण्डनम् (धर्मदास)
विष्णु पु = विष्णुपुराणम्
वृ चा = वृद्धचाणक्यशतकम्
वे = वेतालपचविंशतिका
वे स = वेणीसंहारम् (भट्टनारायण) (८ व शतक)
शशि व = शशिवश (क्षेमेंद्र)
शां श = शांतिशतकम् (शिल्हण) (१२ वें शतक)
शा प = शार्ङ्गधरपद्धति (शार्ङ्गधर - इ स १३६३)
शिशु = शिशुपालवधम् (माघ - ७ वें शतक)
शुक = शुकसप्तति
शृ = शृगारतिलकम् (रुद्रभट्ट) (९ वें त १० वें शतक)
शौनकी नी = शौनकीयनीतिसार (गरुडपुराण)
श्रीकठ च = श्रीकठचरितम्
(मखक इ स ११३५ त ४६)
स पा = सस्कृतपाठोपकारकतत्त्वबोधिनी
स क = सरस्वतीकण्ठाभरणम् (भोज इ स १००५ते१०५५)

सप्त रत्न = सप्तरत्नम्
सहृदया = सहृदयानन्दम्
साहि कौ = साहित्यकौमुदी (बलदेव)
सा द = साहित्यदर्पणम् (कृष्णानद) (१७ वें शतक)
साधनपञ्चकम् (शंकराचार्य)
सु = सुभाषितावलि (वल्लभदेव इ स ११६०)
सुवृत्ततिलकम् (क्षेमेन्द्र)
सुश्रु = सुश्रुतसंहिता
सूक्ति० = सूक्तिमुक्तावलि (जल्हण)
सूर्य श = सूर्यशतकम् (मयूर ७ वें शतक)
स्कान्द = स्कान्दपुराणम्
हनु ना = हनुमन्नाटकम् (हनुमत्कवि)
हरवि = हरविजय (रत्नाकर – ११ व शतक)
हरिव = हरिवंशम्
हि = हितोपदेश (नारायणशर्मा) (१० वें ते १४ वें शतक)

---

## परिशिष्ट ३.

### एकविसाव्या प्रकरणापर्यंतच्या मूळ संस्कृत श्लोकांचीं वृत्तनामें—

**प्रकरण पहिलें.**—(१) वैदिक, (२) वैदिक, (३) अनुष्टुभ्, (४) वैदिक, (५) वैदिक, (६) वैदिक, (७) वैदिक, (८) वैदिक, (९) वैदिक, (१०) वैदेक, (११) राष्ट्रगीत (१२) मालिनी, (१३) अनुष्टुभ्, (१४) अनुष्टुभ्, (१५) शार्दूलविक्रीडित, (१६) उपजाति, (१७) शार्दूलविक्रीडित, (१८) शार्दूलविक्रीडित, (१९) शार्दूलविक्रीडित, (२०) उपजाति, (२१) शार्दूलविक्रीडित, (२२) शार्दूलविक्रीडित, (२३) आर्या, (२४) मालिनी, (२५) अनुष्टुभ्, (२६) वसततिलका, (२७) वैतालीय छंद, (२८) रथोद्धता, (२९) वसततिलका, (३०) अनुष्टुभ्, (३१) वैदिक, (३२) वैदिक, (३३) वैदिक, (३४) अनुष्टुभ् (वैदिक) (३५) अनुष्टुभ्, (३६) अनुष्टुभ्, (३७) अनुष्टुभ्, (३८) वैदिक, (३९) अनुष्टुभ्, (४०) भुजगप्रयातसदृश, (४१) अनुष्टुभ्, (४२) मालिनी, (४३) अनुष्टुभ्, (४४) मराठी ओंवी

**प्रकरण दुसरें**:—(१) अनुष्टुभ्, (२) अनुष्टुभ्, (३) अनुष्टुभ्, (४) अनुष्टुभ्, (५) वसततिलका, (६) अनुष्टुभ्, (७) अनुष्टुभ्, (८) अनुष्टुभ्, (९) अनुष्टुभ्, (१०) अनुष्टुभ्, (११) अनुष्टुभ्, (१२) आर्या (१३) शार्दूलविक्रीडित, (१४) रथोद्धता, (१५) शार्दूलविक्रीडित, (१६) शालिनी, (१७) आर्या, (१८) वसततिलका, (१९) आर्या, (२०) अनुष्टुभ्, (२१) अनुष्टुभ्, (२२) वसंततिलका, (२३) अनुष्टुभ्, (२४) अनुष्टुभ् (२५) आर्या (२६) शार्दूलविक्रीडित, (२७) अनुष्टुभ्, (२८) शार्दूलविक्रीडित, (२९) अनुष्टुभ्, (३०) अनुष्टुभ्, (३१) आर्या (३२) अनुष्टुभ्, (३३) अनुष्टुभ्, (३४) अनुष्टुभ्, (३५) अनुष्टुभ्, (३६) आर्या, (३७) अनुष्टुभ्, (३८) आर्या, (३९) शिखरिणी (४०) शार्दूलविक्रीडित, (४१) शार्दूलविक्रीडित, (४२) शार्दूलविक्रीडित, (४३) अनुष्टुभ्, (४४) उपजाति, (४५) द्रुतविलंबित, (४६) आर्या, (४७) आर्या, (४८) द्रुतविलंबित, (४९) शिखरिणी, (५०) अनुष्टुभ्, (५१) वसततिलका, (५२) शिखरिणी, (५३) उपजाति, (५४) वसततिलका, (५५) आर्या, (५६) शिखरिणी, (५७) शिखरिणी, (५८) शिखरिणी, (५९) वसततिलका (६०) शिखरिणी (६१) शिखरिणी (६२) वसततिलका (६३) माल्यभारा, (६४) अनुष्टुभ्, (६५) शार्दूलविक्रीडित, (६६) आर्या, (६७) शार्दूलविक्रीडित, (६८) मदाक्रान्ता, (६९) वसततिलका, (७०) वसततिलका, (७१) शार्दूलविक्रीडित, (७२) इन्द्रवज्रा (७३) उपजाति, ७४) (७५) शार्दूलविक्रीडित, (७६) आर्या (७७) पृथ्वी, (७८) शिखरिणी, (७९) शार्दूलविक्रीडित, (८०) शार्दूलविक्रीडित, (८१) मन्दाकान्ता, (८२) उपजाति, (८३) उपजाति, (८४) अनुष्टुभ्, (८५) उपजाति, (८६) रथोद्धता, (८७) वंशस्थ, (८८) उपजाति, (८९) शार्दूलविक्रीडित

**प्रकरण तिसरें.**—(१) उपजाति, (२) वसततिलका, (३) अनुष्टुभ्, (४) वसततिलका, (५) मालिनी (६) शिखरिणी, (७) वसततिलका, (८) अनुष्टुभ्, (९) उपजाति, (१०) अनुष्टुभ्, (११) शिखरिणी, (१२) अनुष्टुभ्, (१३) माल्यभारा, (१४) आर्या, (१५) आर्या, (१६) अनुष्टुभ्, (१७) उपजाति, (१८) अनुष्टुभ्, (१९)

आर्या, ( २० ) अनुष्टुभ्, ( २१ ) वसततिलका, ( २२ ) उपजाति, ( २३ ) उपेंद्रवज्रा, ( २४ ) अनुष्टुभ्, ( २५ ) अनुष्टुभ्, ( २६ ) अनुष्टुभ्, ( २७ ) शार्दूलविक्रीडित, ( २८ ) उपजाति, ( २९ ) अनुष्टुभ्, ( ३० ) शिखरिणी

**प्रकरण चौथें** —( १ ) अनुष्टुभ्, ( २ ) मन्दाक्रान्ता, ( ३ ) शार्दूलविक्रीडित, ( ४ ) मालिनी, ( ५ ) मालिनी, ( ६ ) अनुष्टुभ्, ( ७ ) शिखरिणी, ( ८ ) शिखरिणी, ( ९ ) उपजाति, ( १० ) मालिनी, ( ११ ) शार्दूलविक्रीडित, ( १२ ) अनुष्टुभ्, ( १३ ) हरिणी, ( १४ ) शिखरिणी, ( १५ ) वसततिलका, ( १६ ) स्रग्धरा, ( १७ ) आर्या, ( १८ ) अनुष्टुभ्, ( १९ ) शार्दूलविक्रीडित, ( २० ) शिखरिणी, ( २१ ) वंशस्थ, ( २२ ) अनुष्टुभ्, ( २३ ) वंशस्थ, ( २४ ) वसंततिलका ( २५ ) आर्या, ( २६ ) पृथ्वी, ( २७ ) वसततिलका, ( २८ ) शार्दूलविक्रीडित, ( २९ ) वसततिलका, ( ३० ) स्वागता, ( ३१ ) वसततिलका, ( ३२ ) आर्या, ( ३३ ) अनुष्टुभ्, ( ३४ ) आर्या, ( ३५ ) वसंततिलका, ( ३६ ) उपजाति, ( ३७ ) अनुष्टुभ्, ( ३८ ) अनुष्टुभ्, ( ३९ ) आर्या, (४०) अनुष्टुभ् (४१) शिखरिणी (४२) अनुष्टुभ्, (४३) शिखरिणी (४४) अनुष्टुभ् (४५) आर्या, (४६) शिखरिणी (४७) उपजाति, (४८) अनुष्टुभ्, (४९) आर्या, (५०) वसंततिलका (५१) अनुष्टुभ्, (५२) अनुष्टुभ्, (५३) उपजाति, (५४) वंशस्थ, (५५) उपजाति, (५६) शार्दूलविक्रीडित (५७) रथोद्धता, (५८) शिखरिणी, (५९) आर्या, (६०) मालिनी (६१) अनुष्टुभ्, (६२) उपजाति (६३) अनुष्टुभ्, (६४) आर्या, (६५) शिखरिणी, (६६) आर्या, (६७) आर्या, (६८) वैतालीय छंद, (६९) रथोद्धता, (७०) उपजाति, (७१) शार्दूलविक्रीडित, (७२) अनुष्टुभ् (७३) अनुष्टुभ्, (७४) अनुष्टुभ्, (७५) वसंततिलका, (७६) वसततिलका (७७) आर्या, (७८) आर्या, (७९) शिखरिणी,

**प्रकरण पांचवें**—(१) अनुष्टुभ्, (२) पुष्पिताग्रा, (३) आर्या, (४) वसततिलका, (५) अनुष्टुभ्, (६) वसततिलका (७) वसततिलका, (८) अनुष्टुभ्, (९) अनुष्टुभ्, (१०) शार्दूलविक्रीडित, (११) अनुष्टुभ् (१२) अनुष्टुभ्, (१३) हरिणी, (१४) आर्या, (१५) आर्या, (१६) माल्यभारा, (१७) अनुष्टुभ्, (१८) अनुष्टुभ्, (१९) शार्दूलविक्रीडित, (२०) अनुष्टुभ्, (२१) माल्यभारा, (२२) अनुष्टुभ् (२३) शार्दूलविक्रीडित (२४) अनुष्टुभ् (२५) शार्दूलविक्रीडित (२६) अनुष्टुभ् (२७) आर्या (२८) शार्दूलविक्रीडित (२९) अनुष्टुभ् (३०) द्रुतविलंबित (३१) शार्दूलविक्रीडित (३२) अनुष्टुभ् (३३) रथोद्धता (३४) वसततिलका (३५) अनुष्टुभ् (३६) वसततिलका (३७) वसततिलका (३८) आर्या (३९) आर्या (४०) आर्या (४१) शिखरिणी (४२) आर्या (४३) वसततिलका (४४) मालिनी (४५) वसततिलका (४६) आर्या (४७) पुष्पिताग्रा (४८) आर्या (४९) मालिनी (५०) अनुष्टुभ् (५१) अनुष्टुभ् (५२) अनुष्टुभ् (५३) अनुष्टुभ् (५४) अनुष्टुभ् (५५) अनुष्टुभ् (५६) शार्दूलविक्रीडित (५७) हरिणी (५८) शार्दूलविक्रीडित

**प्रकरण सहावें**—(१) वंशस्थ (२) अनुष्टुभ (३) शार्दूलविक्रीडित (४) अनुष्टुभ् (५) अनुष्टुभ् (६) वसततिलका (७) आर्या (८) अनुष्टुभ् (९) अनुष्टुभ् (१०) वसततिलका (११) अनुष्टुभ् (१२) उपजाति (१३) शार्दूलविक्रीडित (१४) शार्दूलविक्रीडित (१५) अनुष्टुभ् (१६) अनुष्टुभ् (१७) उपजाति (१८) अनुष्टुभ् (१९) अनुष्टुभ् (२०) शार्दूलविक्रीडित (२१) स्रग्धरा (२२) अनुष्टुभ् (२३) अनुष्टुभ् (२४) उपजाति (२५) आर्या (२६) हरिणी (२७) शिखरिणी (२८) उपजाति (२९) अनुष्टुभ् (३०) अनुष्टुभ् (३१) शार्दूलविक्रीडित (३२) शार्दूलविक्रीडित (३३) शार्दूलविक्रीडित (३४) इंद्रवज्रा

**प्रकरण सातवें**—(१) मालिनी (२) अनुष्टुभ् (३) अनुष्टुभ् (४) अनुष्टुभ् (५) मालिनी (६) अनुष्टुभ् (७) पुष्पिताग्रा (८) उपजाति (९) उपजाति (१०) अनुष्टुभ् (११) अनुष्टुभ् (१२) उपजाति (१३) अनुष्टुभ् (१४) अनुष्टुभ् (१५) अनुष्टुभ् (१६) अनुष्टुभ् (१७) अनुष्टुभ् (१८) अनुष्टुभ् (१९) उपजाति (२०) अनुष्टुभ (२१) अनुष्टुभ्

**प्रकरण आठवें**—(१) शार्दूलविक्रीडित (२) पृथ्वी (३) अनुष्टुभ् (४) अनुष्टुभ् (५) अनुष्टुभ् (६) पृथ्वी (७) अनुष्टुभ् (८) अनुष्टुभ् (९) वंशस्थ (१०) पृथ्वी (११) उपजाति (१२) इंद्रवज्रा (१३) शार्दूलविक्रीडित (१४) उपजाति (१५) अनुष्टुभ् (१६) अनुष्टुभ् (१७) वैदिक (उपजातिसदृश)

